# मराठेशाहीचा वद्यपक्ष



# (२)

# प्रतिपदा

(पूर्वरात्र

लेखक

साधुदास

( वनविहार, रणविहार, गृहविहार इ० काव्यांचे व मराठींची मजावट इ० गद्यग्रंथांचे कर्ते. )

सन १९२५.

किंमत १। रुपया.

# अर्पणपत्रिका.

———:():———

थेऊरच्या तपोभूमीवरून महाराष्ट्रास मांगल्याचे संदेश देणारी

अर्वाचीन सती-सावित्री

वज्रचूडेमंडित सकलसौभाग्यवती

## कै. श्रीमंत रमाबाईसाहेब पेशवे,

याच्या पुण्यपावन चरणी

त्याच्या बालकाचा प्रेमपूर्वक नजराणा.

# निवेदन.

---:०:---

प्रस्तुत स्वराज्यप्राप्तीकरितां चाललेल्या झगड्यांत राष्ट्राची जी कुचंबणा होत आहे, तिची मीमांसा करूं लागलें ह्मणजे एक गोष्ट प्रमुखत्वानें नजरेंत भरल्यावाचून राहत नाही, ती ही कीं स्वराज्यप्राप्तीकरिता चालवावयाच्या चळवळीच्या बुडाशी साऱ्या राष्ट्राची जी एक संघटित व एकरूप प्रेरक शक्ति असावयास पाहिजे ती अद्याप हिंदुस्थानात व्हावी तशी उत्पन्न झाली नाहीं. हिंदुस्थानचा अवाढव्य विस्तार, त्यात नादणाऱ्या भिन्नधर्मीयांच्या व भिन्नजातीयाच्या स्वार्थाविषयीं परस्पर-विरोधी आकुंचित कल्पना, त्याच्या रोमरोमातून व नसानसातून बद्धमूल झालेले संस्कार, आणि राष्ट्रीयत्वपोषक शिक्षणाचा अभाव, ह्या कारणातून कोणतीं कारणे व ती किती प्रमाणात राष्ट्राच्या कल्याणाला मारक होत आहेत याची यथावत् कल्पना जर यावयास पाहिजे असेल तर ती राष्ट्राच्या पतित काळातील हालचालींचें निरीक्षण करण्यापेक्षा पतनोन्मुख कालातील हालचालींचें निरीक्षण करण्यानेंच अधिक स्पष्ट रीतीनें होणार आहे व तीच एकंदरीत अधिक बोधप्रद ठरणार आहे. हा विचार मनात आणूनच आह्मी ही कादंबरीमाला सुरूं केली आहे.

प्रस्तुत माला चालू करण्यात आमचा आणखीही एक हेतु आहे. तो हा कीं, स्वराज्य घालविण्याचे काम हळू हळू चालवीत असता आह्मी कसे होतों व काय करीत होतों आणि ते घालविण्याचे शतकृत्य केल्यावर आह्मी कसे झालों आहोत व काय करीत आहों, याचीही वाचकाना निःसंदिग्ध कल्पना यावी! ह्मणजे आमच्यातील कोणत्या दोषामुळे आह्मी स्वराज्य गमावले हें तर वाचकाना कळेलच, पण त्याबरोबरच आमच्यातील कोणत्या गुणामुळें आह्मी ते एका काळीं कमावूं शकलों व काही काळ टिकवू शकलो हेही त्याच्या लक्ष्यात येईल. अशा रीतीने आपल्या गुण दोषाच्या द्विविध दर्शनाने वाचकास आपल्या राष्ट्रपिंडाच्या स्वभावाची आणि त्यांतील भल्याबुऱ्या विशेषाची यथार्थ कल्पना बांधता येईल, आपण कालाच्या प्रवाहांत पोहत चाललों आहोंत कीं वाहावत चाललों आहोंत हें आजमावतां येईल आणि इतउत्तर आपलें कर्तव्य काय हेंही निश्चित ठरविता येईल, अशी आह्मास उमेद आहे.

वरील उद्देशानें कादंबरीमाला गुंफावयाची ह्मणजे तिचें अधिष्ठान निर्भेळ ऐतिहासिक सत्यावरच ठेवलें पाहिजे हे उघड आहे आणि त्या धोरणानेंच आह्मी

प्रस्तुत मालेंत अस्सल ऐसिहासिक कागदपत्रांचा व साधनांचा भरपूर उपयोग करणार आहोंत. किंबहुना असें ह्मटलें तरी चालेल कीं थोडासा काल्पनिक मजकूर घालून आह्मी जरी या मालेला कादंबरीचें कल्पनारम्यत्व आणण्याचा प्रयत्न करीत आहों, तरी ती खरोखरी महाराष्ट्राच्या साम्राज्याच्या आणि पर्यायानें हिंदुस्थानच्या इ. स. १७६७ पासून १८१८ पर्यंतच्या इतिहासाच्या रूपानेंच उतरणार आहे. वरील निर्बंधामुळें आह्मांस एक मोठी अडचण उत्पन्न होणार आहे, ती ही कीं, एखाद्या छोट्याशा कथासूत्राभोंवतीं वेगवेगळ्या प्रसंगांचें जाळें विणून लेखकाला आपली मर्यादित कृति रम्य स्वरूपात नटवितां येते, तशी आह्मांस येणार नाही. पण त्याला आमचा निरुपाय आहे. आह्मांस आमच्या मालेंतील प्रत्येक कथानकासाठीं छोटे छोटे राष्ट्रीय इतिहासाचे खंडच क्रमाक्रमानें घेऊन त्यांनाच शक्य तेवढें आकर्षक स्वरूप देण्याचा प्रयत्न करणें प्राप्त आहे, व ह्या दुर्वार्य बंधनामुळें उत्पन्न होणाऱ्या बोजडपणाच्या किंवा बेडौलपणाच्या दोषाकडे वाचक उदार मनानें कानाडोळा करतील असा आह्मांस भरंवसा आहे. कादंबरीलेखनाचा हा संप्रदाय नवीनच खरा, पण वाचकाना तो पसंत पडला हें प्रस्तुत मालेंतील पहिल्याच ‘ पौर्णिमा ’ कादंबरीच्यां झालेल्या स्वागतावरून सिद्ध झाले आहे हे कळविण्यास आह्मांस संतोष वाटतो. ‘ पौर्णिमे ’ च्या प्रकाशनाची व प्रसिद्धीकरणाची आमच्याकडून थोडीफार अनास्था झाली आणि तरी देखील तिचा पहिला भाग - पूर्वरात्र - बाहेर पडताच त्यावर वाचकाच्या ज्या उड्या पडल्या त्यांवरून प्रस्तुत लेखनप्रकार वाचकांना मनापासून आवडला असेच दिसून येऊन आह्मांस पुढील उद्योगाविषयीं पूर्ण उत्साह उत्पन्न झाला आहे. कित्येक वाचकानीं ‘ पौर्णिमे ’ ची उत्तररात्र लवकरच प्रसिद्ध करण्याविषयीं आह्मांस तगादा केला, कित्येकांनी सदर कादंबरींतील कांहीं प्रसंगाविषयी ऐतिहासिक आधाराची चौकशी केली आणि कित्येकांनीं आह्मास उपयुक्त माहिती पुरविली. आमच्या विविध वाचकाच्या समाधानासाठीं ‘ वद्य प्रतिपदे ’ पासून पुढील ग्रंथांच्या प्रकाशनांत पुस्तकाचा आकार बदलणें, बाइंडिंग अधिक आकर्षक करणें, प्रकरणांच्या मथळ्यांवर ऐतिहासिक आधार नमूद करणें वगैरे जरूर त्या सुधारणाचा आह्मी उपक्रम करीत अहोंत. तोही आमच्या प्रिय वाचकांस मान्य होईल अशी आशा आहे.

श्रीमंत बाबासाहेब घोरपडे, इचलकरंजी संस्थानचे अधिपति यांची आमच्या मालेवर प्रथमपासूनच कृपादृष्टि आहे. त्यांनीं ‘ पौर्णिमे ’ चें हस्तलिखित वाचून आम्हांस कित्येक बहुमोल सूचना केल्या, आपल्या संग्रहांतील पुस्तकें आमच्या उपयोगासाठीं दिलीं आणि आह्मांस हरतऱ्हेनें उत्तेजन देऊन कायमचें ऋणी करून

सोडलें ! सांगली संस्थानचे सुविद्य व प्रजावत्सल राजेसाहेब श्रीमंत चिंतामणराव आप्पासाहेब यांनीं प्रस्तुत लेखकाचें कार्य तें आपलेंच मानून ' वज्र प्रतिपदा ' आपल्या संस्थानच्या छापखान्यांत छापावयाची परवानगी दिली. सांगली संस्थानचे शिक्षणमंत्री प्रसिद्ध लेखक रा. सा. यशवंत व्यंकटेश कोल्हटकर यांनींही प्रस्तुत मालेवर पूर्ण ममत्व धरलें आहे. विलिंग्डन कॉलेजचे माजी प्रिन्सिपाल प्रो. लिमये यांनीं ' पौर्णिमे ' स प्रस्तावना लिहिली आहे. पुण्याच्या इतिहास संशोधक मंडळाचीही आमच्या मालेविषयीं पूर्ण सहानुभूति दिसून आली आहे. या सर्वांचें ऋण आमच्या शिरावर आहे व तें फिटण्यासारिखें नाहीं, तें फिटेल अशी आमची अपेक्षाही नाहीं; मात्र प्रस्तुत माला निर्विघ्न तडीस जाण्यास देशवर्तमानाच्या बलाप्रमाणेंच कालबलाचीही अनुकूलता आह्मांस परमेश्वरानें जरूर तेवढी द्यावी अशी त्याचे चरणीं अनन्य भावानें आमची प्रार्थना आहे. शेवटीं आमची नोकरी गोड करून घेणाऱ्या आमच्या प्रिय वाचकांचे आभार मानून व इतःपरच्या कादंबरीखंडाच्या प्रकाशनास विलंब होणार नाहीं असें आश्वासन देऊन आह्मी त्यांची रजा घेतों.

सांगली,
अक्षय्य तृतीया, शके १८५७

साधुदास

# अनुक्रमणिका.

———0———

# वध-प्रतिपदा–[ पूर्वरात्र ]

---

## उपोद्घात.

" पौर्णिमे "च्या कथानकांत दादासाहेबांनीं केलेलें पहिलें बंड आणि माधवराव पेशव्यांनी त्याचा शिताफीनें केलेला बीमोड याची हकीकत वाचकांनीं वाचलीच आहे. दादासाहेबांस धोडपेहून धरून आणल्यानंतर त्यांच्या साथी मंडळींचें पारिपत्य करण्याचा विचार सुरू झाला. खुद्द दादासाहेबांना तर श्रीमंत माधवराव पेशव्यांनीं सक्त नजरकैदेत ठेवलेंच, पण त्याच्या फितुराला मदत करणाऱ्या मंडळींना चांगली दहशत बसावी ह्मणून त्यांनीं जबर शिक्षा करण्याचें ठरविलें. दादासाहेबांचे एक साथीदार गंगाधर यशवंत चंद्रचूड याना पन्नास लक्ष रुपये दंड ठोटावून तो भरीपर्यंत श्रीमंतांनीं त्यांना नगरचे किल्यात कैदेत ठेवलें. तेवढ्याने ते वठणीस येतील असें न वाटल्यावरून बायकाकुणाविणीसुद्धा त्याचें कुटुंबच्या कुटुंब श्रीमंतांनीं कैदेत ठेवलें. गंगोबातात्यांनीं आपणाजवळ पैसा नाहीं असा पुष्कळ बहाणा करून पाहिला, पण त्याचा काहींएक उपयोग न होऊन त्याना पुढे दोन वर्षांनीं तीस लक्ष रुपये भरल्यावर सोडण्यात आलें.

दादासाहेबाचे दुसरे साथीदार दमाजीराव गायकवाड, पण ते लवकरच ह्मणजे ता. १८ आगष्ट १७६८ रोजीच मृत्यु पावले. त्यामुळे त्याच्या सरजामाचें बळ कमी करण्यास श्रीमताना आयतीच सधी मिळाली. दमाजीला गोविंदराव, सयाजी, फत्तेसिग आणि माणिकजी असे चार मुलगे होते. पैकी [illegible] तर श्रीमंतानीं धोडपच्या मोहिमेनतर लौकरच धरून आणून पुण्यास कैदेत ठेवले होते. पण दमाजी मेल्यामुळें श्रीमंताचा गोविंदरावावरचा रोष कमी होऊन त्यानीं त्याची मुक्तता केली. नंतर त्या चौघा भावांनीं गायकवाड सरजाम आपणास मिळावा ह्मणून श्रीमंतापाशीं पृथक् पृथक् मागणी केली. बरेच दिवस चर्चा चालून श्रीमंतानी शेवटी गोविंदरावासच सरदारीचीं वस्त्रे दिलीं. मात्र दादासाहेबाना कुमक केल्याबद्दल त्याजपासून दंड तेवीस लक्ष, नजराणा एकवीस लक्ष, मागील खंडणीची बाकी सव्वा पाच लक्ष, आणि इतर कांहीं किरकोळ मिळून साडेपन्नास लक्ष रुपये घेण्याचा ठराव केला. गायकवाडाला ही जी अद्दल घडली तिने त्याचे व इतर सरंजामदारांचेही चांगलेच डोळे उघडून त्यांना पुरती दहशत बसून राहिली.

नंतर भोसल्यांना शिक्षा करण्याचें काम श्रीमंतांनीं मनावर घेतलें. गोपाळराव पटवर्धन, रामचंद्रराव कानडे इत्यादि सरदारांना सैन्यासह परभारें मदतीस बोलवून श्रीमंतांनीं सन १७६९ च्या जानेवारींत पुणें सोडलें व नगरावरून औरंगाबादेकडे कूच केलें. जानोजी भोसल्यानेंही लढाईची सिद्धता केली. पण पेशव्यांचें बळ आपणापेक्षां फारच मोठें आहे हें जाणून त्यानें त्यांच्याशीं गनिमी काव्यानें लढण्याचा उपक्रम केला. या मोहिमींत विशेष रक्तपात झाला नांहीं. किरकोळ चकमकी कांहीं झाल्या. जानोजीनें धांवपळ करून श्रीमंतांना पुष्कळच दमविलें. पण श्रीमंतांनीं व त्यांच्या सरदारांनीं मोठमोठ्या मजला मारून अखेर त्याला उमरखेडाच्या आसपास कोंडलेंच. तेव्हां सर्वस्वनाश होण्याची वेळ आली असें पाहून जानोजीनें पेशवे सरकारांशीं तह केला, तो कनकापूरचा तह या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यांतील मुख्य कलमें हीं होतीं. (१) जानोजीनें दंडादाखल आठ लक्षांची जहागीर सरकारांत परत करावी, (२) अक्कलकोटकर भोसले शहाजी राजे यांचीं कांहीं उत्पन्नें व हक्क वऱ्हाड प्रांतीं होते, ते जानोजीनें जप्त केले होते, त्यांवरची जप्ती उठवावी, (३) पेशवाई मुलखापैकीं औरंगाबाद सुभ्यांत भोसले आजपर्यंत परभारें घासदाण्याचा ऐवज घेत होते, तो त्यांनीं इतउत्तर सरकारमार्फत घ्यावा, (४) पेशवे सरकारची मागणी येतांच भोसल्यांनीं सैन्यासह नोकरीस हजर व्हावें, (५) सरकार मंजुरीवांचून भोसल्यानीं फौज वाढवूं नये व कमी करूं नये, (६) पेशवे घराण्यांतील फितुरांना भोसल्यांनी थारा देऊं नये, (७) दिल्लीचा बादशहा, औंधचा नबाब, रोहिले, इंग्रज व मोंगल यांपैकीं कोणाशीही पेशवे सरकारच्या परवानगीवांचून सख्य करूं नये, आणि (८) भोसल्यांनीं दरसाल पांच लक्ष रुपये खंडणी पांच हप्त्यांनीं सरकारांत देत जावें. अशा रीतीनें भोसले आणि गायकवाड यांचा बंदोबस्त होण्यास जवळ जवळ वर्ष लागलें.

भोसल्यांवर ही मोहीम चालू असतां, मागें पुण्यांत श्रीमंत दादासाहेबांनीं फितूर करून पळून जाण्याचा प्रयत्न केला. तो वेळींच उघडकीस येऊन त्यांना धरून परत आणण्यांत आलें, व त्यांच्यावरचा पहारा अधिक सक्त करण्यांत आला. त्याबरोबर दादासाहेबानीं वेगळीच शक्कल काढली. आपण उपास करून जीव देणार असें जाहीर करून त्यानीं कांहीं उपासही केले. नाना फडणविसानी जेवणाचा आग्रह केल्यावरून त्यांना शिव्या दिल्या. त्रागा करून पेशव्यास भेवडावावें, असा दादासाहेबाचा बेत होता. आपणास पाच लक्षाची व दत्तक मुलास दोन लक्षाची अशा नेमणुकी करून द्याव्या आणि दत्तक मुलास पुण्यास आपणाजवळ आणून ठेवावें अशी दादासाहेबाची मागणी होती, ती श्रीमंतांनीं साफ नाकारली. अखेर दादासाहेबांना धर्मादायाकरितां दोन लक्ष रुपये देण्याचें आणि मुलगा आणून वडगावास ठेवण्याचें श्रीमंतानीं कबूल केलें आणि गुंता उरकला. जातां जाता दादासाहेबांनी आणखीही एक गोष्ट साधून

केली. ती ही कीं, या ताज्या फितुरांत जे आरोपी सांपडले होते-त्यांच्याबद्दल त्यांनीं त्रागा करून श्रीमंतांकडून माफी मिळवून घेतली!

१७६१ सालीं पानिपतावर झालेल्या पराजयामुळें मराठेशाहीचें वैभव लयास गेलें अशी हिंदुस्थानांतील अनेक राजेरजवाड्यांची जी समजूत झाली होती, ती गेल्या पांच सहा वर्षांत श्रीमंतांनीं सर्वथा पालटून टाकून पुन्हां एकदा मराठेशाहीच्या नांवाचा दरारा सर्वत्र बसविला. सन १७६३ सालीं त्यांनीं निजामअलीचा राक्षस-भुवनावर पराभव करून त्याजकडून वीस लक्षांचा नवा मुलूख मिळविला. सन १७६४-६५ मध्यें त्यांनीं हैदरखानावर स्वारी करून त्यानें बळकावलेला आपला सर्व मुलूख सोडवून घेतला आणि दरसाल बत्तीस लक्ष रुपये खंडणी देण्याचा करार त्याजकडून करून घेतला. नंतरचीं एक दोन वर्षें त्यांनी राज्याचा उत्कृष्ट बंदोबस्त करण्यांत घालविलीं. इतक्यांत हैदरानें पुन्हा कुरापत काढल्यावरून सन १७६६ जून पासून १७६७ जून पर्यंत त्यानी त्याजवर दुसरी मोहीम केली व त्याची चांगली खोड मोडून त्याच्याकडून साडेसोळा लक्ष रुपये रोख घेऊन व साडेसोळा लक्षांच्या आणखी एका हप्त्याचा करार करून घेऊन ते पुण्यास परत आले.

पानिपतच्या अपयशानंतर मराठेशाहीला झालेल्या व्रणांपैकीं आतां एकच व्रण शिल्लक राहिला होता. त्या लढाईत पेशव्याच्या फौजेची मोठी कत्तल झाल्यामुळें उत्तर हिंदुस्थानांतील त्याच्या मुलखाला संरक्षण राहिले नाहीं आणि रजपूत, जाट, रोहिले इत्यादि संस्थानिकांनी, ज्याला जसा फावेल तसा पेशव्याच्या मुलुखावर हात मारून तो बळकावला होता. दादासाहेबांच्या फितुराचा बंदोबस्त झाल्यावर श्रीमंतांनीं आपला उत्तर हिंदुस्थानांतला मुलूख सोडवून घेण्याचें मनांत आणले, आणि रामचंद्र गणेश कानडे याना मुख्य सेनापतीचें पद देऊन विसाजी कृष्ण बिनीवाले, महादजी सिंदे व तुकोजीराव होळकर याना त्यांच्या मदतीस देऊन त्यांनी आपले सैन्य उत्तर हिंदुस्थानांत रवाना केले. या सैन्याने सन १७७० च्या जानेवारीपासून १७७२ च्या जून पर्यंत तिकडील मोहीम केली. तेवढ्यात श्रीमंतांच्या या पराक्रमी सरदारांनीं जवाहिरमल्ल जाटाचा मुलगा नवलसिंग याचा गोवर्धन येथे पराभव करून आपला आग्रा प्रांत व किल्ला सोडवून घेतला आणि त्याजकडोन पासष्ट लक्ष रुपये खंडणी घेतली. नंतर त्यानी अहंमदखान बंगस या पठाणाचा पराजय करून त्यानें बळकाव-लेला आपला मुलूख सोडवून घेतला. नंतर त्यांनी दिल्लीचा पळून गेलेला बादशहा शहाअलम यास आणून दिल्लीच्या तख्तावर पुन्हां बसविले. मग त्यांनी रोहिल्यांची पाठ घेतली. पानिपतच्या वेळीं नजीबखान रोहिल्यानें केलेला नीचपणा मराठ्यांच्या चांगला लक्ष्यांत असल्यामुळें या वेळी त्यांनी रोहिल्याचें उसनें पुरतें फेडून घेतलें. अशा रितीनें श्रीमंतांचें उत्तरहिंदुस्थानातलें अवशिष्ट राजकारण उत्तमप्रकारें सिद्ध

होऊन सन १७७१ च्या अखेरीस त्यांचें उत्तर हिंदुस्थानांतलें राज्य व इभ्रत पुन्हा पूर्ववत् निर्वेध झालीं.

सन १७६७ पासून १७७१ अखेरपर्यंतचीं पांच वर्षें मराठेशाहीच्या परमोत्कर्षाचीं होत. या पांच वर्षांत महाराष्ट्रराज्यचंद्राची पौर्णिमा भरपूर नांदली, आणि ह्मणूनच आह्मी आमच्या कादंबरीमालेंतील १७६७-६८ च्या पाहिल्या कथानकास "पौर्णिमा" हें नांव दिलें हें वाचकांच्या ध्यानीं आलेंच असेल. आतां प्रश्न इतकाच होता कीं, मराठेशाहीची यापुढेंही अशीच भरभराट होत जाणार कीं तें क्षयाला लागणार? देश, काल, वर्तमान यांच्या अनुकूलतेच्या दृष्टीनेंच विचार केला तर मराठेशाहीला या वेळीं पुष्कळच गोष्टी अनुकूल होत्या. इंग्रजांसारखे मुत्सद्दीगिरीचे आणि लष्करी शिस्तीचे शास्त्रीय धडे दुरून देणारे गुरूजी, ह्मं ह्म ह्मणतां त्यांचें अनुकरण करून त्यांच्यावरच उलट मात करून त्यांना चकित करणारा माधवराव पेशव्यांसारखा लोकनायक, सखारामबापू व नाना फडणीस यांच्या सारखे बुद्धिमान कारभारी, रामचंद्रराव कानडे, महादजी शिंदे, गोपाळराव पटवर्धन, विसाजीपंत बिनीवाले यांच्यासारखे रणधुरंधर सेनापती आणि मराठे व मावळे यां सारख्या काटक लोकांची सेना, हा सर्वच संच इतका नमुनेदार जमला होता कीं, दैवानें अमळ अनुकूळ हात दिला असता तर साऱ्या हिंदुस्थानभर मराठेशाहीचें स्वराज्य होण्यास कसलीच अडचण नव्हती. पण तेंच दैव प्रतिकूल झाल्यामुळें हा सारा उत्तमोत्तम संच फुकट गेला आणि क्रमाक्रमानें मराठेशाहीला उतरती कळा लागली! थोड्याच दिवसांत माधवराव पेशवे मरण पावले. श्रीमंतांचा हा मृत्यू इतका अकालीं व अस्थानीं झाला कीं, त्यानें एकट्या पेशव्यांच्या घराण्याची नव्हे, एकट्या मराठेशाहीची नव्हे, तर साऱ्या हिंदुस्थानची अपरंपार हानि केली. माधवरावांच्या बरोबरच त्यांचे उच्च विचार, त्यांच्या राष्ट्रीयत्वाविषयींच्या उदात्त कल्पना, आणि त्यांची कर्तबगारी लयाला गेली, आणि त्यांच्या इतका आटोप व कर्तृत्व त्यांच्या पश्चात् दुसऱ्या कोणत्याही महाराष्ट्रीयास न लाभल्यामुळें इतउत्तरच्या राजकीय उलाढालींत महाराष्ट्र क्रमाक्रमानें फिका पडत गेला.

मराठेशाहीच्या नाशाची अनेकानीं अनेक प्रकारांनीं मीमांसा केली आहे. आपापसांतील दुही, जातिमत्सर, प्रचलित राजकारणाचें अज्ञान, भौतिक सुधारणांविषयी उदासीनता, लष्करी शिस्तीचा अभाव इत्यादि अनेक कारणें मराठेशाहीच्या नाशास हेतुभूत झालीं असें बहुतेकांचें म्हणणें असून तें थोडें फार खरेंही आहे, पण हीं सर्व कारणें तात्कालिक निमित्तें होत. हे सर्व दोष उत्पन्न होण्याचें जें एकच एक मूलकारण "राष्ट्रीय भावनेचा अभाव" तें खरोखरी मराठेशाहीच्या नाशास कारण झालें. हिंदुस्थानांत जोंपर्यंत एकच हिंदुधर्म नांदत होता आणि त्याचें अद्वैतवादी

तत्वज्ञान प्रवृत्तिपर होतें तोंपर्यंत हिंदुस्थानांत एकराष्ट्रीयत्वाची कल्पना जागरूक होती. बौद्ध, मुसलमान वगैरे धर्मपंथांचा हिंदुस्थानांत प्रवेश झाल्यावर धर्मभेदाच्या चिरांनीं एकराष्ट्रीयत्वाचीं शकलें पडलीं, हिंदुधर्माच्या प्रवृत्तिपर आचाराचें निवृत्तिपर आचारांत रूपांतर झालें, राष्ट्रीयभावना नष्ट झाल्यामुळें राष्ट्रीय शिक्षणाचे आखाडे लुप्त झाल्याबरोबर राष्ट्रकर्तव्य जाणणाऱ्या कर्तत्ववान् पुरुषांची पैदास बंद झाली आणि हिंदुस्थानचा राष्ट्रपणा जाऊन तो देश अनेक धर्मपंथ, अनेक आचार, अनेक दोष यांनीं भरलेला एक बेवारशी बिनहिशेबी आणि बेजबाबदार मामला होऊन राहिला! त्यामुळें ओसरीवर थारा मागणाऱ्या पाहुण्याला दिवाणखान्यांत अगत्यानें नेऊन बसाविणें, आपलें वाटोळें करावयास सज्ज झालेल्या शत्रूला आपल्या घरांतील भेद देणें, आपल्या घराची झडती घ्यावयास आत शिरलेल्या परकीयास आपल्यापुढचें वाढलेलें ताट सुपूर्त करून आपण कांजी पिऊन राहणे, आपल्याच हातानें आपल्या घरावर परक्याच्या नांवाची पाटी लावणें, असले अद्भुत चमत्कार महाराष्ट्राच्या अर्वाचीन इतिहासांत भारत पुत्रांनीं शेंकड्यांनीं नव्हे, हजारांनीं करून दाखविलेले आढळतात! ज्या देशाचा इतका बौद्धिक अधःपात झाला तो पारतंत्र्यात खितपत पडणार हें ठरलेंच होतें. कदाचित् पुष्कळ शतकें स्वराज्याचे सुखसोहळे भोगून लाचावलेल्या भरत खंडाला दास्यरूपी प्रायश्चित्ताची शिक्षाही परमेश्वराच्या दरबारात सुनावली केली असेल. पण खेदाची गोष्ट एवढीच की, आपल्या राष्ट्राच्या अवनतीचें अचुक निदान ओळखून त्यावर रामबाण उपाययोजना करण्याजोगा अष्टपैलु मोहरा शिवाजी महाराजांच्या पश्चात् आपणास एवढा एकच लाभला असूनही तो दैवानें महाराष्ट्रास आणखी थोडे दिवस पचूं दिला नाही! मुळींच न देण्यापेक्षा हातात देऊन काढून घेणें हें अधिक निर्दयपणाचें लक्षण होय हे हिंदुस्थानच्या दुर्दैवाच्या लक्ष्यांत आलें नसावे, किंवा येऊनही त्यानें केवळ आपल्या आसुरी आनंदाखातर तसे केलें असावें!!

आमच्या प्रस्तुतच्या कथानकाचा काल सन १७६९–७२ च्या दरम्यानचा आहे, आणि त्यात आम्हाला स्वराज्याच्या पूर्णचंद्राचा कांटा क्षयाकडे झुकला हे दाखवावयाचें आहे. "पौर्णिमे" चे कथानक सन १७६८ च्या जूनमध्यें संपले हे वाचकाच्या स्मरणात असेलच. तेथपासून सन १७७० च्या आरंभापर्यंतच्या मराठेशाहीतील उलाढालीचे थोडक्यात दिग्दर्शन केलेच आहे. एवढ्या अवधीत इंग्रेज कंपनीच्या स्थितीत ह्मणण्याजोगा फरक पडला नाहीं. नाहीं ह्मणावयास तिनें निजामअल्लीचा राजमहेंद्री परगणा जबरदस्तीनें बळकावला, एवढी तिच्या राज्यात नवी भर पडली. निजामअल्लीनें या अत्याचाराबद्दल पुष्कळ हातपाय आपटले, पण इंग्रेजांवर हल्ला करून त्यांचें शासन करण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं नसल्यामुळें त्याला निमूटपणें गप्प बसणें भाग पडलें! सन १७६९ त हैदर नाइकानें इंग्रेजांशीं

सामना दिला. त्यांत तो बराचसा विजयी झाल्यामुळें त्याला एक प्रकारचा आत्म-विश्वास उत्पन्न झाला आणि त्यानें पेशवे सरकारांची कुरापत काढण्याचा उपक्रम केला. त्यांची खंडणी देण्याचें बंद करून त्यानें उलट कर्नाटकांतील त्यांच्या मांडलिक संस्थानिकांकडून आपणच खंडणी उकळण्यास सुरवात केली. त्यावरून त्याच्यावर स्वारी करणें पेशव्यांना भाग पडलें. ही हैदरनाइकावरील तिसरी मोहीम आणि श्रीमंत माधवराव पेशव्यांची अवशिष्ट कारकीर्द हाच आमच्या प्रस्तुत कथानकाचा विषय असल्यामुळें आतां एकदम कथानकासच प्रारंभ करूं.




**म्हैसूरच्या तिसऱ्या मोहिमेचें रणक्षेत्र.**

## प्रकरण १ लें.

खरे ले. ८३३-३४]　**दोन जबरदस्तांचा मांडलीक.**　[का. शु. ४-शके १६९१

शालिवाहन शकाच्या सतराव्या शतकाच्या अखेरीस तुंगभद्रा नदीच्या कांठीं असलेल्या पुराण प्रसिद्ध विजयनगर शहराच्या आग्नेयीस हरपनहळ्ळी नांवाचें शहर असून त्याच नांवाच्या संस्थानाचें तें राजधानीचें गांव होतें. हरपनहळ्ळीचा किल्ला आणि तुंगभद्रा नदी यांच्या दरम्यान् हरपनहळ्ळीकरांचें राज्य असून तें संस्थान पेशवे सरकारांच्या मांडलिकांत मोडत असे. कर्नाटकाचे उत्तर कर्नाटक आणि दक्षिण कर्नाटक असे दोन भाग कल्पिले तर उत्तर भागांत बिदनूर, चित्रदुर्ग, हरपनहळ्ळी, अनागोंदी आणि रायदुर्ग हीं साधारण मोठ्यांपैकी संस्थानें, त्यांच्या खालोखाल चित्रदुर्गचें संस्थान आणि त्यांखेरीज कांहीं संस्थानें असून दाक्षिण भागांत म्हैसूरचें प्रचंड राज्य पसरलें होतें. दक्षिण कर्नाटकांतही तंजावर आणि गुत्ती या नांवांचीं दोन संस्थानें होतीं· त्यांतलें तंजावरचें संस्थान शिवाजी महाराजांच्या वंशाकडेच चाललें असून, गुत्तीचें संस्थान इतिहासप्रसिद्ध सरदार संताजी घोरपडे याचा पुतण्या सिधोजी यानें गुत्ती, गजेंद्रगड आणि सोंडूर हे किल्ले व त्यांभोंवतालचा प्रदेश जिंकून स्थापन केलें होतें. याशिवाय कर्नाटकच्या पश्चिम बाजूला अर्काट, शिरें, कडप्पे आणि कर्नूळ हीं चार मुसलमानी संस्थानें असून तीं आपणांस बरेच दिवस हैदराबाद-कर निजामअल्लीचीं मांडलिक ह्मणवून त्यास खंडणी देत असत. या संस्थानांखेरीज सोंधें, कित्तूर, नवलगुंद, हावनूर, शिरहट्टी आणि डंबळ येथील देसाई आणि अनेक पाळेगार हेही आपणांस छोटे संस्थानिक समजून कर्नाटकांत ठिकठिकाणीं आपला अंमल चालवीत होते! शिवाजी महाराजानी कर्नाटकांत मुलूख जिंकून जें स्वराज्य स्थापन केलें होतें त्यातला बराचसा भाग मध्यंतरी या कर्नाटकांतील नबाबांनीं आणि संस्थानिकानीं बळकावला होता. तो पेशवे मंडळीनी वरचेवर स्वाऱ्या करून बहुतेक परत मिळविला होता. पण कर्नाटकचा कायमचा बंदोबस्त करावयास पेशव्याना अद्याप चांगलीशी फुरसत मिळाली नसल्यामुळे त्याच्या कर्नाटकातील अमलाला शाश्वती आली नव्हती.

आमच्या कथानकाच्या काळीं सावनूरच्या पूर्वेकडे, तुगभद्रेच्या तीरापासून हर-पनहळ्ळीपर्यंत दाट जगल पसरले असून, त्या जगलाची शोभा कित्येक ठिकाणीं नयन-मनोहर तर कित्येक ठिकाणीं निसर्गभयंकर होती. हे जंगल विजयानगर, शिरहट्टी या बाजूंना तुंगभद्रेच्या कांठाने पसरले असून त्यात जागजागी बेरड, रामोशी वगैरे लुटारू लोकाची वसती असे. जंगलात ठिकठिकाणी दाट झाडी असून

त्यांतून हिंस्र श्वापदें असल्याचा बोभाटाही वरचेवर ऐकूं येई. शेजारपाजारच्या खेड्यांतील रहिवाशांच्या वित्तावर डल्ला मारून पळून येणाऱ्या रामोशाला आणि गुरांढोरांवर हल्ला करून त्यांतलें एखादें उचलून आणणाऱ्या वाघाला या जंगलांत सारखाच आश्रय मिळत असे. डोंगरकपारीच्या आधारानें राहणारे बेरड आणि पाल्यापाचोळ्याच्या आधारानें राहणारे हिरवे साप या जंगलांत हिंडणाऱ्या बेसावध प्रवाशाला सारखेच प्राणघातक होत असत. या जंगलांतून वाटा मुळींच नव्हत्या असें नाहीं, पण होत्या त्या फार अवघड असून चांगल्या माहितगार लोकांनाच तेवढ्या माहीत होत्या. या परिस्थितीमुळें "शिरहट्टीची बारी" ह्मणजे महाराष्ट्रांतून कर्नाटकांत उतरूं पाहणाऱ्या सैन्याला काय, किंवा एकट्या दुकट्या प्रवाशाला काय, सारखीच भीतिदायक होऊन बसली होती.

आमच्या कथानकास सुरवात कार्तिक शुद्ध चतुर्थी शके १६९१ ह्मणजे इंग्रेजी मितीनें तारीख ३ नवंबर सन १७६९ या दिवशीं होते. त्या दिवशीं संध्याकाळच्या सुमारास वर निर्दिष्ट केलेल्या जंगलांत सावनूर आणि हरपनहळ्ळी यांच्या दरम्यान् तुंगभद्रेच्या उत्तर तीरावर कुपेळूर नांवाच्या गांवाजवळ हैदर नाइकाची छावणी पडली होती. त्याच्याबरोबर दहा हजार स्वार, पंधरा हजार गारदी, दहा हजार प्यादे, चार हजार कामाठी, शंभर तोफा आणि सव्वाशे हत्ती इतका सरंजाम होता! हैदर नाईक दक्षिण कर्नाटकांतील संस्थानिकाकडून खंडण्या घेत घेत प्रथम हरपनहळ्ळीस आला, आणि तेथल्या संस्थानिकाकडून त्यानें जबरीनें खंडणी वसूल केली. तेथल्या मुक्कामांतूनच त्यानें सावनूरकर नबाबास चिटी पाठविली कीं "खंडणीस मातबर पाठवून बोली चुकवून देणे, नाहीतर मजा राहणार नाहीं!" हैदराचा सावनूरकर नबाबांकडे खंडणी मागण्याचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नव्हता, पण त्यानें पेशव्याची कुरापत काढण्याचा आतां निश्चयच केला असल्यामुळे त्याच्या ह्या मांडलिकाकडे वर लिहिल्याप्रमानें निरोप पाठविला होता. या निरोपाचा आजच्या मराठींत "खंडणी ठरविण्यासाठीं कोणा तरी जबाबदार माणसास पाठवा, आणि तिची रक्कम ठरवून घेऊन तिचा तावडतोब निकाल करा, नाहीं तर आह्मी तुमची शोभा करून जबरीनें खंडणी वसूल करूं" असा अर्थ होतो, यावरून हैदर नाईक या वेळीं किती उद्दाम बनला होता, याची वाचकास कल्पना येईल. हरपनहळ्ळीची खंडणी वसूल झाल्याबरोबर हैदर सावनूरच्या रोखानें निघाला, आणि वर ह्मटल्याप्रमाणें कार्तिक शुद्ध चतुर्थीच्या दिवशीं त्यानें तुंगभद्रा उतरून कुपेळुरास छावणी दिली.

संध्याकाळीं सूर्यास्ताच्या सुमारास हैदराच्या राहुटींत दोन इसम बोलत बसले होते. त्यांजला एक खुद्द हैदर नाईक असून दुसरा त्याचा दुभाष्या अल्ली जमानखान होता. हैदराचें वय या वेळीं सत्तेचाळीस वर्षांचें होतें, तथापि त्याची तरतरी

एखाद्या तरुण मनुष्यासही लाजविण्याजोगी होती. त्याचा वर्ण काळा, चेहरा उग्र आणि दृष्टि अत्यंत भेदक होती. उत्कृष्ट सेनानायकास अवश्य असणारे सर्व गुण त्याच्या अंगीं जन्मजात असल्यामुळें तो एका यःकश्चित् शिपायाच्या पोटीं जन्मास येऊन अखेर म्हैसूरचा राजा झाला. तो बोलीनें मिठास, कृतीनें दगलबाज, आणि नशिबानें खंबीर असल्यामुळें अनेक संकटांतून बचावत जात जात म्हैसूरचा राजा चिक्क कृष्णराय याला कैदेंत टाकून व त्याच्या दोनी भावांना देशोधडीला लावून, त्यानें म्हैसूरचें राज्य बळकावलें होतें. तो गनिमी काव्याच्या लढाईत मराठ्यांचा शिष्य व मैदानी लढाईत इंग्रेजांचा शिष्य शोभण्यासारखा होता. त्यानें कवाइती फौज तयार करून कर्नाटकांतील पुंड-पाळेगारांचा प्रथम निःपात करून टाकला, आणि क्रमाक्रमानें मराठ्यांच्या मुलखावर आक्रमण करण्यास आरंभ केला. त्याच्या नांवाचा दरारा होतां होतां इतका बसला कीं, तो शेजारीं आला रे आला कीं एखाद्या मसनदी-वरील नबाबापासून तों रानावनांतल्या पुंडबेरडापर्यंत सर्व लोक भीतीनें चळचळा कांपूं लागत !

हैदराबरोबर बोलत असलेला दुसरा इसम अल्लीजमानखान हा त्याचा दुभाष्या असून त्याचें वय पंचावन्नाच्या सुमाराचें दिसत होतें. त्याचा चेहरा उभट, डोळे बारीक, आणि वर्ण निमगोरा होता. त्याला मराठी, कानडी, तेलगू, मल्याळी, इंग्रेजी आणि ऊर्दु इतक्या भाषा उत्कृष्ट येत असल्यामुळें हैदर अल्ली त्याला नेहमीं आपणाजवळ बाळगीत असे. स्वतः हैदराला मुसलमानीशिवाय मराठी, कानडी आणि तेलगू या तीन भाषा उत्तम प्रकारें समजत होत्या, पण तो पक्का बिलंदर असल्यामुळे आपल्या एकट्याच्याच ज्ञानावर विश्वासून न राहतां चांगल्या माहितगार माणसाच्या ज्ञानाचा उपयोग करावा अशा हेतूनें त्यानें अल्ली-जमानखानास आपल्या बरोबर बाळगले होतें. कुपेलुरावर तळ दिल्याबरोबर त्यानें सावनूरच्या नबाबास शिक्षा करण्याचें मनात आणलें होते, आणि त्यासंबंधींच त्याचें या वेळीं अल्लीजमानबरोबर बोलणें चाललें होतें. तें अर्थातच मुसलमानींत चाललें होतें, पण आमच्या वाचकाच्या सोईसाठी तें आह्मी मराठीत देतो.

"अल्लीजमानसाहेब," हैदर नाईक ह्मणाला, "सावनूरकर नबाबाचा माणूस येऊन मिठाई नजर करून गेला, पण त्यानंतर त्याची काहींच हालचाल दिसत नाहीं. मी त्या मिठाई आणणाऱ्या जासुदाला दोनशे रुपये इनाम दिले. सावनूरकराचा दगलबाजी करण्याचा तर बेत नसेलना?" हे मिठाईचें प्रकरण काय आहे हें कदाचित् आमच्या वाचकाच्या लक्ष्यात आले नसेल ह्मणून आह्मी त्याचा थोडासा खुलासा करतो. एखादा प्रबळ वैरी चालून आला ह्मणजे त्याच्याबरोबर सलोखा करण्याची आपली इच्छा आहे, हे दाखविण्याकरिता त्याला मिठाई नजर

पाठविण्याचा पूर्वी रिवाज असे. हैदरानें हरपनहळ्ळीहून प्रकरणाच्या आरंभीं लिहिल्याप्रमाणें निरोप पाठवितांच सावनूरकरांची भीतीनें त्रेधा उडून जाऊन त्यांनीं त्याच्याकडे मिठाई पाठवून दिली होती. हैदरानें तिचा स्वीकार करावयाचा कीं नाहीं याचा विचार करण्यांतच दोन दिवस घालविले. त्याच्या मनांत सावनूरचें राज्य जिंकावयाचें होतें. पण पेशव्यांची फौज सावनुरापासून जवळच आली आहे हें कळ-ल्यामुळें त्यानें लढाईचा बेत तहकूब करून सावनूरकरांपासून काय खंडणी मिळेल तेवढी उकळावी असा विचार केला आणि त्याची मिठाई घेऊन, ती आणणाऱ्या जासुदाला दोनशें रुपये बक्षीस देऊन परत पाठविलें. पण त्या गोष्टीस एक दोन दिवस झाले असून अजून सावनूरकरांचा कोणी माणूस खंडणीची बोली करावयास येत नाहीं असें पाहून तो संतापला होता, व त्या क्रोधाच्या भरांत त्यानें वरील उद्गार काढले हें वाचकांच्या ध्यानी आलेंच असेल.

"दगलबाजीचाच कांहीं उद्देश असेलसे वाटत नाहीं," अलीजमान ह्मणाला, "पण ग्यान्विंदाच्या निरोपाचा विचार होऊन खंडणी किती देता येईल याचा सुमार ठरवावयासच वेळ लागला असेल."

"मला नाहीं तसें वाटत," हैदर मान हलवून ह्मणाला, "पेशव्याची फौज सावनुरापासून दहा कोसावर आली आहे, तिच्या आधारावर सावनूरकरांनी अळंटळं चालविली असावा. आज पाचसहा महिने सावनूरकरांनीं आह्माला नुसत्या गोड गोड थापावर झुलवीत ठेवले आहे, आणि आता पेशव्याची फौज मदतीस आली असे पाहतांच त्यांनीं आह्माला वाटाण्याच्या अक्षता लावावयाचा बेत केला आहे. ठीक आहे, मिया हैदरखानाशीं गाठ आहे ह्मणावे! उद्या सध्याकाळच्या आत सावनुरावर तोफा डागून सारें सावनूर जमीनदोस्त करून टाकतो." बोलता बोलता हैदराचा चेहरा लाल होऊन त्याच्या भुवया चढल्या व तो एखाद्या वाघासारखा उग्र दिसूं लागला.

"हुजूर खाविंदाचा तर्क मजपेक्षा अधिक बरोबर असणार हें तर खरेंच," अलीजमान ह्मणाला, "पण मला अजूनही असेंच वाटते कीं सावनूरकर नवाब खाविंदाना दुखविण्याचे धाडस करणार नाहीत. पेशव्याची फौज काय, आज आली आहे, उद्या परत जाईल. पण आमची आणि सावनूरकराची गाठ मात्र कायमची आहे. अशा स्थितींत खंडणीसारख्या शुष्क बाबतींत सावनूरकर खाविंदाना नाराज करतील असें माझे तरी मन सांगत नाहीं."

अलीजमानचा तर्कच खरा ठरला. कारण त्याचें शेवटचें वाक्य पुरें होते इतक्यात एक शिपाई राहुटींत येऊन हैदरास कुर्निसात करून ह्मणाला, "सावनूरकर नबाबांकडून कारकून आले आहेत." हैदरानें "त्यांस घेऊन ये" असें ह्मणतांच शिपाई गेला व सावनूरकरांच्या कारकुनास घेऊन आला. हैदराच्या आतांच्या मन-

स्थितीवरून तो त्या कारकुनावर उसळला असेल अशी वाचकाची समजूत होईल, पण खरोखरी तसें कांहीं झालें नाही. त्यानें त्या कारकुनास सन्मानानें बसवून घेऊन त्याच्या धन्याचें कुशल विचारलें व काय निरोप आहे, ह्मणून त्यास प्रश्न केला. कारकुनानें भीत भीत थैलींतून एक पत्र काढून हैदरापुढें ठेवलें. हैदरानें तें घेऊन वाचलें. पत्रात इतकाच मजकूर होता. 'खंडेराव भेटीस येत आहेत. तेथून मातबरास पाठवून द्यावे. मुलखास उपद्रव न होऊं द्यावे.' पत्रांतलि मजकूर वाचताच हैदरनाईक एकदम खूप झाला, आणि त्याच्या चेहऱ्यावर अभिमानजन्य स्मित चमकलें!

वरील मजकुरात इतके हुरळून जाण्यासारखे काय आहे, असें आमच्या प्रिय वाचकाना कोडे पडेल, पण त्या पत्रातल्या थोडक्या शब्दांत खरोखरीच पुष्कळ अर्थ भरला होता! 'आह्मी आपला दिवाण खंडेराव यास पाठवून देतों, त्याला न्यावयास तुमच्याकडील कोणीतरी मोठा मनुष्य येऊंदे, आणि तुमच्याकडून आमच्या मुलखाची खराबी होत आहे ती बंद करा,' असा जरी वरील मजकुराचा अर्थ होता, आणि तो दिसावयास जरी जरबेच्या स्वरूपाचा होता, तरी एखाद्या वकीलास भेटीस पाठविण्याचा नेहमीचा रिवाज सोडून दिवाणास पाठवितो असें ह्मणण्यांत सावनूरकरांनी 'आपण तुह्मास शरण आलो आहोत, खंडेराव दिवाण तुमच्याकडे येऊन खंडणी ठरवीत आहे, आणि तुह्मांस खंडणी दिल्याबद्दल पेशव्याची आह्मांवर इतराजी होऊं नये ह्मणूनच केवळ आह्मी बाह्यात्कारी ही जरबेची भाषा लिहिली आहे' इतक्या गोष्टी ध्वनित केल्या होत्या! धूर्त हैदरखानाने सावनूरकराच्या पत्रातला मतलब तत्काळ ओळखला, आणि 'आमचे कारकून बाळाजी गणेश याना खंडेराव दिवाणास बोलवावयास पाठवून देतो, असे सावनूरकर नबाबसाहेबास सागा' असा तोंडी निरोप देऊन त्याने सावनूरकराच्या कारकुनाला सन्मानपुरःसर परत पाठविले. त्याच रात्री 'सावनूरकर नबाब आमचे दोस्त असल्यामुळें त्याच्या मुलखात कोणी स्वारी शिकारीस जाऊ नये, गवत मागून आणावे' अशी द्वाही हैदराच्या लष्करात फिरली.

* * * * * * *

त्याच दिवशी आणि जवळ जवळ त्याच वेळी सावनूरच्या पूर्वेस दहा कोसावर असलेल्या मुळगुंद गावच्या माळावर श्रीमत पेशवे सरकाराच्या लष्कराचा तळ पडला असून, त्यातील एका राहुटींतही दोन सरदार बोलत बसले होते. त्यातील एक आनंदराव भिकाजी रास्ते हे असून ते श्रीमंत रावसाहेब पेशव्याचे मामा रास्ते यांच्या घराण्यातील होते. दुसरे सरदार गोपाळ गोविंद पटवर्धन हे असून ते महाराष्ट्रास आदर्शवत् होऊन राहिलेल्या पटवर्धन घराण्यापैकी होते. आमच्या कथानकांत पटवर्धन मंडळींचा उल्लेख वारवार यावयाचा असल्यामुळे त्याचा सन १८०० पर्यंतचा वंशवृक्ष आह्मी पुढें देत आहों.

**पटवर्धन घराणें:—**




चालू मोहिमीत निळकंठ त्रिंबक व गोपाळ गोविंद हे इ० स० १७७१ सालीं आणि माधव कृष्ण हे १७७२ सालीं मृत्यु पावले.

पटवर्धनाचे मूळ पुरुष हरिभट हे निर्वाहाकरिता कोंकणांतून नारो महादेव जोशी, कापशीकर घोरपड्याचे आश्रित याजकडे सहपरिवार येऊन राहिले. नारो महादेवाचा पुत्र व्यंकटराव याला बाळाजी विश्वनाथ पेशव्यानें आपली मुलगी अनुबाई दिली, तेव्हां तिच्यामार्फत पटवर्धनांचा प्रवेश पेशव्याकडे व त्यांचे मार्फत शाहू छत्र-पतीकडे झाला. हरिभटाचे मुलगे गोविंदपंत, रामचंद्रपंत व भास्करपंत हे थोरल्या [illegible] वेळीं पुण्यास येऊन कारकुनी, फडणिशी, व सवडीप्रमाणे शिलेदारीहि करून पराक्रम गाजवूं लागले. गोविंद हरि सरदारी करीत होते त्यावेळीं त्यांनी आपला मुलगा गोपाळराव याला युद्धकलेंत तयार केले आणि पुतणे नारायणराव व मोरोबा यांना कारभारात तरबेज बनविलें. पुढें गोपाळरावांच्या हाताखाली वामनराव, निळकंठराव व परशुरामभाऊ हे शिपाईगिरींत निष्णात झाले. मूळ पुरुष हरिभट, त्यांचे सहा मुलगे, सतरा नातू व पांचपन्नास पणतू असें हें मोठें कुटुंब साठ-सत्तर वर्षे मराठेशाहींत एकत्र नांदून तिच्या अभ्युदयास साधनीभूत झालें. प्रत्येक मोहिमेंत एखादा बळि देऊन आणि भयंकर हाल अपेष्टा सोसून या घराण्यानें खडतर स्वामिसेवा केली आणि त्या तपश्चर्येचें फल म्हणूनच कीं काय, मराठेशाही बुडाली तरी पटवर्धन मंडळींची संस्थानें आज अवशिष्ट राहून स्वराज्याची आठवण

महाराष्ट्रास करून देत आहेत ! नानासाहेब पेशव्यांच्या वेळीं पटवर्धनांस सरंजाम देण्यांत आला, तो पुढें दादासाहेबांनीं जप्त केला. पुन्हा तो श्रीमंत माधवराव पेशव्यांनीं चालू करून दिला. तो मिरज व आसपासचा प्रांत मिळून कर्नाटकाच्या तोंडावर असून सुमारें आठ लक्षांचा होता. मात्र तो रुपयांत न देतां होनांत दिला असल्यामुळें पटवर्धनांचे त्यांत प्रतिवर्षी लाखपन्नास हजार रुपये जात असत ! आमच्या कथानकाच्या प्रारंभकालापर्यंत श्रीमंत रावसाहेब पेशव्यांची पटवर्धन मंडळींवर सकारण वा निष्कारण, इतराजी असल्यामुळें, त्यांच्या पथकांतील शिपायांना नांवें ठेवणे, त्याच्या सरंजामाचे हिशेब बारकाईनें तपासणें इत्यादि प्रकार श्रीमंत वरचेवर करीत. गोपाळराव वगैरे मंडळींना या गोष्टीचा विषाद वाटे, पण त्याबद्दल नाराज होऊन त्यानीं स्वामिसेवेंत मात्र कधीं कुचराई केली नाही. आमच्या कथानकाच्या वेळीं मोरो बल्लाळ पटवर्धन पुण्यास, परशुरामभाऊ, नीळकंठराव, माधवराव आणि गोपाळराव हे कर्नाटकच्या मोहिमेवर आणि बाकीची बहुतेक मंडळी मिरजेस होती. वाचकांना आतां या घराण्याच्या परिस्थितीची बरीचशी कल्पना आली असल्यामुळें कथानकाचें सूत्र पुढे चालवूं.

वर सांगितल्याप्रमाणे सध्याकाळच्या सुमारास पटवर्धनांच्या राहुटींत गोपाळराव पटवर्धन आणि आनदराव रास्ते यांचें संभाषण चाललें होतें. गोपाळरावाचें वय या वेळीं सुमारें अठ्ठेचाळीस वर्षांचे असून तो शरीराने सडपातळ होता. त्याचा चेहरा नीटस व बांधा मध्यम उंच होता. तो मानी, धाडशी व तलख असून कर्नाटकांतील संस्थानिकावर, आणि पुंडपाळेगारांवर त्याचा चांगलाच वचक होता. कर्नाटकांत त्याने आजवर अनेकदा मोहीम केली असून हैदरनाइकाला पुष्कळ लढायांतून चांगलाच हात दाखविला होता. एकमेकाचे डावपेंच एकमेकांना पुरतेपणीं माहीत झाले असल्यामुळें हैदरावर मोहीम चालवावयास तोच एक योग्य सेनापति आहे हें जाणून श्रीमतांनी या मोहिमेवर त्याची योजना केली होती. आनंदराव रास्ते गोपाळरावापेक्षा वयाने बराच लहान म्हणजे सुमारें छत्तीस वर्षांचा असून तोही मोठा उमदा व शूर सरदार होता. हैदराने कर्नाटकांत उपद्रव देण्यास प्रारंभ केल्याचें कळतांच श्रीमंतांनी गोपाळरावास हैदरावर चालून जाण्याची आज्ञा केली आणि आनंदराव रास्त्यास त्याच्या कुमकेस पाठवून दिले. स्वतः श्रीमंतही मोठी फौज घेऊन कर्नाटकांत येणार अशी दाट अवई पसरली. गोपाळराव व आनंदराव नरगुंदाजवळ आले, तेव्हां त्यांना हैदरनाईक हरपनहळ्ळीस आल्याचें समजले. त्याबरोबर तेही गदग परगण्यांत शिरून सावनूरच्या पूर्वेस दहा कोसांवर मुळगुंद येथें येऊन तळ देऊन राहिले. पण त्यांच्याजवळ फौज थोडी आहे हें हैदरास नक्की ठाऊक असल्यामुळें तो बेधडक तुंगभद्रा उतरून कुपेलुरास आला आणि त्यानें सावनूरकर नबाबास

खंडणीबद्दल निरोप पाठविला. तें गोपाळरावास कळतांच त्यानेंही सावनूरकरांस इषारा पाठविला कीं, ' पूर्वी हैदरअलीनें तुमचें सर्व राज्य काबीज केलें असतां श्रीमंतांनीं तें जिंकून तुमच्या हवालीं केलें आहे. सांप्रतही तुमची कुमक करण्यासाठीं त्यांनीं आम्हांला पाठविलें आहे. तुम्ही हैदरास खंडणी द्याल, किंवा त्याजकडे आपला कोणी मनुष्य पाठवाल, तर श्रीमंतांचा तुमच्यावर रोष होईल. ' असा निरोप पाठवून त्यावर सावनूरकरांकडून काय जबाब येतो याची गोपाळराव वाट पहात होता, आणि त्याबद्दलच त्याचें व आनंदरावाचें प्रस्तुत बोलणें चाललें होतें.

'तात्या', गोपाळराव आनंदराव रास्त्याला उद्देशून ह्मणतो, ' सावनूरकरांचें लक्षण मला कांही एकंदरींत ठीक दिसत नाहीं. ते हैदरनाइकाला खंडणी देणार!'

' देईनात? ' आनंदराव ह्मणाला, ' राव, तुह्मी तरी ती गोष्ट इतकी जिवाला कशाला लाऊन घेतां? आमची खंडणी त्याच्याकडून यायची तशी आली आणि आमच्या कुमकेला त्यांनीं द्यायची तशी फौज दिली, ह्मणजे आमचें काम झालें. मग आह्मी बाकीची पंचाईत कशाला करा? ते हैदराला आणि साऱ्या पुंडपाळे-गारांना कां खंडणी देईनात तिकडे? तुमचें काय गेलें? '

' तसें नव्हे तात्या,' गोपाळराव ह्मणतो, ' सावनूरकरांनीं हैदराला खंडणी देणें ह्मणजे तो आमचा प्रत्यक्ष अपमान नव्हे का? आमच्या मांडलिकानें हैदराला खंडणी द्यावी आणि तीहि आमच्या डोळ्यादेखत, आह्मी इतके जवळ उभे असता! मग इतर मांडलिकांचा आमच्यावर विश्वास कसा राहील? आमचा दरारा, आमची इभ्रत कोण मानील? अहो हैदराची मला फार दिवसापासून माहिती आहे. खरोखरीच त्याला अलीकडे आमची दहशत वाटेनाशी झाली आहे, आणि ह्मणूनच त्यानें या गमजा चालविल्या आहेत. '

' तें मात्र खरें बोवा, ' आनंदराव ह्मणाला, ' हैदरनाईक ह्मणजे एक अजब चीज आहे. परवां गुत्तीकर घोरपड्यांना त्यानें असाच सक्तीचा निरोप पाठवून भेटीस बोलावून नेलें, पण त्यांच्याकडून खंडणी वगैरे न मागता आपणच उलट त्यांना पंचवीस हजार रुपये, तीन हत्ती, शिरपेंच आणि मोत्याची कंठी नजर केली ह्मणे! '

' कोण ह्मणतो खंडणी मागितली नाहीं ह्मणून? ' गोपाळराव उसळला, ' अहो, मुराररावाना भेटीला जाऊं नका ह्मणून मी परोपरीनें बजावलें असतां गेले, आणि दरसाल पन्नास हजार रुपये खंडणी द्यायची बोली करून आले! तोच प्रकार आमचे हरिहरचे मामलतदार लक्ष्मणपंत लागू याचा. हैदरानें हरिहरावर तोफा लावतो ह्मणतांच आमचे लागू मजकूर सुद्धा त्याच्या भेटीस गेले. '

' पण हैदराकडून सन्मानपूर्वक सत्कार घेऊन परत आलें, ' आनंदराव अभिमानानें ह्मणतो, ' राव, या सर्व मंडळीतर्फे तुह्मांला माझा असा प्रश्न आहे कीं, तुमचें या प्रांताला असावें तसें मजबूत संरक्षण नसल्यावर आणि हैदरनाइकासारखा जबर शत्रू पांच पन्नास हजार फौजेचा सरंजाम बरोबर घेऊन समोर उभा राहून दरडावणीचे निरोप पाठवूं लागल्यावर, गुत्तीकर, सावनूरकर यांच्यासारख्या गरीब जीवांनीं त्याच्यापुढें मान वाकवूं नये तर काय करावें? तुह्मी त्यांना आपले माडलिक ह्मणविणार, त्यांच्या पासून सालोसाल खंडणी घेणार, आणि प्रसंगाला त्यांचें संरक्षण मात्र करणार नाहीं ? मग त्यांच्यावर असा नामुष्कीचा जर प्रसंग आला तर तो दोष तुमचा कीं त्याचा? '

आनंदरावाचा कोटिक्रमच इतका बिनतोड होता की गोपाळरावाला त्यावर समाधानकारक उत्तर देता येईना. तो गोंधळला. आनंदरावाचा युक्तिवाद त्याला पटला ह्मटलें तरी चालेल. क्षणभर विचार करून तो कांहीं बोलणार, इतक्यात एक जासूद आत आला, आणि ' सावनूरकरांकडून माधवराव शिवराम आणि अण्णाजी तमाजी नावाचे दोन कारकून आले आहेत ' अशी त्यानें वर्दी दिली. ' त्यास घेऊन ये ' असे गोपाळरावाने सांगताच जासूद गेला आणि थोड्याच वेळात वर्णाने काळे आणि चर्येने वस्ताद दिसणारे असे दोन कारकुनी पेशाचे गृहस्थ राहुटींत प्रविष्ट झाले. गोपाळराव त्या दोघांसही ओळखीत असावा असे दिसले. त्यांना पाहताच त्यांने त्यातल्या एकास प्रश्न केला, 'का माधवराव, सावनूरकर नबाबांनी अखेर काय बेत ठरविला? हैदराच्या भेटीस जाणार की नाही? '

' नबाबांनी विनंति केली आहे की—म्हणजे नबाब साहेबाचे असे म्हणणे आहे की— ' माधवराव शिवराम अडखळत सांगू लागला. आपले बोलणें गोपाळरावाला कितपत रुचेल याची त्याला शंका वाटत असावी आणि म्हणूनच ते उच्चारून दाखविण्यास तो भीत असावा, असे स्पष्ट दिसले.

' नबाबसाहेब काय म्हणतात ? ' गोपाळराव तिरस्काराची मुद्रा करून म्हणतो, ' आपणास जातीनेच हैदरनाइकाच्या भेटीस जाणे भाग आहे, असेच ना ? '

' रावानीं असे राग करू नये, ' अण्णाजी तमाजी आपल्या मोडक्या तोडक्या मराठींत गोपाळरावाचे शांतवन करीत म्हणाले, ' हैदरनाईक कुपेळूर मुक्कामीं आले आणि सावनुरावरी तोफा लावते म्हणूं लागला. मग आमचे एजमान नबाब तरी काय करतो ? निरुपाय झाले, तरी देखील खंडणी देत नाही म्हणून स्पष्ट निरोप पाठविले. मग हैदरखानाचे निरोप आले की, तुमचे दिवाण खंडेराव आम्हांस नुसते भेटून जातो म्हणजे पुरे, आम्हांला खंडणी नको. असे निरोप आल्यावर उदयीक खंडेरावास भेटीस धाडतो म्हणते, मग जशी रावांची आज्ञा ! '

नबाबाचा निरोप ऐकून गोपाळराव क्षणभर विचारांत पडला. आनंदरावाची विचारसरणी त्याला पटली होती, त्यांतच सावनूरकरांचा हा निरोप ऐकून त्या विचारसरणीचा खरेपणा त्याच्या अधिकच प्रत्ययास आला. सावनूरकरांनीं आपल्या दिवाणाला हैदराच्या भेटीस पाठवावें तरी एक, नाहींतर त्याच्या तोफांच्या भडिमारानें आपला निःपात करून घ्यावा तरी एक, असा बिनतोड पेंच त्यांना पडला आहे हें त्याला उघड दिसून आलें. बरें आपण ताबडतोब सावनूरकरांच्या कुमकेस जावें ह्मटलें तर तेंही शक्य नाहीं हें त्यास दिसत होतें. कारण गोपाळरावाजवळ फौज अवघी दहाबारा हजारच होती, आणि हैदर नाईक तर चाळीस पन्नास हजारांच्या करोल सरंजामानिशीं आला होता! अशा स्थितींत तुह्मी आपल्या दिवाणाला हैदराच्या भेटीस पाठवूं नका असें ह्मणणें रास्त नाहीं असें त्याला वाटलें. क्षणभर विचार करून तो सावनूरकरांच्या कारकुनांस ह्मणाला, 'ठीक आहे, माधवराव, अण्णाजीपंत, तुह्मी दोघेही भोजनें आटोपून रात्रीच्या रात्री परत चला आणि नबाबांना माझा निरोप सांगा कीं, खंडेराव हैदर नाइकाच्या भेटीस जाऊं देत, मात्र हैदराला खंडणी देण्याचें कबूल करूं नका. खंडणी दिल्यास श्रीमंतांच्या कामी येणार नाही.' गोपाळरावानें दिलेला हा निरोप आनंदरावाला पसंत पडला असावा असें त्याच्या चर्येवरून दिसलें.

---

## प्रकरण २ रें

### बन्सीधर महाराज. [ कार्तिक शु. ५-१६९१

नर्मदा नदीच्या तीरावर जीं अनेक पुण्यपावन क्षेत्रे आहेत, त्या सर्वांत गरुडेश्वराचें स्थान फार पुरातन आणि प्रसिद्ध आहे. विंध्याद्रीचे दाक्षिण तटावरील दाट जंगलांत हे पुराण देवालय बांधलेलें असून, गरुडानें तेथें शिवलिंगाची स्थापना करून तपश्चर्या केली अशी समजूत अनादि कालापासून प्रचलित आहे. हे देवस्थान पेशव्याच्या उत्तर हिंदुस्थानात मोहिमेवर जावयाच्या वाटेपासून फार दूर नसल्यामुळे खुद्द पेशवे सरकारही अमळ आडवाट करून या स्थानाच्या दर्शनास जात असत. निदान दादासाहेब पेशवे तरी एकदा येऊन गेल्याची बोलवा होती. या स्थानाच्या आसपास आज मितीस देखील दाट झाडी आहे, मग आमच्या कथानकाच्या काळीं तेथें केवढें दाट जंगल असेल याची वाचकांनी कल्पना करावी. या जंगलात हिंस्र श्वापदें आणि हत्तींचे मोठमोठे कळप असल्यामुळें हें पुरातन स्थान ज्या मानानें

ऐकून प्रसिद्ध होतें त्या मानानें दर्शनेच्छु लोकांची रीघ तेथें नसे. जे थोडे लोक दर्शनास जात ते बहुधा दहा वीस असामींची जूट करून जात, आणि जंगलांतील भिल्लांना वाटाडे ह्मणून घ्यावयास विसरत नसत. एकटा दुकटा प्रवासी गरुडेश्वरास जाण्याचें धाडस सहसा करीत नसे.

या स्थानाच्या जागृतत्वाबद्दल लोकांची फार बळकट श्रद्धा होती हें सांगावयास नकोच. 'येथें सेवेला राहिलें कीं तत्काळ दृष्टांत होतो,' 'फलाणा गृहस्थ गरुडेश्वराच्या देवळांत निजला असतां रात्री गाभाऱ्यांतून त्याला वाघाच्या गर्जना ऐकूं आल्या,' 'देवाचा गुरव एके दिवशी मलिनपणाने गाभाऱ्यांत गेल्याबरोबर देवाच्या पिंडीवर फडा काढून बसलेला एक पाढरा नाग फुस् करून त्याचे अंगावर आला,' इत्यादि अनेक गोष्टी भिल्लांच्या तोंडून तेथें जाणाऱ्या भाविकाच्या कानावर येत. शिवाय या ठिकाणी सात चिरंजीवांपैकी अश्वत्थाम्याचें कायमचें वास्तव्य असून तो नाना प्रकारच्या रूपानीं फिरतो, व तशाच अधिकारी मनुष्याच्या दृष्टीसही पडतो असाही लोकप्रवाद होता. 'आपण गरुडेश्वराच्या दर्शनास निघालों असतां जंगलांत वाट चुकलो आणि मग अमुक नांवाच्या भिल्लाने आपणास वाट दाखविली' असें एखाद्या यात्रेकरूने सागावें आणि चौकशी करिता त्या नावाचा भिल्ल मुळींच आढळूं नये असे पुष्कळदा झालें होतें! आणि योगायोगाची गोष्ट अशी की, गरुडेश्वराच्या दर्शनास गेलेला एकही प्रवासी चोराचिलटाच्या, हिंस्र श्वापदाच्या किंवा रोगराईच्या एकाद्या आपत्तीस बळी पडून दगावला असे एकही उदाहरण आजपर्यंत घडलें नव्हतें. अशा रीतीने या स्थानाविषयीं एकंदरीत जरी लोकसमाजात अत्यंत पूज्यबुद्धि होती, तरी केवळ त्याच्या दुर्गमत्वामुळेच ते आमच्या कथानकाच्या काळीं जवळ जवळ निर्जन असल्यासारखेच होतें!

पण अलीकडे दहा वर्षांत मात्र ही स्थिती थोडी पालटली होती. याचें कारण शके १६८४ च्या सुमारास बन्सीधर अवधूत नावाचे एक सत्पुरुष गरुडेश्वरावर येऊन राहिले हे होय. बन्सीधर महाराज हे कोण, कोठले, त्यांचे सबंध नांव काय इत्यादि माहिती एवढ्या दहा वर्षांच्या अवधींतही कोणास झाली नव्हती. कित्येकाच्या मतें ते गौड ब्राह्मण होते, तर कित्येक त्याना कायस्थ समजत असत. पण ते निश्चित कोण आहेत हे समजून घेण्याचा कोणी कधी प्रयत्नच केला नाहीं. कारण बोवाची वृत्तीच अशी होती की, त्याना एकदा पाहिलें की पुरे, पाहणाराच्या मनांत त्याच्याविषयीं एकदम पूज्यबुद्धि उत्पन्न व्हावी, आणि त्याने त्यांच्याशीं सलगी करण्याचा प्रयत्न करूं नये. बन्सीधरबोवानी गरुडेश्वरी येताच देवळाशेजारीं आपणाकरिता एक पर्णकुटी बाधून तिजमध्यें वास्तव्य केले होतें. ते भल्या पहाटेचे उठत व नदीवर जाऊन स्नान करून जे एकदा गडप होत ते दहा अकरा घटका

दिवसाच्या सुमारास कसल्या तरी पाल्याची गोळी करून ती हातावर चोळीतच परत येत. नंतर ती गोळी तोंडांत टाकून दिवसभर ते आपल्या पर्णकुटींत बसून रहात. त्यांच्या पर्णकुटींत एक धुमी, एक चिमटा, एक घोंगडें, एक दोन मृगाजिनें, एक खडावांचा जोड आणि एक दोन रुद्राक्षांच्या माळा, याव्यतिरिक्त दुसरें कांहींच सामान दिसत नव्हतें. बन्सीधर अवधूत कधीं जेवल्याचें किंवा फळफळावळ खात असल्याचें कोणी पाहिलें नाहीं. कोणी तसाच आग्रह केल्यास ते एखादा फळाचा तुकडा किंवा दुधाचा घोट घेत, पण तो बहुधा लगेच थुंकून टाकीत ! ते सहसा कोणांशीं बोलत नसत, कीं कोणापाशीं कांहीं मागत नसत. प्रथम प्रथम कांहीं दिवस त्यांच्याकडे कोणाचें विशेष लक्ष्य गेलें नाहीं, पण थोड्याच दिवसांत एकदा असा योग आला कीं, एक भिल्ल दुपारीं देवाच्या दर्शनास आला असतां त्यानें सहज अवधूतांच्या पर्णकुटीत डोकावून पाहिलें, तों एक भला मोठा वाघ आडवा पडला असून बन्सीधर महाराज त्याला टेकून खुशाल लवंडले आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें ! इतकें झाल्यावर मग काय पुसावें ? बन्सीधर अवधूतांचा लौकिक हांहां ह्मणतां आसपासच्या भिल्ल, गोंड वगैरे लोकांत आणि गरुडेश्वराच्या दर्शनास येणाऱ्या भाविक मंडळींत पसरला, आणि त्यांच्या भेटीसाठी तसल्या निर्जन जंगलांतूनही अनेक लोक येऊं लागले. पण बोवाच्या वृत्तींत मात्र त्यामुळें कांहीं फरक पडला नाही. ते पूर्वीप्रमाणेंच निराहारी, मूकवृत्ति आणि निःस्पृह होते. येणारे लोक त्यांस नाना प्रकारें उपद्रव देत, खाण्यापिण्याचा आग्रह करीत आणि नाना प्रकारचे प्रश्न विचारून भंडावून सोडीत. बोवा खाण्यापिण्याच्या बाबतींत तर कोणाचीच भीड ऐकत नसत, पण मंडळीच्या प्रश्नाच्या बाबतीत मात्र तितका तुसडपणा न दाखवितां, 'अच्छा' या एकाच द्व्यक्षरी उत्तरानें बहुधा सर्व पृच्छकांची बोळवण करीत !

बन्सीधर अवधूताची सार्वत्रिक प्रसिद्धी होण्यास जर कांहीं लवमात्र व्यंग राहिलें असले तर तेंही भरून निघण्याचा लवकरच योग आला. एका भिल्लाचा मुलगा अजारी पडून मरणोन्मुख झाला. त्या भिल्लाची बन्सीधर महाराजांवर अत्यंत निष्ठा असल्यामुळें त्यानें त्या पोरास बोवाच्या पर्णकुटिकेंत आणून ठेवले आणि त्याच्यावर कृपा करण्याविषयीं त्यांना विनति केली. बोवानी ' आपणाजवळ तसे कांहीं सामर्थ्य नाही, तूं कांही तरी औषधोपाय कर, ' असें त्या भिल्लास पुष्कळ प्रकारें समजाऊन सांगितलें, पण तो कांही केल्या ऐकेना. अखेर ' तुह्मी लोक मला असा उपद्रव देऊं लागलांत तर मला येथून निघून जाणें भाग पडेल, ' अशीहि दहशत बोवांनीं घालून पाहिली, पण तो भिल्ल ह्मणून आपला हेका सोडीना. तेव्हां बोवांचा नाइलाज होऊन त्यांनीं आपल्या धुमीतली चिमटभर राख काढून त्या

मुलाच्या तोंडांत सोडली. तोंच काय चमत्कार सांगावा? त्या मुलाचा ज्वर एकदम उतरून त्याला चांगला आराम पडला! त्यानंतर बोवांची कीर्ति फारच झपाट्यानें वाढली, आणि त्यांच्या दर्शनास दूरदूरच्या प्रांतांतले लोक येऊं लागले. तो भिल्ल तर त्यांचा दासानुदास होऊन त्यांच्या सेवेसच राहिला, पण इतर भक्तांचीही गर्दी बहुधा अष्टो प्रहर त्यांच्या भोंवती जमूं लागली. कांहीं जण त्यांचे शिष्य होण्याची इच्छा दर्शवूं लागले, तर कांहीं जण आपण त्यांचे शिष्य आहोंत असें खोटेंच सांगूं लागले! बोवांनीं मात्र कधीं कोणास उपदेश दिला नाहीं किंवा आपल्या वृत्तींत यत्किंचित् फेरबदल केला नाही. पुढें एकदा बोवांकडे श्रीमंत रघुनाथरावदादा पेशवे येऊन गेले. नतंर थोड्याच दिवसांनीं दिवाकर बापट नांवाचा दक्षिणी ब्राह्मण त्यांच्या सेवेस येऊन राहिला. त्यानें बोवांची अत्यंत एकनिष्ठ सेवा केल्यावरून बोवांनीं त्याला कांहीं साबरी मंत्र शिकवून त्याची रवानगी केली असाही प्रवाद होता. पण या गोष्टी होऊन बरेच दिवस झाले असल्यामुळें त्यांबद्दल निश्चित अशी माहिती आज कोणासच नव्हती. शके सोळाशें शायशी पासून पुढें, म्हणजे दिवाकर बापट येऊन गेल्यानंतर, बोवांनीं कसलाही चमत्कार केल्याचें कोणी पाहिलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या भोंवतीं जमणाऱ्या मंडळीपैकीं कोणी त्यांना तशा उद्देशानें भीड घातलीच तर आपणाजवळ तसें सामर्थ्य नाहीं असें ते निक्षून सांगूं लागले, व वर उल्लेखिलेल्या जुन्या गोष्टींची कोणी आठवण दिली तर त्या झूट आहेत असें ते म्हणूं लागले. लोकांच्या उपसर्गास ते इतके कंटाळले कीं, इतउत्तर आपल्या दर्शनास येणाऱ्या लोकांपैकीं कोणीही आपणापुढें कांहीं ठेऊं नये, व गरुडेश्वरावर रात्रीं वसतीस राहूं नये अशी त्यांनीं सक्त मनाई करून टाकली!

याही गोष्टीस चार पांच वर्षे होऊन गेलीं. बोवांचा जीवनक्रम आतां बराच अव्यत्यय चालला होता. अशा स्थितींतच शके १६९० च्या श्रावण महिन्याच्या अखेरीस दाक्षिणेकडील एक लुला पागळा ब्राह्मण बन्सीधर माहाराजांच्या सेवेला येऊन राहिला. या ब्राह्मणाचा उजवा हात व डावें पाऊल तुटलेलें दिसत होतें. जवळ पास गाव नसल्यामुळे, आणि आसपास जी काही थोडी वसती होती ती भिल्लाची असल्यामुळे या ब्राह्मणाची तेथे जेवणाची सोय मुळींच होण्या जोगी नव्हती. बोवानी या ब्राह्मणास तावडतोब परत जाण्यास सांगितले, पण तो त्याचे न ऐकता तसाच डोबी देऊन उपाशी तापाशी पडून राहिला. नंतर एक दोन दिवस बोवानीं त्याच्याकडे दुर्लक्ष्यच केल्यासारखे केले, पण तो आपल्या पर्णकुटीतून मुळींच हलत नाहींसे पाहून त्यांनी त्याला आर्जवानें, समजुतीनें आणि दहशत घालूनही जाण्यास सांगितलें. पण तो ब्राह्मण कांहीं केल्या त्यांची पर्णकुटी सोडून बाहेर पडेना. पुन्हा एक दोन दिवस बोवानी त्याचे नाव काढले नाहीं. तरी हा ब्राह्मण

तसाच उपाशी पडून राहिला होता. यापुढें त्याचा अंत पाहणें बरें नाहीं असें वाटू-नच कीं काय, बन्सीधर बोवांनीं त्याला एक पाल्याची गोळी खावयास दिली. ती खातांच त्या ब्राह्मणास एकदम तरतरी येऊन त्याची ग्लानी पार निघून गेली. बोवांनीं त्याचें नांव विचारलें तें त्यानें शिवराम असें सांगितलें. तेव्हांपासून तो ब्राह्मण बोवांच्या कृपेचा वतनदार झाला. ते त्याला रोज नियमानें गोळी आणून देऊं लागले. बोवांनीं त्या ब्राह्मणाची अधिक चौकशी केली नाहीं, आणि त्यानेंही आपण होऊन आपली कांहीं अधिक माहिती दिली नाहीं. शिवराम रोज बोवांची पर्णकुटिका झाडून काढी, पुढचें पटांगण सारवी, आणि बाकी सारा वेळ पर्णकुटी-केच्या आसपास पडून राही. क्वचित् बोवांच्या लंगोट्या नदीवरून धुवकून आणणें, त्यांचें घोंगडें पसरून देणें, इत्यादि किरकोळ कामेंही तो करी. होतां होतां बोवाही त्याला आपण होऊन एखादें काम सांगूं लागले. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे आमच्या कथानकाच्या प्रारंभाच्या सुमारास शिवराम हा बोवाचा एकुलता एक मर्जींतला चेला आहे ही गोष्ट सर्वसमंत झाल्यासारखी झाली होती, आणि बन्सीधर महाराजांनी स्वतः जरी तसें कधीं म्हटलें नाहीं, तरी ते मनातून शिवरामाला आपला शिष्य समजतात, निदान त्याच्यावर त्यांची मर्जी आहे, अशी तेथे येणाऱ्या भिल्ल वगैरे लोकांची खात्री होऊन चुकली होती.

मागिल प्रकरणांत सांगितलेली हकीगत घडली त्याच दिवशींची म्हणजे कार्तिक शुद्ध चतुर्थीची मध्यरात्र उलटून गेली होती. बन्सीधर महाराज आपल्या पर्णकुटीत एकटेच ध्यानस्थ बसले होते. पर्णकुटीत एक पणती मिणमिण जळत असून तीही आता समाधिस्थ होण्याच्या बेताला आली होती. पर्णकुटीच्या दाराशीं धुमीपासून जवळच उसें करून शिवराम निजला होता. बाहेरच्या पटांगणात एक दोन भिल्ल घोंगड्या लपेटून घेऊन झोंपी गेले होते. त्यांचे पटांगणातले अस्तित्व त्यांच्या लयीत ऐकूं येणाऱ्या घोरण्यावरून काय उमगत होते तेवढेच, एरवी त्यांचे काळेकभिन्न देह, आणि त्यांच्या काळ्या भोर घोंगड्या बाहेरच्या गडद अंधरात बेमालूम मिसळून गेल्या होत्या ! नर्मदा तीरावरून येणारा गार वारा बोवाच्या झोपडीवरील पाल्या-पाचोळ्यास भेदून आत शिरत होता; पण बन्सीधर महाराजांना त्याची बिलकूल पर्वा वाटत होतीसें दिसलें नाही. चोहोंकडे निस्तब्ध शांतता झाली असून नर्मदेचा मर्मर ध्वनि, किंवा क्वचित् एखाद्या हिंस्र पशूची गर्जना यावाचून दुसरा कसलाही आवाज कानांवर येत नव्हता. दिवसा रम्य दिसणारी गरुडेश्वराजवळील निसर्गशोभा आजच्या काळोख्या रात्रीं उदास व भयंकर दिसत होती. खुद्द गरुडेश्वराचें देवालय तर एखाद्या नीलवर्ण टेकडीसारखें दिसत होतें. आज थंडी फारच भयंकर पडली होती. शिवरामभटाच्या अंगावर एकच घोंगडी असल्यामुळें तो तिला अगदीं लपेटून घेऊन

व आपले लुळे हातपाय पोटाशीं घेऊन धुमीशेजारीं पडला होता. पण त्याच्या अंगांतील हुडहुडी कांहीं केल्या कमी होईना, व त्याला कांहीं केल्या झोंप येईना. तो एकसारखा चावळत होता व या कुशीवरून त्या कुशीवर वळून एकसारखी चुळबूळ करीत होता. वरचेवर उठावें, हु हु करीत धुमी फुलवावी, तिचा अमळ शेक घ्यावा, पुन्हा लवंडावें, असा प्रकार त्यानें एकसारखा चालविला होता. अखेर बन्सीधर महाराजांच्या लक्ष्यांत ती गोष्ट आली असावी असें दिसलें. त्यांनीं हातांतली माळ थांबवून शिवरामास म्हटलें, ‘ बेटा शिवराम, आज तुला फार थंडी वाजते आहे काय ? ’

“होय महाराज,” शिवरामानें उत्तर केलें, “आज थंडी अमळ कडक पडली आहे.” बोवा शिवरामाशीं हिंदुस्थानी भाषेंत बोलत होते आणि तोही त्यांना त्याच भाषेंत उत्तरें देत होता हें वाचकाना सांगावयास नकोच.

“पाहिलेंसना आमच्यासारख्याच्या सहवासांत कसे हाल असतात ते? ” बन्सीधर महाराज ह्मणाले, “इतके हाल सोसून तूं आमच्या सेवेला काय ह्मणून राहिला आहेस ? ”

‘ महाराजांची कृपा व्हावी म्हणून, ’ शिवरामानें उत्तर केलें, ‘ महाराजांचा सहवास हेच सुख आहे. त्याच्या आनंदात मला असल्या हालअपेष्टाची परवा मुळीच वाटत नाही. ’

‘ बेटा, ’ बोवा विचारतात, ‘ तुझा हात आणि पाऊल कोणी तरी मुद्दाम तोडलेसे दिसते. कोणी तोडले बरे ? ’

‘ पुण्यास श्रीमत माधवराव पेशवे म्हणून सातारच्या छत्रपतीचे प्रधान आहेत, त्यानी तोडलें, ’ शिवरामानें थोडा वेळ थाबून उत्तर दिलें.

‘ ते तर मोठे न्यायी आहेत असें मी ऐकले आहे ’ महाराज म्हणाले, ‘ मग त्यांची इतकी इतराजी तुझ्यावर होण्याजोगे तूं काय केलें होतेंस ? ’

‘ त्याचे चुलते रघुनाथराव दादासाहेब गादीचे खरे हक्कदार आहेत, ’ शिवराम ह्मणाला, ‘ आणि मी पडलों त्याचा पक्षपाती, ह्मणून पेशव्यानी माझे हातपाय तोडले.’

‘ बस्स, इतकेच कारण , बोवानीं खडसून प्रश्न केला, ‘ तूं याहून कांहीं अधिक अपराध केला नाहीस ? खरे बोल. ’

‘ मी त्याच्या नाशाकरिता अनुष्ठान करीत होतों , ’ शिवराम खाली मान घालून ह्मणाला, ’ तें उघडकीस आल्यावरून त्यांनीं मला तशी शिक्षा केली.

“मग झाली ती गोष्ट सरळच झाली” बन्सीधर महाराज ह्मणाले; “पेशव्यांचे चुलते मला ठाऊक आहेत. ते माझ्याकडे एकदा आले होते. ते अगदीं बेवकूब आहेत. मी त्यांना काय इच्छा आहे, ह्मणून विचारतांच मला एकादें मारण-

क्रियेचें अनुष्ठान सांगा ह्मणाले. मी त्यांच्या शब्दांतच गुंतलों होतों ह्मणून त्यांना एक अनुष्ठान सांगितलें, पण त्याचा उपयोग कराल तर तुमचें कधींही कल्याण होणार नाहीं असें त्यांस सक्त बजावलें. थोड्याच दिवसांनीं दिवाकर नांवाचा एक दाक्षिणी ब्राह्मण माझ्याकडे येऊन राहिला, आणि मजजवळ मारणाचे व वशीकरणाचे मंत्र मागूं लागला. त्याला एक दोन मंत्र देऊन मी घालविला आणि पुन्हां म्हणून असलें दान करावयाचें नाहीं अशी शपथ वाहिली. काय करावें, असल्या नीच लोकांच्या संसर्गापासून आम्हांला उपसर्ग होऊं नये म्हणून आह्मी अरण्यवास पत्करला, पण येथेंही येऊन ते आम्हांला उपद्रव देतातच!"

शिवराम कांहींच बोलला नाहीं. त्याला कांहीं बोलण्याची सोयच नव्हती. दिवाकर ह्मणजेच दादासाहेबांचा आचारी देव्या, त्यानें आपणास जें भैरवाचें अनुष्ठान सांगितलें तें महाराजांनीं त्याला दिलेलें तेंच अनुष्ठान होय, इत्यादि सर्व मजकूर त्यानें ओळखला, पण त्याची ओळख बन्सीधर महाराजांना देण्याचें त्याला धैर्य होईना. तो नुसतें "होय महाराज" एवढेंच ह्मणून गप राहिला.

'कलियुगाचा अंमल आतां जारीनें सुरू झाला आहे,' बन्सीधर गंभीर आवाजांत बोलूं लागले, 'आणि धर्म-लोप व राज्यलोप होण्याची वेळ जवळ येऊन ठेपली आहे. ब्राह्मणांनीं आपला निःस्पृह आचार सोडला आहे, व हीन वृत्तीचा आश्रय केला आहे. ओघाओघानें इतर वर्णांचाही आधार सुटत चालला आहे. बेटा शिवराम तूं ब्राह्मण आहेस नाहीं बरें?

'होय महाराज,' शिवराम ह्मणाला, 'मी ब्राह्मण आहे.'

'अरेरे, तूं ब्राह्मण असून तसल्या निंद्य कृत्याला प्रवृत्त झाला होतास!' महाराज ह्मणाले, 'तर मग तुला झाली ती शिक्षा थोडीच झाली असें ह्मटलें पाहिजे. पण आतां तरी तुला पश्चाताप झाला आहे कां? यापुढें तरी आत्मसाधनांत आपल्या आयुष्याचें सार्थक करावें असें तुला वाटतें कां?

'वाटतें महाराज,' शिवराम ह्मणाला, 'आणि ह्मणूनच मी सारी उपाधी टाकून आपल्या चरणाचा आश्रय केला आहे.'

'ठीक आहे,' बन्सीधर महाराज ह्मणाले, 'तुला खरा पश्चात्ताप झाला असेल तर अजूनही तुझें कल्याण होईल. बाबारे, जन्माला येऊन गर्भवासाच्या कचाट्यांतून सुटावे आणि आपल्या उदाहरणानें इतरांना सोडवावें हेंच ब्राह्मणाचें मुख्य कर्तव्य आहे. असो, झाल्या गोष्टी आतां येत नाहींत. तूं यापुढें तरी नर्मदामाईचें स्नान आणि परमेश्वराचें चिंतन यांत आपला कालक्षेप करीत जा, ह्मणजे तुझीं सर्व पातकें जळून खाक होतील व तुझा उद्धार होईल. बरें, नीज आतां, ही राख आपल्या

अंगाला लाव, म्हणजे तुला थंडी वाजणार नाहीं.' असें म्हणून महाराजांनीं धुमींतील चिमटभर राख उचलून शिवरामाच्या हातावर ठेवली.

शिवरामानें ती राख घेऊन आपल्या सर्वांगास लावली. एक क्षणही गेला नसेल इतक्यांत त्याच्या साऱ्या गात्रांत उबारा येऊन त्याची हुडहुडी पार नाहींशी झाली! बन्सीधर महाराजांच्या अगाध सामर्थ्याबद्दल त्याची पुरी पुरी खात्री झाली. ते मनांत आणतील तर इकडची सृष्टि इकडे करण्याचें बळ त्यांच्या अंगीं आहे हें शिवरामानें नक्की ओळखलें. पण त्यांच्या उपदेशाचा परिणाम त्याच्या मनावर झाला असेल कां? वाचकहो, 'पौर्णिमे'च्या कथानकांत शिवरामभट लिमयाची आणि आपली चांगलीच ओळख झाली आहे आणि त्याचें सारें पूर्ववृत्त आपणांस कळलें आहे. मग त्यावरून आपण काय अनुमान काढाल? शिवरामभटास कृतकर्मांचा खरोखरीच पश्चात्ताप होऊन उरलेल्या आयुष्याचें सत्समागमांत सार्थक करावें एवढ्याच हेतूनें तो इतक्या दूरवर येऊन बन्सीधर अवधूतांच्या सेवेला राहिला असेल कां? कां त्याचा कांहीं दुसराच प्रच्छन्न हेतु असेल? कोणास ठाऊक, असेलही. 'सुंभ जळाला तरी पीळ जळत नाही' ही म्हण प्रसिद्धच आहे!

---

## प्रकरण ३ रें

### कान्होबा शतघ्ने. [का. शु. ४- शके १६९१

आज वाचकांस आम्ही श्रीमंत पेशवे सरकाराच्या शनिवार वाड्यांत घेऊन जाणार आहोंत. "पौर्णिमे" च्या कथानकांत आम्ही वाचकांस शनिवार वाड्याची माहिती करून दिली आहे, ती त्याच्या स्मरणांत असेलच. त्या गोष्टीस आतां वर्ष झालें होतें, तथापि वाड्याच्या स्वरूपांत काहीच बदल झाला नव्हता. सदर वाड्यातील आग्नेयीकडील 'लाल' चौकात श्रीमंत माधवराव पेशव्यांनी दादासाहेबास आणून ठेवलें होते आणि त्याच्यावर सक्त नजरकैद ठेवली होती हेंही वाचकाच्या लक्ष्यांत असेलच. सांप्रत दादासाहेबाचा परिवार पूर्वीप्रमाणेंच म्हणजे ते स्वतः, त्यांची पत्नी श्रीमंत सौ. आनंदीबाई, उमामामी व ठमाकाकू या दोन ब्राह्मण बाया, कुटुंबाशास्त्री, खंडो दीक्षित, त्रिमंगलाचार्य, भैरवभट व देव्या हे आश्रित, आणि हुजरे प्यादे इत्यादि कांहीं नोकर इतका होता. या परिवारांत आणखी एक महत्वाची भर नुकतीच पडली होती, तीही वाचकांस कळविणें जरूर आहे. गेल्या दसऱ्याच्याच दिवशीं श्रीमंत सौभाग्यवती आनंदीबाई प्रसूत होऊन त्यांना

एक मुलगी झाली होती, व तिचें नांव दुर्गा असें ठेवण्यांत आलें होतें. दादासाहेबांच्या पूर्वीच्या परिवारांतले एक घटक चिंतो विठ्ठल रायरीकर मात्र आजारीपणामुळें आपल्या गांवीं गेले होते ते अद्याप आले नव्हते. दादासाहेबांची नेमणूक काढून घेण्यांत येऊन त्यांचा खर्च हल्लीं सरकारी खासगींतूनच चालला होता. त्यांच्या नाटकशाळांना वाड्यांत जागा देणें श्रीमंत रावसाहेबांना मुळींच पसंत नव्हतें पण त्यांना वाड्याबाहेर ठेऊन रोज आंत येऊं जाऊं देणें हें एकंदरींत ठीक नाहीं असें नाना फडणिसांनीं सुचविल्यावरून त्या नाटकशाळांना वाड्याच्या दक्षिण बाजूकडील बागेनजीकच्या पडव्यांतून जागा देण्यांत आली होती. मात्र त्यांनीं आपली मर्यादित जागा सोडून इकडे तिकडे वावरतां कामा नये, आणि गणेश दरवाज्याखेरीज दुसऱ्या दरवाजानें वहिवाट करतां कामा नये, अशी त्यांना सक्त ताकीद देण्यांत आली होती. दादासाहेबांच्या सर्वच परिवारावर देखरेख करण्याचें काम श्रीमंतांनीं नाना फडणिसांकडे सोंपविलें होतें. त्यांतील कोणाही व्यक्तीस बाहेर जाणें झाल्यास, किंवा त्याजकडे बाहेरचा कोणी माणूस येणें झाल्यास नानाची अगाऊ परवानगी घ्यावी लागे, अशी व्यवस्था करण्यांत आली होती.

श्रीमंतांनीं दादासाहेबांच्या बरदास्तींत कांहीं कमी पडूं नये ह्मणून पूर्ण खबरदारी घेतली होती. त्यांचा जरूर तो कोणताही खर्च मंजूर आहे असें त्यांनीं नाना फडणीस व खासगीवाले या दोघांसही एकदांच सांगून टाकलें होतें. पण दादासाहेबांच्या कांहीं खर्चाच्या बाबीच अशा अशुद्ध आणि अवघड होत्या कीं त्यांना आवश्यक या सदरांत घालण्यास कोणीही माणूस तयार होणें शक्य नव्हतें. दादासाहेबांसारख्या मानी आणि स्वैरवृत्ति माणसाला असलें कांचणींतलें जिणें पसंत पडणें अर्थातच शक्य नव्हतें. थोड्याच दिवसांत श्रीमंतांच्या व त्यांच्या दरम्यान् धुसफूस सुरू झाली. त्यांनीं आपला तनखा वेगळा तोडून देण्याबद्दल श्रीमंतांकडे मागणी केली. श्रीमंतांनीं तीन लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें पण दादासाहेबांची मागणी सात लक्षांची होती ! श्रीमंतांनीं ती नाकबूल केली. इतक्यात श्रीमंत नागपूरकर भोसल्यांवर मोहीम करून गेले, त्यामुळें हा विषय तितकाच राहिला. तोंपर्यंत दादासाहेबांनीं वाड्यांत फितूर करून पळून जावयाचा प्रयत्न केला. पण तो फसून त्यांना परत धरून आणण्यात आलें, आणि त्यांच्या वरचा पहारा अधिक कडक करण्यात आला. पुढें भोसल्यांचें पारिपत्य करून श्रीमंत परत आले, तेव्हा पुन्हा एकदा आपली नेमणूक स्वतंत्र करून देण्याविषयीं दादासाहेबांनीं त्रागा केला, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढें लवकरच कर्नाटकचे राजकारण उपस्थित होऊन श्रीमंत हैदरअल्लीवर स्वारी करावयास निघाले. जाताना त्यांनीं दादासाहेबांच्या पायावर डोकें ठेऊन ‘ इतःपर तरी सारे फंद सोडून आपलें वडिलांचें नातें

चालवून रहावें " अशी त्यांना विनंति केली आणि आश्विन वद्य अष्टमीस ते डेरे-दाखल झाले.

या गोष्टीस जवळ जवळ पंधरवडा होत आला होता, म्हणजे आज कार्तिक शुद्ध षष्ठी होती. सुमारें दहा घटका दिवस आला होता. दादासाहेबांचें स्नान-पूजादि आन्हिक आटपून ते मोतीचौकांतील एका महालाच्या गच्चीवर सूर्यास अर्घ्य देण्याकारितां आले होते. त्यांनीं कपाळावर आणि दंडावर भस्माचे त्रिपुंड लावले असून गळ्यांत रुद्राक्षाच्या माळा घातल्या होत्या. त्यांचा देह मात्र पूर्वीपेक्षां कृश आणि चेहरा उतरलेला दिसत होता. गच्चीवर त्यांच्याखेरीज यावेळी दुसरी एक व्यक्ति होती, आणि ती सतरंजीवर बसलेली होती. दादासाहेब स्वतः पाटावर उभे असून त्यानीं सूर्याकडे अर्धोन्मीलित दृष्टीनें टक लावली होती. ते एकसारखे सूर्याकडे पहात, नजर तरळूं लागली म्हणजे डोळे मिटून घेत, आणि क्षणभरानें पुन्हां सूर्याकडे पाहूं लागत असा प्रकार एकसारखा चालला होता. स्नानसंध्यादि सारे आन्हिक आटोपल्यावर सूर्याकडे पाहत उभें राहण्याचे प्रयोजन काय, अशी शंका आमच्या वाचकांना येईल, म्हणून तिचा आह्मी थोडासा खुलासा करितों. पुतण्याच्या व आपल्या दरम्यान् काही तोड निघत नाही असें पाहून दादासाहेबानीं गेल्या अमावास्येपासून एक विलक्षण अनुष्ठान सुरू केले होते. सारा दिवसभर दुसरे कांहीं न खाता नुसत्या हरणाच्या दुधावर रहावे, फारच अशक्तता वाटली किंवा कलकलल्या-सारखे झाले तर एक दोन खारका टाकून हरिणाच्या दुधाचीच खीर घ्यावी, मध्यान्हीच्या सुमारास सूर्याकडे टक लावून पहात सुमारे घटकाभर उभे रहावें, आणि नंतर सूर्याला कढत आधणाच्या पाण्याचे तीन अर्घ्य द्यावे, असे हें खडतर अनुष्ठान होते! हे अनुष्ठान दादासाहेबानी कुठल्या ग्रंथातून शोधून काढले, की त्याना तें एखाद्या मांत्रिकानें दिले, ते किती दिवस चालणार आणि त्याचा हेतु काय, इत्यादि गोष्टींचा थागपत्ता कोणासच लागला नाही, पण दादासाहेबानी तें सुरू करतांच सारा शनिवार वाडा हलाल्न गेला एवढे मात्र खरे! श्रीमंताना तो मजकूर ताबडतोब पत्राने कळविण्यात आला. श्रीमंत पार्वतीबाई, सगुणाबाई, इत्यादि खाशी बायकामंडळी दादासाहेबाकडे जाऊन अनुष्ठान थांबविण्याविषयीं डोळ्यात आसवें आणून दादासाहेबाचीं आर्जवे करूं लागल्या, पण त्यानी त्यांना साफ धुडकावून लावलें! अखेर नाना फडणिसानी स्वतः येऊन दादासाहेबाना अनुष्ठान थांबविण्याविषयी, निदान भोजन करून मग तें चालूं ठेवण्याविषयीं विनंति केली. पण दादासाहेब आता पुरते बिथरले असल्यामुळें त्यांनी नानांना फडाफड शिव्या देऊन त्यांची संभावना केली, आणि अनुष्ठान बंद करीत नाहीं ह्मणून सांगितलें. इतक्यांत श्रीमंतांचें उत्तर आलें, त्यांत त्यांनीं 'काकासाहेब सुखानें अनुष्ठान करूत, तिकडे

लक्ष्य देण्याचें कारण नाहीं' असें लिहून पाठविलें. तेव्हां नानांनीं दादासाहेबांचा नाद मुळींच सोडून दिला. पण आतां दादासाहेबांची अवस्था फारच चमत्कारिक झाली. आपल्या अनुष्ठानाच्या खातमीनें भेदरून जाऊन रावसाहेब आपलें ह्मणणें मान्य करतील ही त्यांची आशा तर विफळ झालीच, पण चार पांच दिवसांच्या उपोषणानें त्यांना मात्र मनस्वी थकवा येऊन त्यांची प्रकृति अगदीं बिघडली. त्याबरोबर घाबरून जाऊन त्यांनीं एका वैद्यबोवांस बोलावून आणविलें. गच्चीवर दादासाहेबांच्या शेजारीं सतरंजीवर बसलेले गृहस्थ ते हे वैद्यबोवाच होत.

वर सांगितल्याप्रमाणें दादासाहेबांची स्वारी सूर्याकडे नजर लाऊन उभी आहे, तों आपण सतरंजीवर बसलेल्या वैद्यबोवांची अमळ अधिक ओळख करून घेऊं. हे गृहस्थ वर्णानें काळसांवळे असून सुमारें पसतीस वर्षे वयाचे दिसत होते. त्यांची चेहरेपट्टी साधारण नीटसांत मोडण्यासारखी असून डोळे किंचित् बारीक व नाक चांगलें ठसठशीत होतें. त्यांच्या अंगांतील अंगरखा, डोईवरील पागोटें, कानांतील भिकबाळी आणि अंगावर घेतलेल्या व नेसलेल्या धोतरांचे रुंद कांठ हीं सर्व चिन्हें त्यांच्या प्रतिष्ठित पेशाची साक्ष देत होतीं. या गृहस्थांचें नांव कोन्हेर पाठक असें असून ते ' कान्होबा शतघ्ने ' या नांवानें पुण्यांत व आसपास प्रसिद्ध होते. पुण्यास येऊन स्थायिक होण्यापूर्वी त्यांनीं काशींतील प्रख्यात वैद्य गंगाधर विष्णु महीधर यांच्याकडे दोन तपें वैद्यकाचें अध्ययन केलें आहे अशी बोलवा होती. कान्होबांचें उपनाम पाठक असें असतां त्यांना शतघ्ने असें टोपणनांव कां मिळालें हें आह्मांस निश्चित सांगतां येत नाहीं. कदाचित् ' शतमारी भवेद्वैद्यः ' या विनोदी वचनावरून कोणा तरी वात्रटानें त्यांना हें अभिधान दिलें असावें, आणि तेंच पुढें रूढ झालें असावें. पण विनोदानेंच कां होईना, कान्होबांना जर यथार्थ नांव द्यावयाचें होतें, तर त्या टवाळानें तें ' शतघ्ने ' असें न देतां ' सहस्रघ्ने ' असें द्यावयास पाहिजे होतें; कारण कान्होबांनीं मारलेल्या रोग्यांची संख्या सहस्रावर केव्हांच गेली होती ! कान्होबा आपल्या काशीकर गुरुजींचा निरोप घेऊन पुण्यास रहावयास आले, आणि त्यांनीं आपल्या गुरुजींच्या नांवाचा मोठा गाजावाजा करून तेथें आपला व्यवसाय सुरू केला. तोंच पुण्यांत एकाएकीं एक भयंकर साथ उद्भवून तिनें शेंकडों माणसांचें बळी पटापट घेतल्याचा बोभाटा झाला! मात्र योगायोगाची गोष्ट अशी कीं, या साथींत मेलेल्या प्रत्येक मनुष्याला कान्होबांचेंच औषध सुरू होतें! याच वेळीं पुण्यांत असलेल्या लागवणकर वैद्यांनीं ' पुण्यात साथ बीथ काहीं नसून या खुळ्या कान्होबाच्याच औषधानें इतके लोक नाहक मेले ' असा खोटाच आळ कान्होबांवर घेतला, पण तो मत्सरानें घेतला हें उघड उघड दिसत असल्यामुळें त्याच्यावर कोणाचा विश्वास बसला नाहीं. शिवाय कान्होबांकडे आलेले सर्वच रोगी दगावले

अशीही गोष्ट नव्हती. त्या साथींत त्यांचाही एक रोगी बरा झाला होता, आणि कान्होबांनीं उपरिनिर्दिष्ट वैद्याचें ह्मणणें खोडून काढण्याकरितां त्याचें नांव पुढें केलें. पण त्यावर लागवणकरांनीं ' तो पहिलवान असल्यामुळें मरूं शकला नाहीं, केवळ एक महिनाभर अंथरुणावर लोळून तेवढ्यावरच निभावला ' असें तर्कट लढविलें. तेव्हां असल्या कुटाळांच्या तोंडीं लागण्यांत अर्थ नाहीं असा विचार करून कान्होबांनीं आपलें वैद्यक व्यवस्थित चालूं ठेवलें. आमच्या कथानकाच्या काळीं वैद्यक, खानावळ इत्यादि व्यवसायांना धंद्याचें स्वरूप आलें नव्हतें. औषधें, अन्न, इत्यादिकांच्या मोबदल्याचे पैसे घेणें हें पातक समजलें जात असे. मोठमोठ्या वैद्यांना बहुधा राजाश्रय, किंवा सरदार सरंजामदारांचा आश्रय असे. किरकोळ वैद्यांचे व्यवसाय भिक्षुकी, जोशीपण इत्यादि असत आणि वैद्यक ते केवळ परोपकाराकरितां करीत. तथापि एखाद्या रोग्यानें बरा झाल्यावर आपखुषीनें जर वैद्यास काहीं इनाम दिले तर भिक्षुकीदाखल त्याचा स्वीकार केला जाई. आमच्या कान्होबांना अद्यापि राजाश्रय मिळाला नव्हता, पण अलीकडे त्यांची जी झपाट्यानें प्रसिद्धी होऊं लागली होती, तिजवरून तो लवकरच मिळेल असा सुमार दिसूं लागला होता. सध्यां तरी ते भिक्षुकीचाच धंदा करीत हे खरें.

कान्होबांचा मोठा गुण ह्मणजे त्यांची शास्त्रोक्त वागणूक. कोणत्याहि रोग्यास दिनशुद्धि,शकुन इत्यादि पाहिल्याशिवाय ते औषध देत नसत. एकदा त्यांचेकडे एक महामारीचा रोगी आला असता, त्या दिवशी आमावास्या होती ह्मणून त्यांनी त्याला औषध दिले नाहीं. दुसऱ्या दिवशीं कान्होबा त्यास पहावयास गेले, पण तो रोगी रात्रींच दगावल्याचें त्यांना कळलें ! तथापि त्या बाबतींत कान्होबांचा कांहींच दोष नसल्यामुळे त्यानी त्याची विशेष पर्वा केली नाही. कान्होबाचा दुसरा गुण ह्मणजे त्याची परोपकारबुद्धि. ही इतकी तीव्र होती कीं, दिवसातून एकदां, दोनदां, दहादा देखील रोग्यास पहावयास जाण्यास ते कंटाळत नसत. आतां हें खरें की त्यांना हा प्रसंग क्वचितच येई, पण याचा अर्थ त्यांच्याकडे पुष्कळ रोगीच येत नसतील असा मात्र वाचकानी समजू नये. त्यांच्याकडे पुष्कळ रोगी येत, पण त्यांची औषधयोजनेची खुबीच अशी होती कीं, त्यांचें औषध एकदा पोचलें ह्मणजे रोग्यास वारंवार पहावयाचे त्याना कारणच पडत नसे! कान्होबांचा हा लौकिक न साहूनच कीं काय, लागवणकर वैद्यबोवा कान्होबांच्या औषधप्रयोगानें दिसून येणाऱ्या गुणांचा विपर्यास करून 'शतघ्न्याचें औषध एकदां पोंचलें कीं पुरे, रोगी पुन्हा वर मान करील तर हराम!' असें कुत्सितपणानें ह्मणत असत. एकदां तर लागवणकरांनीं कान्होबांना 'तुह्मी आपल्या रुग्णालयाला जोडून एक धर्मार्थ काष्ठशाला स्थापन करा, ह्मणजे रोग्याची कडेपर्यंत सोय केल्याचें श्रेय

तुह्मांला मिळेल,' असा हिडिस निरोप पाठविला! पण आपला परोकाराचा व्यवसाय नेकीनें चालविणें हेंच असल्या निंदकांना खासें उत्तर असें समजून कान्होबांनीं लागवणकरांच्या निरोपाकडे लक्ष्य न देतां धीमेपणानें आपला व्यवसाय चालू ठेवला. मात्र लेखी पुराव्यानें लागवणकरांची चांगली फजीती करावी म्हणून त्यांनीं आपल्या 'रोग्यांचें नांव व ठिकाण', 'रोगी आल्याची मिति', 'बरा होऊन गेल्याची मिति', 'दगावल्याची मिति' आणि 'शेरा' अशीं पांच सदरें घातलीं आणि एका नोंदवहीवर रोग्यांचें टिपण ठेवण्याची व्यवस्था केली. वाचकांना कान्होबांच्या नोंदवहीची कल्पना यावी म्हणून आम्ही तिजवरील एका पानाचा उताराच देतों:—

| रोग्याचें नांव व ठिकाण | रोगी आल्याची मिति | बरा हो. गे. मिति | दगावल्याची मिति | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ बहिरू धनगर रा. पुणें महामारी | आषाढ शु.५ शके१६८६ | ... | आषाढ शु. ६ शके सदर | कुपथ्यानें मेला |
| २ हरकू सावत रा. कात्रज (खोकला) | आषाढ शु.८ शके १६८६ | आषाढ शु. १५ | ... | दुर्धर पण वाचला. |
| ३ सावळो जोशी रा. भांबुर्डे (उदर) | आषाढ व. २ शके १६८६ | ... | श्रावण शु. ५ शके सदर | कुयोगावर पाहण्याचा हट्ट धरल्यामुळें मेला. |
| ४ रखमाजी ढालाईत, वडगांव (संनिपात ज्वर) | श्रावण व.१० शके १६८६ | ... | श्रावण व.११ शके सदर | पहावयास जातांना व येतांना विधवा समोर आली. |
| ५ भिमाबाई सुरवशी, तळेगांव (अतिसार) | भाद्रपद शु. १ शके १६८६ | ... | भाद्रपद शु. ३ शके सदर | व्याधी होऊन सबंध एक दिवस मध्यें गेल्यावर औषध सुरूं झालें. |

वरील उताऱ्यांत रोगी दगावल्याचें सदर भरण्याचें प्रमाण अधिक आहे असें वाचकांस वाटेल, पण त्यांत कान्होबाचा कांहींच दोष नाहीं हें अखेरच्या शेऱ्यांवरून दिसून येणार आहे. पुढें पुढें तर 'रोगी बरा होऊन गेल्याच्या मिती' चेंही सदर कान्होबांच्या नोंदवहीवर भरूं लागलें आणि कान्होबांची तत्कालीन राजवैद्यांत नाहीं तरी वैद्यराजांत गणना होऊं लागली. शके सोळाशें नव्वदच्या सुमारास कान्होबा ह्मणजे पुण्यांतलें एक वैद्यकीय प्रस्थ होऊन बसलें आणि त्यांनीं 'तुमचा हा प्रति-

स्पर्धी तुमच्या छातीवर पाय देऊन उभा आहे, वाटल्यास येऊन रोग्यांची नोंदवही पाहून चला' असा निरोप लागवणकरांस पाठविला!

होतां होतां आमच्या कथानकाच्या सुरवातीच्या सुमारास कान्होबा पुणें शहरांत आणि आसपासच्या प्रदेशांत चांगलेच महशूर झाले. ह्या त्यांच्या यशाला कारणेंही अनेक होतीं. एक तर कान्होबांची नाडीपरीक्षा सर्वोत्कृष्ट होती. रोग्यास पाहिल्या-बरोबर ते एकदम नाडी तपाशीत आणि त्याच्या विकाराचीं लक्षणें अचूक सांगून निदानाच्या समर्थनार्थ वाग्भट, योगरत्नाकर, इत्यादि ग्रंथांतले श्लोक धडाधड ह्मणून दाखवीत. त्यांचें पाठांतर इतकें मजबूत होतें कीं, तोंडानें एखादा श्लोक ह्मणून तो आपल्या वाग्भटाच्या हस्तलिखित पोथींतील अमुक पृष्ठावर अमुक पंक्तींत आहे असें त्यांनीं सांगितलें कीं तो त्या जागीं हटकून सांपडावयाचाच! कान्होबांच्या या जबर स्मरणशक्तीचा परिणाम फारच विलक्षण होई. एकदां त्यांच्या एका रोग्याचा दूत रोग्याची हकीगत कळविण्याकरितां धांवत त्यांच्याकडे आला. कान्होबांनीं त्याचीच नाडी पाहून त्याला श्वासाचा ह्मणजे दम्याचा विकार झाला असल्याचें सांगितलें. तो दूत तें मान्य करीना आणि आपणास कांहीं झालें नाहीं असा हेका घेऊन बसला. पण कान्होबानीं वाग्भटांतील एक श्लोक ह्मणून त्यांतील लक्षणांचें त्याच्या सांप्रतच्या लक्षणांशी बिनचूक साम्य दाखविल्याबरोबर त्याची खात्री पटली आणि त्यानें मुकाट्यानें कान्होबांचें औषध घेतलें!

आज तर कान्होबा विशेष खुषींत होते. आज उजाडल्याबरोबर त्यांना 'श्रीमंत दादासाहेबांची प्रकृति पहावयास यावें, नऊ घटका दिवसाच्या सुमारास जासूद बोलवावयास येत आहे' अशी वाड्यातून चिठी आली होती, आणि त्या चिठीवर 'पहावयास जाण्यास परवानगी आहे' अशी नाना फडणिसांची मखलाशी होती. लागवणकरांप्रमाणेंच आपणासही बोलवावयास पालखी न येतां आपणास चालत जावें लागणार ही कल्पना मनांत येऊन कान्होबा प्रथम अमळ नाराज झाले होते, पण खुद्द दादासाहेबांची स्थितीच सांप्रत परावलंबी असल्यामुळें पालखी पाठविण्याचे त्यांच्या हातीं नाहीं असा विचार करून त्यांनीं आपल्या मनाचें समाधान केलें. शिवाय लागवणकर हे श्रीमंताचे राजवैद्य असतां आपणांस ज्याअर्थी वाड्यांतले निमंत्रण आलें आहे त्याअर्थी श्रीमंताचा लागवणकरावरचा विश्वास आतां साफ उडाला असला पाहिजे, असा त्यांनीं तर्क बांधला आणि लागवणकरांस आजपर्यंत मिळणारा राजाश्रय यापुढें आपणास मिळणार अशी मनाशी खूणगाठ बांधली. वाड्यांत येताना मुद्दाम आडवाट करून ते लागवणकराच्या घरावरून आले. कर्मधर्मसंयोगानें त्या-वेळीं लागवणकर वैद्य दारातच उभे होते. कान्होबांना हवी होती तशी संधी मिळाली. त्यांनी मुद्दाम खांकरल्यासारखें करून 'मग काय, श्रीमंत दादासाहेबाची प्रकृति पहा-

वयाची आहे म्हणतोस!' असें बरोबर असलेल्या हुजऱ्यास मोठ्यानें म्हटलें आणि लागवणकरांकडे एकदां विजयी मुद्रेनें पाहिलें. लागवणकरांनीं त्यांचे शब्द निःसंशय ऐकले. ते ऐकून त्यांच्या मनावर काय परिणाम झाला हें कळावयास सध्यां आपणांस मार्ग नाहीं, पण कान्होबांना मात्र फारा दिवसांच्या वैराचा सूड घेत-ल्याचें समाधान लाभलें यांत शंका नाहीं. कान्होबा वाड्यांत आल्यावर त्यांना मोती-चौकांतल्या एका गच्चीवर नेऊन बसविण्यांत आलें. थोड्याच वेळांत श्रीमंत दादासाहेबांची स्वारी तेथें आली, पण ती जी आली ती सोंवळ्यानेंच येऊन सूर्या-कडे पहात उभी राहिली, त्यामुळें कान्होबांना त्यांचें विधान संपेपर्यंत वाट पहात बसणें भाग आलें. कान्होबा दादासाहेबांच्या विलक्षण अनुष्ठानाकडे जिज्ञासेनें पहात बसले असतांच आपण तेथें प्रविष्ट झालों आहोंत हें आतां वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल.

थोड्याच वेळांत दादासाहेबांनीं सूर्यावरून आपली नजर खालीं वळविली, इतक्यांत देव्या आचारी अगदी कडकडीत ऊन पाण्यानें भरलेला एक तांब्या,पळी पंचपात्री, आणि एक ताम्हन असें साहित्य घेऊन आला आणि तें दादासाहेबांच्या पाटापुढें ठेवून मुकाट्यानें निघून गेला. तांब्यांतून वाफा निघत होत्या त्यावरून त्यांतलें पाणी फारच गरम असावें असें दिसत होतें. दादासाहेबांनीं तांब्यांतलें पाणी पंचपात्रींत ओतून घेतलें, आणि पळीनें तसलें कढत पाणी हातावर ओतून घेऊन त्यानीं सूर्यास त्या पाण्याचे तीन अर्घ्य दिले! नंतर तोंडाने कांहीं मंत्र पुटपुटत त्यांनीं सूर्यास एक साष्टांग नमस्कार घातला. इतकें कृत्य आटोपल्यावर ते पाटावरून उतरून सतरंजीवर आले. ते सतरंजीकडे वळतांच कान्होबांनीं उठून त्यांना अभ्युत्थान दिलें. दादासाहेबांनीं त्यांना बसावयास सांगितलें आणि ते स्वतः बैठकीवर जाऊन बसले. नंतर 'वैद्यबुवा, तुमची अमळ खोटी झाली, मातक्यान् नाइलाज आहे, माझ्या अनुष्ठानास घटकाभर वेळ लागतो, काय करावें?' असें म्हणत दादासाहेबांनीं आपला हात कान्होबापुढें केला. कान्होबांनींही 'कांहीं नाहीं, खोटी कसली व्हावयाची त्यांत?' असें म्हणत दादासाहेबांचा हात घेऊन त्यांची नाडी पहावयास प्रारंभ केला. क्षणभर नाडी पाहून झाल्यावर कान्होबांनीं वाग्भटातला एक श्लोक म्हणून दादासाहेबांच्या विकाराचें निदान केलें. त्यांचें निदान इतकें अचूक होतें कीं, 'श्रीमंतांस घेरी मारत असली पाहिजे, अंगाचा दाह होत असला पाहिजे, शोष पडत असला पाहिजे, ग्लानी वाटत असली पाहिजे,' इत्यादि कान्होबांच्या प्रत्येक विधानागणिक दादासाहेबांना 'होय' म्हणत जाणेंच भाग पडलें! दादासाहेबांनीं विकाराचें नांव विचारतांच कान्होबांनीं 'पित्तप्रकोप' असें सांगितलें, व आठ दिवस औषध घेतल्यानें तो हटेल अशी

खात्री दिली. दादासाहेबांनीं आपण व्रतस्थ निराहारी असल्यामुळें औषधी द्रव्यें पोटात कशीं घ्यावीं, अशी शंका काढली, तेव्हां 'औषधं जान्हवीतोयं' असें सांगून कान्होबांनीं त्यांच्या शंकेचें निराकरण केलें. शिवाय 'प्रस्तुतच्या श्रीमंतांच्या प्रकृतिमानांत उपोषणें चालू ठेवण्यानें मूळव्याध किंवा विद्रधीसारखा एखादा भयंकर व्याधि होण्याचा संभव आहे, सबब श्रीमंतांनीं स्निग्ध व पौष्टिक असें भोजन चालू ठेवलें पाहिजे' असेंही कान्होबांनीं त्यांना बजावलें. दादासाहेब निमित्तालाच टेकले होते. त्यांना पूर्वीपासून मूळव्याधीचा विकार होता व त्यानें ते मनस्वी गांजले होते. अलीकडे त्याचा जरी उपशम झाला होता, तरी त्या विकाराची त्यांनीं इतकी दहशत घेतली होती कीं, त्याचा प्रादुर्भाव होण्याचा संभव आहे इतकें ऐकतांच ते घाबरले आणि त्यांनीं उपोषणें बंद करण्याचें एकदम कबूल केलें. दादासाहेबांनीं कान्होबांच्या निदानचातुर्याची पुष्कळच स्तुती केली आणि 'मी तुमचा लौकिक ऐकत होतों त्याप्रमाणें वस्तुस्थिती खरीच आहे,' असें ह्मणून त्यांची थोडी खुशामत-ही केली. श्रीमंतांनीं केलेली प्रशंसा ऐकून कान्होबा बेहद्द खुष झाले हें सांगावयास नकोच. अखेर कान्होबांना निरोप देण्याचें मनांत आणून दादासाहेब 'खंडो दीक्षितांना औषध आणावयास पाठवून देतों, मातब्यान् त्यांच्या जवळ अनुपान वगैरे सांगा' असें ह्मणाले. तें ऐकतांच 'आज व उद्यां दिनशुद्धी नसल्यामुळें परवाचे दिवशीं औषध सुरू करावें, तोंपर्यंत हलकें व पथ्यकर असें अन्न सेवन करावें ह्मणजे विशेष त्रास होणार नाहीं' असें कान्होबांनीं सुचविलें. दादासाहेबांना ती सूचना पसंत पडून त्यांनीं कान्होबांना सन्मानपूर्वक निरोप दिला.

---

## प्रकरण ४ थें

### कर्तव्यनिष्ठेचा विलायती नमुना. [ का. शु. ६-९१

आमच्या कथानकाच्या प्रारंभाच्या सुमारास ह्मणजे इसवी सन १७६९ या सालीं ईस्ट इंडिया कंपनीच्या मद्रास येथील वखारीचा गव्हर्नर लॉरेन्स पॉक हा जाऊन त्याचे जागीं ड्यु प्री नावाचा दुसरा मनुष्य गव्हर्नर होऊन आला. सन १७६५ सालीं क्लाइव्हनें दिल्लीच्या बादशहाकडून 'उत्तर सरकार प्रांतावर तुह्मास अधिराज्य दिलें आहे' अशा अर्थाचें एक फर्मान मिळाविलें आणि निजामाच्या ताब्यांत असलेला तो प्रांत पुढें थोड्याच दिवसांत या फर्मानाच्या आधारावर मद्रा-

सकर इंग्रेजांनीं जबरदस्तीनें बळकावला. त्याचें पारिपत्य करावयास निजाम असमर्थ असल्यामुळें तो हात पाय चोळून चोळून अखेर गप बसला. हा प्रांत मिळाल्यानें कलकत्याच्या फोर्ट वुइल्यम किल्यापासून तों तहत मद्रासच्या फोर्ट सेंट जॉर्ज किल्यापर्यंत हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावरून कंपनीचें निर्वेध राज्य झालें! मात्र निजामअलीची समजूत काढण्यासाठीं कंपनीनें त्याला असा करार करून दिला कीं, 'तुम्हांस आम्ही सालोसाल खंडणी देत जाऊं आणि प्रसंगीं सैन्याचीही मदत करूं.'

मद्रासकर इंग्रेजांनीं या वेळीं अर्काटचा नवाब महमदअली यास हाताशीं धरिलें होतें. हैदराशीं त्यांचा नुकताच तह झाला होता त्याअन्वयें त्याच्या संकट-समयीं त्याला मदत करण्याचा त्यांनीं करार केला होता. प्रस्तुत मराठ्यांची स्वारी आपणावर झाली हें पाहतांच हैदरानें इंग्रेजांकडे कुमक मागितली. इंग्रेजांनीं 'संन्याशाच्या मस्तकानें परस्पर विंचु मारावा' या न्यायानें महमदअलीस हैदराची कुमक करण्याचा आग्रह केला. पण महमदअली हैदराचा पक्का द्वेष्टा असल्यामुळें त्यानें हैदरास मदत करण्याचें साफ नाकारलें! याच सुमारास सर जॉन लिंडसे नांवाचा इंग्लंडच्या तिसऱ्या जॉर्ज राजाचा एक वकील विलायतेहून अर्काटकर नबाबाच्या दर-बारीं आला होता, त्यानेही महमदअल्लीला हैदरास मदत न करण्याचीच सल्ला दिली. त्यावरून महमद अल्ली अगदीच पिसाळून हैदरास मदत करावयाची नाही असा निश्चय करून तर बसलाच, पण त्याचे वैरी जे मराठे त्याना मिळावयास तयार झाला! ड्यु प्रॉ आणि त्याचें सल्लागारमंडळ यानी त्याला मराठ्याना मिळण्यापासून मोठ्या शर्थीनें परावृत्त केले, आणि "आमची स्थिति सध्या अत्यंत हलाखीची असल्याने आमच्यानें तुम्हास प्रत्यक्ष कुमक करवत नाही, पण तुमचा वैरी महमदअल्ली याला आम्ही मराठ्यांस मिळूं दिलें नाहीं हीच आमची कुमक समजा" असा हैदरखानास निरोप पाठविला! हा इंग्रेजी कावा हैदरनाईक मरेपर्यंत विसरला नाही.

मद्रासकर इंग्रेज कंपनीच्या कारभारांत इंग्लंडच्या राजाच्या वकिलानें ढव-ळाढवळ करावयाचे कारण काय, अशी शंका वाचकाना येईल म्हणून तिचा थोडा खुलासा करणें जरूर आहे. ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभाराबद्दल विला-यतेत या वेळीं लोकमत फारच बिघडलें होतें. विलायतेंतल्या फाटक्या तुटक्या भणंगानें ईस्ट इंडिया कंपनीच्या पदरी नोकरी धरावी, हिंदुस्थानांत यावें, लाच-लुचपतीनें हवातसा पैसा मिळवावा, लक्षाधीश कोट्याधीश होऊन परत जावें, आणि तिकडच्या एखाद्या उमरावाच्या मुलीशी लग्न करून नबाबी थाटांत मिरवावें, हें दृश्य तिकडील सामान्य जनसमूहास सहन होईनासें झालें होतें. त्यांनीं ईस्ट इंडिया कंप नीचे नोकर हिंदुस्थानांतील प्रजेला वाटेल तसे लुबाडून पैसा आणतात असा गिल्ला

सुरू केला. खुद्द कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्मणून ईस्ट इंडिया कंपनीचें जें नियामक मंडळ विलायतेंत होतें, त्याला आपल्या हिंदुस्थानांतील नोकरांच्या वागणुकीची चीड आली. कंपनीच्या भागीदारांपेक्षां तिच्या नोकरांनाच शेंकडोंपट अधिक पैसा मिळावा हें दृश्य त्यांना विपरीत दिसूं लागलें. फारच बोभाटा झाल्यावर इंग्लंडच्या राजानें कंपनीच्या नोकर लोकांच्या हिंदुस्थानांतील धिंगाण्यास आळा घालण्याकरिता सर जॉन लिंडसे नांवाचा वकील हिंदुस्थानात पाठविला व इकडील राजेरजवाड्यांशीं स्नेह संपादन करण्याकरितां लागणारे जरूर ते सर्व अधिकार त्याला दिले. कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स या संस्थेनेही आपल्या इकडील नोकरांस चक्क लिहून कळविलें की 'तुह्मी हिंदुस्थानातील राजेरजवाड्याच्या अंतर्गत भांडणांत न पडतां केवळ आपला व्यापार संभाळून रहावें.' अशा रीतीनें दोनीकडून थपडा बसल्यामुळें मद्रासचा गव्हर्नर ड्यु प्री आणि त्याचें सल्लागार मंडळ यांचा नाइलाज होऊन त्यांना तूर्त तरी मूग गिळून बसणे भाग आलें. मद्रासकर इंग्रेज हैदर नाइकाला स्वतः कुमक न करिता महमदअल्लीकडून ती देववण्यास का पहात होते, याचें बीज आता वाचकांच्या लक्ष्यांत आले असेलच.

मद्रासचा गव्हर्नर आणि त्याचे सल्लागार जरी अशा रीतीनें थंड झाले, तरी मद्रासकर इंग्रेजात या वेळी असा एक महत्वाकांक्षी मनुष्य होता की, त्याला इंग्लंडच्या राजाने केलेला हा लाडा कारभार मुळीच खपला नाही. त्याने हिंदुस्थानांतील कंपनीच्या कारभारात इंग्रेज राजाने इतःपर ढवळाढवळ करूं नये अशी व्यवस्था घडवून आणण्याचा चंग बांधला. हा मनुष्य हिंदुस्थानच्या इतिहासात पुढें प्रसिद्धीस आलेला वॉरन हेस्टिंग्ज होय. त्याच्याकडे या वेळी मद्रासच्या इंग्रेज वखारीमधील जावक मालाच्या संरक्षकाचे काम होते. त्यानें विलायतेंतील कोर्ट ऑफ डायरेक्टर्स याना 'विलायतच्या राजाने आपला वकील पाठवून कंपनीच्या कारभारांत ढवळाढवळ करणे रास्त नाही, आह्मी इकडे पराक्रमाने पैसा व मुलूख मिळवून कंपनिचा फायदा करून देत आहोत, आणि राजाचीही इभ्रत व कीर्ति वाढवीत आहोत, अशा स्थितीत राजाने अशी ढवळाढवळ केल्यास कंपनीची आजपर्यंतची सर्व कामगिरी फुकट जाऊन तिच्या व्यापाराला आणि राज्यालाही धोका उपस्थित होईल' इत्यादि आशयाची पत्रावर पत्रे पाठविली. पण त्याचा काही विशेष उपयोग झाला नाही. अधिक राज्य मिळविण्याची मद्रासकर इंग्रेजाची हाव तूर्त तरी सिद्धीस गेली नाही. राज्यसंपादनाची इच्छा सफळ होत नाही असे पाहताच वॉरन हेस्टिंग्सने आपला मोर्चा म्हैसूर इलाख्यांतील आणि आसपासच्या प्रांतातील कापसाचा व्यापार काबीज करण्याकडे वळविला. तो त्यानें कसा सिद्धीस नेला हे पुढें यथाक्रम येईलच. मद्रासकर इंग्रेजाच्या प्रस्तुतच्या परिस्थितीची वाचकांना

आतां बरीच कल्पना आली असल्यामुळें कथानकाचें सूत्र पुढें चालवूं.

मागील प्रकरणांत सांगितलेली हकीगत घडली त्याच ह्मणजे कार्तिक शुद्ध षष्ठीच्या दिवशीं मध्यान्हीच्या सुमारास मद्रास येथील फोर्ट सेंट जॉर्ज किल्ल्याच्या आवारांतील एका छोटेखानी बंगल्यांत एक सुंदर तरुणी चितारकाम करीत बसली होती. ती युरोपियन तर होतीच, पण तिच्या सौंदर्याच्या विशिष्ट ढबीवरून ती इंग्रेज नसावी असें दिसत होतें. आणि ती खरोखरच इंग्रेज नसून जर्मन होती, व तिचें नांव हेन्रिएटा असें होतें. तिचें वय सुमारें बावीस वर्षांचें दिसत असून तिचे लावण्य अत्यंत मनोहर होते. तिचा वर्ण गोरापान, नाक सरळ, कपाळ रुंद आणि केशकलाप पिंगट सोनेरी रंगाचा होता. तिचे डोळे घारे, पण अत्यंत पाणीदार असून त्यांत एक प्रकारच्या उन्मादाची चमक वावरत होती. तिचा बांधा उंच व सडपातळ, गात्रयष्टि नाजूक आणि चेहऱ्याचा एकंदर डौल आकर्षक होता. हेन्रिएटा एका गरीब कुळांत जन्मलेली असून तिच्या मातापितरानी तिचे लग्न बॅरन इमहॉफ नांवाच्या एका प्रौढवयस्क जर्मन उमरावाशी करून दिले होते. या उमरावाजवळ एका पदवीखेरीज दुसरी कसलीच संपत्ति नसल्यामुळे हेन्रिएटा पूर्वी जी एका भणंगाची मुलगी होती ती आता एका सरदाराची भिकारीण बायको झाली इतकेच. दोन चार वर्षांपूर्वी बॅरन इमहॉफने युरोप खंडातील दारिद्री लोकाना हिंदुस्थानात आपले नशीब काढावयाची सोय चांगली झाली असल्याचे ऐकले आणि तो बायकोसह कलकत्त्यास आला. पण इंग्रेज लोकाना इतर युरोपीय राष्ट्रांचा मत्सर वाटत असल्यामुळें असो, किंवा अन्य कांही कारणामुळे असो, त्याची कलकत्त्यास कांही सोय लागली नाही. तेव्हा कंटाळून तो एका इंग्रेजी जहाजातून मद्रासेस जाण्यास निघाला. याच जहाजातून वॉरन हेस्टिंग्सही मद्रासेस चालला होता. वाटेंत इमहॉफ दंपत्याची आणि त्याची चांगलीच ओळख झाली, व हेस्टिंग्स हा मोठा दिलदार आणि लाघवी मनुष्य आहे अशी इमहॉफ नवराबायकोंची खात्री झाली. त्याचा प्रवास चालू असताच हेस्टिंग्स एकाएकी फार आजारी पडला, तेव्हा हेन्रिएटा इमहॉफने त्याची चांगलीच शुश्रूषा केली. ती एकसारखी त्याच्या उशाशी बसून होती आणि त्याच्या औषधपाण्याची व्यवस्था स्वतः पहात होती. तिच्या शुश्रूषेला यश येऊन हेस्टिंग्स लवकरच खडखडीत बरा झाला. हेस्टिंग्स फारच गुणवान् आहे अशी हेन्रिएटाची खात्री झाली आणि तिच्या आजपर्यंत झालेल्या हालअपेष्टा मनात येऊन हेस्टिंग्सचें मन द्रवले. मद्रासेस आल्याबरोबर हेस्टिंग्सनें बॅरन इमहॉफला मद्रासकर कंपनीच्या वखारींत एक किफायतशीर नोकरी लावून दिली. इतके दिवस कष्ट भोगल्यासारखे हेन्रिएटाला एकदाचे चांगले दिवस आले. ही गोष्ट आमच्या कथानकाच्या प्रारंभापूर्वी नुकतीच घडून आली होती.

वर सांगितल्याप्रमाणें हेन्रिएटा चित्रकर्मांत गुंतली असून ती एका सरोवराचा देखावा रेखाटीत होती. पण काय असेल तें असो, तिचें लक्ष्य आज चित्ररेखनाकडे मुळींच लागत नव्हतें. ती वरचेवर अंगणांतील फाटकाकडे पहात होती, आणि मधून मधून उष्ण श्वास टाकीत होती. मध्येंच ती अंगावर शहारे आल्यासारखें करी आणि त्या क्षणापुरता तिचा चेहरा पाढरा फटफटीत होई! पुन्हा क्षणभरानें तिच्या गालावर गुलाबी लाली चढूं लागे आणि तिच्या डोळ्यांत उन्मादाचें पाणी तळपूं लागे. तिच्या मनाची अशी चलबिचल का बरें होत असावी? तिला माहेरच्या प्रियजनांची आठवण होऊन असे झाले असेल? छें, ते शक्यच नाही. तिला आधीं माहेरचे प्रियजन कोणी राहिलेच नव्हते, आणि राहिले असले तरी त्याच्या विरहदुःखाचीं चिन्हे ही तरी खास नव्हती. तर मग काय, कुलीनत्वाला अनुचित असे काही विचार तिच्या मनात येत असावे, आणि ते मनात येऊं देणे बरें नव्हे असें वाटून ती त्याना झाडून टाकण्याचा प्रयत्न करीत असावी? हो तसेंच असलें पाहिजे. तो पहा, तिचा चेहरा पुन्हा एकदा गोरामोरा झाला! आता ती मन घट्ट करून आपले कलम हातात घेऊन पुनश्च एकवार चित्र रेखाटूं लागली! आणखी थोडा वेळ गेला. अरेरे, पण हे काय? सरोवरात पोहणाऱ्या बदकाची आकृति रेखाटावयास म्हणून ती बसली असता तिच्या हातून नकळत बदकाच्या ऐवजी जहाजाची आकृति रेखाटली गेली! आपल्या विचाराच्या गुंगीत अफाट दर्यावर चालणारें गलबत हेन्रिएटाने खुष्कीवरील एका टीचभर सरोवरांत आणून सोडलें! त्या गलबतावर एक अस्पष्ट मनुष्याकृति तिच्या नजरेस पडूं लागली, आणि तीच स्पष्ट होत होत तिच्यापुढे वॉरन् हेस्टिंग्सची मूर्ति उभी राहिली!

हेन्रिएटा खडबडून उठली. आपल्या हातून नकळत झालेली चूक तिच्या लक्ष्यात येऊन ती खजील झाली. तिनें चित्राकडे एकवार नजर टाकली, आणि तिचें तिलाच हसू आलें. तिने एकवार घड्याळाकडे नजर टाकली तो नुकतेच साडेबारा वाजले आहेत असें तिला दिसून आले. तिचा नवरा बॅरन इम्हॉफ बखारीत आपल्या नोकरीच्या कामावर गेला होता. तो दुपारच्या जेवणास येण्यास अजून चागला दीड तास अवकाश होता. तेव्हा तोपर्यंतचा वेळ कसा घालवावा ही विवचना हेन्रिएटाला पडली. नवरा येईपर्यंत आपण समुद्रकिनाऱ्यावरून हिंडून यावें असें तिच्या मनात येऊन तिने आपली टोपी व शाल उचलली. पण इतक्यात तिला कसलीशी आठवण झाली आणि पुन्हा एक उसासा टाकून तिने आपली टोपी व शाल खालीं ठेवली आणि ती कोचावर येऊन बसली. ती कोचावर बसावयास आणि रस्त्यातील फाटकाचे दार उघडलेलें ऐकूं यावयास एकच गाठ पडली. कोचावर अमळ जोरानें बसल्यामुळें त्याच्यावरील मऊ गिर्द्यावर हेन्रिएटाच्या नाजूक

देहाला बसणारे हेलकावे अजून पुरते थांबले नव्हते तोंच फाटक उघडल्याचा आवाज ऐकूं येऊन तिचें हृदयही उशा खाऊं लागलें! फाटक उघडून आंत कोण येत असावें याची कल्पना तिला झाली. तिची मुद्रा एकदम प्रसन्न झाली, पण तिच्या छातीची धडधड मात्र अधिकच वाढली. कां बरें? आंत येणारी व्यक्ति आपणापुढें येऊन तिची व आपली भेट होणें एकंदरींत धोक्याचें आहे, असें तर तिची मनोदेवता तिला सांगत नसेलना?

पण या प्रश्नाचें उत्तर वाचकांना देण्यास आह्मांस वेळ नाहीं, कारण तो पहा दिवाणखान्याच्या दारांतून एक इंग्रेज गृहस्थ हातांत टोपी घेऊन आंत आला, आणि हेन्रिएटास पाहून स्मितपूर्वक ' मिसेस इम्‌हॉफ, मी कामाच्या वेळी येऊन आपली खोटी तर करीत नाहींना? ' असें इंग्रेजींत ह्मणत तिच्या जवळ आला. त्याला पाहून व त्याचे शब्द ऐकून हेन्रिएटानेंही ' छे छे, खोटी मुळींच नाहीं, या बसा कीं ' असें इंग्रेजींतच उत्तर करून आपल्या कोचाजवळच असलेल्या एका खुर्चीकडे बोट दाखविलें. तो इंग्रेज गृहस्थ खुर्चीवर बसतो आहे, तों आह्मी वाचकांस त्याची ओळख करून देतों. हा इंग्रेज गृहस्थ ह्मणजे प्रकरणाच्या आरंभीं आह्मी ज्याचा उल्लेख केला तो वॉरन हेस्टिंग्स होय. हेस्टिंग्सचे वय या वेळी सदतीस वर्षांचे असून त्याचा बांधा मध्यम उंच, सडपातळ पण प्रमाणबद्ध होता. त्याचे नाक सरळ, डोळे मोठे व पाणीदार आणि एकंदर चेहरेपट्टी मोठी आकर्षक होती. इंग्लंडात लाहनपणी जवळ जवळ उडाणटप्पू ह्मणून गाजल्यामुळे त्याच्या पालकानी त्याला ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरींत पाठविलें होते. जवळ जवळ एकोणीस वर्षें कलकत्याच्या वखारींत काम करून त्यानें बरेच नाव आणि पैसाही कमावला होता, व तेथून नुकतीच त्याची रवानगी मद्रासेस करण्यात आली होती. कलकत्याहून मद्रासेस येतांना तो वाटेंत आजारी पडला, त्यावेळी त्याची हेन्रिएटाने चांगली शुश्रूषा केली हे पूर्वी सांगण्यात आलेच आहे. त्या ओळखीचा परिणाम दृढ परिचयात होऊन हेस्टिंग्स बॅरन इमहॉफच्या घरी वारवार येऊं लागला. त्यात पुन्हा हेस्टिंग्सची येण्याची वेळ आणि बॅरनची कामावर गेला असल्याची वेळ हटकून एकच पडूं लागली व त्याला हेन्रिएटाबरोबर तासचेतास बोलत बसावयाची संधि मिळूं लागली. या परिस्थितीचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. दोघाच्याहि मनात पातकी प्रेमाचा प्रादुर्भाव होऊन त्याला फक्त वाचा फुटावयाचीच तेवढी राहिली होती.

' बॅरन इमहॉफ अजून कामावरून आले नाहीत वाटतें? ' हेस्टिंग्स हेन्रिएटानें दाखविलेल्या खुर्चीवर बसत ह्मणाला, ' या हिंदुस्थानच्या उष्ण हवेंत दुपारची कामाची वेळ म्हणजे खरोखर एक शिक्षाच आहे. पण काय करावें, नाइलाज आहे. इथल्या व्यापारी आणि शेतकरी पशूंना तीच वेळ सोयीची वाटते! '

' पण बॅरन इम्‌हॉफना त्यापासून कांहींच त्रास वाटत नाहीं ' हेन्रिएटा म्हणाली, ' नोकरी म्हटली कीं थोडेसे हाल व्हावयाचेच. त्यांच्या विपत्तींत त्यांना तुह्मी ही नोकरी लाऊन दिलीत याबद्दल ते तुमची वारंवार आठवण काढतात, आणि तुमचे उपकार मानतात. '

' उपकार कसले त्यांत ? ' हेस्टिंग्स म्हणतो, ' माझें तें कर्तव्यच होतें. मिसेस इमहॉफ, तुम्हांला खरें सांगू कां, नुसती नोकरीचवशी काय, पण माझे प्राण देखील जरी तुमच्या पायावर वाहिले तरी देखील ते थोडेच होणार आहेत, असें मला वारंवार वाटतें. तुह्मी माझ्यावर तसें ऋणच करून ठेवलें आहे. ' हे शब्द बोलत असतां हेटिंग्सची नजर हेन्रिएटाच्या नजरेस भिडून राहिली होती.

हेन्रिएटाला कसेंसेंच झालें. हेस्टिंग्सच्या नजरेंत कृतज्ञतेहून कांहीं तरी वेगळें होते आणि तें तिच्या दृष्टीस सहन होईना ह्मणूनच कीं काय न कळे, तिनें आपली दृष्टि जमिनीकडे वळविली, आणि ती ह्मणाली, ' हेस्टिंग्स, तुह्मी माझ्या साध्या कृतीला उगीच मोठेपणा देत आहात. जहाजावर मी तुमची थोडी शुश्रूषा केली हेच ना माझें ऋण ? मग तितपत ऋण कोणीही दुसऱ्यावर करितो, त्याला एवढें गौरव कशास पाहिजे ? '

' हेन्–मिसेस इमहॉफ ' हेस्टिंग्स आवेशानें ह्मणाला, ' तुम्हांला काय सांगूं, तुम्ही माझ्यावर नुसते ऋणच करून ठेवलें नाहीत, तर मला प्राणदान दिलेंत! मला औषधें पाजली नाहींत, अमृत पाजलेंत. या अफाट दुनियेत एकटा आणि निराधार पडलेला हा जीव औषधानें वाचला नाही, पथ्यानेंही जगला नाहीं, तर केवळ तुमच्या प्रेमळ शुश्रूषेनेच बचावला. तुह्मी मला वाचवलेंत हे माझ्या शिरावर डोंगराएवढे उपकार करून ठेवलेत, पण आता मला असे वाटूं लागलें आहे कीं, तुह्मी माझी शुश्रूषा केली नसतीत, आणि मी तसाच मेलो असतों तर अधिक बरे झाले असतें. ' असे ह्मणत हेस्टिंग्सने कपाळावर हात ठेवला व दीर्घ निश्वास सोडला.

' अगोबाई, हेस्टिंग्स ' हेन्रिएटा घाईने उद्गारली, ' तुह्मी काय बोलता हें ? '

' खरें तेंच बोलतों ' हेस्टिंग्स ह्मणाला, ' तुह्मी मला एका तापातून वाचव-लेंत आणि दुसऱ्या तापांत नेऊन टाकलेंत ! पहिला ताप मी कसा तरी सहन केला असता – नव्हे करीतच होतों, पण हा दुसरा ताप मात्र मला मुळीच सोसवत नाहीं. तो माझ्या अंतरंगाचा अहोरात्र दाह करीत आहे ! '

' हेस्टिंग्स, ' हेन्रिएटा म्हणते, ' तुह्मी असें संदिग्ध काय बोलत आहांत ? स्पष्ट बोला, मला अशी संदेहांत टाकूं नका. दुसरा ताप कसला, आणि तो सोस-

वत काय नाहीं, हें आहे तरी काय, ? हे शब्द बोलत असतां हेन्रिएटाचें हृदय एकसारखें कंप घेत होतें.

'स्पष्ट बोलेन,' हेस्टिंग्स म्हणाला, 'पण माझे शब्द तुह्मांला रुचणार नाहीत. तुह्मी मला कृतघ्न, दगलबाज, हरामखोर ह्मणाल. नको नको, ते शब्द बोलून तुह्मांला दुखविण्यापेक्षां मीच जन्मभर तळमळत राहीन, तें पुरवलें !'

'हेस्टिंग्स, आज तुम्हाला झालें आहे तरी काय ?' हेन्रिएटा ह्मणाली, 'मला दुखविण्याजोगें तुह्मी काय बोलणार आणि बोलाल तरी कसे ? सागा, काय असेल तें सांगा, तुमच्या शब्दानी मला दुःख होणार नाहीं असे मी तुह्मांला वचन देते.'

'काय, तुह्मी मला वचन देतां ?' हेस्टिंग्स आतुरतेनें म्हणाल, 'छे, पण वचन दिल्याचा तुम्हांला मागाहून पस्तावा होईल. तुह्मी माझें फिरून तोंडसुद्धा बघणार नाहीं. बाकी एका अर्थी तेंच बरें होइल. आताच्या यातना सोशीत बसण्यापेक्षा–' इतकेंच ह्मणून हेस्टिंग्स थाबला.

'हेस्टिंग्स,' हेन्रिएटा कंपित स्वरानें म्हणाली, 'तुह्मी आज हें मांडिलें आहे तरी काय ? तुमचें मी तोंड देखील बघू नये असें तुह्मी काय बोलणार ? बोलाच तर मग, हेस्टिंग्सच्या कोणत्याही शद्बानी दुखाविले जाण्याइतकें हेन्रिएटाचें मन दुबळें नाहीं हें तिला एकदां सिद्ध करून देऊं द्या !'

'काय ? माझ्या शद्बानी तुह्मी नाराज व्हाल असें मी तुह्मास स्पष्ट सुचाविलें असूनही तुह्मी मला बोलण्याची आज्ञा करीत आहात ?' हेस्टिंग्स उद्गारला, 'पण छे, ते शब्दच माझ्यानें उच्चारवत नाहीत. परस्त्रीवर नजर ठेवणारा बदमाष, मित्राशी कृतघ्न होणारा हरामखोर असें म्हणवून घेण्यापेक्षा हें निःस्सार जिणें एका क्षणात संपाविलेलें काय वाईट ?' असें म्हणून हेस्टिंग्सने खिशातून एक खजीर काढला व तो आपल्या छातीत खुपसून घेण्याचा आविर्भाव केला.

हेन्रिएटा ताडकन् उठली, आणि हेस्टिंग्सच्या हातातला खंजीर दाराच्या कोपऱ्यांत दूर फेकून ह्मणाली, "वॉर–मिस्टर हेस्टिंग्स, असा आततायीपणा करूं नका गडे! प्राणावर इतके उदार व्हायला काय झाले? तुमचें दुःख मला सागा, मी तें हलकें करीन."

'मिसेस इमहॉफ्' हेस्टिंग्स ह्मणाला, 'माझे दुःख शाब्दिक सहानुभूतीने हलकें होण्याजोगे नाही. ते हलकें करावयास तुह्मास मोठाच यज्ञ करावयास पाहिजे. तुमच्या उपकारानी बद्ध झालेला हा गुलाम तुमच्या गुणास लाचावून तुमच्या प्रेमाचा अभिलाष करण्याइतका धीट बनला आहे, आणि तरी पण त्या प्रेमाची याचना करण्याचा हक्क त्याला नाही हें त्याला कळते आहे!'

'हेस्टिंग्स, तुह्मी काय बोलतां हें?' हेन्रिएटा सदसद्विवेकबुद्धीच्या टोचणीशीं जिवापाड झगडत ह्मणाली, 'देवा, आतां मी करूं तरी काय?'

'काय करूं?' हेस्टिंग्स तिच्यापुढें गुडघे टेकून ह्मणाला, 'हेन्रिएटा, लाडके, दुसरें कांहीं करूं नको, या दासाला आपला ह्मण.' असें ह्मणत त्यानें धिटाईनें तिचा हात ओढून घेऊन त्याच्या तळव्याचें चुंबन घेतलें.

हेन्रिएटानें हेस्टिंग्सच्या मुरदाडपणाचा प्रतिकार केला नाहीं. आणखी एक क्षण जाता तर ती पतित होणार होती. पण तिच्या नशीबानें यावेळेपुरती तरी खैर केली. फाटकाचे दार जोरानें उघडून 'मेहरबान, साब!' ह्मणून कोणी तरी मुसलमानी भाषेत मोठ्यानें हाक मारलेली ऐकूं आली.

हेन्रिएटानें आपला हात झटकन् मागें ओढून घेतला. हेस्टिंग्सची अवस्था कशी झाली असेल, व त्याचा किती विरस झाला असेल याची कल्पना करण्याचें काम आह्मी वाचकावरच सोपवितो. त्यानें तो आवाज आपल्या मुसलमान चपराशाचा हे चटकन् ओळखलें, व तो उठून पुढें झाला. पट्टेवाल्याचा खून करावा इतका त्याला त्याचा राग आला होता. तो दात ओठ खातच दारात गेला. इतक्यात चपराशीही अंगणात बराच पुढें आला होता, त्याची व हेस्टिंग्सची दृष्टादृष्ट झाली. तो पळत आल्यामुळें धापा टाकीत आहे असें हेस्टिंग्सला दिसलें. त्यावरून तसेंच कांहीं तरी महत्वाचें काम असल्याशिवाय तो आपणास येथपर्यंत हुडकीत येण्याचें धारिष्ट करावयाचा नाहीं हें ओळखून हेस्टिंग्सनें त्यास मुसलमानींतून काय आहे?' म्हणून विचारलें. चपराशानें 'चिकबाळाप्पा आले आहेत. आणि आपली भेट घेऊन लगेच जाणार आहेत' असें सांगितलें. तें ऐकताच हेस्टिंग्सचा पट्टेवाल्यावरचा राग क्षणात मावळला व 'त्यांना आलोच म्हणून सांग' असें म्हणून तो हेन्रिएटाकडे वळला. तिची रमणीय मूर्ती प्रणयभंगाच्या कोपानें लाल झालेली त्यास दिसली. हें स्वर्गीय सुधेचें ताट सोडून जावें की न जावें हा विचार क्षणमात्र त्याच्या मनात येऊन तो गोंधळला. पण दुसऱ्याच क्षणीं 'जावें–गेलेच पाहिजे', असा मनाशीं निश्चय करून 'माफ कर हेन्रिएटा, तसेंच राष्ट्रहिताचें काम आल्यामुळें केवळ नाइलाजानें या स्वर्गीय नंदनवनातून मी त्या नरकभूमीत जात आहे; काम आटोपून लवकर परत येतो' असें म्हणत त्यानें दाराच्या कोपऱ्यात पडलेला खंजीर उचलून घेतला आणि हेन्रिएटाकडे दृष्टी न वळविता तो तेथून बाहेर झटकला तो इतक्या झपाट्यानें बाहेर पडला की, 'फिरून मला तोंड सुद्धा दाखवूं नका' असें हेन्रिएटानें फणफणत उच्चारलेले शब्द देखील त्याला ऐकूं आले नाहींत!

वाचकहो, हेस्टिंग्सचा प्रणय पापी, हिडिस होता हें तर उघडच आहे. इंग्रेज इतिहासकारांना देखील त्याचें समर्थन करता आलें नाहीं. पण त्याच्यासारख्या

परिस्थितींत षड्रिपूंपैकीं अत्यंत प्रबळ अशा थोरल्या दादांची पकड ताडकन् झिंजाडून आपल्या स्वतःच्या देखील नव्हे, तर राष्ट्राच्या स्वार्थास जागणारे हरीचे लाल तत्कालीन आर्यावर्तांत कितीसे सांपडले असते बरें? पण या प्रश्नाचें उत्तर इतिहासानेंच दिलें असल्यामुळें आपणांस त्याची पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. तरी देखील दुसरा एक प्रश्न वाचकांस विचारल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. तर मग बोला वाचक मित्रहो, परस्त्रीवर डोळा ठेऊन तिला भ्रष्ट करूं पाहणाऱ्या वॉरन हेस्टिंग्सचा नीचपणा अधिक निंद्य, कीं अप्सरेसारख्या सुंदर रमणीच्या समागमसुखाला केवळ राष्ट्रहिताखातर लाथाडून 'कामार्ताहि प्रकृतिकृपणाश्चेतनाचेतनेषु' या कालिदासीय वचनाला हरताळ फासणाऱ्या वॉरन हेस्टिंग्सची कर्तव्यनिष्ठा अधिक स्तुत्य?

---

## प्रकरण ९ वें.

### कर्तव्य निष्ठेचा हिंदी नमुना. [ कार्तिक शु. ६-१६९१

मागील प्रकरणात सांगितलेली हकीकत घडून सुमारे अर्धी घटका झाली आहे अशी कल्पना करून आह्मी वाचकास वॉरन हेस्टिंग्सच्या बंगल्यांत घेऊन जात आहो. फोर्ट सेंट जॉर्ज किल्याच्या तटबंदीच्या आंत कंपनीच्या नोकरांकरिता जे अनेक बंगले बांधले होते, त्यांच्या जवळ जवळ मध्यभागींच हा बंगला असून तो लहानसरच पण सुंदर होता. बाहेर एक पडवी, आत एक सोपा, सोप्याच्या एका बाजूस सैपाकघर, दुसऱ्या बाजूस एक लहानशी खोली आणि मागल्या बाजूस एक पडवी इतकाच बंगल्याचा सारा मिळून विस्तार होता. अंगणात एक लहानसा बगीचा केला असून त्याच्यामधून फाटकातून बंगल्यात जाण्याची वाट होती. पडवीला लोखंडी पट्याची जाळी बसविली असून तिजवर एक हिरवा गार वेल सोडलेला दिसत होता. हेस्टिंग्स अद्यापि अविवाहित होता, त्यामुळें एक सैंपाकी आणि एक दोन नोकर यावाचून त्याचा असा काही वेगळा परिवार नव्हता. बाहेरची पडवी आणि आंतला सोपा हे दोन्ही उत्कृष्ट शृंगारलेले असून हेस्टिंग्सच्या सदभिरुचीची साक्ष देत होते. सोप्यात एक सलग बैठक टाकलेली असून तिजवर एक टेबल, दोन तीन खुर्च्या, व एक कोच इतकें सामान व्यवस्थित रीतीने माडून ठेवलेलें दिसत होते. पडवींतही अशीच बैठक टाकली असून दोन तीन खुर्च्या भिंतीला टेकून माडलेल्या होत्या. घरांत चोहोंकडे स्वच्छता व टापटीप दिसून येत होती.

या वेळीं सोप्यावर दोन खुर्च्यांवर दोन इसम बोलत बसले होते. त्यांतील एक स्वत: वॉरन हेस्टिंग्स हा असून दुसरा म्हैसूर येथील चिकबाळाप्पा या नांवाचा एक व्यापारी होता. त्याचें वय पंचेचाळीस वर्षांच्या सुमाराचें दिसत होतें. त्याचा वर्ण काळाकुट्ट, नाक ठसठशीत व जाड, दृष्टि भेदक आणि आवाज घोगरा होता. त्याचा बांधा ठेंगणा व अंगलोट बोजड असल्यामुळें तो विशेषच कुरूप दिसत होता. त्याचा धंदा दलालीचा असून म्हैसूर प्रांतांत पिकणारा कापूस शेतकऱ्यांकडून खरेदी घेऊन त्याचे गठ्ठे ईस्ट इंडिया कंपनीच्या मद्रास किंवा अर्काट येथील वखारींत आणून विकणारे जे अनेक दलाल लोक होते त्यांपैकीं तो एक होता. आमच्या कथानकाच्या काळीं म्हैसूर व त्याच्या आसपासचा प्रदेश यांतून कापूस पुष्कळ पिकत असे. उपरि-निर्दिष्ट दलालांचे गुमास्ते हे खेड्यापाड्यांतून फिरून शेतकरी लोकांचा कापूस खरेदी करून त्याचे गठ्ठे आपापल्या मालक दलालांकडे आणून गुदरीत. नंतर ते दलाल लोक ते गठ्ठे कंपनीच्या वखारींत नेऊन विकीत. त्या वेळीं दक्षिण कर्नाटकात चोहोंकडे हैदरअल्ली, अर्काटकर नबाब, निजाम, इंग्रेज आणि मराठे अशा परस्पर-विरोधी राज्यकर्त्यांच्या मोहिमा, आणि पुंड-पाळेगाराचे दंगे एकसारखे चालू असल्यामुळें सर्वत्र बेबंदशाही माजली असून प्रजेच्या जीविताची आणि वित्ताची मुळीच शाश्वती नसे. बहुतेक शेतकरी लोक कर्जबाजारी आणि दारिद्र्यांत खितपत पडलेले असून शेतांत पिकलेला माल शेतांतून घरीं सुरक्षित येऊन पदरी पडतो कसा, याची प्रत्येक शेतकऱ्यास अहोरात्र चिंता लागलेली असे. बरें, एकदां घरी येऊन पडल्यावर मालास सुरक्षित-पणा आला, असें तरी कोठें होतें ? मोठमोठ्या शहरांपासून तों तहत लहानसहान खेड्यापर्यंत वारंवार परचक्रे येऊन मालाची लुटालूट होई, जबरीनें खंडण्या वसूल केल्या जात, आणि गुरेढोरें वगैरे पळविली जाऊन शेतकरी लोक आणि इतर प्रजाही सारखीच नागवून निघे. हा प्रकार नेहमीचाच होऊन बसल्यामुळें शेतां-तून घरीं आलेला माल घरीं फार वेळ ठेवूं न देता विकून त्याचे पैसे करण्याकडे लोकांची प्रवृत्ती होई. लोकांना माल लपविण्यापेक्षां पैसे लपविणें अधिक सोईचें वाटे ! आणि या प्रवृत्तीमुळेंच दलाल लोकाना हा माल स्वस्तांत घ्यावयास सांपडून त्यांना मोठी किफायत होई.

पण या दलाल लोकांना शांततेच्या काळी मिळणाऱ्या फायद्याचा वचपा दग्याधोप्याच्या काळांत सव्याज भरण्याचा प्रसंग येई. कारण त्याच्यापैकीं बहुतेक दलाल चांगलेच गबर असून परचक्राची धाड आली ह्मणजे तिचा पहिला आघात बहुतेक त्यांच्यावर होई. आमच्या कथानकाच्या काळीं पांच पन्नास दलाल चागले-च प्रसिद्ध असून त्यांचीं दुकानें होसूर, गुर्रमकोंडा, चिकबाळापूर, बिदनूर, कर्नूळ,

वगैरे ठिकाणीं होतीं, आणि ते बहुधा 'नाईक' या नांवानें संबोधिले जात. या नाइकांपैकीं चनवसाप्पा या नांवाचा नाईक तर इतका धनत्तर सावकार होता कीं, त्यानें प्रस्तुत मोहिमीच्या अखेरीस हैदरातर्फे अठ्ठावीस लक्षांची सावकारी निशा पेशव्यांपाशीं भरली! अशा रीतीनें हे दलाल श्रीमंत असल्यामुळें लुटालूट करणारां-चा पहिला मोर्चा त्यांच्यावर वळे हें उघडच आहे. शिवाय दंग्याधोप्याच्या वेळीं पुष्कळ प्रजा परागंदा होई, त्यामुळें या लोकांनी त्याना कर्जाऊ दिलेल्या रकमा बुडत. त्यांच्या वखारी लुटल्या जात, आणि केव्हां केव्हां कंपनीच्या वखारीकडे विकावयास ह्मणून निघालेला त्यांचा माल वाटेंतच लुटला जाई. ह्मणून त्यांचा धंदा जरी मनस्वी किफायतीचा होता, तरी अलीकडे तो फार धोक्याचा होऊन बसला होता, व हे दलाल लोक प्रस्तुतच्या बेबंदशाहीला अगदी कंटाळले होते.

दक्षिण कर्नाटकांतल्या कोष्टी लोकांची स्थिति तर फारच हलाखीची झाली होती. त्यांच्यापैकीं बहुतेक जण कर्जबाजारी असून वर उल्लेखिलेल्या दलाल लोकांनीं त्यांना कर्जाऊ रकमा दिलेल्या असत. पुष्कळदा कर्जाच्या व्याजां-तून किंवा फारच झालें तर थोडी मजुरी देऊन हे दलाल लोक आपण खरेदी केले-ल्या कापसाचें त्यांच्याकडून कापड विणून घेत आणि तें विकून पुष्कळ फायदा मिळवीत. शेंकडों विणकर कोष्टी तर या आपत्तीस कंटाळून मद्रासेस गेले होते आणि तेथें कंपनीच्या आश्रयास राहिले होते. कंपनी त्याचेकडून कापड विणून घेई व तें परदेशी पाठवी, किंवा हिंदुस्थानच्या पेठातूनही मोईप्रमाणें विकी. असें करण्यात कंपनीला कापड स्वस्त पडे, आणि कोष्टी लोकाना थोडी का होईना, पण रोख मजुरी मिळून ते तेवढ्यातच खूष असत! आज रुपया दीड रुपया मजुरी रोज मिळवूनही अतृप्त राहणारा विणकर आमच्या कथानकाच्या काळी रोजीं तेवढ्याच आण्यात वर्षानुवर्ष संतुष्ट होता!

हेस्टिंग्स कलकत्याहून मद्रासेस आल्याबरोबर त्याची काकदृष्टि या दक्षिण कर्ना टकांतील कापसाच्या प्रचंड व्यापाराकडे वळली, आणि दलाल लोकाना मिळ णाऱ्या उमाप किफायतीचें त्याला मोठे वैषम्य वाटूं लागले. त्यानें ताबडतोब विला-यतेंतील कोर्ट ऑफ डायरेक्टर्स याना एक पत्र लिहून दक्षिण कर्नाटकातील काप-साच्या व्यापाराची ही परिस्थिति त्यांना समजावून दिली, आणि स्वतः त्याजकडे जे निर्यात मालाच्या संरक्षकाचें काम होतें, त्यात आपल्या मनाप्रमाणें एतद्देशीय मालाची खरेदी करण्यासंबंधी आणि आपल्या हाताखालीं हुषार कारकून मदतनीस नेमून घेण्यासंबंधीं, कांहीं अधिकार आपणास असावे अशी त्यानें त्यांच्याकडे मागणी केली. ती त्यांनीं ताबडतोब मंजूर केली. अशा रीतीनें माल खरेदी करण्यासंबंधीं मनाजोगी सत्ता हातीं येतांच हेस्टिंग्सनें दक्षिण कर्नाटकांतील दलाल लोकांवर आपली

मोहीम सुरू करण्याचें मनांत आणलें, व त्यानें त्या दलाल लोकांच्या परिस्थितीची आणि उद्योगाची बारकाईनें चौकशी केली. त्यावरून त्यांच्या व्यापाराच्या पद्धतीची चांगली कल्पना येऊन, तो बसविण्यास काय केलें पाहिजे, हेंही त्यानें निश्चित ठरविलें. तथापि स्वतः दक्षिण कर्नाटकांतील खेडींपाडीं हिंडून शेतकरी लोकांचा माल वळवून आपल्या वखारींकडे नेणें त्याला शक्य न वाटल्यामुळें, तूर्त त्या दलाल लोकांपैकींच एखाद्याला आमिष दाखवून हाताशीं धरावें आणि त्याच्याकडूनच परभारें तें काम करून घ्यावें असा त्यानें बेत केला. शोधाअंतीं गुरमकोंड्याचा चिक्कबाळाप्पा नाईक ह्या आपणास पाहिजे तसा मनुष्य आहे असें त्याला कळलें, आणि त्यानें त्याला कांहीं जरूरीच्या कामाकरिता उभाउभीं येऊन आपणांस भेटावें अशा आशयाचें पत्र लिहिलें. चिकबाळाप्पा व्यापारानिमित्त मद्रासेस वारंवार येऊन जात असल्यामुळे त्याची व हेस्टिंग्सची पूर्वींची ओळख होतीच. हेस्टिंग्सचें पत्र पोचताच तो ताबडतोब निघून आला. तो कशा परिस्थितींत आला हें वाचकांना मागील प्रकरणीं कळलेंच आहे. प्रस्तुत हेस्टिंग्सबरोबर बोलत बसलेले गृहस्थ ते हेच चिकबाळाप्पा नाईक होते, आणि त्यांच्याशी मोडक्या तोडक्या कानडींत बोलण्याइतपत कन्नड भाषेचे ज्ञान हेस्टिंग्स यास होते, इतकें वाचकांस कळवून कथानकाचा धागा पुढें चालवूं.

'नाईक,' हेस्टिंग्स म्हणतो, 'आपणास अमळ लांब येण्याची तसदी पडली, किंबहुना मीच दिली याबद्दल मी आपली माफी मागतों. पण माझें कामच तसें महत्वाचे असल्यामुळें निरुपाय झाला.'

'तसदी काही नाहीं' बाळाप्पा नाईक ह्मणतो, 'आम्हांस वारंवार मद्रासेस यावें लागतेच, त्यात काहीं विशेष नाहीं. फक्त सध्या मोसमाचे दिवस असल्यामुळें—'

'हो, त्यासंबंधीच मी तुह्माला कांहीं सुचविणार होतों,' हेस्टिंग्स ह्मणाला, 'नाईक, तुह्मी प्रांतोप्रांतीं हिंडून शेतकऱ्यांचा माल जमवितां आणि मग तो आमच्या वखारीकडे पाठविण्याची जी दगदग करितां, त्यापेक्षा तो परभारेंच इकडे रवाना करून तुह्माला घरबसल्या काही तरी दलाली मिळावी, अशी योजना कां करीत नाहीं? म्हणजे वाटेत मालाची लुटालूट होऊन नुकसान होण्याचें भय तुह्मांला राहणार नाहीं, भावात चढउतार होऊन ठोकर लागण्याची भीती राहणार नाहीं, कसलीच जिकीर राहणार नाहीं. आपली निर्वेध दलाली घ्यावी, स्वस्थ बसावें.'

हेस्टिंग्सच्या बोलण्याचा झोंक बाळाप्पाला समजला, पण त्याच्या बोलण्याचा आशय कळलासें दिसलें नाहीं. तो ह्मणाला, 'घरबसल्या दलाली मिळाली तर ती कोणाला नको आहे? पण शेतांवरचा माल परभारें इकडे येऊं लागला तर आह्मांला दलाली कोण आणि काय म्हणून देणार?'

'कां बरें? आह्मी, आमची कंपनी देणार,' हेस्टिंग्स ह्मणाला, आणि तुमच्या कामगिरीबद्दल देणार. मात्र हल्लीं शेतांवरून माल खरेदी करून आमच्याकडे पाठविण्याची तुमची दगदगीची कामगिरी आह्मी आमच्याकडे घेणार आणि तुह्मांला दुसरी कामगिरी सांगणार. ती हीच कीं, तुह्मी आमच्या कारकुनांना घेऊन खेडींपाडीं हिंडून शेतकरी लोकांची व त्यांची ओळख करून द्यावयाची, शेतकऱ्यांनीं आपला माल कोणत्याही दलालाकडे न नेतां एकदम आमच्याकडे आणावा अशाबद्दल त्यांचें मन वळवावयाचें, आणि इकडे येणाऱ्या सर्व मालावर हल्लींप्रमाणेंच आकारून दलाली घ्यावयाची. फक्त ती परभारें न घेतां आह्मांकडून घ्यावयाची. कां, आतां आली ना माझी योजना तुमच्या लक्ष्यांत?'

हेस्टिंग्सची योजना बाळाप्पाच्या लक्ष्यांत खरोखरीच आली होती. तमाम दलाल लोकांचीं शेतकरी कुळें आपणाकडे वळवून त्यांची दलाली सफाई बुडवावी असा हेस्टिंग्सचा डाव असून त्यांत तो आपला उपयोग साधनासारखा करून घेऊं पाहतो आहे हें त्यानें ओळखलें. त्याच्या डोक्यांत काहूर सुरू झालें. काय, आपल्या सहव्यवसायी दलालांचा धंदा बुडवून परक्या लोकांची धन करावी? लोक काय ह्मणतील? दलालबंधूंचीं बायकामुलें आपणास तळतळाट देणार नाहींत काय? छे, तें कांहीं उपयोगी नाहीं. पण कां नाहीं? इतर दलाल लोक आपला मत्सर करीत नाहीत कां? ते एकमेकाचीं कुळें वळवून नेत नाहींत का? नेतातच. मग आपणही त्यांचेंच अनुकरण कां करूं नये? आणि आपणास फायदा? फायदा काय विचारावा? तमाम दलाल लोकाच्या कुळांचें वळण कंपनीकडे पडल्यावर सगळ्याच मालावरची दलाली आपणा एकट्यास आकारून मिळावयाची! ओहो, काय लाट आहे? लोकापवादाला भिऊन असलें घबाड हातचें दवडावयाचें? छे, नाहीं, साफ नाहीं! चिकबाळाप्पाचे विचार इतक्या पल्याला येताच त्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारची निर्धाराची छटा चमकूं लागली. वाचकहो, दलालीच्या लोभानें आपल्या व्यवसायी बंधूंचे गळे कापावयास चिकबाळाप्पा तयार झाला!

पण इतक्यात त्याच्या डोक्यात एक कल्पना येऊन तो चमकला! शेतकरी लोकांचें वळण एकदां कां कंपनीच्या वखारीकडे पडलें, आणि कंपनीच्या रोख व चोख व्यवहारास ते लाचावले, ह्मणजे पुन्हा ह्मणून कांहीं केल्यानें त्यांचा ओघ आपणा दलाल लोकांकडे वळावयाचा नाहीं, अर्थात् त्यानंतर आपणासारख्या फितुरी मध्यस्थाची कंपनीला जरूरीही उरणार नाहीं; मग तशा स्थितींत कंपनीनें आपणांस बैठी दलाली देण्याचें नाकारलें तर? मग आपली वाट काय? ही कल्पना मनांत येतांच चिकबळाप्पाच्या मुद्रेवर साशंकपणाची छटा पसरली आणि त्याचें मन हेलकावे खाऊं लागलें.

बाळाप्पाच्या मनांत काय विचार चालले आहेत हें हेस्टिंग्सनें तत्क्षणीं ओळखलें, आणि तो बाळाप्पास ह्मणाला, ' नाईक, तुह्मी कां गुळमुळत आहां हें माझ्या लक्ष्यांत आलें. आपल्या व्यवसायबंधूंचा धंदा कसा बुडवावा, आणि कंपनी आपला करार नेहमीं पाळील कां, अशा दोन शंका तुह्मांला आलेल्या आहेत. पण त्या दोनीही शंका बरोबर नाहींत अशी मी तुह्मांला खात्री देतों. तुमचे व्यवसायबंधू अत्यंत नीच व बदमाष लोक असून ते गरीब बिचाऱ्या शेतकऱ्यांना आणि कोष्टयांनाच नाडतात असें नाहीं, तर तुमच्यासारख्या सरळमार्गी व्यवसायबंधूला सुद्धां लुबाडावयास अनमान करीत नाहींत. अशा स्थितींत त्यांची कींव करण्याचें तुह्मांला मुळींच कारण नाहीं. आतां दुसऱ्या शंकेसंबंधी ह्मणाल, तर तिचें समाधान मी तेव्हाच करतों. आपण कंपनीच्या व तुमच्या दरम्यान् एक करारपत्रच करूं व त्याच्या दोन नकला करून त्याच्यावर सह्या करूं. एक नक्कल आह्मी आमच्यापाशीं ठेवून घेऊं, एक तुह्मी ठेवून घ्या, ह्मणजे विषय संपला. हें पहा, आमचा व्यवहार अगदीं सरळ आणि उघड असतो. त्यात आडपडदा बिलकूल असावयाचा नाहीं. '

आपल्या मनांतले विचार हेस्टिंग्सनें इतके बिनचूक ओळखलेले पाहून चिकबाळाप्पास आश्चर्य तर वाटलेंच, पण त्याच्या शंकाचें त्यानें केलेलें समाधानही त्याला बरेंच पटलेंसें दिसलें. विशेषतः हेस्टिंग्स लेखी करार करावयास तयार आहे हें पाहून त्याचें पूर्ण समाधान झालें. पण काय असेल तें असो, आपल्या व्यवसायबंधूंचा गळा कापणारा हा करार परकीय व्यापारी कंपनीशीं करावयास त्याचे मन कांही केल्या तयार होईना. इतर दलाल लोकांविषयीं त्याची मोठीशी सहानुभूती होती असे नाहीं, किंवा आपल्या धंद्यात तो ह्मणजे मोठा नेकीनें वागणारा सत्पुरुष होता असेंही नाही, पण त्याला आपली कसली तरी काल्पनिक भीती वाटत होती आणि ती त्याला हेस्टिंग्सच्या सूचनेस संमती देऊं देईना. बरें, निक्षून नाहीं असें ह्मणण्याचेंही त्याला धैर्य होईना. हेस्टिंग्सने त्याला दाखवलेलें आमिषच तसे मोहक व आकर्षक होते. बराच वेळ झाला तरी त्याच्या मनाचा निश्चय होईना.

चिकबाळाप्पाच्या चर्येकडे हेस्टिंग्सचें एकसारखें लक्ष्य होतें. सावज जाळ्याजवळ आले आहे हें तर त्यानें ओळखलेंच, पण जाळ्यात पाऊल टाकावयास तें अजून अमळ बुजतें आहे असें पाहून त्यानें आपला निर्वाणींचा बाण काढला. तो मोठ्या निस्पृहपणाचा आव आणून ह्मणाला, ' नाईक, बघा, तुमचाही फायदा व्हावा आणि आमचाही व्यापार चालावा, ह्मणून मी तुह्मांला ही सूचना केली होती. तुह्मांला पसंत असली, पतकरा; नाहींतर माझा कांहीं आग्रह नाहीं. तुह्मी पहातच आहांत, सांप्रत मराठ्यांची मोहीम म्हैसुरावर चालू झाली आहे, आणि त्यांच्या तडाक्यांत

हैदरअलीचें राज्य कितपत टिकेल याची शंकाच आहे. मग काय हो? मराठे ह्मणजे पहिल्या प्रतीचे लुटारू लोक, त्यांच्यां अमलांत तुमचा व्यापार कसा काय चालेल याची तुह्मांला कल्पना आहेच. तेव्हां हें सर्व मनांत आणून तुमचा निश्चय ठरवा.'

हेस्टिंग्सचे हे शब्द बोलून होताहेत, इतक्यांत दुसरा एक इंग्रेज मनुष्य हातांत एक उघडलेलें पत्र घेऊनच तेथें आला, आणि चिकबाळाप्पास आपण जणुं पाहिलेंच नाही असा आविर्भाव करून तो हेस्टिंग्सच्या खुर्चीपाशीं येऊन अशा बेतानें उभा राहिला कीं त्याची चिकबाळाप्पाकडे सहजगत्या पाठ वळून राहिली. नंतर तें पत्र हेस्टिंग्सच्या हातांत देऊन तो त्याच्याशी इंग्रेजींत कांहीं बोलला. बाळाप्पाला अर्थातच त्याचें बोलणें कळलें नाहीं, पण त्याच्या भाषणांत 'महारुद्राप्पा' हें नाव आलेलें मात्र त्याला कळलें आणि तो चमकला! हेस्टिंग्सने तें पत्र घेऊन त्या गृहस्थास कांहीं उत्तर दिलें, तें ऐकून तो गृहस्थ लगेच निघून गेला. 'महारुद्राप्पा' हें नांव ऐकतांच चिकबाळाप्पाच्या चर्येवर पडलेला फरक हेस्टिंग्सच्या भेदक नजरेंतून सुटला नव्हता. हेस्टिंग्सनें 'हें पहा नाईक तुमच्यापैकी एक दलाल महारुद्राप्पा याचें पत्र' असें ह्मणत ते पत्र चिकबाळाप्पाच्या हातांत दिलें. बाळाप्पानें त्या पत्रावरून एकदा नजर टाकली मात्र, त्याला एकदम विजेचा झटका बसल्यासारखें होऊन तो ताडकन् उठून उभा राहिला! तें पत्र कानडींत लिहिलेलें असून, त्यांत जो करार कंपनीशीं करावयास चिकबाळाप्पा गुळमुळत होता तो करावयास आपण कबूल असल्याचें महारुद्राप्पानें कंपनीस लिहिलें होतें! चिकबाळाप्पाच्या अंगाची लाही झाली. काय? ज्यानें आजपर्यंत आपल्याशी धंद्यात चढाओढ केली, आपलीं कुळें फितविलीं, एवढेंच नव्हे तर आपल्या मुलाला ठरविलेली मुलगी स्वतःच्या मुलाला करून घेऊन आपली नाचक्की केली, तो आपला दुष्मन् महारुद्राप्पा कंपनीशीं करार करून आपणच सगळी किफायत बळकावूं पाहतो? छे छे, नाहीं, ती गोष्ट आपण कालत्रयीं होऊं देणार नाहीं! त्यापेक्षां आपणच तो व्यवहार पतकरून साऱ्या भाई दलालाचें तळपट केल्याचा अपवाद आला तरी चालेल, कपाशीचा सारा व्यापार कंपनीच्या हातीं गेला तरी चालेल, पण महारुद्राप्पाला ही संधी साधावयास अवसर देतां कामा नये! झालें, चिकबाळाप्पाचा निश्चय एका क्षणांत ठरला व तो हेस्टिंग्सला ह्मणाला, 'साहेब, तुह्मी प्रथम मला विचारलें आहे, लक्ष्यांत ठेवा. मी नाहीं ह्मटल्याशिवाय महारुद्राप्पाशीं करार करावयाचा नाहीं हं. बस, चला, तुमचा आमचा करार ठरला. तुमच्या शर्ती आह्मास एकदम कबूल आहेत, मात्र तुमचा आमचा करार लेखी झाला पाहिजे.'

'ठीक आहे, लेखी होऊंद्या,' हेस्टिंग्स ह्मणाला, 'तुम्हांला पाहिली संधी

द्यावयाची असें मी मनाशीं ठरविलेंच होतें. हा पहा आपल्या शर्तीचा कागद,' असें ह्मणून त्यानें आपल्या समोरच्या टेबलाच्या कप्प्यांतून एक कागद काढून तो चिकबाळाप्पाच्या हातांत दिला. बाळाप्पानें त्याजवरून एकदां नजर टाकिली. त्यांत त्याला अपवाद घेण्याजोगें कांहीं दिसलें नाहीं. त्यानें लगेच शर्तपट्टी पुरी करण्याविषयीं हेस्टिंग्सला सुचविलें. हेस्टिंग्सनें शर्तपट्टीची आणखी एक नक्कल केली, आणि दोनी कागदांवर चिकबाळाप्पानें आपली, आणि कंपनीतर्फे हेस्टिंग्सनें अशा सह्या केल्या आणि करार पुरा झाला. चिकबाळाप्पानें वैश्या दलालीच्या मोबदल्यांत दक्षिण कर्नाटकांतील कपाशीच्या व्यापाराचीं सूत्रें कंपनीच्या हातांत दिलीं!

वाचकहो, एतद्देशीय कर्तव्यनिष्ठेचा हा नमुना पाहून आपण खिन्न होऊं नका. जेथें आपणास धूर्त ह्मणविणाऱ्या मोठमोठ्या एतद्देशीय मुत्सद्यास देखील राष्ट्रीय हिताहिताच्या व्यापक भावनेची सूक्ष्म सुद्धां कल्पना आली नव्हती, तेथें चिकबाळाप्पा हा कोणत्या झाडाचा पाला?

---

## प्रकरण ६ वें.

### कुलीन कलावंतीण. [ कार्तिक शु ६ शके १६९१

मागील दोन तीन प्रकरणात सांगितलेल्या गोष्टी घडल्या, त्याच म्हणजे कार्तिक शुद्ध षष्ठीच्या दिवशीं सुमारें मध्यान्हीच्या संधीस मुळगुंदावरून सावनुरास जाणाऱ्या रस्त्यानें एक घोडेस्वार भरधाव घोडा फेकीत चालला होता. त्याच्या घोड्याला अंगभर आलेल्या घामावरून व त्याच्या तोंडातून गळणाऱ्या फेसावरून त्यानें बराच लांबचा पल्ला मारला असावा असे दिसत होतें. घोडेस्वार वयानें तरुण, सुमारें तिशीच्या अदमासांत दिसत असून, त्याच्या अंगातील अंगरखा, पायांतील विजार, कमरेभोवतालचा शेला, आणि डोकीवरलि फेटा यावरून तो मराठ्यांच्या लष्करातील शिलेदार असावा, असेंच कोणीही अनुमान केलें असतें. या शिलेदाराचा वर्ण काळाच पण तजेलदार, कपाळ रुंद, डोळे विशाल आणि नाक सरळ असून त्याला नुकतेंच मिसरूड फुटूं लागलें असल्यामुळें त्याचा चेहरा मोठा मोहक दिसत होता, आणि त्यातच उन्हानें त्याच्यावर एक प्रकारची लाल छटा पसरून तिजवर घामाचे बिंदु चमकूं लागल्यामुळें त्याच्या गालांना नुकतेंच पाणी शिंपडलेल्या कमलपत्राची शोभा आली होती. त्याच्या शेल्याखालून एक तरवार लटकत राहिली असून ती

घोड्याच्या चालीवरील पावलागणीक उशा घेत होती. त्याचा घोडा चांगला मजबूत व धिप्पाड असून त्याच्या पूर्ण हुकमतींत असावा असें दिसत होतें.

आमचा घोडेस्वार आपला घोडा फेकीत एका ओढ्याशेजारीं येऊन पोंचला, आणि त्यानें आपल्या घोड्याचा लगाम खेंचून त्याला उभें केलें. सावनूर गांव येथून फारच जवळ, सुमारें अर्धाकोस राहिलें होतें. घोडेस्वारानें घोड्यावरून खालीं उडी टाकून प्रथम शेल्याच्या पदरानें आपला घाम पुसला. नंतर घोड्याच्या पाठी-वरून एकदा हात फिरवून त्यानें त्याच्या पुठ्ठयावर एक दोन थापा मारल्या. येथून असेंच तडक सावनुरास जावें कीं येथेंच घटकाभर मुक्काम करून विसावा घ्यावा असा त्याला क्षणभर विचार पडला असावा असें त्याच्या मुद्रेवरून दिसलें. तो सावनुरास जाण्याच्या बेतानेंच निघाला होता, पण त्या ओढ्यांतलें सुंदर व स्वच्छ पाणी, तेथली दाट झाडी आणि झाडीमुळें उत्पन्न झालेली गार सावली हें सर्व पाहतांच आपला बेत क्षणभर तहकूब करून त्या ओढ्याच्या काठीं अमळ विसावा घेण्याची त्याला बलवत्तर इच्छा झाली. लगेच त्यानें घोड्यावरचें सामान उतरून एका झाडाच्या बुंध्याशीं ठेवलें, जवळच आपला गाशा पसरला, आणि घोड्याला पाणी पाजण्यासाठीं तो ओढ्यांत घेऊन गेला. घोडा पाणी पीत असतां आमच्या शिले-दारानें आपलें तोंड व हात पाय एकवार स्वच्छ धुऊन घेतले व एक दोन चुळाही भरल्या. त्यावरून त्या ओढ्याचें रुचकर पाणी आणि गार सावली हीं त्याच्या मनांत अधिकच भरलीं आणि तेथें क्षणभर विसावा घेण्याचा त्याचा बेत कायम झाला. नंतर त्यानें घोड्यास परत नेऊन एका झाडाला बांधलें आणि तो स्वतः येऊन गाशावर आडवा झाला.

पण आपलें कथानक पुढें चालविण्यापूर्वी हा घोडेस्वार कोण, आणि तो कोणीकडे चालला होता, याची आमच्या वाचकांना जिज्ञासा असेल हें जाणून आह्मी प्रथम ती पूर्ण करितों. हा घोडेस्वार दुसरा तिसरा कोणी नसून पुढें महा-राष्ट्राच्या इतिहासात प्रसिद्धीस आलेला परशुरामभाऊ पटवर्धन हाच होय. हैद-रानें कुपेल्लुरास मुक्काम करून सावनुरास शह दिला आणि सावनूरच्या नबाबास ‘खंडणीची बोली करण्याकरितां कोणा तरी मातबर मनुष्यास पाठवून द्या’ अशा आशयाचा निरोप पाठविला हें वाचकांच्या लक्ष्यांत असेलच. उलट गोपाळराव पटवर्धनांनीही सावनूरकर नबाबास निरोप पाठविला कीं, ‘तुमचे दिवाण खंडेराव वाटल्यास हैदरास भेटावयास जाऊं देत, पण तुह्मी हैदरास खंडणी देता कामा नये.’ सावनूरकरांनीं हैदराकडे मनुष्यच पाठवूं नये, त्याला अजीबात धुडकावून लावावें, असा प्रथम गोपाळरावांचा आग्रह होता. पण सावनूरकरांना तितका धीर निघणें शक्य नसल्यामुळें, सावनूरकरांचा कारभारी खंडेराव यानें हैदराच्या भेटीस जावें,

मात्र त्याला खंडणी देऊं नये, एवढ्या अटीवर गोपाळरावांनीं तोड केली आणि सावनूरकरांच्या कारकुनाबरोबर तशा आशयाचा निरोप पाठविला, हें वाचकांस पहिल्या प्रकरणांत ठाऊक झालेंच आहे. ही तोड ठरली तरी सावनूरकरांना आतां मोठाच पेच पडणार आणि त्यांतून ते हैदराचा राग आणि पेशव्यांची मर्जी या दोनी गोष्टी संभाळून कसे निभावून जाणार, ही गोपाळरावांना शंका वाटतच होती आणि ती त्यांनी आनंदराव रास्ते, परशुरामभाऊ वगैरे मंडळीपाशीं दुसऱ्या दिवशीं बोलूनही दाखविली. इतकेंच नव्हे, तर सावनूरचा नबाब अबदुल मजीदखान हा भितरा व उतावळ्या स्वभावाचा मनुष्य असल्यामुळें तो हैदरअल्लीला खुष करण्याकरितां चोरून खंडणी दिल्यावाचून कधीही रहावयाचा नाहीं अशीही आपली खात्री असल्याचें गोपाळरावानीं बोलून दाखविलें. मात्र तसें झाल्यास तें आपणास कळावें अशी गोपाळरावाची तीव्र इच्छा दिसली. खुद्द सावनूरच्या दरबारांत राजो तिमाजी नावाचा पटवर्धनाचा कारकून होता, व तो तेथील बातम्या आपल्या यजमानास लिहून कळवीत असे पण इतक्या गुप्त बातम्या त्याला कळावयाच्या नाहीत असे गोपाळरावास वाटलें, व त्यांना मोठी चुटपूट लागून राहिली.

सावनूरकरानी हैदरास चोरून खंडणी दिल्यास ती बातमी आपणास अवश्य कळावी, अशी गोपाळरावाना इतकी बलवत्तर इच्छा असण्याचें कारण काय, अशी शंका आमच्या वाचकाना येईल, म्हणून आम्ही तिचा थोडक्यात खुलासा करितो. गोपाळराव सध्या फौजेच्या खर्चापायी अगदी जिकीरीस आला होता. पेशव्यांकडून त्याला वेळच्यावेळीं खर्चास रक्कम मिळत नव्हती. अशा स्थितीत सावनूरकरानी जर हैदरास चोरून खंडणी दिली तर आपणही दंडादाखल त्याजकडून जबर खंडणी उकळावयाची असा गोपाळरावाचा बेत होता आणि म्हणूनच त्या गोष्टीची त्याला इतकी जिज्ञासा होती! आपल्या वडील भावाच्या मनात काय विचार चालले आहेत हें परशुरामभाऊनी ओळखले आणि ती बातमी नक्की काढून आणण्याची कामगिरी आपल्या शिरावर घेतली. गोपाळरावानी धाकट्या बंधूंचा उत्साह पाहून 'विशेष साहस करूं नको' असे बजावून त्याना संमति दिली. बंधूंची आज्ञा मिळताच भाऊसाहेब आज सकाळीं लवकर स्नानसंध्या आटोपून व फराळ करून स्वार झाले आणि प्रकरणाच्या आरंभी म्हटल्याप्रमाणे सावनूरच्या ओढ्यात येऊन दाखल झालें हे आता वाचकाच्या लक्ष्यात आलेच असेल.

भाऊ ज्या ओढ्याच्या काठावर आडवे झाले होते, त्या ओढ्यापासून सावनूर पश्चिमेस अवघ्या अर्ध्या कोसावर राहिले होते हे वर सागितलेच आहे. त्यामुळे परशुरामभाऊंना पडल्या जागेवरून सावनूरच्या किल्याचा तट स्वच्छ दिसत होता, इतकेंच नव्हे तर, किल्यावरील बुरूज, चौक्या वगैरे बंदोबस्तही चागलाच नजरेस

येत होता. सावनुरांत जाऊन आपला कारकून राजो तिमाजी याची प्रथम गांठ घ्यावी, आणि मग जरूर पडल्यास नबाबाचीही भेट घेऊन त्याच्या मनाचा ठाव काढून घ्यावा अशा बेतानें भाऊ प्रथमच निघाले होते. पण ओढ्यावर येऊन क्षणभर विश्रांती घेतल्यावर त्यांच्या मनांत असा विचार आला कीं, नबाब जर हैदरखानाला चोरून खंडणी देणार असला, तर आपण त्याची गांट घेऊन कांहींच उपयोग होणार नाहीं. उलट तो आपला बेत अधिकच गुप्तपणानें अमलांत आणील. तेव्हां अशा स्थितींत आपण स्वत: सावनुरास न जातां राजो तिमाजीसच बोलावून आणावें, आणि त्याच्याकडून तेथील परिस्थितीची नक्की बातमी काढून घ्यावी असें त्यांनीं मनांत आणलें व एखाद्या गुराख्याच्या किंवा धनगराच्या पोराबरोबर त्याला निरोप पाठवावा ह्मणून ते इकडे तिकडे पाहूं लागले. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, भरदुपारच्या वेळीं त्यांना साऱ्या आसमंतांत एक चिटपांखरूं सुद्धां दिसेना ! खरें ह्मटलें तर यावेळीं कोठें गुरे चारणीस सोडून गुराख्यांची पोरें झाडाच्या सांवलीस गप्पासप्पा करीत बसली आहेत, कोठे एखादा शेतकरी मालाची गाडी भरून घेऊन शेताकडून गावांत चालला आहे, कोठें मेंढराचा कळप चारणीस सोडून एखादा धनगर ‘ हर्र ’ करीत त्यांना आवरतो आहे, कोठें एखादा वाटसरू डोक्यावर धोतर टाकून उन्हाची तिरीप चुकवीत रस्त्यानें हळू हळू चालला आहे, अशी तुरळक कां होईना, पण माणसांची रहदारी चालू असावयास पाहिजे होती, आणि सावनूरसारख्या राजधानीच्या शेजारी तरी अवश्य असावयास पाहिजे होती. पण तसें कांहींच चिन्ह न दिसता, चोहोंकडे माणसाच्या नावानें अगदींच शुकशुकाट आहे असें पाहून भाऊंना फार आश्चर्य वाटलें. हा हैदराच्या नावाचा प्रताप आहे, हें तर भाऊंनी ओळखलेंच, पण आपल्या शत्रूची ही सत्ताबत त्यांच्या मानी स्वभावाला न खपूनच की काय, त्यांच्या चर्येवर एक मत्सराची लहर चमकून गेली !

राजो तिमाजीला निरोप पाठविण्याचें साधन नाहीं असें पाहतांच आपणासच आता सावनुरास जाणे भाग आहे, अशी भाऊंची खात्री झाली; आणि जावयाचेंच तर मग उगीच उशीर तरी कशास करावयाचा, असें मनात आणून ते उठले व त्यांनी आपला गाशा उचलला. इतक्यात थोड्या अंतरावर ओढ्याच्या कांठच्या झाडीतून एक हृदयभेदक किंकाळी त्यांच्या कानावर आली आणि त्यांचे पाऊल जागच्या जागीं खिळून राहिलें ! आवाज स्त्रीचा आहे हे तर त्यांनीं ओळखलेंच, पण अशा निर्जन जागीं भर दुपारीं येऊन संकटात पडणारी ही स्त्री कोण असावी याची त्यांना कल्पना होईना. इतक्यांत त्यांच्या मनांत असा विचार आला कीं हैदरच्या सैन्यापैकीं कोणीतरी शिपाई एखाद्या एकट्या दुकट्या स्त्रीला गांठून तिज वर अत्याचार करीत असावा. इतकी कल्पना मनांत येतांच त्यांनीं आपल्या हातां-

तला गाशा खालीं टाकून दिला, आणि चटकन् आपली तरवार उचलून घेऊन ज्या बाजूनें तो आवाज ऐकूं आला त्या बाजूनें ते निघाले. ते पांचपन्नास पावलें गेले असतील इतक्यांत ओढ्याकांठच्या झाडींत दोन माणसांची झोंबी चालली असल्याचा त्यांना भास झाला आणि त्यांची शंका अधिकच बळावली. ते झपाट्यानें पुढें गेले, तों जवळच झाडीत एका स्त्रीनें झाडाच्या फांदीला बांधलेला दोर आपल्या भोंवती गुंडाळून घेतला आहे आणि दुसरी एक स्त्री तो तिच्या हातून हिसकावून घेत आहे असा देखावा त्यांच्या दृष्टीस पडला!

त्या दोघी स्त्रियांपैकीं एक आत्महत्या करण्याच्या विचारांत होती व दुसरीनें तिला अडथळा करून तिचा बेत सिद्धीस जाऊं दिला नाहीं हें भाऊंच्या तेव्हांच लक्ष्यांत आलें. त्याचप्रमाणें त्यांच्या भाषेवरून व पेहेरावावरून त्या मुसलमान आहेत हेंही त्यांनीं ओळखलें. पण सावनूरकरासारख्या मुसलमानी राज्यात मुसलमान स्त्रीला आत्महत्या करण्याजोगा प्रसंग काय आला असावा, याबद्दल त्यांचा कांहीच तर्क चालेना. तेव्हा क्षणभर उभें राहून पुढें काय प्रकार होतो तो पहावा असा बेत करून भाऊ एका मोठ्या झाडाच्या आडोशाला उभे राहिले. ते अमळ सावधगिरीनेंच पावले टाकीत आले ह्मणून असो, किंवा त्या स्त्रियांची मनेंच अत्यंत व्यग्र झाली होती ह्मणून असो, भाऊंची चाहूल त्यांना मुळीच लागली नाही, त्या आपल्या नादातच होत्या. ज्या स्त्रीने दुसरीच्या गळ्याभोंवतालचा दोर हिसकावून घेण्यास प्रारंभ केला होता तिने एवढ्या वेळात तो पुरतेपणी सोडवून घेतला होता. नंतर तो झाडावर उंच फेकून देऊन ती ह्मणाली, 'बाईसाहेब, हैदरखानाच्या छावणीत लालामियाची गाठ पडेल या भीतीने कुठे आत्महत्या कां करावयाची? आपला बोलून चालून कलावंतिणीचा पेशा. ज्याच्या राज्यात रहावयाचें त्याचें काम ऐकावयास नको का? त्यानी हैदरखानाच्या छावणीत गावयास चला ह्मणून सांगितले, आपलें मुकाट्यानें जाऊन गाऊन आलें! तेथे ह्मणे लालामियाच भेटतील, आणि मग ह्मणे माझे काळीजच फाटून जाईल, असले नसते कुतर्क काढून जीव द्यायला तुमचा जीव इतका वाटेवर का पडला आहे?'

हें त्या स्त्रीचे भाषण भाऊंच्या कानी पडताच त्यांची जिज्ञासा एकदम जागृत झाली. त्यांनी जे थोडेसे शब्द ऐकले तेवढ्यावरून त्याना बऱ्याच गोष्टी समजून आल्या. त्या स्त्रियांपैकीं एक स्त्री कलावंतीण असून दुसरी तिची दासी आहे, त्या कलावंतिणीस सावनूरकर नबाब अबदुलमजीदखान यानें हैदराच्या छावणीत गावयास जाण्यास सांगितले आहे, तेथे लालामिया नावाच्या इसमाची गाठ पडावयाचा संभव असल्यामुळें व तसें होणे कलावंतिणीस अप्रिय असल्यामुळें ती आत्महत्या करावयास आली आहे आणि तिच्या दासीनें ऐनवेळी येथें येऊन तिला वाचाविलें,

इतक्या गोष्टी तर त्यांस निश्चित कळल्याच, पण हैदराचा सरदार लालामिया याचें तोंड सुद्धां पाहूं नये इतकी या कलावंतिणीची त्याच्यावर इतराजी होण्याजोगें त्यानें हिचें काय घोडें मारलें आहे हें त्यांच्या लक्ष्यांत येईना. त्याचप्रमाणें सावनूरकर नबाबांचा कारभारी खंडेराव हा हैदराचे भेटीस जावयाचा आहे, त्याच वेळीं हैदराच्या मनोरंजनाकरितां हा गाण्याचा कार्यक्रम योजला आहे, कीं त्याच्या बुडाशी दुसरें कांहीं कारस्थान आहे याबद्दलही त्यांचा तर्क चालेना.

'रोशन,' ती कलावंतीण मुळूं मुळूं रडत ह्मणाली, 'माझा जीव आतां वाटेवरच पडला नाहीं तर काय? कोणीही यावें आणि तुडवावें अशीच नाहीं कां त्याची स्थिति झाली? मी अब्रूला तर मुकले, स्वतःस कलावंतीण तर ह्मणवून घेतलें, तोंड काळें करून या सावनुरास तर येऊन राहिलें, इतकें करूनही दुर्दैव माझी पाठ सोडीत नाहीं! आपले कलंकित झालेलें तोंड ज्याच्या पुढें नेऊं नये अशी माझी मनापासून इच्छा, त्याच्यापुढे तें घेऊन जाण्याचा मला प्रसंग आला आहे! नको नको हें जिणें! मेल्या दुर्दैवानें माझी कशी पाठ घेतली आहे? ते मला सुखानें मरूं देखील देत नाही! हाय रे देवा!' असे ह्मणून तिने टाहो फोडला.

भाऊंना आता धीर निघेना. त्या कलावंतिणीचें दुःख पाहून तर त्याचे हृदय विरघळलेंच, पण तिच्या तोंडून निघालेले कांहीं शब्द त्यानीं पतकरलेल्या कामगिरीच्या दृष्टीनें महत्वाचे असल्यामुळे, तिला अशीच रडत ठेवण्यापेक्षा आपणच तिचे दुःख काय आहे तें समजून घ्यावे आणि शक्य तर तें दूर करावें व जमल्यास आपल्या उपयोगाची काही माहितीही तिजपासून मिळाल्यास पहावी असे त्याच्या मनांत आलें व ते एकदम पुढे होऊन मुसलमानीत ह्मणाले, 'बायांनो, तुह्मी भिऊ नका. मी एक मराठा सरदार असून तुमचा भाऊ आहे असें समजा. या बाईंना कांही तरी मनस्वी दुःख झालें आहे हे मला समजले. तें मला सांगण्याची तुमची इच्छा असली, आणि तुह्मी मला सांगितलेंत तर तें दूर करण्याचा मी मनापासून प्रयत्न करीन.'

भाऊंची चाहूल लागताच त्या स्त्रियांनी आपले बुरखे तोंडावरून ओढून घेतले होते, आणि त्या दचकून मागें सरल्या होत्या. पण त्याचे बोलणें पुरतें ऐकल्यावर त्यांना बराच धीर आलासे दिसलें. विशेषतः त्याच्या बोलण्यांतला प्राजलपणा, त्यांच्या चर्येवरील निष्कपटपणाची झाक, आणि त्याच्या आवाजांतला दिलदार जिव्हाळा यांचा त्यांच्या मनावर बराच परिणाम झाला. कलावंतिणीची दासी मोठी धूर्त व चुणचुणीत होती. मराठा सरदाराचे बोलणें मुख्यत्वें आपणास उद्देशून आहे हें तिनें तेव्हांच ताडलें व ती ह्मणाली, 'सरदारसाहेब ह्या माझ्या धनीण मुमताज बी हल्लीं सावनुरास राहतात. यांचा पेशा कलावंतिणीचा आहे इतकेंच, पण त्यांची

वागणूक एखाद्या साध्वीसारखी आहे. हल्लीं सावनूरकर नबाबसाहेब यांचेकडे हैदरखान पाहुणे आले असून त्यांचा मुक्काम जवळच कुपेलुरावर आहे. काल रात्रीं आमचे खाविंद नबाबसाहेब यांचा यांना निरोप आला कीं परवां—ह्मणजे उद्यां—रात्रीं आमचे दिवाण हैदरखानांच्या भेटीस जाणार आहेत, तरी त्यांच्याबरोबर तुह्मी जाऊन हैदरखानांच्या छावणींत गाणें करावें. माझ्या धनीण बाईंना हैदरखानांच्या छावणींत जाण्याची मनापासून इच्छा नसल्यामुळें यांनीं आपली प्रकृति बरोबर नाहीं असें सांगून पाठविलें. पण नबाब जनाबांचा पुन्हा निरोप आला कीं कसलीही सबब चालणार नाही, तुह्मांस गेलेंच पाहिजे. या जुलमाचें मनस्वी दुःख होऊन माझ्या धनिणीनें सारी रात्र रडून काढली. आज सकाळीं हैदरखानांच्या छावणींतून बाळाजीपंत नावाचे कारकून खंडेराव दिवाणाना बोलवावयास आले असें कळतांच माझ्या धनिणीचा धीर सुटला व त्या मुकाट्यानें घरातून निघून इकडे आल्या. मीही त्याच्या पाठोपाठ आले. त्या आपल्या गळ्यास फास लावून घेत होत्या इतक्यांत मी येऊन त्याना सोडवले. सरदार साहेब, आपण तरी दोन शब्द सागून माझ्या धनिणीची समजूत काढा हो, त्या किनई फार गुणी आहेत बघा!' इतके बोलून रोशनही आसवे गाळूं लागली.

'पण याना हैदरखानाकडे गावयास जाण्यापेक्षा आत्महत्या केलेली पुरवली, असें का वाटते बरे?' भाऊंनी प्रश्न केला, 'विशेषतः खंडेराव दिवाण बरोबर असता याना हैदरखानाच्या छावणीत जाण्याचा इतका का धोका वाटतो?'

'त्याना गाणे करावयास जाण्यात धोका वाटत नाही,' रोशन ह्मणाली, 'पण तेथे गेल्यावर हैदरखानाच्या पदरचे सरदार लालामिया याची तेथे गाठ पडण्याचा संभव आहे ह्मणून ह्या जाण्यास नाराज आहेत.'

लालामियाचे तोंड पाहण्याची ह्मणा, किंवा त्याला आपले तोंड दाखविण्याची ह्मणा, कलावंतिणीची इच्छा नाही हे भाऊंच्या पूर्वीच लक्ष्यात आलें होतें. पण ती गोष्ट हिला इतकी अप्रिय का याचे गूढ त्याना अजूनही उकलले नव्हतेच. ते ह्मणाले, 'पण लालामियाची ह्याना इतकी भीति वाटण्याचे कारण काय?'

'त्याची यांना भीति वाटत नाहीं' रोशन ह्मणाली, 'प्रेम – संताप –' इतकें बोलून रोशन अडखळली. लालामियाबद्दल मुमताजच्या मनात वागत असलेल्या मनोविकाराला काय नाव द्यावे हेच तिला कळेना. लालामियाचें नाव अशा प्रकारानें निघतांच मुमताजलाही पुन्हा हुंदका आवरेना.

मुमताजच्या दुःखाची भाऊंना आतां बरोबर कल्पना आली. त्याच्याबद्दल तिला प्रेम आणि संताप हे दोनी मनोविकार ज्या अर्थीं वाटत आहेत, त्या अर्थीं त्यानें हिला शीलभ्रष्ट करून फसविलें असलें पाहिजे असा त्यांनीं तर्क केला, आणि

लालामियाच्या नीचपणाचा त्यांना जितका राग आला तितकीच मुमताजविषयीं त्यांच्या मनांत सहानुभूति उत्पन्न होऊन ते मुमताजला उद्देशून ह्मणाले, ‘ बाई, तुह्मांला मी आपली बहीण ह्मटलें आहे, अर्थात् तुमची इज्जत ती माझीच इज्जत असें मी समजतों. तुमच्या दासीच्या बोलण्यावरून लालामियानें तुह्माला फसवून तुमचा केसानें गळा कापला आहे असा मला अंदेशा येतो. बोला तर, तुमची काय इच्छा आहे? लालामियाला ह्या जगांतून नाहींसा केल्यानें तुमची तृप्ति होईल कां? लवकरच त्याची माझी रणमैदानांत गाठ पडणार आहे, तेव्हां– ’

‘ नको नको, सरदारसाहेब–दादा, तेवढें मात्र करू नका, ’ कलावंतीण घाईनें ह्मणाली, ‘ त्यांनीं मला फसविलें तरी– ’ इतकें ह्मणून ती थांबली. गळा दाटून आल्यामुळें तिच्यानें पुढें बोलवेना.

‘काय?’ भाऊंनीं आश्चर्यानें विचारलें, ‘त्यानें तुमचा असा घात केला तरी त्याचा घात होऊं नये अशी तुमची इच्छा आहे? मग मोठेंच आश्चर्य ह्मणावयाचें!’

‘माझ्या धनीणबाई देहानें भ्रष्ट झाल्या, तरी मनानें भ्रष्ट झालेल्या नाहींत,’ रोशन सांगूं लागली, ‘लालामियांनीं ह्यांना पळवून नेऊन लग्न करावयाची लालूच दाखवून भ्रष्ट केलें हें खरें, पण मनानें ह्या अजून पवित्रच आहेत. ह्यांचा कलावंतिणीचा पेशा सुद्धां अगदीं नांवापुरताच आहे. गाणें शिकल्या आहेत ह्मणून कलावंतीण ह्मणावयाचें इतकेंच, एरवीं ह्यांची सर चांगल्या पतिव्रता ह्मणविणाऱ्या बायकांना सुद्धां यावयाची नाहीं!’ हे शेवटचे शब्द बोलत असतां आपल्या धनिणीबद्दल वाटणारा अभिमान रोशनच्या अक्षरा अक्षरांतून प्रकट होत होता.

स्त्रीहृदयाच्या या उदात्त नमुन्यानें रणांगणांत तोफांच्या गोळ्यालाही टक्कर देणाऱ्या भाऊंच्या अंतःकरणास खळबळून सोडलें. ते सद्गदित होऊन ह्मणाले, ‘मुमताज-ताई, आतां संकोच न करितां सांगा, लालामियाशीं तुमचें लग्न लागलें तर तुमचें समाधान होईल का?

‘होईल का ह्मणून काय सांगूं?’ मुमताज ह्मणाली, ‘अल्लानें एवढी खैर केली, तर माझ्यासारखी भाग्यवान् कोण आहे? निदान त्यांनीं माझ्यावर प्रेम केलें नाहीं तर मी त्यांच्या पायांची दासी होऊन तरी उजळ माथ्यानें राहीन. पण इतकें माझें भाग्य असेल का? असें ह्मणून कलावंतिणीनें एक दीर्घश्वास सोडला!

‘आहे, तुमचें लालामियाशीं लग्न होईल, आणि तें लवकरच होईल असें मी तुह्मांला वचन देतों’ भाऊ ह्मणाले, ‘मात्र तोंपर्यंत तुह्मी माझ्या सल्ल्याप्रमाणें वागलें पाहिजे.’

'मी आपल्या अर्ध्या वचनांत राहीन,' मुमताज ह्मणाली, "दादांनीं वाटल्यास आपल्या बहिणीची परीक्षा पहावी'.

भाऊंना तिच्या निष्ठेचें मोठें कौतुक वाटलेंसें दिसलें. त्यांनीं तिला पुढें काय करावयाचें तें सांगितलें, पण तें काय होतें हें जाणण्याची वाचकांनीं आतांच घाई करूं नये अशी आमची त्यांस विनंति आहे. मात्र इतकें खरें कीं भाऊंची मसलत ऐकून मुमताज कलावंतिणीचें पूर्ण समाधान झालें. तिचा चेहरा खुलला आणि ती रोशनबरोबर सावनुराकडे परत फिरली.

---

## प्रकरण ७ वे.

खरे. ले ८२५ ] **खाशांची छावणी.** [ कार्तिक शु ७ शके १६९१

आज आह्मी वाचकास जेजुरीस नेत आहोत. 'ह्माळसाकात खंडेराया' ची ही नगरी पुण्यापासून जवळच दक्षिणेच्या वाटेवर असून फार पुरातन काळापासून मोठें क्षेत्र ह्मणून प्रसिद्ध आहे. पेशवे सरकाराचीही या क्षेत्रावर सिद्धटेक, थेऊर, इत्यादि क्षेत्राप्रमाणेच भक्ति असून, त्याच्या घराण्यातील मंडळी जेजुरीस वारंवार गेल्याचा उल्लेख इतिहासात सापडतो. साप्रत हैदरावर तिसरी मोहीम चालू होताच श्रीमंत रावसाहेबाची स्वारी आश्विन वद्यात जी डेरेदाखल झाली, ती प्रथम जेजुरीसच आली होती आणि त्याच्या बरोबरच्या हुजुरात वगैरे फौजेचा तळ तेथे पडला होता. जेजुरीच्या विस्तीर्ण माळावर डेरे व राहुट्या ठोकण्यात आल्या असून, छावणीच्या मध्यभागी श्रीमंत खाशाचे 'दल' आणि 'बादल' नावाचे दोन प्रसिद्ध डेरे दिले होते, आणि त्यात श्रीमत उतरले होते. एका डेऱ्यात श्रीमंताची व श्रीमंत सौभाग्यवती रमाबाई साहेबाची रहावयाची जागा असून, दुसऱ्यात श्रीमंताची कचेरी होती. पत्नीला स्वारीबरोबर घेण्याचा श्रीमताचा प्रघात नसे, पण या खेपेस श्रीमंताच्या प्रकृतीचे मानच रमाबाईना असे दिसले की, त्यानी सर्व भीडभाड सोडून आपण बरोबर येणार असा हट्ट धरिला, त्याला श्रीमंत पार्वतीबाईचा दुजोरा मिळाला, आणि मग रावसाहेबाचा नाइलाज होऊन त्यानी त्यांना बरोबर घेतले. या स्वारीस श्रीमंत नारायणरावही निघाले असून, त्यांचा तळ साप्रत करजगी तालुक्यांत उमदी येथें होता. त्याच्या बरोबर पाच हजार फौज असून, वाटेंत आणिकही जमतच होती.

श्रीमंतांच्या या मोहिमीला जरी प्रथमपासूनच शुभ शकुन होत होते तरी खुद्द त्यांच्या स्वतःच्या प्रस्थानाला फारच विघ्नें आलीं होतीं. ते दसऱ्यासच निघणार

होते, पण त्याच दिवशीं श्रीमंत सौभाग्यवती आनंदीबाई प्रसूत झाल्यामुळें त्यांचें निघणें वद्य अष्टमीपर्यंत लांबले. नंतर फिरंगी वैद्य 'कणीघाम काका' यानें त्यांच्या प्रस्थानास आडामोडा घातला. "सड्डुया आपली टब्बेट कस्टाच्या मोइमीवर जान्या-सारकी नाई, टिला विस्रांटीच पाइजे, आनि टरी सुड्डा आपन जाटील टर टी खाट्रीनें बिगडेल" असा त्यानें श्रीमंतांस स्पष्ट इषारा दिला. तें ऐकतांच श्रीमंत पार्वतीबाईनीं आणि रमाबाईनीं मोठाच घोळ घातला. पण हैदराची दंगल दिवसेंदिवस बळावत चालल्यामुळें, आणि कर्नाटकांतील सरदारांची निघून येण्याविषयीं वरचेवर पत्रें येऊं लागल्यामुळें श्रीमंतांना मोहिमेवर निघणेंच भाग आलें आणि त्यांनीं सर्वांची समजूत घालून कूच केलें; मात्र बरोबर श्रीमंत सौभाग्यवती रमाबाईंना घ्यावे ही पार्वतीबाईनीं सुचविलेली तोड मान्य केली.

आज कार्तिक शुद्ध सप्तमी असून सकाळीं आठ नऊ घटका दिवस आला होता. श्रीमंताची स्वारी बादल डेऱ्यांत कचेरीस बसली होती. डेरा उत्कृष्ट शृंगारला असून आंत मऊ रुजामा अंथरला होता, व त्यावर लोड गालिचा टाकला होता. चला वाचकहो, आपण अमळ आंत डोकावून पाहूं. होय, लोडाला टेकून मध्यभागीं बसलेले तेच श्रीमंत रावसाहेब पेशवे आणि त्याच्यापासून थोड्या अंतरावर बसलेले ते साबाजीराव भोसले. काय? श्रीमंत आपणास ओळखत नाहींत? त्याना पाहून आपणास एक वर्षच झाले असेल, इतक्यात आपण त्याची ओळख विसरलात? छे पण हा आपला दोष नाही. श्रीमंताच्या चर्येतच तसा फरक पडला आहे. त्यांचे गुलगुलीत गाल आतां खप्पड झाले आहेत. त्याची मूळचीच सडपातळ देहयष्टि आता अगदींच रोड, गवताच्या काडी सारखी झाली आहे. अरेरे, एवढ्या साडेतीन हात देहात मिळून एक मूठभर तरी मास कोठे सांपडेल कां, असा संशय येत आहे! चेहरा देखील अगदी निस्तेज झाला आहे. वाचकहो, श्रीमंत पुढें ज्या राजयक्ष्म्याला बळी पडले असे इतिहासात प्रसिद्ध आहे, त्याची पकड एव्हापासूनच त्याच्यावर बसली आहे आणि ते हळू हळू खंगत चालले आहेत! प्रस्तुत त्यांना ज्वर, हातापायाची जळजळ, हाडें व बरगड्या दुखणें इत्यादि क्षयाची लक्षणे जाणवत नव्हती हे खरे, पण त्याचा देह आपला क्रमाक्रमानें वाळ-तच होता! मात्र त्याच्या विशाल डोळ्यातली जरब अजून कायम असून, तिच्या तीव्रपणात रेसभर फरक पडला नव्हता. सध्या श्रीमंताच्या बरोबर वैद्य असा कोणी नसून, पुण्याच्या आसपास मुक्काम असेपर्यंत कनिंगहॅम डाक्टरच दोन चार दिवसांनी एकदा येऊन प्रकृति पाहून जात होता. त्याचेच औषध प्रस्तुत श्रीमंताना चालू असून, पुण्याच्या लागवणकराचाही एक काढा सुरू होता. पथ्याची व्यवस्था श्रीमंत रमाबाईसाहेब स्वतः पहात असल्यामुळे तिकडून काळजी करण्याचे कारण

नव्हतें. एकंदरींत ढासळलेल्या स्थितीच्या मानानें श्रीमंतांची प्रकृति सध्यां तरी त्यांतल्या त्यांत बरी होती, आणि हातीं घेतलेल्या मोहिमेवर झटून लक्ष्य घालून ती पुरती यशस्वी करण्याचा त्यांनीं निर्धार केला होता.

वर सांगितल्याप्रमाणें श्रीमंतांच्या शेजारीं साबाजीराव भोसले बसले असून त्यांचें व श्रीमंतांचें संभाषण चालू होतें. साबाजीराव हे जानोजीराव भोसल्यांचे बंधु असून, नुकत्याच झालेल्या तहास अनुसरून पांच हजार फौजेनिशीं श्रीमंतांच्या कुमकेस आले होते. ते स्वतः जरी मोठेसे कुशल सेनापति नव्हते तरी शूर आणि धाडसी शिपाई होते. त्यांचें वय या वेळीं चाळिशीच्या सुमारास असून, मुद्रा मोठी भव्य आणि रुबाबदार होती. त्यांचा स्वभाव उमदा असून निष्कपटी होता. श्रीमंत दादासाहेबांनीं प्रस्तुत पुण्यास चालविलेल्या अनुष्ठानासंबंधी श्रीमंतांचें व साबाजी- रावांचें आज बोलणें चाललें होतें. साबाजीराव जुन्या मताचा आणि भोळा मनुष्य असल्यामुळें त्याला दादासाहेबांच्या अनुष्ठानाची मोठी भीती वाटत होती, आणि श्रीमंत रावसाहेबांनीं वाटेल ती व्यवस्था करून दादासाहेबांची समजूत काढावी आणि त्यांचें अनुष्ठान बंद करवावें असा त्यानें आग्रह धरिला होता. तो ह्मणाला, ‘श्रीमंत, पांच सात लक्षांची नेमणूक करून दिल्यानें जर दादासाहेबांची समजूत होणार आहे, तर आपण तरी त्यांना बंदींतच ठेवण्याचा आग्रह कशाला धरिला आहे? आतां आपण त्यांची बरदास्त उत्तम ठेवली आहे, त्यांचा वडिलांप्रमाणें मान ठेवला आहे, हें कबूल; पण त्यांना जर त्यांत संतोष नाहीं, तर नेमणूक घेऊन राहीनात कां निराळे? उगीच जुलमाचा रामराम तरी कशाला पाहिजे?’

श्रीमंतांना हा प्रश्न नवीन नव्हता. खुद्द साबाजीनेंच त्यांना जेजुरीच्या मुक्का- मांत दोन तीनदा विचारला होता. पण त्यानें तो प्रश्न केला कीं श्रीमंत दुसराच कांहीं तरी विषय काढून त्या प्रश्नाचें उत्तर देणें टाळीत असत. आज मात्र त्यांना काय वाटलें कोणास ठाऊक, त्यांनीं साबाजीरावास उत्तर केलें, ‘साबाजीराव, तुह्मी हें माझ्या कल्याणाकरितांच सुचवीत आहांत हें माझ्या लक्ष्यात येत नाहीं, अशी कां तुमची समजूत आहे? पण तुह्मीच विचार करा, काकासाहेबानी जो दत्तक घेतला आहे, तो केवळ राज्यांत बखेडा चालू ठेवण्याकरिताच नाहीं कां? लाख दोन लाखांनीं नेमणूक वाढवून देण्याची मोठीशी गोष्ट नाहीं, ती मी वाढवून देईन, किंबहुना काकासाहेबांचा तो हक्कच आहे. पण मुबलक पैसा आणि स्वतंत्रता मिळाल्यावर फंदफितूर केल्याशिवाय काकासाहेब क्षणभर तरी गप्प राहतील असे तुह्मांस वाटतें कां?’

‘होय, ते स्वस्थ राहणार नाहींत हें मला सुद्धां दिसतें आहे,’ साबाजी ह्मणाला, ‘पण आपल्या प्रकृतीपेक्षां का फंदफितुराची काळजी अधिक आहे?’

'साबाजीराव, तुह्मी भोळे आहांत,' श्रीमंत स्मित करून ह्मणाले, 'अहो, अशा अनुष्ठानांनीं कां कोठें दुसऱ्याच्या प्रकृतीवर परिणाम होत असतो? तथापि तो होतो असें तुमच्या समजुतीखातर मी क्षणभर मानून चालतों. पण मग मी तुह्मांला असें विचारतों कीं, आज नेमणूक पाहिजे ह्मणून काकासाहेब अनुष्ठान करूं लागले, एवढ्यावरून भिऊन त्यांना नेमणूक द्यावयाची; उद्यां नेमणूक करून मिळाल्यावर राज्यांत निम्मी वाटणी पाहिजे ह्मणून जर ते अनुष्ठान करूं लागले तर राज्याचीही वांटणी त्यांना द्यावयाची कीं काय? होय, अनुष्ठान ह्मणजे ब्रह्मास्त्रच झालें ह्मणावयाचें!'

श्रीमंतांच्या कोटिक्रमानें साबाजी निरुत्तर झाला. त्याच्या बोलण्याची यथार्थता त्याला पटलीसें दिसलें. पण दादासाहेबांच्या अनुष्ठानामुळेंच श्रीमंताची प्रकृति ढासळते आहे, ही त्याची समजूत कांहीं केल्या पालटेना. श्रीमंताना आतां उपाय तरी कोणता सुचवावा अशा फिकिरीत तो पडला. श्रीमंतांनीं त्याच्या मनांत काय चाललें आहे तें ओळखलें व ते बोलूं लागले, 'साबाजीराव, काकासाहेबांच्या अनुष्ठानाने माझ्या जिवाला अपाय होईल ही समजूत तुह्मी अगदीं सोडून द्या. त्यांतूनही त्यांना नेमणूक करून देऊन मी मोकळे केले असते, ते कांहीं कोणी परके नाहींत. पण साबाजीराव, तुह्मांला माझ्या [illegible] एक गुजगोष्ट सांगतों, माझ्या प्रकृतीची आता शाश्वती नाहीं. उद्यां माझें कांहीं बरें वाईट झालें आणि नारायणाच्या हातांत कारभार आला, तर काकासाहेबाचें अरिष्ट आवरावयाचें सामर्थ्य त्याच्यात आहे का? मी तें आवरूं शकलों, अजूनही आवरीन, पण नारायणाच्या अंगात ती कुवत आहे असें तुह्माला वाटतें का? माझ्या धाकात आज जुटीनें वागतात असे दिसणारे सरंजामदार माझ्या पश्चात् दोन दोनीकडे होऊन राज्याची धूळधाण होणार नाहीं कां? ह्या गोष्टी बोलावयाच्या नव्हेत, पण तुह्मी खरोखरीच दिलदार आहात, आणि हा प्रश्न मला दोन चारदा केलात ह्मणून मी माझें अंतःकरण आज तुमच्या पाशीं खुलें केलें इतकीच गोष्ट.' इतकें बोलून श्रीमंतांनीं एक दीर्घ निश्वास सोडला!

साबाजी थक्क झाला. आपल्यासमोर बसलेल्या या साडेतीन हाताच्या रोड अस्थिपंजरात हिमालयासारखे विशाल आणि समुद्रासारखे खोल विचार सांठवले आहेत हें पाहून त्याची अक्कल गुंग झाली! पण असल्या गुणनिधीला आपल्या मरणाचीं दुःस्वप्नें पडूं लागलीं आहेत हें पाहून त्याच्या पोटात भडभडून आलें. तो कांहीं तरी बोलणार होता, इतक्यांत श्रीमंतांचा खास हुजऱ्या भिवा पोवार आत आला, आणि श्रीमंतांस मुजरा करून उभा राहिला, त्यामुळें साबाजीचे शद्ब त्याच्या ओठावरच राहून गेले.

‘ भिवा, काय आहे रे ? ’ श्रीमंतांनीं भिवास पाहून प्रश्न केला.

‘ मोत्याजीराव विचारे निरोप मागावयास आले आहेत, ’ भिवानें उत्तर केलें.

‘ त्यांना आंत हाक मार ’ श्रीमंत ह्मणाले. आज्ञा होताच भिवा बाहेर गेला, आणि थोड्याच वेळांत सुमारें पसतीस वर्षें उमरीची, धिप्पाड, कल्ले राखलेली, रुबाबदार आणि मराठेशाही पोशाख नखशिखान्त केलेली अशी एक व्यक्ति आत आली. वाचकहो, भिवाने निर्दिष्ट केलेले मोत्याजीराव विचारे ते हेच होत. पेशवे सरकाराचें आरमार विजयदुर्गच्या किल्यात होतें, तें आंग्र्यांना पकडून कैदेंत ठेवल्यापासून अलीकडे पुष्कळ वर्षे धुळपाकडे दिलेलें होतें. पण धुळप मजकूर समुद्राचा बदोबस्त नीट ठेवीत नाहीत व समुद्रात परकी लोकाचीं गलबतें लुटून जो पैसा मिळवितात तो सरकारात जमा करीत नाहीत, असा फार बोभाटा झाल्यामुळें श्रीमंतानी नुकताच आरमाराचा सुभा धुळपांकडून काढून मोत्याजीराव विचारे यांजकडे दिला होता. आपल्या ताब्यांत आरमार देण्याविषयी श्रीमंताचें धुळपांना आज्ञापत्र घेऊन मोत्याजीराव आज विजयदुर्गास जावयास निघाले होते, व खंडोबाचें दर्शन घेऊन श्रीमंताचा निरोप मागावयास आले होते. मोत्याजीराव पूर्वी आंग्रे याजकडे तरबेज झाले आहेत अशी प्रसिद्धी होती, आणि त्यानीं ऐटही खूप आणली होती. ते आत येताच श्रीमंतास मुजरा करून ह्मणाले, ‘ सरकार, मला आता परमाणकी — ’

‘ काय, निघालांत ? ’ श्रीमंत ह्मणाले, ‘ ठीक आहे चला, बाळाजीपंत घाट्यांना परभारे पुण्याहून विजयदुर्गाला येऊन तुह्मास मिळण्याविषयी लिहिले आहे. तुह्मी विजयदुर्गला पोंचता तों ते तुह्मास येऊन मिळतील. फरांचीस आणि वलंडर या दोघानींही समुद्रावर आमच्या हद्दींत फार चाचेगिरी चालविली आहे त्यांचा चागला बंदोबस्त करा, बरेना ? ’

‘ त्ये आता काय सागूं सरकार ? ’ मोत्याजीराव ह्मणाले, ‘ योक माहिन्याच्या आंमदि कुटल्याच फिरंग्यानं दर्यावर ह्मनून अक्षी त्वाड काढू नये, अशी एवस्ता करून टाकतु न् काय ! बर, येतु आता, शिरमंताचा आशिरवाद असुंद्या. ’ असें ह्मणत मोत्याजीराव पुढें आले, आणि त्यानी श्रीमंतांच्या पायावर मस्तक ठेवलें.

‘ बरें आहे, या, ’ असें ह्मणत श्रीमंतानीं मोत्याजीरावास उठवून निरोप दिला. मोत्याजीराव बाहेर जाण्यासाठी तंबूच्या दारात आले. इतक्यांत काय झालें कोणास ठाउक, ते जागच्या जागी थबकून ओरडले, ‘ आ, हतबी इगिन् कराया हैसच कां तूं ! ’

मोत्याजीरावांस कसलें विघ्न झालें हें श्रीमंतास समजेना. त्यांनीं ‘ कायहो मोत्याजीराव, कसलें विघ्न झालें ? ’ अशी त्यांना मोठ्यानें पृच्छा केली. त्यावर

मोत्याजीरावांनीं, इसेस काइ न्हाइ सरकार, मांजार आडवं चाललं हुतं, पन मागारं ग्येलं' असें सांगून, पुन्हा त्या मांजराला विघ्न करावयास सवड देऊं नये ह्मणूनच कीं काय, तेथून झपाट्यानें पाय काढला! मोत्याजीरावांची ती तारांबळ पाहून श्रीमंतांस हसूं आलें. ते साबाजीरावाकडे वळून ह्मणाले, 'साबाजीराव, आमचा मोत्याजीराव जितका शूर व पराक्रमी आहे तितकाच अडाणी आहे. त्याच्या मदतीला मी बाळाजीपंत घाट्यांना दिलें आहे, पण या अडाण्याच्या हातांत आरमाराचा कबिला कसा काय निभावेल याची मला शंकाच आहे. खरें ह्मटलें तर आरमाराचा सुभा धुळपांकडून काढून त्याला देणें रास्त नव्हतेंच, पण धुळपांना थोडीशी अद्दल —'.

श्रीमंतांचें वाक्य पुरें होण्याच्या आंत भिवा पोवार पुन्हा एकदा आंत आला आणि मुजरा करून 'मोरोबा अबा पटवर्धन आले आहेत' असें ह्मणाला. श्रीमंतांनीं 'येऊं देत' असें ह्मणतांच भिवा गेला, आणि थोड्या वेळांत मोरोबा पटवर्धन डेऱ्यांत प्रविष्ट झाले. मोरोबा हे हरिभटांचे दुसरे चिरंजीव बाळंभट यांचे पुत्र असून श्रीमंतांबरोबर स्वारींत होते हें वाचकांस ठाऊक झालेंच आहे. त्याचप्रमाणें पटवर्धन मंडळींवर अलीकडे श्रीमंतांची थोडी इतराजी होती हेंही मागील एका प्रकरणांत वाचकांस कळलें आहे. श्रीमंतांची कोणी तरी, बहुधा त्रिंबकराव मामा पेठ्यांनीं अशी समजूत करून दिली होती कीं, 'पटवर्धन मंडळीचा सरंजाम एवढा मोठा असून त्यांच्या हातून हैदराचा बंदोबस्त होत नाहीं, याचें कारण ते आपल्या सैन्यांत चांगले शिपाई नोकरीवर न ठेवतां कसल्या तरी भुरट्या लोकांची खोगीरभरती करतात, आणि त्यामुळें त्यांच्या सैन्याच्या हातून व्हावी तशी चाकरी होत नाही.' पटवर्धन मंडळींना भ्याड किंवा चुकार ह्मणण्याची त्रिंबकराव मामाची छाती नव्हती, आणि त्यानें तसें सांगितले असतें तरी श्रीमंतास तें खरे वाटलें नसतें, ह्मणून मामानी ही शक्कल काढली होती! श्रीमंताच्या मनावर मामाच्या चुगलीचा थोडाबहुत परिणाम होऊन त्यांनीं मोरोबाजवळ तशा आशयाचे उद्गार काढले होते. मोरोबास अर्थातच हा अपवाद सहन झाला नाही. श्रीमंतांनीं कोणाच्या तरी सांगण्यावरून आपणांवर असा टपका ठेवला आहे, असें त्यानें गोपाळरावास कर्नाटकांत लिहून कळविलें. गोपाळरावानें त्याच्या पत्रावर जें बाणेदार उत्तर पाठविलें तें आजच मोरोबाच्या हातीं आलें असून तें पत्र घेऊनच तो श्रीमंतांच्या राहुटींत आला होता. मोरोबास पाहतांच श्रीमंतांची भुवई किंचित् आठुरली, पण तिच्यावरची वक्रता अत्यंत सूक्ष्म असून ती उत्पन्न झाली तितक्याच वेगानें मावळूनही गेली. श्रीमंत ह्मणाले, 'या अबा, बसा. कर्नाटकाकडची काय खबरबात? राव कोठें आहेत?' 'राव' हा शब्द श्रीमंतांनीं गोपाळरावास

उद्देशून योजला होता हें वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल.

'दादा मुळगुंदास जावयाचे होते,' मोरोबा श्रीमंतांस नमस्कार करून खालीं बसत ह्मणाला, 'हैदरनाईक सावनुराकडे येऊं लागल्याचें वर्तमान आल्याबरोबर तेही सावनूरकरांच्या कुमकेकरितां मुळगुंदाकडे निघाले आहेत.'

'एकूण हैदरनाइकाचा रेंच कांहीं अशा तशानें मोडत नाहीं ह्मणायचा?' श्रीमंत अमळ सचिंत स्वरांत ह्मणतात, 'मागल्या दोन्ही मोहिमांत त्याचें पुरतें पारिपत्य करावयास आह्मांस फुरसत झाली नाहीं त्यानेंच तो इतका शेफारला आहे'.

'पण त्याचा वकील आप्पाजीराम तर परवां परवांपर्यंत तहाचें बोलणें करीत होता,' साबाजीराव भोसले मध्येंच ह्मणाले, 'शिवाय जातांनाही तो बेचाळीस लक्ष रुपये खंडणी देण्याचें कबूल केल्यासारखें करून हैदराची मंजुरी आणावयास म्हणून गेला आहे.'

'अहो ती नुसती लुच्चेगिरी!' श्रीमंत म्हणाले, 'आह्मांला सैन्याची जुळवाजुळव करायला उशीर लागावा म्हणून ती एक हूल होती इतकेंच. इकडे अप्पाजीराम आमच्याशी तहाच्या गोष्टी बोलतो आणि तिकडे हैदरनाईक आमच्या मांडलिक संस्थानिकांकडून खंडण्या वसूल करतो, गुत्तीकर सेनापतींना जरबीनें भेटावयास बोलावतो, ही काय तहाची वाटाघाट करण्याची रीत म्हणावयाची? बोलतां बोलतां श्रीमंताची भुवई चढली आणि डोळेही किंचित् आरक्त झाले.

'तरी दादा आणि रास्ते जवळ जाऊन पोचले आहेत ह्मणून बरें,' मोरोबा अभिमानानें म्हणाला, 'नाहींतर त्याचा दंगा धारवाडापर्यंत आला असता!'

'अहो तुमचे दादा वाघ आहेत,' श्रीमंत किंचित् तिरस्कारानें म्हणाले, 'पण त्यानीं आपल्या बरोबर शेळ्या घेतल्या आहेतना?'

'श्रीमंताना आमचा निष्कारण संशय येतो हें आमचें दुर्दैव आहे,' मोरोबा म्हणाला, 'हें दादाचें आजच पत्र आलें आहे, तें श्रीमंतानी एकवार पहावें आणि मग तरी आम्हास दोष द्यावा.' असें म्हणत मोरोबानें एक पत्र काढून श्रीमंतांपुढें ठेवलें. श्रीमंतानीं तें पत्र घेऊन वाचण्यास सुरवात केली. त्यात पुढील मजकूर होता.

श्रीगणराज

"आशीर्वाद उपरि. श्रीमंत 'तुह्मांजवळ लोक चांगले नाहीं, ठळकपणें दिसत नाहीं' ह्मणतात. ऐशास आह्मी जितकी चौकशी करावयाची तितकी करून माणूस पाहून ठेवतों. जर करून माणसाचा दाखला पाहणें असेल तरी फलटण देश, पुणें देश, अकलूज सोलापूर वगैरे व मानदेश करकंब वगैरे व कानडे वळणाचे लोक आहेत. कानडे कांहीं कृष्णापारचे आहेत त्याचा दाखला मालोजी घोरपडे व दौलत-

रायांस पुसावा. अलीकडील आहेत त्यांचा दाखला फकीरजी फडतरे, थोरात, महादजी शितोळे यांस व मानदेशाच्यांचा दाखला निंबाळकर, माने यांस पुसावा. फलटण देशचे, पुणें देशचे, शिरवळ देशचे आहेत त्यांचा दाखला मनास आणून धारकरी माणूस किती आहे हें पहावें. [हे लोक] आह्मांजवळ रोजमुऱ्यावर राहते तरी वस्त्रें जशीं पाहिजेत तशीं देऊन चाकराचे खासे बरें माणूस करून दाखवितों! परंतु आह्मास लबाडी करितां येत नाहीं. आह्मांजवळ हजार रुपयांचे नालबंदीपासून अलीकडे चारशें पांचशें पावेतों किती आहेत ते नावनिशी पहावी. पथके कोण आहेत ते पहावें. आह्मी ज्यांस रुपये देतों ते कांहीं आमचे काका मामा कोणी नाहीत. प्रतिवर्षी श्रीमंतांस संदेह! आमचे फौजेच्या गणतीस आम्हांस नकळत कारकून पाठवावें, माणूस वाईट ह्मणावें, यांत जीव नाहीं. आमचे लोक सारे दूर करून श्रीमंतानीं आपलेच परीक्षेचे ठेऊन दिल्हे तरी आह्मी राजी आहों! अगर सरदारी दूर करून जातीनिशीं (आह्मांस) ठेविलें तरी राजी आहों!! परंतु आमचा इतबार न करितां चौकश्या कराव्या, माणूस वाईट ह्मणावें यात जीव नाहीं. आम्ही येथपावेतो राजी आहों. लोक उणे बाळगतो म्हणून चोरून गणती घेतात, त्यास लोक किती ठेवितों हा भ्रम असल्यास कीर्दी नांवनिशीवार पत्रकें आवर्जे पहावे. त्यास रुजू घालावें. माणसाचा संदेह (असेल) तरी दाखला पहावा. येथपावेतों आम्ही राजी असतां जे ते गोष्टीचा संदेह! आमचा ऋणानुबंधच तितका! उपाय काय? एका खाशास पांचपांचशें रुपयाचीं सनगें मीं कोठून द्यावीं? श्रीमंतांनी सरंजाम (आह्मांस) होनाचा दिला! वरकड साऱ्यास रुपये, आह्मास होन! चवथाईचा तोडा अजिबात! जाजती शिबंदीचा तोटा. पागेचा खर्च. सरदारी खर्च. वरकडाचे सरदारीस पांच खिजमतगार पाच जासूद पुरतात. आम्हास पाउणशें जासूद लागतात. तसेच ढालाईत, खासबारदार, उटे, हत्ती, घोडी म्हणता दीड लाख रुपये पागेस लागतात. तसाच सरदारी खर्च. यंदा जाहलें ते जाहलें. पुढले वर्षी श्रीमंतांनीं लोक ठेवून द्यावे, (त्या लोकांपासून) आह्मी चाकरी घ्यावी हें उत्तम आहे. हेंच पत्र श्रीमंतास दाखवावें. हे आशिर्वाद.'

पत्र वाचून श्रीमंतांनी स्मित करीत, 'आतां रावांच्या कुमकेस लवकर गेलें पाहिजे बरें का!' एवढेच उद्गार काढले! आपणा पटवर्धनमंडळीविषयी श्रीमंतांच्या मनांत असलेली अढी निघाली हें मोरोबानें ओळखलें व त्याची मुद्रा प्रसन्न झाली.

---

## प्रकरण ८ वें.

### वैद्यराजांची त्रेधा. [ का. शु. ८-९१

आज आह्मी वाचकांस कान्होबांच्या रुग्णालयांत घेऊन जाणार आहोंत. आमचे वाचक रुग्ण आहेत, ह्मणून त्यांस आम्ही कान्होबांकडे घेऊन जात आहोंत अशी गोष्ट नाहीं; किंबहुना ते ईश्वरकृपेनें चांगले सुदृढ असावेत अशीच आमची इच्छा आहे. पण कान्होबांच्या रुग्णालयांत एकदा पाय टाकल्यावर, विशेषतः त्यांच्या औषधांचा परिचय झाल्यावर, आमच्या प्रिय वाचकांची प्रकृति मूळची कितीही कणखर असली तरी ती तशीच टिकेल अशी हमी आमच्यानें देववत नाही. अशा स्थितींत आम्ही त्यांना, कान्होबांच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे एक 'पथ्य' सांगतों. तें हेंच की, कान्होबांच्या रुग्णालयांत त्याना आतां ज्या दिव्य औषधी दिसणार आहेत त्यातल्या कोणत्याही औषधीला त्यांनीं चुकून सुद्धां स्पर्श करूं नये. एवढी खबरदारी घेतली कीं, त्यांच्या प्रकृतीला मुळींच धोका नाही, अशी हमी भरण्यास आम्ही तयार आहो !

आज कार्तिक शुद्ध अष्टमी असल्यामुळें श्रीमंत दादासाहेबाचें औषध न्यावयास खंडो दीक्षित येणार अशी कान्होबाची खात्री होती, आणि ह्मणून ते अगदीं खुषीत होते. काहीं ह्मणा, कान्होबांचा तारा तूर्त जोरावर होता, यांत शंका नाहीं. काल नुकतेच त्याचें औषध श्रीमंत नाना फडणीस याचे चुलत चुलत बंधु मोरोबादादा याच्या मुलास सुरूं झालें होतें. आज श्रीमंत दादासाहेबांस व्हावयाचें होतें. असे मोठमोठे रोगी येऊं लागल्यावर, आपणांत आणि लागवणकर वैद्यात काय तफावत राहिली, असा प्रश्न स्वतःच्या मनास विचारून कान्होबा त्याचें आपणांस अनुकूळ असे उत्तर घेत होते, आणि त्याच आनंदात निमग्न झाले होते. कान्होबांचें रुग्णालय सदाशिवपेठेच्या भरवस्तींत असून चागले प्रशस्त होतें. एक मोठे अंगण, त्याला लागून एक पांच खणी पडवी, तिच्या पलीकडे एक तेवढाच सोपा, आंत एक माजघर, त्याच्यामागें एक पडवी, व माजघर आणि मागील पडवी यांना लागून एक आडवें सैंपाकघर, इतका कान्होबाच्या घराचा विस्तार होता. सोप्यावर कान्होबाची बैठक असून रोगी तपासण्याचें काम तेथेंच चाले. सोप्यास लागून अंगणाच्या बाजूनें एक आडवें दालन होतें, त्यांत कान्होबाचा औषधी संग्रह असे. या दालनात आपणांस लवकरच जावयाचें असल्यामुळें तूर्त त्याचा विचार न करतां आपण कान्होबांच्या सोप्याचेंच अमळ बारकाईनें निरीक्षण करूं. सोप्यावर एका बाजूस एक प्रशस्त बैठक टाकली असून त्याजवर एक गालिचेवजा सुंदर सतरंजी अंथरली होती, आणि तिजवर एकदोन तक्ये भिंतीला टेकून ठेवले होते. तक्यांशेजारीं एक पेटी, एक औषधी

बटवा, एक तस्त व एक विड्याच्या पानांचा डबा असे जिन्नस ठेवलेले दिसत होते. जवळच एक तबक पडलें असून त्यांत कांहीं वाळलेल्या पानांचे तुकडे आणि एक अडकित्ता अस्ताव्यस्त पडला होता. सोप्याच्या फरशीवर दोन मोठे खल ठेवले असून त्यांतून कसलीं तरी औषधें खलाला घातलेलीं दिसत होतीं, आणि त्यांत रुतून बसलेल्या बत्त्यांवरून तीं अर्धवट खलून झालीं असावीं असें अनुमान होत होतें. सोप्यांतील एका खुंटीवर एक बाराबंदी लटकत असून दुसऱ्या खुंटीवर एक अंग-रखा व एक पागोटें ठेवलेलें दिसत होतें. कोपऱ्यांत हातांत धरावयाच्या एक दोन काठ्या ठेवलेल्या असून त्यांपैकीं एकीच्या मुठीवर सिंहाचें वैठें कोरीव चित्र बसविलेलें होतें. सोप्याच्या दुसऱ्या बाजूस एक झोंपाळा टांगलेला असून त्याच्या हलग्या व कड्या चांगल्या मजबूत दिसत होत्या.

कान्होबांच्या अंगणाचा देखावाही त्यांच्या पेशाची भरभक्कम साक्ष देत होता. अंगणाच्या एका कोपऱ्यांत धमाशाचा एक ढीग पडला असून त्याला लागून तुळशींचा एक भारा पडला होता. दुसऱ्या एका कोपऱ्यांत एक सराट्यांचीं रास पडली असून तिजमधील सराटे इतस्तता विखुरले होते. अंगणांत एक लहानसें छप्पर उतरलें असून त्यांत एक घोडें बांधलेलें दिसत होतें. कान्होबा आसपासच्या खेडेगांवीं रोगी पहावयास जात, त्या वेळीं या घोड्याचा उपयोग करीत. पण त्या घोड्याच्या एकंदर ठेवणीवरून, एका हातानें लगामाचे हिसडे, दुसऱ्या हातानें चाबकाचे किंवा प्रसंगोपात् काठीचेही तडाके, दोन पायांच्या दोन टांचा, आणि तोंडानें शिव्यांचा भडिमार, अशा पांच हत्यारांचा कान्होबांनीं एकसमयावच्छेदेंकरून उपयोग केल्याशिवाय तें त्यांना रोग्यांच्या घरापर्यंत बहुधा वाहून नेत नसावें, असें अनुमान करण्यास जागा होती. घोड्यापासून थोड्याच अंतरावर एक उभट हंडा ठेवलेला असून त्यामध्यें एक भली मोठी रवी होती, आणि तिजभोंवतालच्या दोरीचे वेढे छपराच्या खांबाला गुंतविलेले दिसत होते, यावरून हा हंडा बहुतेक औषधांचीं सत्वें काढण्याकरितां तेथें ठेवलेला असावा असें दिसून येत होतें.

आपला मोठेपणा खंडो दीक्षितांच्या मनावर चांगला ठसावा, अशाबद्दल कान्होबांनीं आज पराकाष्ठेची खबरदारी घेतली होती. ते स्वतः पांढरें स्वच्छ धोतर नेसले असून त्याचे ठसठशीत काठ शक्य तितके उठून दिसावे अशी व्यवस्था त्यांनी निऱ्यांची चोप करतांनाच केली होती. त्यांनीं हातात एक पाचूची अंगठी घातली असून मनगटांत सलकडी चढविलीं होतीं. आपल्या सोप्यावर रोग्याची खूप गर्दी असते असें खंडो दीक्षितांस वाटावें ह्मणून त्यांनीं शेजारच्या एक दोन ह्यातान्या कोतान्या गृहस्थांस सकाळींच फराळाचें निमंत्रण दिलें होतें. हे निमंत्रित इसमही नुकतेच येऊन दाखल झाले होते व त्यांतला एक दमेकरी आणि दुसरा मूळव्याधीनें

ग्रस्त असल्यामुळें कान्होबांनीं त्यांना अगत्यानें सोप्यावर बसवून घेतलें होतें. इतक्यांत कान्होबांच्या सुदैवानें पुण्याशेजारच्या खेड्यांतील दोन व्यक्तींना कान्होबांचें औषध सुरू झालें होतें, त्या दोन्ही व्यक्ति अत्यवस्थ असल्याचें सांगावयाकरितां, आणि कान्होबांनीं त्यांच्याकरितां कांहीं औषध बदलून दिल्यास तें न्यावयाकरितां ह्मणून दोन इसम आले होते, त्यांनाही कान्होबांनीं 'थोडे बसा, औषध तयार करून देतों' असें सांगून बसवून घेतलें. इतका सारा संच जमल्यावर कान्होबा बरेच निश्चिंत झाले, आणि खंडोदीक्षित एकदा केव्हां येतात, आणि आपलें वैद्यकीय वैभव पाहून दिपून जातात अशी त्यांना उत्कंठा लागली. पण ती बाहेर मुळींच दिसू न देतां ते झोपाळ्यावर बसून सोप्यावर बसलेल्या आपल्या शेजाऱ्यांशीं गप्पागोष्टी करीत राहिले.

पण कान्होबांना फार वेळ वाट पहावी लागली नाहीं. थोड्याच वेळांत खंडो दीक्षित दारांतून आंत येतांना त्यांना दिसले. त्यांना पाहतांच कान्होबा गडबडीनें उठून त्यांना दारापर्यंत सामोरे गेले, आणि त्यांना घेऊन सोप्यावर आले. नंतर परस्परांचे कुशल प्रश्न होऊन ते दोघे झोपाळ्यावर बसले. कान्होबांनीं श्रीमंत दादासाहेबांच्या प्रकृतीची चौकशी केली, तेव्हां खंडो दीक्षितांनीं 'श्रीमंत आतां जेवावयास लागले असून त्याची प्रकृति आतां ठीक आहे; मात्र थोडी अशक्तता वाटत आहे,' असें सांगितलें. त्याबरोबर कान्होबांनीं 'ठीक आहे, अशक्तता जावयास कितीसा उशीर? चार आठ दिवस औषध घेतलें कीं ती पार नाहींशी होईल' अशी खंडो दीक्षितांना खात्री दिली. नंतर थोडा वेळ त्या दोघांच्या इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी झाल्यावर चालू वैद्यकासंबंधी बोलणें निघालें. हल्लीं वैद्यकात वैद्य लोक पाऱ्याचा व अभ्रकाचा उपयोग करून ज्या मात्रा व रसायनें बनवूं लागले आहेत तीं आयुर्वेदाच्या मूलतत्वांना कितपत धरून आहेत या विषयी खंडो दीक्षितांनीं शंका प्रदर्शित केली. त्याबरोबर तीं आर्यवैद्यकाच्या मूलतत्वाना मुळीच सोडून नाहींत अशी, नाना प्रकारचीं प्रमाणें देऊन कान्होबांनी त्याची खात्री करून दिली. इतकेंच नव्हे, तर पारा हें शंकरांचें वीर्य असल्यामुळें त्याच्या उपयोगांत गुणधर्माबरोबरच पावित्र्यही वास करितें आहे असें कान्होबांनी प्रतिपादन केले. नंतर वनस्पतीच्या अपार सामर्थ्याबद्दल त्यांच्या गोष्टी चालू झाल्या. त्याबरोबर कान्होबांनीं वनस्पतींचे विविधगुणदर्शक निघंटांतले श्लोक खंडो दीक्षितांना भराभर ह्मणून दाखविले व वनस्पतींच्या तारक आणि मारक शक्तीबद्दलचीं अनेक उदाहरणेंही दिलीं. आतां यांची ही लांबड आणखी किती वेळ चालते कोणास ठाऊक, अशा समजुतीनें फराळाच्या आशेनें आलेले कान्होबांचे शेजारी कंटाळले व उठून जावें असेंही त्यांच्या मनांत आलें.

पण खंडो दीक्षितांशीं बोलतां बोलतां कान्होबा मधून मधून त्यांचेकडेही पाहून बोलत, व " कां मोरूकाका, खरेंना ? " असें एकास व " होय ना अन्तुमामा, " असें दुसऱ्यास मधून मधून संबोधून त्यांचा आपल्या संभाषणांत जणूं अतर्भाव करीत, त्यामुळें त्यांचा नाइलाज होऊन त्यांना बसून राहणें भाग आलें. पडवींत बसलेले रोग्यांचे निरोपे तर आपल्या घरीं आसन्नमरण होऊन पडलेल्या रोग्यांची आठवण काढून आपला जीव कासावीस करीत होते; पण कान्होबा एका मोठ्या व प्रतिष्ठित पाहुण्याशीं बोलण्यांत गुंतले असल्यामुळें त्यांचा नाइलाज होऊन ते जागच्या जागींच चुळबुळ करीत राहिले. इतक्यांत खंडो दीक्षिताच्या मनांत काय आलें कोणास ठाऊक, ते कान्होबांस म्हणाले, 'वैद्यराज, तुमच्या औषधांचा संग्रह कोठें आहे पाहूं तर खरा एकदा. त्यांत नाना प्रकारचीं औषधें असतील नाही बरे ? '

खंडो दीक्षितांनीं इतकें म्हणावयाचा अवकाश, कान्होबा अगदीं हुरळून गेले. आपल्या ज्ञानानें खंडो दीक्षित आधींच थक्क झाले आहेत, आतां त्यांना एकदा आपला औषधसंग्रह दाखविला म्हणजे ते पुरतेच चकित होतील असें मनांत आणून कान्होबा त्यांना म्हणाले, ' हो हो, नानाप्रकारची औषधें आहेत तर ! जुन्या पाठांतली कांहीं आहेत, कांहीं मी स्वतः माझ्या कल्पनेनें बनविलेलीं आहेत. अहो आह्मी पुष्कळ करतों, पण तुमच्यासारखे पहाणारे मिळत नाहींत. या, तुह्माला आमची औषधें दाखवितों. ' असें ह्मणून कान्होबा खंडो दीक्षिताना आपल्या औषधांच्या दालनांत घेऊन गेले. जातांना मोरूकाका, अन्तुमामा आणि पडवीत आतुरपणाने बसलेले निरोपे यांजकडे पाहून ' आलोंच हं, ' असें ह्मणावयास ते विसरले नाहीत. कान्होबांच्या औषधी दालनात दोन कपाटें व काहीं भिंतींतच राखलेल्या कमानी असून त्या कमानीतून कांहा जुन्या पद्धतीच्या पातळ काचेच्या बरण्या व कांहीं चिनी मातीच्या बरण्या ठेवलेल्या दिसत होत्या. त्या बरण्यावरील औषधाच्या नावाच्या सूचक चिठ्यांवरून त्यांत आसवें व अरिष्टें ठेवलीं असावी असें दिसत होते. कान्होबांनीं आत जाताच प्रथम एक कपाट उघडून त्यातील कुपिस्थ रसायनाचा आणि मात्रादिकाचा परिचय खंडो दीक्षितांना करून देण्यास प्रारंभ केला. हा काय 'वातविध्वंस', याचा अमुक गुण आहे; हा काय 'शूलदावानल', याचा तमुक गुण आहे; असें औषधाचें नामनिर्देशपूर्वक गुणवर्णन कान्होबा करीत चालले. पण खंडो दीक्षिताचें त्याच्या चर्पटपंजरीकडे मुळींच लक्ष्य नसावेंसे दिसलें. मात्र ते कान्होबाच्या कपाटांतील वस्तूंचे लक्ष्यपूर्वक निरीक्षण करीत होते हे खरें, मग ते त्यांत दुसरेच काही शोधीत होते कीं काय न कळे ! क्षणभरानें ते म्हणाले, ' समजलों समजलों, या कपाटांत ग्रंथोक्त मात्रा व रसायनें दिसतात. आता त्या कपाटांत काय काय औषधें आहेत पाहूं बरें. ' असें म्हणत खंडो दीक्षित झटकून पुढच्या कपाटापाशीं गेले

देखील! तेव्हां कान्होबांचा नाइलाज होऊन त्यांनीं तें कपाट उघडलें व त्यांतील औषधांची माहिती खंडो दीक्षितांना करून देण्यास प्रारंभ केला. या कपाटांत कान्होबांनीं स्वतःच्या कल्पनेनें बनविलेलीं कांहीं औषधें, टाकणखार, मनशीळ इत्यादि कांहीं खनिज द्रव्यें व कांहीं विषें आणि उपविषें कुप्यांतून ठेवलेलीं दिसत होतीं. कान्होबांनी प्रथम आपण बनविलेल्या नव्या औषधांची माहिती खंडो दिक्षितांना देण्यास प्रारंभ केला. हा ' पुलिनवालुकेश्वर ', शूलावर अगदीं रामबाण आहे; हा 'तडाग-मृत्तिकेश्वर', परिणामशूलावर वस्ताद आहे; हा 'प्राणाविध्वंस' रोग्याच्या वेदना क्षणांत नाहीशा करितो; इत्यादि औषधांची माहिती खंडो दीक्षितांना देऊन ' हीं सर्व औषधें माझ्या कल्पनेचीं आहेत ' असें कान्होबा अभिमानपूर्वक म्हणाले, आणि कान्होबांच्या शोधाचें खंडो दीक्षितांनीही मनापासून कौतुक केले. यापुढें कान्होबा खनिज द्रव्यांच्या वर्णनास सुरवात करतील अशा भीतीनेंच कीं काय, खंडो दीक्षित त्यांना ' औषधांत विषांचाहि उपयोग असतो काय ? ' असें विचारिते झाले. त्याबरोबर ' हो हो, असतो तर, विषें योगवाही असतात ' असें ह्मणून कान्होबांनीं खनिज द्रव्यें सोडून खंडो दीक्षिताना विषांचीं नावें व गुणधर्म सागण्यास सुरवात केली. ' हा बचनाग, याचा ज्वरावर चांगला उपयोग होतो; हा सोमल, यकृतावर मोठा वस्ताद आहे; हा ब्रह्मपुत्र, हा तर इतका भयंकर आहे की याचा एक कण जरी पोटात गेला, तरी सर्वांगाला आग लागल्याप्रमाणें मनुष्याचा दाह होतो आणि तो थोड्याच दिवसांत मरतो — '

कान्होबाचे शेवटचे शब्द अजून पुरते उच्चारूनही झाले नव्हते, इतक्यांत पुढच्या दरवाज्यातून कोणी तरी व्यक्ति ' कान्होबा, अरे कान्ह्या ! ' अशा हांका मारीतच आत आली. कान्होबानी त्या व्यक्तीचा आवाज ओळखला, आणि त्यांचा चेहरा खर्रकन उतरला ! ही पीडा या वेळी येथे कशाला आली, असें त्याना वाटलें आणि बाहेर जाऊन त्या व्यक्तीची गाठ घ्यावी न घ्यावी, अशा विचारांत ते क्षण मात्र पडले. तोपर्यंत ती व्यक्ति अंगणातून पुढे येऊन ' कान्होबा आहे का हो ? ' असा तिने सोप्यावर बसलेल्या कान्होबांच्या शेजाऱ्यांस प्रश्नही केला होता, आणि त्यानी ' इकडे औषधाच्या सोप्यात आहेत, ' असें त्या व्यक्तीस उत्तरही दिले होतें ! त्याबरोबर ' असें कां ? ' असे ह्मणत त्या व्यक्तीने पायातला जोडा पडवींत काढून ठेवला आणि ओसरीच्या पाहिऱ्या चढण्यास प्रारंभ केला. पण पहिल्या पाहिरीवर पाय टाकताच तेथें पडून राहिलेला एक चुकार सराटा त्या व्यक्तीच्या पायात शिरला आणि ' कान्ह्या, जळलें राडेच्या तुझे वैद्यक ! ' असे शद्ब वेदनेच्या तिरीमिरीत त्या व्यक्तीच्या तोंडून निघून गेले !

पण कान्होबांसारख्या भिषग्वर्यांबरोबर इतकी सलगी किंबहुना अतिप्रसंग

करणारे हे गृहस्थ कोण, हें प्रथम वाचकांस सांगितलें पाहिजे. या गृहस्थांचें नांव सदाशिव दीक्षित दाते असें असून हे पुण्यांतले एक प्रसिद्ध अग्निहोत्री होते. ह्यांचें अध्ययन काशींत झालें असून तेथें असतांना त्यांचा गंगा विष्णु महीधर या प्रसिद्ध वैद्याशीं फारच घरोबा पडला होता. ते संस्कृत व्युत्पत्ति शिकण्यापुरते सहाध्यायीच होते ह्मटलें तरी चालेल. नंतर गंगा विष्णु वैद्यक शिकले आणि सदाशिव दीक्षित वैदिक बनले. पुढें आमचे कान्होबा गंगा विष्णूकडे वैद्यक शिकावयास राहिल्यावर त्यांना सदाशिव दीक्षित केव्हां केव्हां संस्कृत व्युत्पत्ति सांगत. कांहीं दिवसांनीं कान्होबा आणि सदाशिव दीक्षित थोड्या दिवसांच्या अंतरानें पुण्यास येऊन स्थायिक झाले, तरी त्यांचें गुरुशिष्यांचें नातें कायमच राहिलें. त्यांतूनही ह्मातार्‍या माणसांना आणि विशेषतः कर्मठ ब्राह्मणांना तरुणांच्या मोठेपणाची फारशी दिक्कत वाटत नाहीं या सामान्य नियमास सदाशिव दीक्षितही अपवाद नसल्यामुळें ते कान्होबांना अजूनही पूर्वीप्रमाणेंच संबोधीत असत. कान्होबांना अलीकडे ही सलगी आवडेनाशी झाली होती, पण कांहीं अशीं त्यांचीं लहानपणचीं बरींचशीं बिंगें सदाशीव दीक्षितांना ठाऊक झालीं होतीं ह्मणून, आणि कांहीं अशीं त्यांच्या गुरूच्या नात्याला आणि कर्मठपणाला मान देऊन, कान्होबा ती सहन करीत असत. इतकी प्रस्तावना करून कथानक पुढें चालवूं.

वर लिहिल्याप्रमाणें कान्होबांना एकेरी व अर्वाच्य संबोधून सदाशिव दीक्षित आपल्या पायांतला सराटा काढण्यासाठीं खालीं वांकले, इतक्यांत त्यांना आणखी कांहीं तरी पाघळावयास संधी देऊं नये या हेतूनें 'या दीक्षित बसा, बसा' असें म्हणत कान्होबा औषधांच्या दालनांतून बाहेर आले. त्यांना पाहून सदाशिव दीक्षित सोप्याच्या पाहिर्‍या चढत म्हणाले, 'कान्ह्या, अरे त्या बाबूराव फडणिसाला काय औषध दिलें होतेंस ? त्याचा पोटशूळ अधिकच उठला तो ! सारी रात्र त्यानें तळमळून काढली. गाढवाच्या लेका, मोठ्या माणसांना कशाला औषधें देतोस तीं ? गोरगरिबांनाच काय मारशील तेवढें पुरें कीं !'

सदाशिव दीक्षिताचे शब्द ऐकून सोप्यावर बसलेले मोरूकाका व अन्तुमामा आणि पडवींत ताटकळत बसलेले रोग्यांचे दूत कान्होबाकडे टकमक पाहूं लागले. कान्होबाना तर सदाशिव दीक्षिताचा इतका राग आला की, ह्या म्हातार्‍याच्या एक चांगली श्रीमुखात भडकावून द्यावी असे त्याना क्षणभर वाटले. सोप्यावरच्या व पडवींतल्या मंडळींचे एक असो, पण औषधाच्या दालनात असलेल्या खंडो दीक्षितांच्या कानावर जर ह्या म्हातार्‍याचे शब्द गेले असले तर ते आपणास मनात काय ह्मणतील, अशी शंका मनांत येऊन कान्होबा अतिशय चिडले. त्यांनीं वळून एकदा औषधाच्या दालनाकडे साशंक मुद्रेनें पाहिलें, पण खंडो दीक्षित आपलीं औषधें पाह-

ण्यांत अगदीं गर्क झाले आहेत असें त्यांस दिसून आलें. तें पाहतांच कान्होबांना अमळ हायसें वाटून ते चटकन् पुढें आले आणि सदाशिव दीक्षितांच्या कानाशीं लागून ह्मणाले, 'काका, या वेळीं माझ्याकडे एक मोठे पाहुणे आले आहेत. कृपा करून आतांच्या वेळेपुरतें तरी कांहीं वाईट साईट बोलूं नका.'

पण ह्मातार्‍या सदाशिव दीक्षिताला कान्होबांचें हें पुटपुटणें ऐकूं गेलें नाहीं ह्मणा, किंवा त्याच्या पायाची वेदना अजून कमी झाली नव्हती ह्मणून ह्मणा, तो कान्होबांवर अधिकच मोठ्यानें खेंकसून ह्मणाला, 'कान्ह्या, असा पुटपुटूं नको. त्या बाबुरावाला काय औषध दिलें होतेंस, खरें सांग.'

'कां बरें, पुलिनवालुकेश्वर दिला होता.' कान्होबा त्वेषानें धुमसत ह्मणाले.

'अरे लेका, पुलिनवालुकेश्वर हें नांव कुठल्या ग्रंथांतून काढलेंस? वाळवंटांतील वाळू बिळू तर दिली नाहीसना? बाकी दिली असलीस तर तेंही एका अर्थीं बरेंच ह्मणावयाचें, अगदींच विषारी जिन्नस नाहीं तर कच्चा पारा घालण्यापेक्षां तुझा पुलिनवालुकेश्वरच बरा!'

आतां या ह्मातार्‍याला काय करावें हेंच कान्होबास कळेना. ही साडेसाती येथें कोठून आली असें त्यांस होऊन गेलें. आतां कांहीं तरी सांगून त्याला एकदा वाटेला लावावें असा विचार करून कान्होबा ह्मणाले, 'दीक्षितकाका, बाबुरावाच्या पोटशूलावर मी योजना बरोबर केली होती-'

'डोंबल तुझें!' सदाशिव दीक्षित ओरडले, 'योजना कसली करतोस बोडक्याची? तुझें औषध घेतल्यापासून तो एकसारखा तळमळतो आहे. श्रीमंतांच्या स्वारीबरोबर गेलेल्या मोरोबादादाला परत येण्याचा निरोप सुद्धा गेला. तुला पन्नास वेळां सांगितलें कीं तूं थोरामो—'

'बरें बरे,' कान्होबा, दीक्षितांचें वाक्य आडवित ह्मणाले, 'आतां मी स्वतःच तिकडे जातों आणि तडागमृत्तिकेश्वर देऊन येतों. त्यानें एक घटकेंत गुण आलाच पाहिजे!'

"काय ह्मणालास, तडागमृत्तिकेश्वर?' सदाशिव दीक्षित आश्चर्यानें आ वासून ह्मणाले, 'हे सुद्धा औषधच की काय? कान्ह्या, तुला वेडबीड तर लागले नाहींना? तुझा गुरु गंगा विष्णु याच्या पाठात मी असलीं औषधें कधींच ऐकलीं नाहीत!'

हा ह्मातारा जर पटकन् मरेल, किंवा निदान मुका तरी होईल, तर किती मौज होईल, असें कान्होबांच्या मनात एका क्षणांत दहा वेळ येऊन गेलें असेल! पण आपल्या मनाप्रमाणें घडून यावें, असा योग क्वचितच येतो, असा विवेक

करून कान्होबा आंतल्या आंत चडफडत राहिले. इतक्यांत सदाशिव दीक्षितांच्या शब्दांनीं उत्तेजित होऊनच कीं काय, पडवींत बसलेल्या निरोप्यांपैकीं एकजण सदाशिव दीक्षितांना उद्देशून म्हणाला, 'आमच्या झाळसालाबी काल हैंनीं तडक-मरतिकेसरचं दिला हुता बगा दादा, अन् तवाच्यादरनंच तिचा वाका लइ वाडलाया!'

झालें, कान्होबा जिला भीत होते ती गोष्ट अखेर झालीच! दीक्षितांच्या अपभाषणाचा आपल्या लौकिकाला व इभ्रतीला अनिष्ट परिणाम होणार अशी कान्होबांना स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं. मोरूकाका व अन्तुमामा हसूं लागले. आता मात्र कान्होबांचा संताप आवरेनासा झाला. ते सोप्याच्या पाहिऱ्यांवरून ताडकन् उडी टाकून खालीं आले, आणि त्यांनीं वरील वाक्य उच्चारणाऱ्या त्या निरोप्यास 'पाजी मनुष्य! माझ्या औषधानें जास्त झालें ह्मणतोस?' असें ह्मणत गचाडी दिली! तो निरोप्याही चांगला जवान होता. 'असं रागावाया काय झालं जी दादा?' असें ह्मणत त्यानेंही कान्होबाचा हात धरला. कान्होबांनीं त्याला खेचीत व गचांड्या देत घराबाहेर नेलें, पण दारातून बाहेर पडतांच त्या निरोप्याचा रंग एकदम पालटला आणि त्यानें कान्होबांची मानगुटी धरली. त्याबरोबर कान्होबा 'मेलों, खून, खून!' असें ओरडले. तो प्रकार पाहताच सदाशिव दीक्षित दाते, मोरूकाका, अन्तुमामा आणि पडवींत बसलेला दुसरा निरोप्या असे सर्वच जण घाईघाईनें तें झोंबट सोडविण्यासाठीं बाहेर गेले!

पण वाचकहो, आपले दोस्त खंडो दीक्षित औषधाच्या दालनात अजून काय बरें करीत आहेत? बाहेर चाललेला प्रकार त्याना मुळींच कळला नसेल का? छे, असें कसे होईल? वाचकहो, बाहेर चाललेला मजकूर त्याना अक्षरन् अक्षर ऐकूं येत होता, किंबहुना ते त्याचीच वाट पहात होते ह्मटलें तरी चालेल. ती पहा, सोप्यावरची सर्व मंडळी बाहेर गेल्याची चाहूल लागताच खंडो दीक्षिताची चर्या एकदम पालटली! त्यांनी एकवार सोप्याकडे नजर टाकली, आणि कडोसरीची तपकिरीची डबी काढून निजमधील तपकीर कपाटाच्या मागल्या बाजूस ओतून टाकली. अरे, पण हे काय? खंडो दीक्षितानी 'ब्रह्मपुत्र' विषाची कुपी कशाला काढली? तें पहा, वाचकहो त्यांनी त्या कुपीची गुडदी काढून कुपीतलें थोडें विष आपल्या तपकिरीच्या डबीत ओतून घेतले आणि कुपीस पुन्हा गुडदी बसवून ती मूळच्या जागी होती तशी ठेवून दिली! नंतर त्यांनीं आपली डबी कनवटीस खोचली, आणि कान्होबांच्या औषधसंग्रहास पाहून आपण चकित झालों असे दर्शविणारी मुद्रा करून ते दालनांतून बाहेर आले.

तोंपर्यंत कान्होबाही आपल्या तंट्याची वारासार करून आंत येत होते. त्यांस पाहतांच दीक्षित ह्मणाले, 'वैद्यराज, तुमचा औषधसंग्रह पाहून मी तर चकित

झालों. श्रीमंतांना मी हें कळविलें ह्मणजे तुमचें औषध सोडून ते दुसऱ्याच्या औषधाला स्पर्श सुद्धां करणार नाहींत!' दीक्षितांना बाहेरचा प्रकार मुळींच कळला नाहीं अशी कान्होबांची खात्री झाली आणि त्यांच्या प्रशंसेनें ते बेहद्द खुष झाले. नंतर त्यांनीं श्रीमंत दादासाहेबांकरितां आपल्या बटवींतून एक मात्रा काढून खंडो दीक्षितांपाशीं दिली व तिचें अनुपान सांगून त्यांना निरोप दिला. इतक्यांत आपल्या औषधांच्या दालनांतील कपाटें उघडीं राहिलीं आहेत या गोष्टीची त्यांना आठवण झाली व तीं बंद करण्यासाठीं ते त्या दालनाकडे वळले. पण दालनाच्या आत पाऊल टाकतांच त्यांना शिंकाची एक अशी भयंकर चळक आली कीं, ते घाबरे होऊनच दालनांतून बाहेर आले!

अमळ हायसें वाटल्यावर कान्होबांनीं आपल्या स्वभावानुरूप आज आपणांस झालेल्या सर्व त्रासाचे निदान केलें आणि त्या सर्व त्रासाला सदाशिव दीक्षित दाते हेच आदिकारण होत असें ठरवून, संधी मिळताच त्याची एकवार चांगली खोड मोडण्याचा निश्चय केला.

---

## प्रकरण ९ वें.

खरे ऐ. ले. ८३२-३३-३४.] **नजराण्याचा साज.** [का. शु. ८-९१.

कार्तिक शुद्ध अष्टमीच्या दिवशीं सूर्यास्ताच्या सुमारास कुपेळूर गांवानजीक पाच सात मेणे, दोन तीन बैलगाड्या, एक दोन सुतरस्वार, आणि सात आठ खिजमतगार असा सरंजाम येऊन उतरला, आणि हैदरअल्लीच्या छावणींत जाण्यास निघाला. या मंडळींत सावनूरकराचा दिवाण खंडेराव, त्याला बोलावून नेण्यासाठी आलेला हैदराचा कारकून बाळाजीपंत, बाळाजीपंताबरोबर आलेले आणखी दोघे हैदराचे कारकून, खंडेरावाचा एक कारकून, मुमताज कलावंतीण, तिच्या दोन शिष्यिणी, दोन सारंग्ये, आणि एक पखवाजी इतक्या व्यक्ति प्रमुख होत्या. ही मंडळी वाहनातून उतरताच त्याचे सामासुमानही गाड्यातून उतरून घेण्यास खिजमतगारांनी प्रारंभ केला. खंडेरावाच्या दरबारी पोषाखाची एक व इतर सामानाची एक अशा दोन पेट्या प्रथम उतरण्यात येऊन एका राहुटींत नेण्यात आल्या. त्यांच्या कारकुनाचें सामान एका पेटींत होतें, तीही पेटी खिजमतगारानी उचलून नेली. नंतर मुमताजचे दोन तंबोरे, एक पखवाज, दोन सारंग्या इत्यादि सामान एका गाडींत होतें, तेंहि खिजमतगारांनीं भराभर उचलून नेलें. पण आह्मांला या तपशिलाशीं विशेष

कर्तव्य नसल्यामुळें आह्मी तो इतकाच सोडून, वाचकांचें लक्ष्य त्या मेण्यांपैकीं दोन मेण्यांकडे विशेषतः वेधूं इच्छितों. कारण खंडेराव दिवाण समक्ष उभे राहून या दोनी मेण्यांतलें सामान उतरवीत होते. या मेण्यांपैकीं एका मेण्यांत चार तंबोरे व दुसऱ्या मेण्यांत चार पखवाज असें सामान मोठ्या बंदोबस्तानें गुंडाळून ठेवलेलें दिसत होतें. खिजमतगार तें उतरीत असतां खंडेराव 'बेतानें उतरा, फोडाल!' असें त्यांना वरचेवर सांगत होते, आणि पुढें तें उचलून नेतांनाही 'एकेक जण एकेक डाग उचला' असें ते बजावीतच होते, यावरून खंडेरावांना या साजाचें महत्व विशेष वाटत असावेंसें दिसलें. आणि तसें होतें खरेंच, कारण हा साज सावनूरकर नबाब अबदुलमजीदखान याजकडून हैदरखानास नजराणा ह्मणून आला होता. खिजमतगारांनीं हा साज उचलून नेतांच आमची पाहुणेमंडळीही हैदराच्या गोटांत प्रविष्ट झाली.

आमच्या कथानकाच्या दुसऱ्याच प्रकरणांत सावनूरकर नबाबाला दोनीकडून दोन परस्परविरोधी निरोप येऊन कसा पेंच पडला होता, हें सांगितलेलें वाचकांच्या स्मरणात असेलच. एकीकडे 'कोणी तरी जबाबदार माणूस खंडणीची बोली करावयास पाठवून द्या' अशा आशयाचा हैदर नाइकाचा निरोप आला होता व दुसरीकडून 'हैदरास खंडणी दिलीत तर श्रीमंत पेशवे सरकाराची तुमच्यावर इतराजी होईल' अशा मतलबाचा गोपाळराव पटवर्धनाचा निरोप आला होता. अशा स्थितींत सावनूरकर नबाबास मोठेंच संकट येऊन पडले. दोघेही निरोप पाठविणारे बलिष्ठ असल्यामुळें कोणाचें ऐकावें हेंच त्यास कळेना. शेवटीं त्यानें खंडेराव दिवाणाच्या सल्यानें असें ठरविलें कीं, हैदराच्या निरोपाप्रमाणें खंडेरावानें स्वतःच हैदराचे भेटीस जावें, पण त्यास खंडणी वगैरे कांहीं एक देण्याचें कबूल न करतां त्याचा नुसताच स्नेह राहत असल्यास राखावा. शिष्टाचाराप्रमाणें औपचारिक नजराणा करावा. इतकें ठरल्यावर हैदरास तशा अर्थाचा निरोप पाठविण्यांत आला, आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं सक्तीनें खंडणी वसूल करावयाच्या उद्देशानें आलेला हैदर या तडजोडीस कबूल झाला! हैदरानें सावनूरकरांच्या निरोपाचा अर्थ कसा केला हें वाचकांस पूर्वीच कळलें आहे. मग तसा अर्थ काढावयास त्याला काय आधार होता, तो त्याचा त्यालाच ठाऊक! इकडे सावनूरकरांनीं तर आपण हैदराशी बरोबरीच्या नात्यानें वागतों आहों असा आव आणला आणि 'हैदरास खंडणी देण्याचा आपला मुळींच विचार नाहीं, फक्त शेजारधर्म ह्मणून औपचारिक भेट मात्र घेत आहोंत' असें गोपाळराव पटवर्धनांस लिहून कळविलें. इतकेंच नव्हे, तर आपल्या व्यवहारांत आंत एक बाहेर एक असा प्रकार नाहीं हें

निर्विवाद शाबीत करण्याकरितां, त्यांनीं पटवर्धनांचा सावनूर येथील कारकून राजो तिमाजी यास हैदराचा निरोप आल्यापासून तों तहत खंडेराव हैदराकडे जावयास निघे-पर्यंत ह्मणजे कार्तिक शुद्ध चतुर्थीपासून तों तहत सप्तमीपर्यंत आपल्या वाड्यांत ठेऊन घेऊन, हैदराच्या कारकुनाशीं बोलणें चालणें देखील त्याच्या देखतच केलें. एवढेंच नव्हे, तर खंडेराव हैदराकडे जावयास निघाला त्या वेळी देखील त्यानीं कांहीं तरी निमित्त काढून राजो तिमाजीस मुद्दाम हजर ठेवलें. हेतु हा कीं, खंडेरावाबरोबर काय काय लवाजमा जातो, त्यांतून खंडणीची रक्कम वगैरे जाते कीं काय, हें राजो तिमाजीस दिसावें. सावनुरकरांच्या या खटाटोपाला यश आलें यांत शंका नाहीं. खंडेरावाच्या लव्याजम्यांतून हैदरास नजर करण्याकरितां घेतलेले चार तंबोरे व चार पखवाज यावांचून दुसरें कांही सामान गेलें नाही असें राजो तिमाजीनें प्रत्यक्ष पाहिलें, सावनूरकरांच्या प्रमाणिकपणाबद्दल त्याची खात्री झाली आणि त्यानें आपले धनी पटवर्धन यांना तसे लिहून कळविले.

आमच्या वाचकास कदाचित् अशी शंका येईल कीं, चार तंबोरे व चार पखवाज नजर करणे म्हणजे तरी एक प्रकारें खंडणी देण्यासारखेंच नव्हे काय, तर आह्मी त्यास असे कळवितो कीं, इतपत नजराणा करणे हे हल्लीप्रमाणेच त्या काळींही शिष्टपणाचें लक्षण मानलें जात असून त्यात नजराणा पाठविणारास कोणताही कमी-पणा येण्याचा संभव नव्हता. खुद्द हैदरअल्लीकडे सावनूरकराचा पहिला निरोप गेला तेव्हा त्याने त्या निरोप नेणाऱ्या जासुदास दोनशे रुपये बक्षीस दिले होते. त्यानंतर हैदराचा कारकून बाळाजीपंत हा खंडेरावास बोलावून नेण्यासाठीं आला त्या वेळी त्याने सावनूरकरापुढे अकरा रुपये धरून, मगच हैदराची थैली त्याच्या हातात दिली होती. असा प्रकार असल्यामुळे सावनूरकरानी आज हैदराकडे पाठ-विलेला हा तंबोऱ्याचा व पखवाजाचा नजराणा म्हणजे केवळ एक दरबारी शिष्टा-चार होता.

सावनूरकराकडून आलेल्या मंडळींचीं व हैदरखानाकडील लोकांचीं जेवणी खाणी आटोपल्यावर हैदराच्या छावणीतील एका प्रशस्त राहुटीत गाण्याच्या बैठ-कीची तयारी करण्यांत आली. राहुटीभर रुजामे अंथरण्यात येऊन त्यावरून अंतरा अंतरावर लोडगालिचे ठेवण्यात आले. हे गाणें खासगी स्वरूपाचें आहे असे प्रसिद्ध करण्यात आले असल्यामुळे हैदराच्या निवडक सरदार मंडळीशिवाय इतर कोणास प्रवेश मिळणे शक्य नव्हतें. शिवाय हैदराचा धाकच असा जबर होता कीं इतकें आकर्षक गाणें त्याच्या राहुटीत होणार हे प्रसिद्ध झाले असूनही, त्याच्या राहुटीच्या आसपास येण्याची सुद्धा त्याच्या शिपायांची छाती होत नव्हती. शामियान्यात खूपच रोशनाई करण्यात येऊन अगरबत्त्यांचा घमघमाट दरवळून राहिला.

दिव्यांचा चकचकाट आणि अष्टमीचें चांदणें यांचा अंतर्बाह्य मिलाफ होऊन सारा शामियाना व त्याचा आसमंत उजळून निघाला. सात आठ घटका रात्र होते तों हैदराचे एकेक सरदार येऊन राहुटींत दाखल झाले. हा कोण सैदुमिया, हा कोण गुलजारखान, हा कोण शहानवाजखान, हा कोण व्यंकटराव बार्की, हा कोण कॅप्टन् मुसा इंगल फरांचीस, याप्रमाणें एकेक जण येऊन स्थानापन्न होऊं लागतांच सभा भरून दिसूं लागली. थोड्याच वेळांत खंडेराव दिवाण आपल्या कारकून पेशासह येऊन सभेस बसला. त्याच्या पाठोपाठ मुमताज कलावंतीण आपल्या साजासह येऊन दाखल झाली. तिच्या बरोबर तिच्या दोन शिष्यिणी, पखवाजी आणि सारंग्येही येऊन बसले. परशुरामभाऊंनीं मुमताजची कशी काय समजूत काढली असेल ती असो, ती आज मोठ्या उमेदींत गाण्यास आलेली दिसली. तिनें आज मोठा मोहक पेहेराव केला होता, त्यामुळें ता यऊन बसतांच साऱ्या खानांचे डोळे तिजकडे एकदम लागून, जो तो 'वा वा: तोबा, क्या खपसूरत औरत है' असें आपापल्या शेजाऱ्याच्या कानांत पुटपुटूं लागला! पण मुमताज जर एका कारणाकरितां लोकदृष्टीचा विषय झाली, तर तिच्या पखवाज्यानें दुसऱ्याच कारणाकरितां त्यांच्या मनांत कौतुक उत्पन्न केलें. त्याचा तो तलम मलमलीचा पांढरा फेक आणि झिरझिरीत सद्रा, तें जरतारी जाकीट, तो कलाबतूचा चढाव, ते झुपकेदार कल्ले, त्या गुलमिशा, ती ऐटबाज तुर्की टोपी, आणि ती माफक दाढी, सर्वच थाट काही और होता! मुमताजनें बसल्याबरोबर एकवार सभोंवार चोरनजरेनें पाहिलें, पण त्या बैठकींत तिला लालामिया कोठें दिसला नाहीं. त्यामुळे तिला समाधान वाटून तिचा चेहरा अधिकच खुलला. नंतर खंडेरावानें तिला साज जुळवून ठेवण्याची इशारत केल्यावरून तिने गवसणींतून आपले तंबोरे काढले व त्यातील एकेक जुळविण्यास सुरवात केली. पखवाज्यानेंही आपला पखवाज काढून त्याच्या एका बाजूस कणीक लावली व दुसऱ्या बाजूस हातोडीनें ठोकाठोकी सुरूं केली. थोड्याच वेळात तंबोरे व पखवाज जुळवून तयार झाले, आणि पखवाज्याने आपल्या वाद्यावर एक थाप देऊन त्यांची सुरेल मिळणी श्रोते मंडळीस जाहीर केली.

आणखी एक घटका गेली असेल नसेल, इतक्यांत खंडेरावाच्या नोकरांनी नजराण्याचा साज आणला आणि खंडेराव ज्या गालिच्यावर बसला होता त्याच्या शेजारच्या गालिच्यावर व्यवस्थेनें मांडून ठेवला. त्यांनी चारी तंबोरे लोडास टेकून तिरपे ठेवले, आणि पखवाज त्यांच्यापुढें शिस्तीनें लावून ठेवले. ते उघडे करून ठेवतांच राहुटींतल्या सर्व मंडळींचें लक्ष्य एकदम त्यांच्याकडे वेधलें जाऊन जो तो त्यांच्या नक्षीकामाची व सुबकपणाची वाखाणणी करूं लागला. मुमताजचा पखवाजी तर त्या तंबोऱ्यांवर इतका फिदा झाला कीं त्याची दृष्टिच मुळीं त्यांच्यावरून

हलेना. तो एकसारखा त्या तंबोऱ्यांकडे टक लावून पहात होता. मग त्याला त्यांत एवढें काय वाटत होतें कोणास ठाऊक? आणखी थोडा वेळ गेला. सुमारें दहा घटका रात्र झाली असेल, इतक्यांत शामियान्याच्या तोंडाशीं भालदारांची ललकारी ऐकूं आली आणि हैदरखानाची स्वारी आपल्या दुभाष्यासह सभेंत प्रविष्ट झाली. तो आंत येताच सर्वांनीं उठून त्याला खडी तामीज दिली. मुमताजचा पखवाजी मात्र ते तंबोरे पाहण्यांत इतका गुंगला होता कीं त्या नादात त्याला उठून उभे राहण्याचें सुद्धां भान राहिलें नाहीं. मुमताजनें त्याला हळूच आठवण दिली त्या वेळीं कोठें ' जी हां ' करीत त्यानें किंचित् उठल्यासारखें केलें. पण तोंपर्यंत हैदर व इतर मंडळी आपापल्या जाग्यावर बसली देखील होती, हें पाहून पखवाजीही खालीं बसला. नंतर खंडेरावाचे व हैदरखानाचे थोडे कुशल प्रश्न होऊन नजराण्याचा समारंभ झाला. समारंभ ह्मणजे इतकाच कीं, खंडेरावानें उठून त्या तंबोऱ्यांपैकीं एक तंबोरा जाग्यावरच उभा करून हैदरापुढें किंचित् मान लवविली, आणि हैदरानेंही किंचित् स्मित करून ' आह्मी या नजराण्याचा स्वीकार केला ' अशा आशयाने मस्तक अमळ वांकविले, व हातानें ' असूं देत ' अशी खूण केली. नंतर हैदरानें खंडेरावास आपणाजवळ बोलावलें व त्यास मानाचीं बहुमोल वस्त्रें देऊन एक हिऱ्याची पाणीदार अंगठी नजर केली. अरे, पण आमचे पखवाजी बुवा का असे चुळबूळ करीत आहेत? त्याचे डोळे कशाने लाल झाले? ते पहा, ते कसे उष्ण श्वास सोडताहेत व जागच्या जागींच कसे धुसफुसत राहिले आहेत! तो नजराण्याचा समारंभ पाहण्याच्या नादात याच्याकडे कोणाचे लक्ष्य नाही ह्मणून बरें, नाहीं तर त्यांची ही चमत्कारिक वृत्ति पाहून त्यांची कोणी तरी चांगलीच संभावना केली असती! खंडेराव आपल्या जाग्यावर येऊन बसला आणि त्याने गाणे सुरू करण्याविषयीं मुमताजला इशारत केली. त्याबरोबर मुमताजनें तंबोरे उचलून शिष्यिणींचे हाती दिले आणि त्यानी ते छेडावयास प्रारंभ केला. पखवाजीही आता शुद्धीवर आला होता, त्याने पखवाजावर थाप दिली. मुमताजनें 'आऽऽ' केला तोच इतका सुरेल केला कीं, एका क्षणात राहुटीमध्यें जिकडे तिकडे स्तब्धता उत्पन्न होऊन सर्वांचे डोळे एकदम तिजकडे लागले.

कलावंतिणीनें प्रथम एक हिंदुस्थानी ध्रुपद सुरू केलें. रात्रीची वेळ, मुमताजसारखीं गाणारीण, आणि हैदरसारखा दर्दी श्रोता, असा त्रिवेणी संगम जुळून येतांच हां हा ह्मणता गाण्यास रंग चढला हें सांगावयास नकोच. मुमताजचे मधुर आलाप सर्व राहुटीभर पसरून राहिले. तिच्या पखवाजीनेंही आपलें कौशल्य कसून दाखविण्यास प्रारंभ केला. त्याच्या डावीकडचें 'धीम्' आणि उजवीकडचें 'तान्' हें इतकें सुरेल बोलत होतें कीं प्रत्येक जण त्याच्या भरदार बाजाला मान तुकवीतच

राहिला. त्याच्या भोंवतालीं बसलेले सारे खान आणि मिया देहभान विसरून गेले आणि मुमताजच्या व तिच्या पखवाजीच्या कौशल्यावर त्यांच्या मुरकुंड्या वळूं लागल्या. ' सुभान अल्ला, क्या गाना है ! ,' ' वा वा: पखवाजी, कैसा बिजलीके माफक हात चल रहा है !,' इत्यादि स्तुतिपर वाक्यांचा वर्षाव बारीक पण स्पष्ट आवाजांत चोहोंकडून होऊं लागला. हिंदुस्थानी चीज गाऊन झाल्यावर मुमताजने एक कर्नाटकी मासला चालू केला. तो तर तिचा हातखंडाच असल्यामुळे आधीच गुंग झालेल्या श्रोत्यांना तिनें खरोखरीच वेड लावलें ! खुद्द खंडेरावाला तिची ती दिव्य गायकी ऐकून अत्यंत आश्चर्य वाटलें. मुमताज सावनूरचीच राहणारी असल्यामुळें सरकारी वाड्यांत तिचें गाणें त्यानें अनेकदां ऐकलें होतें, पण आजच्यासारखा रंग तिच्या गाण्याला आलेला त्यानें कधींच पाहिला नव्हता. खुद्द मुमताज व तिचा पखवाजी हीं दोघें परस्परांच्या कसबावर खुष होऊन परस्परांस उत्तेजन देत होती.

हैदरअली गाण्याचा व नाचरंगाचा फार शोकी होता. विशेषेंकरून नायकिणीचें गाणें असलें म्हणजे तो रंगात येई, बैठकीत मद्यपान करी, कधीं कधीं तें अतिरिक्तही करी, आणि मग सारी रात्र त्याचा धुडगूस जो चाले तो काही पुसूं नये ! पण काय असेल ते असो, आज त्यानें मद्याची आठवण सुद्धा काढली नाहीं. मग खंडेरावासारख्या परक्या राजाच्या दिवाणादेखत असली अमर्याद वागणूक बरी नव्हे अशा विचारानें त्यानें आपलें मन आवरलें असल्यास नकळे. तो आज प्रथमपासूनच लक्ष्यपूर्वक गाणें ऐकत होता. त्याचें सारें चित्त मुमताजच्या आलापाकडे आणि तिच्या पखवाजीच्या लयकारीकडे लागलें होतें. शिवाय त्याला गाणेंही थोडें बहुत समजत असल्यामुळें आपल्या पागल सरदारांप्रमणे कलावंतिणीच्या नुसत्या खपसुरतीवर किंवा हावभावांवर न भाळता, गाण्याची मौज घेण्याची त्याच्या अंगी पात्रता होती. त्याचा कान तर इतका तिखट होता कीं सुरेल बेसुर हें त्याला तेव्हाच कळत असे. आतांपर्यंत मुमताजच्या तीन चिजा गाऊन झाल्या असून चवथ्या चिजेला प्रारंभ झाला होता. इतक्यात पखवाजीच्या हातचा पखवाज एक स्वरानें उतरला आहे ही गोष्ट हैदराच्या लक्ष्यात आली. पण हैदर पक्का व्यवहारज्ञ असल्यामुळे, भरमैफलीत ' तुझा पखवाज उतरला आहे ' असे पखवाजीस ह्मणणे ह्मणजे त्याचा उपमर्द करण्यासारखे होय हे तो जाणून होता. ह्मणून पखवाज बेसूर बोलतो आहे हें कळत असूनही तो गप्पच राहिला. मात्र त्याची चर्या जी एवढा वेळ शात व प्रसन्न होती, तिजवर किंचित् वक्रता उत्पन्न होऊन ती उतावीळ व नाराज झाल्यासारखी दिसूं लागली. इतक्यात आपला पखवाज बदसूर वाजत असल्याचें पखवाजीच्याही लक्ष्यांत आलें. त्याने पखवाजाच्या डाव्या बाजूवरच एक हात चालता

ठेऊन, उजव्या हातानें पखवाजाच्या तोंडावर हातोडीचे ठोके देण्यास प्रारंभ केला. पण त्यामुळें पखवाज सुराला न मिळतां अधिकच बेसूर झाला, आणि ती गोष्ट मुमताजच्या लक्ष्यांत येऊन तिनें गाणें एकदम तहकूब केलें. मैफलीचा अमळ विरस झाला, पण त्याला उपाय नव्हता. पखवाजीनें हातोडीचे भराभर ठोके देऊन व कांहीं गठ्ठे खालीं वर करून पुन्हा एकदा पखवाज सुराला मिळवून घेतला, आणि मुमताजनें बंद ठेवलेली चीज पुनश्च चालू केली.

या वेळी मध्यरात्रीचा सुमार झाला होता. चांदणेंही बहुतेक संपुष्टांत आलें होतें. गाण्यास पुन्हा सुरवात झाली खरी, पण वाचकांस हें ठाऊकच आहे कीं, कोणत्याही गोष्टीचा रंग जितक्या लौकर मोडतो, तितक्या लौकर तो पुन्हा भरत नाही. आताही तसेच झालें. विसकटलेला रंग पुन्हा भरण्याकरितां मुमताज आपली शिकस्त करूं लागली, पण तो बेटा काही केल्या लवकर भरेना. ते पाहतांच मुमताजनें गायक लोकांच्या नेहमीच्या युक्तीचा अवलंब केला. तिने चालू असलेली चीज एकदम बंद केली, आणि एक द्रुत लयीची सुंदर कर्नाटकी छक्कड ह्मणण्यास प्रारंभ केला. त्याबरोबर श्रोतेमंडळीत एकदम विजेचा संचार झाल्यासारखें होऊन, चोहोंकडून एकाच वेळी वाहवाचा वर्षाव झाला. पखवाजीनेंही नाना प्रकारच्या बोल परणाचा आणि तऱ्हतऱ्हेच्या अवसानांचा उपयोग करण्यास प्रारंभ केला. गाण्यास पुन्हा एकदा रंग भरला. हैदराची मुद्रा पुन्हा एकवार प्रसन्न होऊन तो नागासारखा डोलू लागला. पण आजच्या गाण्यास कोणती वाईट वेळ लागली होती कोणास ठाऊक, पुन्हा एकदा त्यात विघ्न उपस्थित झालें. पखवाजीचें हत्यार पुनश्च बेसूर बोलूं लागलें आणि तें दुरुस्त करण्याकरितां ह्मणून तो त्याच्यावर हातोडीनें जसजसे ठोके देऊं लागला, तसतसें तें अधिकच बिघडत जाऊन एखाद्या फुटक्या डफासारखे वाजूं लागलें! सर्व लोकाचें लक्ष्य बिचाऱ्या पखवाजीकडे लागून त्याची सर्वांना कींव आली. पखवाजी तर पखवाजास ठोकठोकून व त्याचे गठ्ठे खालीं वर कर करून इतका कंटाळला कीं शेवटी त्याने तोंड वाकडे करून पखवाजापुढें हात टेकले! ते हत्यार दुरुस्त होण्याची त्याला आशा राहिली नसावीसे दिसले. त्याने खंडेरावाच्या शेजारच्या गालिचावर ठेवलेल्या नजराण्यातील पखवाजाकडे एकवार पाहिल्यासारखें केले, आणि 'ये तो बिलकूल बाद हो रहा है, उसमेसे कोईबी चलेगा, देखता हूं' असे आपल्याशींच पण मोठ्याने पुटपुटत तो हातोडी घेऊन जो उठला तो तडक नजराण्याच्या पखवाजाकडे निघाला! तो इतका त्रासलेला दिसला कीं, आपल्या पखवाजाने दगा दिल्यामुळें आज गाण्याचा बेरंग झाला ही गोष्ट त्याच्या मनास फारच लागली असावी असे सर्वांस वाटले. इतक्यात त्याचा बेत खंडेरावाच्या लक्ष्यात येऊन 'अरे ते नजराण्याचे पखवाज

आहेत, त्यांना हात लावूं नको ' असें तो खूपच मोठ्यानें ओरडला! पण त्याच्या इषारतीनें जें काम व्हावयाचें तें अनायासें अपघातानें घडून यावें असा योग होता ह्मणूनच कीं काय, पखवाजीचा पाय कशांत तरी अडकला आणि तो धाडकन् सप-शेल पालथा पडला! तो असा जोरानें कोसळला कीं त्याच्या मस्तकाची धडक लोडास लागून तो दूर ढकलला गेला, त्याच्यावरचे तंबोरे एकमेकांवर आपटून गड-गडत खालीं गेले, आणि त्याच्या हातांतली हातोडी निसटून एका पखवाजावर जाऊन हापटून पखवाजाचें तोंड फुटलें! अरे पण हा काय चमत्कार? त्या तंबो-ऱ्यांपैकीं एकाचा भोपळा फुटून त्याचे तुकडे उडाले होते आणि त्यांतून सोन्याचे होन घरंगळत खालीं येत होते! त्याचप्रमाणें फुटलेल्या पखवाजांतूनही तसल्याच होनांचा एक ढीग खाली घसरून येऊन राहिला होता!!

आपल्या हातून केवढा मोठा प्रमाद झाला हें मनांत येऊनच कीं काय पख-वाजी अत्यंत खजील झाला आणि चटकन् उठून मागें सरला. मुमताज वेड्या सारखी टकमक पाहूं लागली. खंडेराव ओरडतच उठला, आणि त्याचा चेहरा पांढरा फटफटीत झाला. हैदरास खंडणी देत नाही असें पटवर्धनांस निक्षून कळवून इकडे तंबोऱ्यांतून व पखवाजांतून चोरून खंडणी आणून देण्याची जी कारवाई आपण केली, ती अशा प्रकारें अकल्पित उघडकीस आल्याचें पाहताच त्याला मेल्याहून मेल्यासारखें झालें आणि राहुटीतल्या मंडळींत कोणी परका इसम आहे कीं काय, हें पाहण्याकरितां त्याची दृष्टि इतस्तता संचार करूं लागली! पण हैदराच्या व आपल्या माणसाखेरीज येथें कोणी परका इसम खरोखरीच नसल्यामुळे आपली भीति निराधार आहे हें जाणून त्याने आपल्या मनास धीर दिला. नज-राण्याचा साज फुटला हें प्रेक्षकाच्या लक्ष्यांत येतांच चोहोंकडे एकच गोंधळ उडला! ' काय झालें हो? ' ह्मणून विचारणारे आणि 'अमुक अमुक झालें' ह्मणून त्यांस तप-शीलवार उत्तर देणारे या दोघांच्याही आवाजांची एकच गल्लत झाली. बऱ्याच लोकांच्या लक्ष्यांत झालेला प्रकार लवकर आला नाहीं. हैदर अली ' क्या बेवकूफ अदमी है, ' असें ह्मणत उठून उभा राहिला, त्याबरोबर त्याचे सरदारही उठले आणि मग एकच कल्ला झाला. मग या सर्व अनर्थाचें मूळ जो पखवाजी त्याचा शोध सुरूं झाला. कित्येक मंडळी त्याला धरून आणण्यासाठीं सरसावली. पण तो कसचा सांपडतो? मघांच्या धांदलीत तो केव्हांच पसार झाला होता!

---

## प्रकरण १० वें.

खरे ले. ८२८, ८५३, ८५४ इ. } **आखाड्यांत प्रवेश.** [मार्ग. व. १३-९१

मागील प्रकरणांत सांगितलेली हकीगत घडून जवळ जवळ दीड महिना होऊन गेला होता. एवढ्या अवधींत हैदराच्या व पेशव्यांच्या लष्करांच्या ज्या हालचाली झाल्या त्या केवळ प्रास्ताविक स्वरूपाच्या असल्यामुळें आह्मी वाचकांना त्यांची थोडक्यांत माहिती करून देऊन कथासूत्र पुढें चालविणार आहोंत. गोपाळराव पटवर्धनांचा तळ मुळगुंदास असतां श्रीमंत पेशवे सरकार जेजुरीस आले होते हें वाचकास ठाऊकच आहे. त्याच वेळीं श्रीमंत नारायणराव पेशवे करजगी येथें होते हेही वाचकाच्या स्मरणात असेल. मराठ्याच्या लष्कराचे हे तीन तळ तीन ठिकाणीं पडले असून, तीन्हीं तळावर लष्कराची जुळवाजुळव चालूंच होती. श्रीमंत रावसाहेब कार्तिक शुद्ध चतुर्थीनंतर जेजुरीहून निघाले ते कार्तिक शुद्ध नवमीच्या सुमारास वांईस आले. त्याचा मुक्काम वाईस असताना पुण्याहून डाक्टर कनिंगहॅम आणि नाना फडणीस मुद्दाम त्यांच्या भेटीसाठीं आले होते. कणीघाम काकानें श्रीमंताची प्रकृती पाहून, ती चालूं स्थितीत जरी साधारण बरी दिसत असली, तरी एकंदरीत दगदगीच्या मोहिमेला टिकण्याजोगी नाहीं असे आपले प्राजल मत बोलून दाखविले, आणि त्याच्या सूचनेचा विचार करण्याकरिता श्रीमंतांची व नानांची अगदी खासगी अशी बैठक झाली. तिजमध्ये नानांनीही श्रीमंतांस सरदार मंडळीवर मोहीम सोपवून पुण्यास परत चलण्याचाच सल्ला दिला, पण प्रस्तुतच्या स्थितीत आपण जातीनिशी कर्नाटकात गेल्याशिवाय मोहिमीचा जम बरोबर बसणार नाही अशी श्रीमताची खात्री असल्यामुळे त्याना नानाची सूचना मान्य करणें अशक्य झाले. अखेर असें ठरले की, प्रकृति जोंपर्यंत बरीच निकोप आहे असें वाटेल तोपर्यंत श्रीमतानी मोहिमेवर असावें, आणि तोपर्यंत नानांनी पुण्यास श्रीमंताच्या आरोग्याकरिता शत कोटि मृत्युंजयाच्या जपानें अनुष्ठान बसवावे; एवढ्याने श्रीमंताची प्रकृति सुधारत राहिली तर उत्तमच झालें, आणि ती बिघडूंच लागली तर मात्र श्रीमंतानी सरदार मंडळीवर मोहीम सोंपवून पुण्यास परत जावें. अशी तोड ठरल्यावर नाना फडणीस व डाक्टर कानिंगहॅम पुण्यास परत गेले, आणि श्रीमंत वांईहून पंढरपुराकडे निघाले.

मार्गशीर्ष शुद्ध अष्टमीला श्रीमंताचा तळ पंढरपुरास येऊन पडला. तेथें एक दोन मुक्काम करून ते सागोल्यावरून करजगीस आले. तेथे श्रीमंत नारायणरावांच्या व त्यांच्या फौजा एकत्र झाल्या. करजगीच्या मुक्कामास श्रीमंताच्या पाशी फौजेचा

बराच सरंजाम जमला, आणि आतां आपण कर्नाटकची मोहीम यशस्वी करून हैद-राचा पुरता नक्षा उतरूं अशी त्यांना धमक वाटूं लागली. श्रीमंत कर्नाटकांत निःसंशय येतात, असा भरंवसा लागतांच कर्नाटकांतील त्यांच्या मांडलिकांना मोठा धीर आला, आणि त्यांनीं आपापल्या फौजा श्रीमंतांच्या मदतीसाठीं तयार केल्या. या मोहिमेंत मराठ्यांतर्फे एकंदर किती सैन्य जमलें होतें याची वाचकांना कल्पना यावी ह्मणून आह्मी वेगवेगळया पथकांचे तपशीलवार आंकडेच पुढें देतों:—

| क्रमांक. | पथक | फौज संख्या | क्रमांक | पथक | फौज संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | पटवर्धन, तीन पथके | ८००० | ११ | गारदी | १५००० |
| २ | धायगुडे | १००० | १२ | सावनूरकर | ३००० |
| ३ | हरी गोपाळ | २००० | १३ | कडपे व कर्नूळचे नबाब | १५०० |
| ४ | रास्ते | २५०० | १४ | कित्तूरकर | १००० |
| ५ | अक्कलकोटकर भोसले | १००० | १५ | सदाशिव रामचंद्र | २००० |
| ६ | नागपूरकर भोसले | ५००० | १६ | चित्रदुर्गकर | ३००० |
| ७ | शहाजी भापकर | १००० | १७ | गुत्तीकर घोरपडे | ४००० |
| ८ | गजेंद्रगडकर व नरगुंदकर | ५०० | १८ | हैदराबादकर निजाम | ८००० |
| ९ | गायकवाड | ४००० | | | |
| १० | हुजुरात व पागा | १५००० | | एकूण | ३७५०० |
| | एकूण | ४०००० | | | |

याप्रमाणें या मोहिमीवर पेशवे सरकारांच्या तर्फे पाऊण लक्षावर फौज दाखल झाली होती. मात्र ही सारी फौज एकाच वेळीं कामगिरीवर आली होती, असे वाचकांनी समजूं नये. कर्नाटकातील मांडलिकांच्या फौजा बऱ्याच उशीरानें युद्धात आल्या, आणि निजामअल्लीचा सरदार तहवारजंग हा तर जवळ जवळ सालअखेरी-सच येऊन मिळाला.

पेशव्यांची प्रकृति बरी नाहीं, यावरून ते मोहिमीवर येणार नाहींत अशी हैदरअल्लीस मोठी आशा होती. पण आश्विन वद्यांत ते डेरेदाखल झाले असें कळल्यावर त्याचा अमळ हिरमोड झाला आणि त्याला चिंता उत्पन्न झाली. त्याचे वकील अप्पाजीराम व रेझा अल्ली हे पुण्यास श्रीमंतांबरोबर तहाचें बोलणें करण्या-करितां आले होते. हैदरानें तिकडे अशा तऱ्हेनें तहाचें बोलणें चालूं ठेवलें

होतें आणि इकडे कर्नाटकांत श्रीमंतांच्या मांडलिकांपासून खंडणी उकळण्याचें कामही सुरू ठेवलें होतें! श्रीमंतांनीं हैदराच्या वकीलांना स्पष्ट सांगितलें कीं, शके १६८९-९०-९१ या तीन सालांबद्दल चाळीस लक्ष रुपये खंडणी द्या, चित्रदुर्ग वगैरे आमच्या मांडलिक संस्थानांपासून काय खंडणी घेतली असेल ती परत द्या, आमचा नोकर मीर रेजा यास गुर्रमकोंड्याची जहागीर आह्मी दिली होती, तो तुमच्याकडे फितूर होऊन आला आहे त्यास आमचे स्वाधीन करा व ती जहागीर आमची आमच्या ताब्यांत द्या, तरच तुमचा आमचा तह होणें शक्य आहे. पण हैदरअल्ली या कलमांपैकीं पहिल्या ह्मणजे खंडणीच्या रकमेखेरीज कोणतीच गोष्ट कबूल करीना, आणि खंडणीचें देखील तिप्पल सांगू लागला. तें असें कीं दहा लक्ष रुपये तूर्त सावकारी निशा करून देतों, सोळा लक्षाच्या फेडी-बद्दल रेझा अल्ली या वकिलास ओलीस ठेवतों, आणि बाकी राहिलेले चौदा लक्ष पेस्तर साली देतों! मिळून काय, ' दस देएंगे, दस दिलवाएंगे ' पैकीं सारा प्रकार होता! असला लपंडाव श्रीमंतांच्या तापट प्रकृतीस न खपून त्यांनीं हैदराच्या वकी-लांना निरोप दिला आणि आरंभीं लिहिल्याप्रमाणें ते मजल दरमजल कूच करूं लागले.

करजगीहून श्रीमंत हळूं हळूं मुक्काम करीत रामतीर्थ, कोकटनूर अशीं गांवें घेऊन कृष्णाकाठीं हिपरगीस आले. मार्गशीर्ष महिन्याचा वद्य पक्ष सुरू झाला होता. हिपरगीस एक दोन मुक्काम करून ते झपाट्यानें निघाले, ते तुंगभद्रेच्या कांठीं कोपळ गावावर येऊन मार्गशीर्ष वद्य द्वादशीस पोंचले. आता मात्र हैदर अल्लीची पक्की खात्री झाली की, पेशव्यांनीं आपणास भिवविण्याकरितां कर्नाटकांत येण्याची केवळ हूल उठविली आहे असें जे आपण समजत होतों तें खरें नसून, आपणावर निकराची मोहीम चालविण्याचा त्यांचा नक्की विचार ठरला आहे. तेव्हां त्याचें धाबें दणाणले आणि तो कुपेल्लूरचा मुक्काम उठवून पेशव्यांच्या प्रगतीच्या प्रमाणात मागें हटूं लागला. कार्तिक वद्य एकादशीच्या सुमारास तो होसुरावर गेला आणि पेशवे तुंगभद्रेवर येईपर्यंत नैर्ऋत्येच्या रोखानें मागें सरून उडगणीस गेला आणि जडें-अनवडी-उगडणी या तीन गांवरानांच्या आसपास तोफांच्या बातेऱ्या बांधून तळ देऊन राहिला. तेथून मासूरची बारी अगदीं जवळ असून एकदां त्या बारीत शिरल्यावर आपला पाठलाग करणें पेशव्यांच्या फौजेला अगदीं अशक्य आहे अशी त्याची खात्री होती. कुपेल्लुराहून जरी हैदरखान निघाला, तरी गोपाळराव पटवर्धनांनीं त्याचा एकदम पाठलाग केला नाहीं. त्यांची फौज थोडी असल्यामुळें ते पेशव्यांच्या आगमनाची वाट पहात होते. श्रीमंत रण-क्षेत्रावर येऊन पोंचले ह्मणजे त्यांच्या सल्यानें मोहिमेचा पुढील बेत आंखावा असा

गोपाळरावाचा हेतु होता. अखेर श्रीमंत कोपळ मुक्कामीं आले आणि तेथें येतांच त्यांनीं गोपाळरावाला आपणास ताबडतोब येऊन भेटण्याविषयीं लिहिलें. त्याबरोबर गोपाळरावानें आनंदराव रास्ते, परशुरामभाऊ पटवर्धन वगैरे मंडळीवर आपल्या मुळगुंद येथील छावणीच्या रक्षणाचें काम तात्पुरतें सोपविलें आणि तो सडाच निघून कोपळ मुक्कामीं श्रीमंतांस भेटावयास गेला.

श्रीमंतांची कोपळची छावणी ह्मणजे एक प्रचंड शहरच वसलें होतें. शेंकडों डेरेराहुट्या, असंख्य पालें, दहा वीस हजार घोडे, गाड्यांचे हजारों बैल, उंटें व ओझ्यांचीं तट्टें आणि या शिवाय गाडे, मेणे, तोफा इत्यादि सरंजाम दहापांच मैलांचा प्रदेश व्यापून पसरला होता. या सरंजामांत साठ हजारांवर शिपाई आणि प्रचंड तोफखाना होता. शिवाय सुतार, लोहार, नालबंद, भोई, पखालजी, कामाठी, हरकारे, जासूद, झाडेंतोडे, मशालजी, कहीवाले आणि बुनगें यांचीही गर्दी होती. बहुतेक पथकवाल्या सरदारांच्या वेगवेगळ्या राहुट्या असून त्या थोड्या थोड्या अंतरावर उभारल्या असल्यामुळे सर्वांची मिळून एक रमणीय शोभा दिसत होती. गोटाच्या भोंवतीं जागजागीं चौक्या बसविल्या असून त्यावर दक्ष आणि विश्वासू लोकांचा खडा पहारा ठेवला होता. मराठ्याच्या लष्कराची वाटेनें लुटालूट करीत जाण्याबद्दल पूर्वीपासूनच मोठी ख्याति होती, पण श्रीमंत रावसाहेब पेशव्यांनीं आपल्या दराऱ्यानें तो प्रघात बहुतेक बंद पडला होता. श्रीमंत ज्याप्रमाणें उत्तम मुत्सद्दी होते त्याप्रमाणें उत्तम सेनापतीही होते. लढाईतले डावपेंच तर ते उत्तम जाणतच होते, पण चोहोंकडे हेर पाठवून शत्रूकडच्या बातम्या आणविण्यांतही त्यांचा हातखंडा होता. मोहिमीवर निघाल्यापासून त्यांनीं हैदराच्या हालचालींवर सूक्ष्म नजर ठेवली होती, आणि प्रस्तुतची मोहीम कशी चालवावयाची याचें धोरणही त्यांनीं आपल्या मनाशीं आंखून ठेवले होतें. पण ते गोपाळराव पटवर्धनाच्या धोरणाशीं कितपत जुळतें हें त्याना अजमावावयाचे असल्यामुळें त्यानीं कोपळच्या मुक्कामास गोपाळरावाला मुद्दाम बोलवून घेतलें होतें. आपल्या सरदारांत शूर ह्मणण्याजोगे सरदार पुष्कळच आहेत, पण युद्धाचे डावपेच जाणणारा सेनापति असें ह्मणण्याजोगा सरदार एकटा गोपाळरावच आहे अशी श्रीमतांची पक्की खात्री होती आणि ह्मणूनच त्याच्या सल्लामसलतीचें श्रीमताना इतकें महत्व वाटत होतें.

मार्गशीर्ष वद्य त्रयोदशीच्या रात्री श्रीमंताच्या बादल डेऱ्यांत तमाम सरदार मंडळी जमून मोहिमीच्या धोरणाबद्दल खल चालला होता. मध्यभागीं एका लोडाला टेकून अक्कलकोटकर शहाजी राजे भोसले बसले असून त्याच्या उजवी कडे नागपूरकर साबाजीराव आणि डावीकडे श्रीमंत रावसाहेब बसले होते. रावसाहे-

ांच्या शेजारीं जवळच गोपाळराव पटवर्धन बसले होते आणि इतर सरदारमंडळी आपापल्या मानाप्रमाणें दुतर्फा वांटून बसली होती. प्रत्येक जण आपापल्या मगदुराप्रमाणें आपलें मत प्रदर्शित करीत होता, आणि श्रीमंत सर्वांचें ह्मणणें लक्ष्यपूर्वक एकून घेत होते.

'मला वाटतें,' नरसिंगराव धायगुडे ह्मणाले, 'हैदरनाईक जोंपर्यंत उडगणीच्या रानांत आहे, तोंपर्यंतच त्याला कोंडावा. पटवर्धनांचीं व आपलीं पथकें एकत्र करून त्याला वेढा दिला तर तो अनायासेंच सांपडेल आणि मोहिमीची पुढची सारीच दगदग वाचेल.'

'नरसिंगराव,' गोपाळराव पटवर्धन उत्तर करितात, 'तुह्मी ह्मणता तें शक्य झालें असतें, पण केव्हा? हैदर नाइकाच्या भोंवतालच्या चारी बाजू खुल्या असत्या तर. सध्यां तो उडगणीच्या रानांत तोफांच्या बातेऱ्या बांधून राहिला आहे. तेथें आह्मी त्याला कोंडावयास पहावयाचें ह्मणजे त्याच्या तोफांना आपलें माणूस निष्कारण बळी द्यावयाचें. आणि इतकेंहि करून कोंडलाच तर फार तर तीन बाजूंनीं कोंडतां येईल. त्याच्या पिछाडीची मासूरची बारी त्याला निसटून जायला मोकळीच आहे. तिच्यामध्यें तो एकदा शिरला ह्मणजे त्याच्या फौजेवर आमच्या करोलांचा मुळींच एलगार चालणार नाही!'

हैदरानें धरलेल्या आसऱ्याच्या जाग्याची श्रीमंताना कल्पना होतीच. ते ह्मणाले 'तर मग मैदानात येऊन आह्माशी लढाई देण्याचा त्याचा विचार नाहीं असें जे मला वाटत होते ते खरेंच ह्मणावयाचें?'

'श्रीमंतांचा तर्क अगदी बरोबर आहे,' गोपाळराव श्रीमंतांच्या बुद्धिमत्तेचें मनातल्या मनात कौतुक करीत ह्मणाला, 'त्याचा तोफेचा सरंजाम जरी मजबूत आहे, तरी मैदानात येऊन आमच्या घोडेस्वारांशी गाठ घालण्याची त्याची छाती नाहीं. तो असाच दडून बसणार, जरूर पडली तर बरसातीपर्यंत देखील असाच दडून बसणार—'

'अन् तवर अमी त्येचा समदा मुलूक तुडवून काढू त्येची वाट!' शहाजी भापकर मध्येंच ह्मणाले, 'त्येची त्येला काई काळजीच न्हाई जनु?'

'त्याची त्याला खातर नाहीं,' गोपाळराव ह्मणाले, 'बरसातीला आमचें लष्कर परतून देशावर गेलें ह्मणजे तो बाहेर पडणार आणि आपला मुलूख पुन्हां जिंकून घेणार.'

'ह्यचभन् मानूस हाय कां हैवान हाय?' भापकर उद्गारले, 'आपल्या परजेच्या जिवाची अन् मालमिळकतीची अजाबात कदर न्हाई असला ह्यो मानूस कसला?'

'हा असा आहे खरा,' श्रीमंत स्मित करून ह्मणाले, 'मग तुह्मी त्याला कांहीं ह्मणा. मागच्या दोन्ही मोहिमांतूनहि मला त्याचें हेंच धोरण दिसलें. आह्मी आलों ह्मणजे तोंड चुकवावयाचें आणि परत गेलों ह्मणजे बाहेर पडून आमच्या मुलखाची नासाडी करावयाची!'

'आणि ह्मणूनच मी असें सुचवितों,' धारवाडचे सुभेदार लक्ष्मण हरि लागू ह्मणाले, 'कीं, या खेपेस तरी हैदर नाइकाचा रेंच पुरता मोडल्याशिवाय श्रीमंत खाशांनीं परत जाऊं नये.'

'पण तो मोडावयाचा कसा?' साबाजीराव भोसले आश्चर्य करीत विचारतात, 'त्याला जर दडून बसावयाला कर्नाटकांत असल्या मजबूत बाऱ्या आहेत, तर त्यांतून त्याला बाहेर तरी हुसकावयाचा कसा, आणि त्याचा रेंच तरी मोडावयाचा कसा?'

'त्याला दोन उपाय आहेत,' गोपाळराव सांगूं लागला, 'एक ह्मणजे मासूरच्या बारीलाच चोहोंकडून वेढून त्या बारीत त्याला कोंडावयाचा आणि त्याची रसद बंद करून त्याची उपासमार करावयाची. पण हा उपाय तितकासा खात्रीचा नाहीं, आणि तूर्त अमलांत आणावयाजोगाही नाहीं. कारण त्याला दिवसगत मनस्वी लागेल आणि इतकें करूनही त्याची रसद खात्रीने बंद करितां येईलच असें प्रमाण नाहीं.'

'बरें हा एक झाला,' श्रीमंत ह्मणाले, 'आता दुसरा उपाय कोणता ह्मणता?'

'दुसरा उपाय असा,' गोपाळराव ह्मणाला, 'आमच्या फौजेचे दोन भाग करून, एका भागानें तडक दक्षिणेकडे श्रीरंगपट्टणाचा रस्ता धरावा, वाटेंतला त्याचा सर्व मुलूख तुडवावा, किल्लेकोट पाडून टाकावे, साऱ्या मुलखाची पार नासधूस करावी, आणि दुसऱ्या भागाने एकसारखें त्याच्या मागावर राहून त्याला मोकळेपणानें वावरूं देऊं नये. तो जाईल तिकडे त्याचा पाठलाग करावा, आणि वरचेवर छापे घालून त्याला बेजार करून सोडावें!'

'आपल्या राजधानीलाच शह बसला म्हणजे बारीतून बाहेर येणे त्याला भागच आहे ह्मणतां?' श्रीमंत मनातल्या मनात गोपाळरावाच्या युद्धकल्पनेवर खुष होऊन म्हणाले, 'ठीक आहे, मलाही असेंच वाटते. मी चाळीस हजार फौज घेऊन स्वतः पट्टणाकडे जातों आणि तुह्मी तीस पस्तीस हजार फौज घेऊन हैदरला रोखून धरा. हें काम तुह्मावांचून दुसऱ्यास जमावयाचें नाहीं.'

श्रीमंतांचे वरील शब्द ह्मणजे इतर सरदाराच्या कर्तृत्वाला एका प्रकारें शेलापागोट्याचा आहेरच होता. पण गोपाळरावाची योग्यताच अशी होती कीं श्रीमंतांनीं त्यांना दिलेला मोठेपणा सर्वांनीं विनतक्रार कबूल करावा! गोपाळराव कर्नाटक

प्रांतांतले पुरते माहितगार असून हैदराचे डावपेच त्यांना सर्व ठाऊक झाले होते. हें जाणूनच श्रीमंतांनीं वरील कामगिरी त्यांच्यावर सोपविली हें सर्वांनींच ओळखलें आणि ते न चिडतां चूप राहिले. पण गोपाळरावाची स्थिति मात्र चमत्कारिक झाली. तो स्वतः खर्चाच्या मनस्वी अडचणींत असून, श्रीमंत देखील त्याच पेंचांत आहेत हें त्याला पुरतेपणीं ठाऊक होतें. उलट निरुपद्रवी प्रजेच्या मालमत्तेची लुटालूट करीत जाणें हें श्रीमंतांस मनापासून नापसंत आहे हेंही त्यास ठाऊक होतें. अशा स्थितींत प्रस्तुतच्या पैशाच्या अडचणीचें निमित्त पुढें करून हैदराच्या मुलखांत लुटालूट करावयास श्रीमंतांची परवानगी मिळवावी असें मनांत आणून तो ह्मणाला, 'श्रीमंतांनीं मजवर ही अवघड कामगिरी सोंपविली आहे, आणि श्रीमंताच्या पुण्याईनें ती मी यथाशक्ति पारही पाडीन, पण चालू प्रसंगीं माझीही एक उलट विनंति आहे ती श्रीमंतांनीं मान्य केली पाहिजे.'

'बोला,' श्रीमंत ह्मणाले, 'राव, तुमची काय विनंति आहे?'

'विनंति इतकीच की हैदराच्या मुलखांत लुटालूट करावयाची आमच्या सर्व सरदारास परवानगी असावी.' असें ह्मणून गोपाळराव आतुरतेनें श्रीमंतांच्या तोंडाकडे पाहूं लागले.

श्रीमंताच्या मनात काय विचार चालले आहेत हें कळावयास मार्ग नव्हता. हैदराबद्दल त्याच्या मनांत पराकाष्ठेची चीड आली असून त्याच्या अत्याचारांमुळें ते मनातल्या मनांत धुमसत होते. शिवाय त्याच्यावर पुरती जरब बसवावयाची तर त्याच्या मुलखाची पार नासाडी करून तो वैराण करून टाकणेंच भाग आहे असें त्यांना वाटत होते. पण आपल्या सरदाराना सररास लुटालूट करण्याची परवानगी देणें ह्मणजे माकडाच्या हाती कोलीत दिल्यासारखे होईल कीं काय, अशी त्यांना भीति वाटत असावी. ते बराच वेळ स्तब्ध राहिले होते.

आपली विनंति श्रीमंताना चांगलीशी रुचली नाही हे ओळखून गोपाळराव ह्मणाले, 'श्रीमंतानी यांत मुळीच साकडे मानूं नये. स्वतः हैदर नाईक आमच्या मुलखात काय करतो हे श्रीमतानीं ध्यानी आणावे. आणि राजकारणात इतकें मार्दव उपयोगीही नाही. शत्रूच्या मुलखात जरब बसवावयाची तर असेच केलें पाहिजे. शिवाय हैदराची प्रजा देखील श्रीमंत समजतात तितकी निरुपद्रवी नाही. त्याच्या राज्यात हिंदूंचा मनस्वी छळ होतो. हिंदूंची मालमत्ता आणि अब्रू यांना मुळींच सुरक्षितपणा नाही. वाटेल त्या उपटसुंभाने उठावे आणि हिंदूंचीं घरेंदारें लुटावीं असा प्रकार सररास चालू आहे. मग त्याच्या तरी प्रजेची कणव आह्मी इतकी कां करावी मला समजत नाहीं.'

अजूनही श्रीमंत स्तब्धच होते. त्यांनीं एकवार साबाजीराव भोसले व शहाजी राजे अक्कलकोटकर यांचेकडे पाहिलें. ते काय ह्मणतात पहावें, अशी त्यांची इच्छा असावी.

'गोपाळरावदादांचें ह्मणणें बरोबर आहे असें मला वाटतें,' साबाजीराव ह्मणाले, 'आमचा दरारा जर हैदरावर पुरता बसावयास पाहिजे तर असेंच केलें पाहिजे.'

'मला देखील तसेंच वाटतें,' शहाजी राजे ह्मणाले, 'हैदरानें आमच्या मुलखाची इतकी नासधूस केली आहे कीं आह्मी त्याच्या मुलखाची मुळींच मुलाहिजा धरतां कामा नये.'

'तें तर झालेंच,' गोपाळराव अनुकूल संधीचा फायदा घेत ह्मणाला, 'पण हैदराच्या लोकांची मजल एवढ्यावरच थांबली नाहीं. त्यानीं हिंदूंच्या इतक्या बायका जबरीनें नेऊन बाटविल्या आहेत कीं — '

गोपाळरावांना पुढचे शब्द बोलण्याचें कारणच पडलें नाहीं. श्रीमंताची मुद्रा एका क्षणांत इतकी पालटली की, ते बघतां बघता रुद्रावतार दिसूं लागले. त्यांच्या डोळयांतून ठिणग्या पडूं लागल्या. ते आवेशानें मध्येंच ह्मणाले, 'बरें तर राव, तुह्मां सर्वांना लुटालूट करण्याची परवानगी आहे. मात्र ती करताना भल्या-बुऱ्याचा विवेक संभाळून — '

'श्रीमंतांनीं त्याची मुळीच काळजी करूं नये,' गोपाळराव ह्मणाला, 'आह्मी तें सर्व योग्यायोग्य पाहूनच करूं.'

आणखी थोडा वेळ खल होऊन कचेरी बरखास्त झाली. गोपाळराव दुसरे दिवशीं सकाळीं आपल्या छावणीकडे परत फिरला. श्रीमंतांनीं त्याच्या कुमकेस पंधरावीस हजार फौज पाठविली आणि स्वतः बाकीच्या फौजेनिशीं पट्टणाकडे जाण्याची तयारी केली.

---

## प्रकरण ११ वें.

### डोंगरची भाकणूक. [ मार्ग. व. १४-९१

मागील प्रकरणांत सांगितलेली हकीगत घडली, त्याच ह्मणजे मार्गशीर्ष वद्य चतुर्दशीचे दिवशीं मद्रास शहराच्या पश्चिमेस बऱ्याच अंतरावर असलेल्या होसूर नांवाच्या गांवानजीक एका लहानशा डोंगराच्या पायथ्याशीं असलेल्या माळावर प्रचंड जनसमुदाय लोटला होता. या समुदायांत पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रियांची संख्या होती. दक्षिण कर्नाटक, म्हैसूर, तंजावर वगैरे अनेक प्रांतांतले लिंगाईत, मराठे, जैन, मुसलमान वगैरे अनेक धर्मांचें आणि शेतकरी, व्यापारी, नोकर इत्यादि अनेक पेशाचे लाख दोन लाख मनुष्य एके ठिकाणीं गोळा झालें होतें. एवढा मोठा जनसंमर्द एके ठिकाणीं जमण्याचें कारण हेंच कीं ह्या डोंगरावर बीरण्णा ह्मणून एक देवाचें देऊळ होतें आणि त्या देवळांत राहणाऱ्या यल्लाप्पा नांवाच्या धनगराची आज तेथे भाकणूक व्हावयाची होती. भाकणूक ह्मणजे भाकीत किंवा ज्योतिष. धनगर आणि ज्योतिष कसा सांगणार, अशी कदाचित् आमच्या वाचकांना शंका येईल, तर त्यांच्या समाधानाकरिता आह्मी असें सांगतों कीं, प्रत्येक वर्षी मार्गशीर्ष वद्य चतुर्दशीच्या दिवशी ह्या यल्लाप्पा धनगराच्या अंगी बीरण्णाचा संचार होई, आणि मग तो पौष महिन्यापासून पुढील मार्गशीर्षापर्यंतचे साऱ्या वर्षाचें भविष्य किंवा वर्षफल वर्तवून लोकाना जाहीर करी. या भाकितांत व्यापाराची तेजीमंदी, लोकाचें आरोग्य, राजकीय उलाढाली वगैरे सर्व विषय येत. आणि त्या विषयासंबंधीं यल्या धनगर जें भाकीत सांगे तें तंतोतंत बरोबर येते असा लोकाप्रवाद होता. बीरण्णा ह्मणजे मारुतिरायाच्या हाताखाली असलेल्या बावन्न बीरापैकी एक महत्वाचा बीर होता, ही गोष्ट ध्यानात घेतली ह्मणजे त्याचा संचार अंगी झालेल्या यल्या धनगराला एका दिवसापुरती का होईना, अतींद्रिय दृष्टि प्राप्त होई यात नवल मानण्याचे कारण नाही !

बीरण्णाचे देऊळ डोंगराच्या पायथ्याशीच असून बरेच पुरातन असावें, असें त्याच्या बांधकामावरून दिसत होते. डोंगराच्या उतरणीला लागून दूरपर्यंत विस्तीर्ण माळ पसरलेला होता. देवळापासून जवळच सुमारे शेपन्नास कदमाच्या अंतरावर एक पार बांधलेला असून त्या पारावर एक भले मोठे जुने पिंपळाचे झाड होतें. पाराला फरसबंदी केली असून तिच्या फरशांपैकी एका फरशीवर मनुष्याच्या पावलासारखी एक आकृति उमटलेली दिसत होती. हे पाऊल बीरण्णाचे आहे अशी भाविक लोकाची दृढ समजूत असून त्या पावलावर माखलेल्या तेलशेंदरावरून

त्याची पूजाअर्चाही श्रद्धेनें होत असावी असें अनुमान करण्यास जागा होती. भाकणुकीच्या दिवशीं तिसरा प्रहरचे सुमारास यल्लाप्पा धनगर ह्या पावलाशेजारच्या दुसऱ्या एका फरशीवर बसे आणि मग त्याच्या अंगांत संचार होऊन तो भाकीत सांगावयास प्रारंभ करी. बहुतेक भाकीत तो आपल्या अंतःप्रेरणेनेंच सांगत असे. क्वचित् दुसऱ्या कोणी कांहीं विचारलेंच तर त्याचींही उत्तरें तो देई, पण त्याच्या अंगीं दैवत संचरून त्याचें जरूर तेवढें भाकीत सांगितल्यावर पुन्हा व्यक्तिगत भाकिताचे प्रश्न विचारून त्याला त्रास देणें योग्य नाहीं, अशीच बहुतेकांची समजूत असल्यामुळें तशा प्रकारचे प्रश्न त्याला सहसा कोणी विचारीत नसत, आणि इतक्याही उपर कोणी विचारलेंच, तर त्याला मिळालेल्या उत्तराप्रमाणें हटकून गोष्ट घडूनच येईल असा नेम नसे. मात्र यल्लाप्पा धनगर स्वयंप्रेरणेनें जी भाकणूक करी तिचा अगदीं बिनचूक दाखला येतो अशी सर्वत्र ख्याति होती.

आजच्या भाकणुकीला विविध जातींचे व धंद्यांचे लोक एकत्र जमले होते हें वर सांगितलेंच आहे. ह्या लोकांत शेतकऱ्यांचा व व्यापाऱ्याचाच भरणा मोठा होता आणि इतर पांढरपेशे, नोकरचाकर इत्यादिकांचा त्या मानाने बराच कमी होता. चालू सालीं दक्षिण कर्नाटकात कापसाचें पीक चांगलें आलें होतें. तेव्हां त्याची तेजीमंदी कशी राहील हे समजून घेण्याकरितां मुख्यत्वे शेतकरी लोक जमले होते. हैदरावर मराठ्यांची स्वारी सुरू झाल्याची बोलवा ऐकूं येत होती, तेव्हां तिजपासून आपण खरेदी करून ठेवलेल्या मालाला व एकंदर व्यापाराला कितपत धोका आहे, हें ऐकून घेण्याकरितां व्यापारी मंडळी गोळा झाली होती. आणि आपल्या मालमत्तेची व घरादाराची सुरक्षितता कशी काय राहील, देशाचें आरोग्य कसें काय टिकेल, इत्यादि विविध हेतू मनात धरून इतर लोक गोळा झाले होते. स्त्रिया केवळ भाविक श्रद्धेनें जमल्या होत्या. मध्यान्ह होऊन गेल्याबरोबर दूरदूरच्या प्रांतांतील व खेड्यापाड्यांतील बैलगाड्या दौडत येऊन बीरण्णाच्या माळावर सुटूं लागल्या. प्रत्येक गाडी सुटली कीं तिजमधून पाच सात पुरुष व एक दोन बायका उतरत. कांहीं मंडळी घोड्यावरून तर कांही पायी येतांना दिसत होती. होतां होता मध्यान्ह उलटून घटका दोन घटका होऊन जाईपर्यंत सगळा माळ माणसांनीं फुलून गेलेला दिसूं लागला. भाकणुकीची वेळ जवळ येत चालली तसतसें लोकसमूहाचें कुतूहलही वाढूं लागलें आणि सर्वांचे डोळे ‘ भाक्या ’ च्या पाराकडे लागले.

पण अद्याप भाक्याचाच पत्ता नव्हता. तो आज सकाळपासूनच जो एकदा कोठें निघून गेला आहे तो अजून आलाच नाहीं, असा बोभाटा झाला होता. बऱ्याच लोकांनी त्याचा त्याच्या घरीं व आसपासच्या खेड्यांतून शोध केला, पण त्याचा कोठेंच पत्ता लागला नाहीं. तो कधीं कधीं असा निघून जाऊन महिना

महिना गडप होत असे, हें लोकांना ऐकून ठाऊक होतें, पण भाकणुकीच्या दिवशीं तो अशा रीतीनें गेल्याचा दाखला अजून घडला नव्हता. त्यामुळें जमलेल्या समुदायांत एक प्रकारचें चिंतेचें वातावरण पसरलें होतें. तथापि कांहीं लोकांना मात्र तो भाकणुकीच्या ऐन वेळीं आल्यावांचून रहावयाचा नाहीं अशी खात्री वाटत होती व ते इतरांना तसें सांगून धीर देत होते. पुरुषांपेक्षां स्त्रियांना विशेष चुटपुट लागल्याचें त्यांच्या मुद्रांवरून दिसत होतें. होता होतां भाकणुकीची वेळ अगदीं जवळ येऊन ठेपली आणि अजूनही जेव्हां यल्लापा येण्याचें चिन्ह कोठें दिसेना, तेव्हां मात्र लोकांची निराशा होणार असा रंग दिसूं लागला.

पण या लोकसमुदायास असेंच कांहीं वेळ अनिश्चित परिस्थितीच्या वातावरणांत हेलकावे खात ठेवून, आह्मी वाचकांना ह्याच डोंगराच्या उंच जागीं असलेल्या एका गुहेंत घेऊन जात आहोंत. ही गुहा एका तुटलेल्या कड्याखालीं असून अवघड जागी होती, आणि तिजमध्यें वाघाची वसती असते असा बोभाटा होता. गुहेमध्यें जाण्यास एक आडवळणाची व अवघड अशी पाउलवाट होती, पण वर सांगितलेल्या कारणास्तव त्या गुहेंत जाण्याचें धाडस सहसा कोणी करीत नसे. या गुहेंत प्रस्तुत तीन इसम बोलत बसले असून त्यातला एक खुद्द यल्लापा धनगर होता, दुसरा वॉरन हेस्टिंग्स होता आणि तिसरा वाचकाच्या ओळखीचा चिकबाळाप्पा दलाल होता. यल्लाप्पाचा वर्ण काळा कुट्ट असून त्याच्या अंगावर एक लंगोटी आणि एक घोंगडें याखेरीज दुसरें कांहींच प्रावरण दिसत नव्हतें. त्याचें वय सुमारे पंचावन्न वर्षांचें दिसत असून त्याचे केस पिकलेले दिसत होते. त्याचा बांधा मध्यम उंच, सडपातळ व काटक दिसत होता आणि त्याची एकंदर चर्या सात्विक व प्रेमळ दिसत होती.

वॉरन हेस्टिंग्सनें चिकबाळाप्पाला आपल्याकडे फितूर करून घेतल्यावर त्याला पहिला प्रश्न असा पडला की शेतकरी लोकानी आपला माल दलाल लोकांकडे मुळीच न नेता इंग्रेज कंपनीच्या वखारींत विकावयास आणावा, अशाबद्दल काय युक्ती करावी? व्यक्तिशः दक्षिण कर्नाटकातल्या प्रत्येक शेतकऱ्याला भेटून त्याचे मन वळविणे चिकबाळाप्पाला शक्य नव्हतें. तेव्हा आता काय करावें अशा विचारात हेस्टिंग्स पडला असता चिकबाळाप्पाने त्याला कल्पना सुचविली कीं, यल्लाप्पा धनगराने जर आपल्या भाकणुकीत शेतकऱ्यानी आपला कपाशीचा माल इंग्रेजकंपनीकडे विकावयास न्यावा अशा आशयाचे दोन शद्ब उच्चारले, तर त्याचा परिणाम तमाम शेतकऱ्यांवर जादूसारखा होईल, आणि हजारों भीडवशिल्यानी किंवा गाठीभेटींनीं जें काम होणार नाहीं तें यल्लाप्पाच्या तेवढ्या दोन शद्बानी होईल! हेस्टिंग्सला हिंदु लोकाच्या भाविक आणि अंधश्रद्ध स्वभावाची चागली कल्पना

असल्यामुळें त्याला चिकबाळाप्पाची सूचना एकदम पसंत पडली आणि त्यानें यल्लाप्पा धनगराकडे सूत जुळविलें. दोघांची भेट वर सांगितलेल्या गुहेंत होण्याचें ठरलें. त्याप्रमाणें मार्गशीर्ष वद्य चतुर्दशीच्या दिवशीं हेस्टिंग्स चिकबाळाप्पासह मध्यान्हीच्या सुमारास मुक्कास्थानें येऊन या गुहेंत दाखल झाला व तेथे त्याची आणि यल्लाप्पाची गांठ पडली. दोघांचें कानडींत संभाषण सुरू झालें. हेस्टिंग्सला यल्लयाची भाकणूक हें जरी थोताड वाटत होतें, तरी त्यानें आपल्या मतलबावर नजर देऊन यल्लाप्पाच्या भाकणुकीसंबंधी लौकिकाची पुष्कळच स्तुति केली आणि आपल्या मनांतील हेतु त्याला हळू हळू समजाऊन दिला. चिकबाळाप्पानेही त्याची चांगलीच साथ केली. यल्लाप्पाने त्या दोघाचे ह्मणणे शांतपणे ऐकून घेतले व तो बाळाप्पास ह्मणाला, ‘ नाईक, तुमचा हेतु माझ्या ध्यानात आला. पण भाकणुकीच्या वेळी मी जे बोलतो ते शुद्धीत बोलत नाही. बीरण्णा माझ्या अंगात संचार करतो आणि तो जे बोलवील ते मी बोलतो. तेव्हा अमुकच बोलावे हे माझ्या हाती काय आहे बरे? ’

हेटिंग्सला यल्लाप्पाचे ह्मणणे खरे वाटले नाही. तो ह्मणाला, ‘ यल्लाप्पा, बीरदेव तुमच्या अंगात येतो हे मला नाहीं खरे वाटत. बोला तुह्माला काय पाहिजे? शंभर-दोनशे रुपये— ’ असे ह्मणत हेस्टिंग्सने खिशातून रुपये काढले.

‘ आग लावा त्या तुमच्या शंभर अन् दोनशे रुपयाना! ’ यल्लाप्पा उसळून ह्मणाला, ‘ माझ्या बीरण्णाचे वारे तुह्मी खोटे ह्मणता? तुमची जीभ झडून जाईल! ’ बोलतां बोलता यल्लाप्पाचे डोळे आरक्त होऊन त्याचे सर्वांग रागाने कापूं लागले. तो संतापून उठला व बाहेर जाण्यास निघाला.

‘ हे काय यल्लाप्पाअण्णा? ’ चिकबाळाप्पा त्याचा हात धरून त्याला बसवीत ह्मणाला, ‘ अहो, इतके रागावायाला काय झाले? तुमच्या अंगात बीरण्णाचे वारे भरते हे या पाहुण्याना ठाऊक नाही ह्मणून ते तसे ह्मणाले इतकीच गोष्ट, एरवी बीरण्णावर ह्यांची भक्ति नाही असे मात्र समजू नका हो. ’ हे बोलत असता चिकबाळाप्पाने हेस्टिंग्सला इतक्या सफाईने डोळा घातला की भोळया यल्लाप्पाला त्याचा मागमूस सुद्धां लागला नाही! तो एकदम शांत होऊन खाली बसला.

‘ यल्लाप्पा, तुह्मी खरोखरीच रागावलात कीहो? ’ हेस्टिंग्स हंसून ह्मणाला, ‘आह्मां लोकांना देवाचें वारें भरलेलें पाहून ठाऊक नसतें, ह्मणून तुमचें ह्मणणें मला एकदम खरें वाटलें नाहीं इतकेंच. बाकी आमच्या मद्रासकर कंपनीची तुमच्या बीरण्णावर कमी भक्ति आहे असें नाहीं. अहो तुह्माला काय सांगूं, आमचा व्यापार जर मनासारखा जुळला तर आह्मी बीरण्णाचें जुनें पुराणें झालेलें देऊळ पुन्हां बांधणार आहों. ’

यल्लाप्पाची मुद्रा प्रसन्न झाली. त्याच्या डोळ्यांत समाधानाचें पाणी चमकूं लागलें, पण तो कांहीं बोलला नाही. हेस्टिंग्सनें आपलें बोलणें पुढें चालू केलें. तो ह्मणाला, 'यल्लाप्पा, आह्मी जेव्हां प्रथम मद्रासेस वखार घातली, त्याच वेळी तुमच्या बीरण्णाच्या नावाने नारळ फोडला होता. आतां आमचा व्यापार चांगला चालला आहे, मग आह्मी तुमच्या बीरण्णाशीं कसे कृतघ्न होऊं बरें?'

यल्लाप्पाला वाचा फुटली. तो अभिमानाने ह्मणाला, 'आमचा बीर देव आहेच तसा. तो हजारो लोकाच्या नवसाला पावला आहे. तुह्मी त्याच्या देवळात जरा डोकावून बघा, पालख्या काय, घोडे काय, पाळणे काय, कुंच्या काय, एक का दोन? हजारो जिन्नस देवाला देऊन लोकानी आपले नवस फेडलेले तुह्माला दिसतील.'

'तर मग मीही एक नवस बोलतों,' हेस्टिंग्स ह्मणाला, 'कापसाचें गिऱ्हाईक जर थेट आमच्या वखारीकडे येऊन आह्मास माल विकूं लागलें तर आह्मीही बीरण्णाच्या देवळाचा जीर्णोद्धार करूं, तुमच्या भाकणुकीच्या जाग्यावर एक सुंदर छप्पर उतरू —'

'बस बस, गर्दी झाली,' यल्लाप्पा ह्मणाला, 'आणखी कांही नको. ते तुमचे रुपये तुह्मी परत घ्या. मला धनगराला हो रुपये काय करावयाचे? मी देवाला तुमच्याबद्दल भीड घालतो. तो तुमचे काम खात्रीने करील असें समजा. बरे माझी आता भाकणुकीची वेळ झाली. मी आता जातो.' असे ह्मणून यल्लाप्पा उठला.

रोखीच्या भक्तीपेक्षा उधारीच्याच भक्तीला हिंदूंचा देव अधिक पावला हे पाहून हेस्टिंग्स मनातल्या मनात अगदी खुष झाला, पण बाहेर तसे कांही दिसू न देता, तो ह्मणाला, 'यल्लापा, तुमची ही निर्लोभी वृत्ति पाहून बीरदेव तुह्माला पावतो याचे मला आता अगदी आश्चर्य वाटेनासे झाले आहे. बरे आहे, तुह्मी चला, पण देवाला आमच्या तर्फे भीड मात्र अगदी मनापासून घाला बरेना? असें ह्मणून हेस्टिंग्सने रुपये उचलून खिशात घातले आणि थोड्या वेळाने त्रिकधाळाप्पास घेऊन तो गुहेतून बाहेर पडला.

सुमारे एका घटकेने यल्लाप्पा अकस्मात् भाकणुकीच्या पारावर येऊन उभा राहिलेला दिसू लागला. त्याला पाहाताच 'यल्ल्या आला' ही गुणगुण सर्वत्र पसरली आणि सर्वांचे लक्ष्य त्याच्या हालचालीकडे वेधून राहिले. पाराजवळ आणखी दोघे तिघे धनगर उभे होते. त्यापैकीं एकाने एक नारळ उचलून यल्लाप्पाच्या हातीं दिला. यल्लाप्पाने 'जय बीरण्णा' ह्मणून तो पारावर फोडला आणि त्यातले पाणी आपल्या बसावयाच्या फरशीवर उडविले. नंतर दुसऱ्या एका धनगराने कापूर उदबत्ती

त्याच्या हातांत दिली, ती त्यानें फरशीपुढें लावून ठेवली. मग त्यानें देवळाकडे तोंड करून डोळे मिटले व हात जोडले. तो कांहीं वेळ तसाच निश्चल उभा होता. क्षणभरानें मस्तक लववून त्यानें देवास एकवार नमस्कार केला व तो पुढें होऊन भाकणुकीच्या फरशीवर आसनमांडी घालून बसला. पाव घटका सुमारें गेली असेल, इतक्यांत यल्लाप्पानें अंगास आळोखेपिळोखे देण्यास सुरवात केली, आणि तो घुमूं लागला. हळूं हळूं घुमतां घुमतां त्यानें एक अशी किंचाळी फोडली कीं, ती सभोंवार दूरपर्यंत ऐकावयास गेली आणि सर्व लोक खडबडून जाऊन त्यांचे डोळे व कान एकदम यल्लाप्पाकडे खेचले गेले! चोहोंकडचा गोंगाट एकदम थांबून सर्वत्र निस्तब्ध शांतता पसरली.

भाकणुकीस प्रारंभ झाला. भाकणुकीचा मजकूर यल्लाप्पाच्या तोंडून कुणबी कानडींत बाहेर पडत होता, पण वाचकांच्या सोईसाठीं आह्मी त्याचा तसल्याच प्रकारच्या मराठींत तर्जुमा करून देत आहों. यल्लाप्पा – किंवा खरें बोलावयाचें ह्मणजे त्याच्या अंगांत शिरलेलें बीरदेवाचें वारें – बोलूं लागलें,

'ऐकार ऽ बाबानु – आउंदा परजन्न ब्येताचाच हाय – न्हाईच ह्मटलं तरीबी चालऽल – कुनी धानधून इकू नये – सालब्येगमी करून ठ्येवावी – नदीनाल्याना पानी येनार न्हाई – तळींतलाव कोरड ऽ पडत्याल – वडऽवहाळ आटून जात्याल– आडहिरी सुकून जात्याल हो ऽऽऽऽ'.

हें भाकीत ऐकतांच सारा श्रोतृसमुदाय हदरून गेला. या टोंकापासून त्या टोंकापर्यंत अंगाचा थरकाप एखाद्या साथीसारखा पसरत गेला. सर्व जण चिंतातुर होऊन पुढें काय येतें तें ऐकावयास सादर झाले.

'ऐकारऽ दादानु – आउंदा – धान लई महाग होईल – वैरणकडबाबी महाग होईल – समदी पिकं करपून जात्याल – येक ताटबी हाताला येनार न्हाई – धारन चिपटऽमापस्यावर येऊन बसऽल – मानसं पटापट टाचा खुडून मरत्याल – कैक जन गावं सोडून जात्याल – कैक गावाची पांडर वोस पडल होऽऽऽऽ'.

अरे बापरे! कोण प्रळय हा! हे भाकित ऐकताच सर्व लोकाच्या काळजांत चर्र झालें! खरें ह्मटलें तर हें भाकित पहिल्या भाकिताच्या पुरवणीदाखल होतें, व श्रोत्यांनींही मनांतून त्याची कल्पना केली असेल. पण मनात अस्पष्ट असणारी हुरहुर प्रत्यक्ष शब्दचित्राच्या रूपानें नटून पुढे उभी राहिली ह्मणजे तीच अधिक भय उत्पन्न करते असा अनुभव आहे. आतां पुढें काय वाढून ठेवलें आहे, अशी भीती धरूनच श्रोते ऐकूं लागले.

'ऐकारऽ बाबानु – आउंदा – रोगराई इसेस न्हाई – मरीआईचा तुरळक फ्येरा येईल – तापखोकला कुटं कुटं डोकावल – लई मोटी अशी सांत कसलीच

येनार न्हाई – आगी मातुर लई लागत्याल – घरं दारं जळत्याल – गंजावणग्या पेटत्याल – येक येकांची दुस्मानगिरी करत्याल – कुनी कुनाची कनव करनार न्हाई – कलीचा परबाव समदीकडऽ दिसऽल होऽऽऽऽ.'

असो, बेतांत आहे; हें भाकीत कांहीं विशेष भिण्याजोगें नाहीं, असेंच सर्वांना वाटलें. त्यांत सुचविलेला अनर्थ थोड्या खबरदारीनें टाळण्यासारखा आहे, निदान त्यांत प्रयत्नाला जागा आहे असें सर्वांनीं आपल्या मनाशीं ठरविलें. त्यामुळेंच कीं काय, या खेपेस तरी भीतीचे निदर्शक उद्गार श्रोत्यांच्या जमावांत विशेष ऐकूं आले नाहींत.

'ऐकाऽऽ बाबानु –' पुन्हा एकदा भाकणुकीची चळक सुरू झाली, 'आउंदा-लई मोटऽ परचक्कर येनार हाय – गांवंऽ लुटनार हाय – शेतशिवार अक्षी टिपून काडनार हाय – मानसाला मारझोड करनार हाय – मालमिळकत फस्त करनार हाय – गावगावच्या प्येटा वोस पाडनार हाय – शेतकऱ्यांनी आपला माल मद्रासच्या प्येटवर नेऊन इकावा – हतल्या प्येटऽवर न्येला तर लुटला जाईल र बाबानु होऽऽऽऽ'. हे शेवटचे शब्द खूपच मोठ्यानें ओरडून यल्लाप्पाने एक किंचाळी फोडली व तो बेशुद्ध पडला!

भाकणूक संपली हे सर्वांनी ओळखले. श्रोतृसमुदायात एकच हाहाःकार सुरू झाला. यल्लाप्पाने आजपर्यंत पुष्कळ भाकणुकी केल्या होत्या, त्यातल्या कित्येक भीतिदायक होत्या, पण आजच्या इतकी भयंकर, काळजाचें पाणी करणारी भाकणूक त्याने कधीच केली नाही असें पुटपुटत लोक पांगू लागले. यल्लाप्पाच्या भाकितात 'आउदा' हा शब्द जो येत होता तो शके १६९२ च्या चैत्रापासून पुढच्या चैत्रापर्यंतच्या वर्षाचा निदर्शक होता, हे वाचकाच्या लक्ष्यात आलेंच असेल. शके १६९१ हे साल दक्षिण कर्नाटकात चागलेंच पिकसाल झालें होतें, आणि चाल् सालातील परिस्थितीचा उपयोग लोकाना पुढील सालच्या तरतुदीकरिता शक्य तेवढा करितां यावा, हाच ही भाकणूक मार्गशीर्षाच्या अखेरीस होण्याचा हेतु असावा. भाकणुकीचा हेतु साध्य झाला. तिजपासून लोकांनीं घ्यावयाचा तो बोध घेतला. प्रांताप्रांतांतून कापूस पेरून राहिलेल्या शेतकऱ्यांनीं आपला माल दलाल लोकास न विकता मद्रासकर कंपनीच्या वखारींवर नेण्याचा जागच्या जागींच निश्चय केला हें सांगावयास नकोच.

पण वाचकहो, आजच्या हृदयभेदक भाकणुकीने सारा श्रोतृसमुदाय हळहळत असतां, आनंदानें एकमेकांच्या हातावर टाळी देऊन हांसत खिदळत चाललेले हे दोन इसम कोण बरें? अर्थात् ते हेस्टिंग्ज व चिकबाळाप्पा हेच होत. हजारों लोकांच्या दाढ्या पेटल्या असतां त्यांच्या जाळावर आपणांस बिडी पेटवावयास संप-

डली याचाच आनंद मानणारे हरीचे लाल जगात कांहीं थोडे नाहींत. त्यांपैकींच ही एक दुक्कल होती. पण बिचारा यल्लाप्पा! त्याच्या अंगात बीरण्णा खरोखरीच येत होता कीं नाहीं हें आम्हांस निश्चित सांगवत नाहीं, पण तो लुच्चा किंवा ढोंगी नसून कोणत्या तरी मानसिक आकर्षणाचा त्याच्यावर परिणाम होऊन तो वरील भाकणूक बोलून गेला, एवढी मात्र वाचकास आम्ही खात्री देतो. वाचकहो, यल्लाप्पाच्या एका शब्दानें दक्षिण कर्नाटकाच्या कपाशीच्या व्यापाराचीं सूत्रे हेस्टिं-ग्सच्या हातीं जावीं हा योगायोग विपरीत असेल, त्याकरिता आपण यल्लाप्पास तळतळाट घाल; पण ज्या काळात एखाद्या विहिरीत गोमांसाचा तुकडा टाकून व तो दुसऱ्या दिवशीं काढून दाखवून, त्या विहिरीचें पाणी प्यालेला सारा गाव एकदम बाटविणें पोर्तुगीज लोकांना शक्य झाले त्या काळात यल्लाप्पा सारख्या धनगराच्या एका शब्दावर भावनाशील कृषिकसमाजास झुलविणें हेस्टिंग्सला साध्य झाले यात नवल त काय?

---

## प्रकरण १२ वें.

खरे ले. ८५०, } **गवाळ्यांतील चोळी** पौष. शु. १-५१

श्रीमंत पेशवे सरकार कर्नाटकच्या मोहिमेवर निघाले असता त्याचा मुक्काम वांईस पडला होता आणि त्या मुक्कामी नाना फडणिसांनीं त्याचेकडून शतकोटि मृत्यु-जयाचें अनुष्ठान करण्याविषयीं परवानगी मिळविली होती हे वाचकाच्या स्मरणात असेलच. ही गोष्ट कार्तिक शुद्ध नवमीच्या सुमारास घडली. नाना वाईहून पुण्यास आले व त्यांनीं लगेच अनुष्ठानाची तयारी केली. तोंपर्यंत श्रीमंताच्या मातुःश्री गोपिका-बाई गंगापुरास होत्या त्या-त्याकडूनही नानास अनुष्ठानाविषयीं कांहीं सूचना लिहून आल्या. त्यात “ अनुष्ठानाला जे ब्राह्मण लावावयाचे ते शुचिर्भूत व विद्वान् पाहून लावावे, त्याना वाड्याबाहेर सोडूं नये, आणि त्याच्या जपावर सक्त नजर ठेवावी, ” या तीन मुख्य होत्या. पुण्यास त्यावेळी विद्वान् म्हणण्याजोगे अनेक ब्राह्मण होते, त्यातून दहा ब्राह्मण निवडून काढण्याचे काम नानांनीं सदाशिव दीक्षित दाते यांस सांगितलें. सदाशिव दीक्षित, खुद्द नाना फडणिसाच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे ‘ निस्पृह, प्रामाणिक आणि खणखणीत ’ ब्राह्मण होते. ते किती खणखणीत होते याचा मासला वाचकांस पूर्वीं एका प्रकरणात पाहावयास मिळालाच आहे.

नानांची सूचना मिळतांच सदाशिव दीक्षितांनीं पुण्याच्या ब्रह्मवृंदांतून दहा उत्तम ब्राह्मण निवडून काढिले आणि 'अनुष्ठानाचे आचार्य, ब्रह्मा, सदस्य आणि उपद्रष्टे असे जे चार पुरोहित असावे लागतात त्यांचे वर्ण देण्याजोगे ब्राह्मण पुण्यास नाहींत, तरी ते पुण्याबाहेरून आणले पाहिजेत' असें नानास स्पष्ट सांगितलें. नानानी ती गोष्ट कबूल करून बापूभट जोगळेकर, व्यंकट श्रोत्री, बापूभट पाळंदे व उपेंद्र श्रोत्री या चौघा महाराष्ट्रीय विद्वान् ब्राह्मणास वाई, पैठण, पंढरपूर इत्यादि दूरदूरच्या गावाहून मुद्दाम बोलावून आणविलें व पुरोहिताची तरतूद केली. ब्राह्मणाची भरती मनाजोगी होताच अनुष्ठानास प्रारंभ झाला.

अनुष्ठानाचे आचार्यत्व बापूभटजी जोगळेकरास देण्यात आले. त्याचे अग्नि-होत्र असल्यामुळे ते प्रथम आपले गाव सोडून पुण्यास येण्यालाच कबूल होत नव्हते, पण 'राज्याधिपतीच्या प्राणापेक्षा अग्निहोत्राची पर्वा तुम्हाला अधिक वाटते काय?' असा नानांनी त्याना प्रश्न टाकताच ते वेताला आले, आणि त्यानी आपले अग्नि-होत्रच सहकुटुंब पुण्यास आणले. आचार्यत्वाची याप्रमाणे व्यवस्था झाल्यावर व्यंकट श्रोत्री याना ब्रह्मे नियोजित करण्यात आले, सदस्यत्व बापूभट पाळंद्याना देण्यात आले, आणि उपद्रष्ट्याचे काम उपेंद्र श्रोत्री याजकडे सुपूर्त करण्यात आले. या चार ब्राह्मणाच्या पुरोहितत्वाखाली मृत्युंजयाच्या शतकोटि जपाचे अनुष्ठान सुरू व्हावयाचे ठरले. मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेचा दिवस अनुष्ठानाच्या प्रारंभासाठी मुक्रर करण्यात येऊन त्या दिवशी अनुष्ठानाचे दहा ब्राह्मण आणि चौघे पुरोहित याची मधुपर्क पूजा करण्यात आली, आणि श्रीमंत थोरल्या बाजीरावसाहेबाचा जो प्रशस्त दिवाणखाना होता त्यात देवतास्थापन करण्यात येऊन मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेच्या दिवशी सकाळी त्याच दिवाणखान्यात अनुष्ठानाचा आरंभ झाला.

श्रीमंत गोपिकाबाईंनी दिलेल्या इशारतीप्रमाणे नानानी ब्राम्हणाची व्यवस्था ठेवली. अनुष्ठान समाप्त होईपर्यंत त्यांनी वाड्यातून कोणत्याही कारणाने बाहेर पडा-वयाचे नाही, अशी त्याना सक्त ताकीद देण्यात आली. तोपर्यंत त्याची राहण्याची कायम तरतूद वाड्यातच करण्यात आली. ब्राह्मणांनी श्रीमंत नारायणरावसाहेबाच्या थोरल्या देवघरात झोपावे, पहाटेस उठून प्रातर्विधि उरकून पूर्वेकडील जांभळी दर-वाज्याजवळील हौदावर स्नानसंध्या करावी, आणि सूर्योदयाबरोबर जे अनुष्ठानास बसावें तें दहाबारा घटका दिवस येईपर्यंत जप करीत रहावे, अशी योजना करण्यात आली होती. ब्राह्मणाना जपाकरिता रुद्राक्षाच्या माळा देण्यात आल्या होत्या व त्याच्या जपावर देखरेख ठेवण्याकरितां रामशास्त्री प्रभुणे, धोंडजोशी श्रीवर्धनकर, सदाशिव दीक्षित दाते, महादेवशास्त्री गाडगीळ, काशीनाथशास्त्री गोरे, भीक जोशी पंचनदीकर आणि अनुष्ठानाचे चारी पुरोहित इतकी मंडळी डोळ्यांत तेल घालून

अंतरा अंतरावर बसत असत. ह्मणजे जप करणाऱ्या एकेक ब्राह्मणागणीक देखरेख करणारा एकेक ब्राह्मण ठेवला गेला होता! इतक्या खबरदारीनें जें अनुष्ठान सुरू झालें त्यांत व्यंग कोठून राहणार? प्रत्येक ब्राह्मणानें दररोज एक हजार जप करावा अशी मर्यादा घालून देण्यांत आली होती. दरम्यान् शिंक, जांभई किंवा खोकला आला, तर त्या वेळांत माळेचा रुद्राक्ष ओढावयाचा नाहीं, अशी या ब्राम्हणांना सक्त ताकीद मिळाली होती. या सर्वंच ब्राम्हणांचें उच्चार-कौशल्य सारखेंच नसल्यामुळें एखाद्या ब्राम्हणाला आपली जपसंख्या पुरी करण्याला घटका दोन घटका अधिक लागत. साधारणतः मध्यान्हींच्या सुमारास सर्व ब्राम्हणाची सहस्र संख्या पुरी होई. नंतर त्यांचें भोजन होत असे. भोजनास दररोज एक पक्वान्न व खीर असा बेत असे. भोजनोत्तर ब्राम्हण मंडळी थोडावेळ वामकुक्षी करीत. संध्याकाळी सर्वजण हौदावर संध्या करीत आणि रात्रौ भोजन झाल्यावर सर्व ब्राम्हण श्रीमंत नारायणराव पेशव्यांच्या थोरल्या देवघरांत झोंपत. अनुष्ठानाच्या आरंभापासून हा कार्यक्रम कायम झाल्यासारखा होऊन ब्राम्हणाच्या इतका अंगवळणी पडला कीं आठ पंधरा दिवसांत त्यांचें काम यंत्राप्रमाणें चालूं लागून त्याच्यावर देखरेख करणाऱ्या आश्रितांनीं त्यांना कसलीही इशारत देण्याची गरज उरली नाहीं.

जप करणाऱ्या दहा ब्राह्मणांस लावण्यांत आलेली ही शिस्त त्याच्यावर देखरेख करणाऱ्या दहा सरकारी आश्रितांनाही लागू करण्यात आली होती. त्याना देखील वाड्यांतच रहावें लागे, जेवणखाण वाड्यातच करावें लागे, आणि झोंपही पण वाड्यांतच घ्यावी लागे. नाहीं ह्मणावयास सदाशिव दीक्षित दाते आणि अनुष्ठानाचे आचार्य बापूभटजी जोगळेकर या दोघांचें अग्निहोत्र असल्यामुळें त्याना मात्र सकाळ संध्याकाळ आपल्या बिऱ्हाडीं जाऊन अग्नीला होम देऊन येण्याची परवानगी देण्यांत आली होती. अनुष्ठान सुरू झाल्यापासून नानाचें वास्तव्य जवळ जवळ अष्टौ प्रहर वाड्यांतच होतें ह्मटलें तरी चालेल. ते स्वतः प्रत्यहीं लवकर स्नानसंध्यादि करून वाड्यांत येत, जपाच्या वेळीं हजर रहात, पुढें भोजनाच्या वेळी ब्राह्मणांचा समाचार स्वतः घेत, आणि तिसरे प्रहरी फडात बसून कचेरीचें काम पहात. अशा रीतीनें अनुष्ठानाचा बंदोबस्त हरएक बाबतींत उत्कृष्ट ठेवण्यात आला असल्यामुळें अनुष्ठान निर्विघ्न चाललें. प्रत्येक ब्राह्मणाचा हजार, याप्रमाण दहा ब्राह्मणांचा दहा हजर जप दररोज पुरा होऊं लागून शतकोटीच्या उद्दिष्ट संख्येत हळूं हळूं भर पडत चालली. होता होतां मार्गशीर्ष वद्य अमावास्येला तीन लक्ष जपसंख्या पुरी होऊन, अनुष्ठान असेंच व्यवस्थित चालल्यास सर्व संख्या भरून, अनुष्ठान सिद्धीस जाईल अशी नाना फडणिसाना उमेद वाटूं लागली. महादेवाचे कोणतेंही आराधन सद्यःफलदायक खरें, पण त्यात लवमात्र खंड पडलेला त्या खडतर

दैवतास खपत नाहीं, अशी इतरांप्रमाणेंच भानांचीही बळकट समजूत असल्यामुळें त्यांनीं अनुष्ठानाला इतकी चोख शिस्त लावून दिली होती हें वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल.

आज पौष शुद्ध प्रतिपदा असून सकाळीं सुमारें नऊ घटका दिवस आला होता. नित्याप्रमाणें थोरल्या बाजीरावसाहेबांच्या दिवाणखान्यांत ब्राह्मणांचा जप सुरू झाला होता. या वेळीं सदाशिव दीक्षित दात्यांची स्वारी घराकडे होम देण्यासाठीं ह्मणून गेली होती, ती लगबगीनें दिल्ली दरवाज्यांतून वाड्यांत शिरली आणि उजवीकडच्या वाटेनें जांभळी दरवाज्याजवळील हौदाकडे जाण्यास वळली. त्यांच्या काखेंत एक गवाळें असून, त्यांची मुद्रा अगदीं चवताळल्यासारखी दिसत होती, आणि खरें ह्मटलें तर त्यांना रागावण्याजोगें बलवत्तर कारणही घडलें होतें. ते होम देऊन घरातून बाहेर पडले आणि वाटेस लागले, तोंच त्यांचा पाय एका चिंधीवर पडला होता, आणि त्याच वेळीं त्याच वाटेने वाड्यांत येण्यास निघालेल्या कान्होबा शतघ्न्याना सदाशिव दीक्षितानी ' कान्ह्या, ही चिंधी कोणाची असावी रे ? ' असा प्रश्न केला असतां, कान्होबांनीं आलेल्या संधीचा फायदा घेऊन ' काका, आताच तो महार सडक लोटीत गेला, त्याच्या मुंडाशांतून ती चिंधी खालीं पडली ' असे उत्तर दिलें होतें! कान्होबाची लीला सफल झाली. सदाशिव दीक्षितांच्या अंगाचा भडका उडाला. ते त्या महाराला लक्षावधि शिव्या देतच वाड्यात आले आणि तडक हौदाकडे वळले. आपणाबरोबर आपले गवाळेंही विटाळलें असल्यामुळें सदाशिव दीक्षितांना आता गवाळ्यासकट सचैल स्नान करण्यावाचून गत्यंतरच उरलें नव्हते. हौदावर येताच त्यानी गवाळे घेऊन हौदांत बुडी मारली, आणि ते गवाळ्यांतील धाबळी, पंचा वगैरे जिन्नस भिजवूं लागले. इतक्यात आमचे कान्होबाही वाड्यात आले आणि हौदाजवळून श्रीमंत दादासाहेब रहात असलेल्या ' लाल ' चौकाकडे जावयास निघाले. सदाशिव दीक्षिताचा आपण खासा सूड घेतला, असे मनात येऊन वाटणारे समाधान त्याच्या चर्येवर स्पष्ट दिसत होतें. कान्होबाच्या मनात सदाशिव दीक्षिताना आणखी काही तरी बोलून अधिकच चिडवावें असें आलें होते, पण दीक्षित या वेळी आपल्या देहाची आणि गवाळ्याची शुद्धि करण्यांत अगदीं गर्क असल्यामुळे आणि कान्होबांनाही लाल चौकात जावयाची गडबड असल्यामुळें त्यानीं आपला बेत तहकूब केला व ते तसेच पुढें होऊन चौकांत शिरले.

पण कान्होबा आज वाड्यांत कां आले होते, हें प्रथम वाचकांस कळविलें पाहिजे. श्रीमंत दादासाहेबांची लाल चौकांत प्रतिष्ठापना झाल्यानंतर त्यांच्या नाटकशाळांना शनिवार वाड्यांतील दक्षिण बाजूच्या बगीचानजीक तटाला लागून अस-

लेल्या खोल्या रहावयास देण्यांत आल्या होत्या. या नाटकशाळांना शनिवार वाड्यांत रहावयास आल्यापासून नाना फडणिसांची कदर फार जाचक होऊं लागली होती. विशेषतः खोटे रुसवे करून दादासाहेबांकडून जिन्नसपानस उपटण्याची संधी त्यांना अगदीं मिळेनाशी झाली होती. कारण खुद्द दादासाहेबांचाच खर्च जेथें सरकारी खासगींतून नियमित होऊन चालू झाला, तेथें त्यांच्या हातीं अशा रीतीनें उधळावयास नक्त पैसा येणेंच शक्य राहिले नाहीं. अशा स्थितींत दादासाहेबांच्या नाटकशाळा त्यांच्या बरोबरच्या निर्धन बंदिवासाला अगदीं कंटाळल्या असल्यास नवल नाहीं. दादासाहेबांपासून तूर्त तरी नुसत्या अन्नवस्त्राखेरीज दुसरें कांहीं मिळणें शक्य नाही अशी त्यांची खात्री झाली व त्या फार रंजीस झाल्या. त्यांच्या पैकीं उमेदी व रत्ना या दोघींनीं तर कांहीं तरी निमित्त काढून या बंदिवासातून आपली सुटका करून घेण्याचा बेत केला, पण वाड्यातून कोणत्याही कारणानें बाहेर पडावयास त्यांना नाना फडणिसांची बंदी असल्यामुळें, त्यानीं गेल्या आठ दिवसांत आजाऱ्याचें सोंग घेतलें. हेतू असा कीं वैद्यानेंच परस्पर "यांना हवा पालट करण्याकरितां चार दिवस बाहेर गांवीं ठेवावें" अशी नाना फडणिसांना सल्ला द्यावी आणि मग आपली आयतीच सुटका व्हावी! प्रथम प्रथम एक दोन दिवस त्याचें दुखणें पडशा खोकल्यावारीं गेलें, पण तिसऱ्या दिवशीं त्यांची प्रकृति फारच बिघडली असें कळतांच दादासाहेबांनीं कान्होबांना बोलावणें पाठाविलें आणि त्यांच्याकरवीं त्या दोघींची प्रकृति तपासून घेतली. कान्होबांनीं त्याचें प्रकृतिमान पाहून त्याचें निदान केलें व त्यांना औषध देण्यास प्रारंभ केला. पण उमेदी काय, किंवा रत्ना काय, दोघींनाही कान्होबाचें औषध नको असून, त्यांच्याकडून हवा पालट करण्यासाठीं आपणांस बाहेर पाठविण्याचा सल्ला नाना फडणिसांना देववावयास पाहिजे होता. त्यांनीं कान्होबांजवळ हळूंच तशी गोष्ट काढली. पण असले महत्वाचे दोन रोगी आपल्या औषधानें बरे झाले असें यश मिळविण्याची संधी कान्होबांना आयती मिळाली असल्यामुळें कान्होबा नाटकशाळांचें म्हणणें मुळींच कबूल करीनात. "असले दुर्धर व्याधी जर हवापालटानें बरे होऊं लागले तर आमच्यासारख्या वैद्यांचें जगांत प्रयोजनच उरणार नाहीं," असें म्हणून त्यांनीं त्या दोघींना धुडकावून लावलें! नाटकशाळांची निराशा झाली, व मग मात्र त्याची प्रकृति झपाट्यानें सुधरूं लागली. मार्गशीर्ष वद्य अमावास्येच्या दिवशीं तर कान्होबांनी त्यांची प्रकृति चांगली सुधारली असल्याचें श्रीमंत दादासाहेबांजवळ जाहीर केलें आणि त्यांच्याकडून धन्यवाद मिळाविले! आतां फक्त अशक्ततेवर चार दिवस औषध दिल्यानें काम भागणार आहे अशी दादासाहेबांची खात्री झाली, तथापि बाब नाटकशाळांची असल्यानें त्यांनीं कान्होबांस रोज एकदा येऊन त्यांची प्रकृति पाहून जाण्याचा क्रम

ठेवण्याबद्दल सूचना दिली. कान्होबांना हा अधिकच मोठेपणा वाटला व त्यांनीं दादासाहेबांची सूचना आस्थेनें अमलांत आणण्याचें ठरविलें. अर्थात् कान्होबा आज सकाळीं जे वाड्यांत आले होते, ते उमेदीची व रत्नाची प्रकृति पहावयास आले होते, हें आतां वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल.

वर सांगितल्याप्रमाणें सदाशिव दीक्षितांचें स्नान चाललें असतां कान्होबा वाड्यांत आले, ते नीट उमेदीच्या खोलीत गेले. तेथें तिची प्रकृति पाहून आणि वाग्भटांतील निरोगी स्थितीचे दर्शक एक दोन श्लोक ह्मणून त्यांनीं त्या श्लोकांत सांगितलेलीं लक्षणें तिच्या लक्षणांशीं पटवून दिलीं, आणि ते तेथून बाहेर पडण्यासाठीं ह्मणून खोलीच्या दाराशी आले. तोंच दारातून त्यांना पुढील देखावा दिसला. समोरच हादावर सदाशिव दीक्षितानी आपलें गवाळें ओलेंच गुंडाळून हौदाच्या कांठावर ठेवल आहे, आणि ते स्वतः उत्तराभिमुख उभे राहून ओलेत्यानें कसला तरी जप करीत आहेत. ह्या सहज आलेल्या संधीचा उपयोग करून दीक्षितांची काहीं तरी टवाळी करण्याचा अनिवार मोह कान्होबांना झाला. त्यांनीं इकडे तिकडे पाहिले तों दाराजवळच एका खुंटीवर त्याना एक कशिद्याची चोळी दिसली. त्यानीं ती चटकन् उचलून घेतली आणि तिचा बोळा करून मुठीत धरला. नंतर ते पावले न वाजविता हौदाजवळ आले आणि सदाशिव दीक्षितांचें गवाळें हळूंच उलगडून त्यानीं तो चोळीचा बोळा सदाशिव दीक्षितांच्या आंत असलेल्या पंचावर अर्धवट पसरून ठेवला आणि पुन्हा गवाळे गुंडाळून होते तसें ठेऊन ते परत फिरले. वाड्याच्या ह्या बाजूस रहदारी विशेष नव्हती आणि कान्होबानी हा प्रयोग केला त्यावेळी तर जाभळी दरवाजावरच्या पहारेकऱ्यावांचून दुसरें कोणीच आसपास नव्हते. कान्होबाचें कृत्य पहारेवाल्यांना दिसत होतें, पण कान्होबांनीं त्यांना खूण केल्यामुळे असो, किंवा त्यानाही ही फाजील सोवळ्या ब्राह्मणाची मस्करी मनापासून आवडल्यामुळें असो, ते चूप राहिले. कान्होबा परत फिरले ते रत्ना नाटकशाळेची प्रकृति पाहण्याकरिता तिच्या खोलीत निघून गेले. थोड्याच वेळांत सदाशिव दीक्षितांचा जप पुरा झाला व ते हौदातून बाहेर आले, आणि झालेला विटाळ निस्तरण्याच्या भानगडींत आपणास फारच उशीर झाला असें पाहून लगबगीनें गवाळें खाकेंत मारून हिरकणी चौकांत शिरले.

इतका प्रकार होईपर्यंत अकरा घटका दिवस येऊन गेला होता. थोरल्या रावसाहेबांच्या दिवाणखान्यात ब्राह्मणांचा दैनिक जप पुरा होत आला होता. सदाशिव दीक्षित होम देण्यासाठीं ह्मणून जे गेले, त्यांचा अजून पत्ता नाहीं, ह्मणून रामशास्त्री व नाना फडणीस आश्चर्य करीत होते इतक्यांत सदाशिव दीक्षितांची स्वारी घाईघाईनें ओलेतीच आंत आलेली त्याना दिसली. त्यांना दारांत पाहतांच नाना ह्मणाले,

" दीक्षित किती उशीर हा ! आणि पुन्हा स्नानसें केलेलें दिसतें ! "

" तें कांही विचारूं नका नाना !" सदाशिव दीक्षित त्रासिक स्वरानें ह्मणाले, " दिवसानुदिवस काल विपरीत आला हेंच खरें. रस्त्यांतून लोटत जाणाऱ्या महारांना रस्त्यांतल्या चिंध्या सुद्धा उचलण्याचा कंटाळा येऊं लागला, तेव्हां आतां ब्राह्मण्याचीच ग्रहदशा फिरली असें ह्मटलें पाहिजे ! "

सदाशिव दीक्षितांचा पाय रस्त्यांतल्या एखाद्या चिंधीवर पडला आणि त्यांना पुन्हा स्नान करण्याचा प्रसंग आला हें नानांनी ओळखलें आणि ते त्यांचें सांत्वन करीत म्हणाले, ' अरेरे, दीक्षित, तुमचा पाय चिंधीवर पडून तुह्मांला पुनश्च स्नानाचा प्रसंग आला अं ? ठीक आहे, आज मी जनार्दन हरी कोतवालाकडून महाराना सक्त ताकीद देववितों. '

नानांच्या आश्वासनानें सदाशिव दीक्षिताचें समाधान झालेंसे दिसलें नाही. ते अजून चडफडतच होते. त्यांनीं हातांतलें गवाळें पाटावर ठेवलें आणि दांडीवर असलेलें आपलें धोतर घेऊन नेसण्यास प्रारंभ केला. धोतर नेसून झाल्यावर त्यांनीं आपला सोडलेला पंचा गवाळयांत गुंडाळून ठेवण्यासाठीं गवाळें उचललें, पण तें काम दूर उभें राहून करण्याऐवजीं जपास बसलेल्या ब्राह्मणाच्या शेजारीं येऊनच करावें ह्मणून ते अमळ पुढें आले आणि त्यांनी आपलें गवाळें हातांतल्या हातांतच उलगडलें. त्यांनीं गवाळयाचे वेढे ढिले केले मात्र, तोंच पंचाच्या घडीवर असलेली चोळी पटकन् गवाळयांतून निसटून खालीं पडली आणि तिचा पडतांना झालेला आवाज सर्वांच्या कानावर गेला. दीक्षिताच्या गवाळयातून खाली पडलेला जिन्नस एखादा पंचाबिंचा असला पाहिजे अशा समजुतीनें शेजारी बसलेल्या भीक जोशी पंचनदीकरांनीं न वळून पाहतांच आपला हात लांबविला व तो पडलेला जिन्नस उचलून दीक्षिताना देण्यासाठीं वर केला. पण तो नजरेपुढें येताच एखादा विंचू असल्याप्रमाणे त्यानी एकदम दूर फेकला आणि ते ओरडले, ' अहो ही चोळी आहे ! '

धर्मास पञ्चनदीकर भीकजोशाच्या हातातून फेकली गेलेली चोळी सर्व ब्राह्मणाच्या मध्यें अचानक जाऊन पडली ह्मणून बरें, नाहींतर जपाच्या ब्राह्मणापैकीं एखाद्यास विटाळ होऊन ऐन अनुष्ठानातच विघ्न आलें असते ! सुदैवानें हा प्रसंग टळला आणि एकट्या भीकजोशानाच विटाळ होऊन वेळ निभावली. भीकजोशी हे जपावर देखरेख करणाऱ्यापैकीं एक असल्यामुळें त्यानीं स्नान केल्याने काम भागणार होतें. आपणावर अकल्पित येऊन पडलेली जबाबदारी ओळखून भीकजोशी तर चडफडत उठलेच, पण नाना फडणिसानाही इतक्यांतच कोणाचा तरी निकडीचा निरोप आल्यावरून ते खालीं गेले, ह्मणून हा विटाळाचा बोभाटा यांच्या

कानावर गेला नाहीं. तथापि नाना गेले, तरी रामशास्त्री वगैरे मंडळी तेथे होतीचि. त्यांच्या कानावर भीक जोशांचे शब्द जातांच त्यांचें लक्ष्य एकदम त्या मध्यें पडलेल्या चोळीकडे गेलें. त्यांनीं पाहिलें तों ती खरोखरीच चोळी होती, आणि ती देखील एखाद्या कुलस्त्रीची नसून उघड उघड नाटकशाळेची दिसत होती ! 'हें हों काय सदाशिव दीक्षित ? हें काय कुलंगडें आणलेंत ?' अशा आशयाची मुद्रा करून जो तो दीक्षितांकडे टकमक पाहूं लागला ! जपाचे ब्राह्मणही हातांतील जप तहकूब ठेऊन व आ वासून सदाशिव दीक्षितांकडे एकसमयावच्छेदेंकरून नजर रोखते झाले !

सदाशिव दीक्षितांनीं ती चोळी पाहिली, आणि त्यांना आपल्या विटंबनेची एकदम कल्पना येऊन तिरीमिरी आली. त्याचा चेहरा गोरामोरा झाला, त्यांच्या मेंदूंत ढवळल्यासारखें झालें, आणि ते मटकन् खालीं बसले ! कोणा तरी पाजी मनुष्यानें आपली ही कुटाळकी केली आहे हें त्यांच्या लक्ष्यांत आलें, पण प्रेक्षक मंडळी आपणास मनात काय ह्मणत असतील, हें मनात येऊन त्या ब्राह्मणाच्या काळजाचा थरकांप झाला. आपली अशी अतिप्रासंगिक चेष्टा करणाराचा त्यांना मनस्वी राग आला आणि तो त्याच्या पोटात मावेनासा होऊन त्याच्या जिभेचा तुफान पट्टा सुटला, 'अरेरे, कोणा अधम दुरात्म्यानें ही चोळी माझ्या गवाळ्यांत घातली असेल त्याचा निःपात होवो ! त्याच्या हातांत कोड भरो, त्याची जीभ झडून जावो ! हरहर नारायणा, काय हा प्रसंग ?' बोलतां बोलतां मस्करीच्या रूपानें का होईना, पण नाटकशाळेच्या चोळीचा संसर्ग आपल्या गवाळ्यास झाला आणि आपण पतितप्राय झालों, ही कल्पना त्या भोळ्या कर्मठाला इतकी झोंबली कीं त्याच्या मानसिक यातना अनावर होऊन त्याचा कंठ दाटून आला आणि कपाळावर हात मारून घेऊन तो सत्वशील ह्मातारा ढळढळा रडूं लागला !

पण सदाशिव दीक्षिताची ही भीति अस्थानीं होती. त्याचें कडक वैराग्य, शुद्ध आचरण, असामान्य विद्वत्ता, आणि उतार वय इतक्या गोष्टी त्यांच्या निष्पाप-पणाची हमी भरावयास सज्ज असल्यामुळे त्याच्याबद्दल कोणालाच शंका आली नाही. उलट कोणी तरी त्याची ही घाणेरडी टवाळकी केली आहे हे पाहून सर्वांनाच त्याची कींव आली. रामशास्त्री वगैरे मंडळी त्याचें सांत्वन करूं लागली. पण सदाशिव दीक्षिताचे समाधान कशानेंही होईना. ते रडत रडत ह्मणाले, 'नाहीहो रामशास्त्री, या सद्या दीक्षितानें स्वपत्नीवांचून जगांतील सर्व स्त्रिया मातेसमान मानल्या आहेत हो ! परस्त्रीचा जर या देहाने पापाबुद्धिपूर्वक स्पर्श केला असेल तर आतांच्या आतां त्याला महारोग होवो ! ह्या दात्याचे बेचाळीस पूर्वज नरकाला जावोत ! तो प्रळयकाळपर्यंत कुंभीपाकांत कुचंबत पडो ! कोणा दुष्टानें माझ्यावर हें कुभांड घातलें असेल त्याचे तळपट होईल, कधी राहणार नाहीं,' असें मोठ्यानें

ओरडून-सदाशिव दीक्षितांनीं करकरा हात चोळले !

आतां या भोळ्या ब्राह्मणाची कशी समजूत घालावी हेंच कोणाला समजेना. रामशास्त्र्यादिकांनीं त्यांचीं परोपरीनें आर्जवें केलीं, ही चेष्टा आहे तिला इतकें काय चिडावयाचें, इत्यादि सांगून पुष्कळ बोध केला, तुमच्याबद्दल कोणाच्याही मनांत कांक्षा आली नाहीं व येणें शक्य नाहीं असें आणा शपथा वाहून सांगितलें, पण रामाचें नांव! सदाशिव दीक्षित कांहीं केल्या ऐकेनात. 'आपण आतां हें काळें तोंड लोकांना दाखविणार नाहीं. प्रायोपवेशन करून जीव देणार!' असें ह्मणून ते कपाळ बडवून घेऊं लागले. अनुष्ठानांत हें काय विघ्न उपस्थित झालें, ह्मणून सर्व मंडळी घाबरली. इतक्यांत नाना फडणीस खालीं गेले होते, ते जिन्याच्या दारानें हसत हसतच आंत आले, आणि त्यांनीं सदाशिव दीक्षिताना हाक मारली. नानांस पाहून व त्यांची हाक ऐकून सदाशिव दीक्षितांनी हंबरडा फोडला, व 'नाना माझें तोंड काळें झालें हो! कोणी दुष्टानें माझा घात केला हो!' असें ओरडतच ते त्यांच्याजवळ गेले. नानांनीं त्यांस शांत रहावयास सागून एकीकडे नेलें व त्यांच्या कानांत कांहीं मजकूर सांगितला. त्याबरोबर सदाशिव दीक्षिताचें दुःख एका क्षणांत मावळलें आणि 'अरे कारट्या! केव्हां रे शिंच्या हा उद्योग केलास?' असें कांहीं तरी शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडले. पण त्या शब्दातील शिव्यात द्वेषमूलक कोप नसून प्रेममूलक वात्सल्य आहे हें सर्वांच्या चटकन् ध्यानात आलें. नानांनीं आणखी थोडा वेळ दीक्षितांच्या कानाशीं लागून त्याना काही सागितलें. तें काय असावें हें वाचकाना तर्कानें देखील ओळखता येईल, कारण त्या दिवसापासून सदाशिव दीक्षितानी कान्होबांना उद्देशून अपशब्द उच्चारलेला कोणीही ऐकिला नाहीं !

---

## प्रकरण १३ वें.

### सक्तीची याचना. [पौ. शु. १.

त्याच ह्मणजे पौष शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं आणि साधारणपणें त्याचवेळीं सावनूरकर नबाबाच्या राजवाड्यांत मोठी गडबड उडून राहिली होती. सावनूरकर नबाब अबदुलमजीदखान, त्याचा दिवाण खंडेराव, आणि दरबारचे इतर मानकरी अशी तमाम मंडळी सरकारी वाड्यांत जमली असून, सर्वांच्या मुद्रा चिंताक्रांत दिसत होत्या. आणि ह्या सर्व मंडळींना चिंता उत्पन्न होण्याजोगें तसें बलवत्तर

कारणही झालें होतें. नुकतीच गोपाळराव पटवर्धनाकडून सावनूरकरांना एक चिटी सांडणीस्वारानें आणून दिली असून तिजमध्यें पुढील मजकूर होता. ‘आज मुळगुंदाहून आमचा तळ उठवून आह्मी गलगनाथास जात आहोंत. सायंकाळचे सुमारास सावनूरचे पायथ्यास मुक्काम करून उदईक पुढें रवाना होऊं. रात्रौ आमची भेट घेऊन आह्मांस ऐशीं हजार होन नजर करणें. चुकल्यास गांव लुटून घ्यावे लागतील, मग आह्मांकडे बोल नाहीं, जाणिजे.’ हा विलक्षण निरोप ऐकून सावनूरकरांची काय अवस्था झाली असेल याचा वाचकांनींच विचार करावा. नबाब इतका घाबरला कीं, त्यानें आपला दिवाण खंडेराव, पटवर्धनांचा सावनूर येथें राहणारा कारकून राजो तिमाजी आणि आपले कांहीं प्रमुख मानकरी यांस ताबडतोब बोलावून आणविलें आणि गोपाळराव पटवर्धनाच्या निरोपाची काय व्यवस्था करावी, याचा विचार चालविला.

हा खल नबाबाच्या राजवाड्यांतील घुसळखान्यांत अगदीं खासगी रीतीनें चालला होता. नबाबाने पटवर्धनाच्या चिटीतील मजकूर सर्वांना समजावून दिला, आणि पुढें काय करावें याबद्दल त्याचें मत विचारलें. निरोप ऐकून सर्व लोक अगदीं थक्क होऊन गेले. त्यांना या निरोपाचा अर्थच समजेना. परवा परवापर्यंत आपणास स्नेहभावाचीं पत्रें लिहिणारा, हैदरअल्लीपासून आपलें रक्षण करण्यासाठीं ह्मणून सावनूरच्या शेजारीं येऊन तळ देऊन राहिलेला, आणि आपल्या मदतीच्या आधारावर हैदरला खंडणी देऊं नका असें आपणास सक्तीनें बजावणारा आपला मित्र गोपाळराव आज एकाएकी आपणावर उलटून ऐशीं हजार होन मागतो याचा अर्थ काय? हे होन कशाबद्दल द्यावयाचे? पेशवे सरकारांची खंडणी ह्मणून असतील, तर चालू सालची खंडणी आपण दोन महिन्यांपूर्वींच दिली आहे. तर मग काय उसनवार ह्मणून द्यावयाचे? पण चिटीतल्या मजकुराच्या झोकावरून ते उसनवार मागितलेले दिसत नाहींत. अमुक वेळेच्या आंत अमुक रक्कम नजर करा, नाहींतर तुमचे गाव लुटतों, ही भाषा याचनेची नसून जरबेची होती. तर मग काय, पटवर्धन आपणापासून लूट उकळूं पाहतात असे समजावयाचें कीं काय? मराठे लष्कराची लुटालूट करण्याविषयीं पूर्वीपासूनच प्रसिद्धी आहे, पण ती शत्रूंच्या हद्दींत करण्याविषयीं आहे; मित्रांच्या हद्दींत नव्हे. गोपाळराव पटवर्धन तूर्त फौजेच्या खर्चाच्या पेंचानें फार जिकिरीस आला आहे, हें सावनूरकरांना ऐकून ठाऊक होतें, पण तो कितीही जिकिरींत असला तरी त्याचा लोकाला काय उपकार? त्यानें आपल्या धन्याकडून खर्चास मागून घ्यावे, किंवा दुसरी काय पाहिजे ती तजवीज करावी, अशा प्रकारची विचारसरणी जमलेल्या मंडळींच्या बोलण्यांतून दिसून आली.

खुद्द राजो तिमाजीला आपल्या यजमानांच्या कृत्याचें मुळींच समर्थन करितां येईना. त्यानें पुष्कळ विचार केला, पण गोपाळरावांकडून सावनूरकरांना इतक्या निर्वाणींचा निरोप एकाएकीं कसा आला, याचें कोडें त्याला उलगडेना. त्याला गोपाळरावांचा स्वभाव जो ठाऊक होता, त्यावरून एखाद्या लुटारूस शोभणारें असलें निंद्य वर्तन करावयास ते तयार होतील, असें मानावयास त्याचें मन घेईना. येऊन जाऊन सावनूरकरांनीं खंडेरावाला हैदराचे भेटीस पाठविला, एवढ्या एकाच गोष्टीकरितां गोपाळरावानें सावनूरकरांना हा दंड लावला असावा, ही एकच कल्पना संभवनीय होती; पण तीही चांगलीशी टिकेना. कारण सावनूरकरांनी आपलें संकट गोपाळरावास समजावून देऊन त्याच्या परवानगीनेंच खंडेरावास हैदराकडे पाठविलें होतें. शिवाय गोपाळरावाचा मुख्य मुद्दा काय, तर सावनूरकरांनीं हैदरास खंडणी देऊं नये, ती सावनूरकरांनीं दिली नाही अशी राजो तिमाजीची पूर्ण खात्री होती. आणि ह्मणूनच त्याला आपल्या यजमानांच्या वागणुकीची मीमांसा करिता येईनाशी होऊन 'आश्चर्य आहे, त्यांनीं असा निरोप कसा पाठविला समजत नाहीं,' इतकें ह्मणून तो गप्प राहिला. सावनूरकरांच्या पदरच्या मानकऱ्यानी तर त्याना स्पष्टच सल्ला दिला कीं, 'वखत आला तर किल्ला झुंजवावा, पण असे उगीचच्या उगीच ऐशी हजार होन देऊ नयेत.' त्यांचें ह्मणणें असें पडलें की, आपण जर असे पेशव्याच्या प्रत्येक येणाऱ्या जाणाऱ्या उपटसुंभ सरदाराला हजाराहजारानीं होन देऊं लागलों, तर किरकोळ पुंडपाळेगारांवरही उद्यां आपली जरब राहणार नाही, ते मुद्धा आपणास शिरजोर होऊन बसतील, आणि इतउत्तर राज्य चालविणेंच अशक्य होऊन जाईल.

पण काय असेल तें असो, गोपाळरावाचा वरील निरोप पराकाष्ठेचा उद्धट, अन्यायाचा आणि निंद्य आहे, हें उघड दिसत असूनही, नबाब अबदुलमजीद खान आणि त्याचा दिवाण खंडेराव याना उघडपणें तसें ह्मणण्याचें धारिष्ट होईना! कां बरें? त्यांचें मन त्यांना खात होतें, ह्मणून का? हो, असेंच ह्मटलें पाहिजे. कारण, आपण हैदरास खंडणी देणार नाहीं असे जरी त्यानी गोपाळरावास कळविलें होतें, तरी ती चोरून दिलीच होती, आणि ती कशी शिताफीने दिली होती हें वाचकांस ठाऊक झालेंच आहे. अर्थात् हें आपलें गुपित जर गोपाळरावास कळलें असलें, तर त्यानें आपणास शिक्षा ह्मणून ही ऐशीं हजार होनांची मागणी केली असण्याचा संभव आहे, आणि तशा स्थितींत त्याला दोष द्यावयासही आपणांस जागा नाहीं, असें त्यांचें अपराधी मन त्यांना वरचेवर सांगत होतें, आणि ह्मणूनच कीं काय, त्यांच्या तोंडाला आपोआप खीळ पडली होती. त्यांतच आपलें बिंग गोपाळरावाला खरोखरीच समजलें असेल कीं नाहीं, हें निश्चितपणें अजमावण्याजोगें साधन त्यांना मिळेना, आणि ह्मणूनच त्यांची मानसिक कुचंबणा त्यांना शतपट

तीव्रतेनें जाणवत होती. मुमताज कलावंतिणीच्या पखवाजीच्या अडाणीपणामुळें तंबोरापखवाज फुटले ह्मणून तर मुळीं खंडणीची गोष्ट इतपत तरी उघडकीस आली, नाहीं तर ती मुळींच आली नसती अशी नबाबाची व खंडेरावाची खात्री होती; पण आता तें मनांत आणून कांहीं उपयोग नव्हता. आतां प्रश्न एवढाच उरला होता कीं, त्या प्रसंगीं हजर असलेल्या मंडळीपैकीं कोणी गोपाळरावास तो मजकूर कळविला असेल कीं काय? नबाब व खंडेराव त्यासंबंधीं जसजसा विचार करूं लागले तसतसें त्यांना असेंच वाटूं लागलें कीं, ती बातमी मुद्दाम येऊन गोपाळरावास सांगेल असा कोणी मनुष्यच त्या प्रसंगीं हजर नव्हता. बहुतेक लोक हैदराचे, व कांहीं थोडे आपले, मिळून सारे इमानी नोकर होते. येऊन जाउन राहिला मुमताज कलावंतिणीचा परिवार, त्यात पुन्हा मुमताज, तिच्या शिष्यिणी, आणि तिचे सारंग्ये हे तर बोलून चालून आपल्या गांवचे रहिवासी. त्यांना अगोदर खंडणीची कल्पनाच येणें शक्य नाहीं आणि आली तरी ते ती गोपाळरावास कळवावयास कशास जातील? शिवाय त्याना त्या दिवशी झालेल्या प्रकाराबद्दल कोणाजवळ एक अवाक्षरही उच्चारावयाचे नाहीं अशी खंडेरावानें सक्त ताकीद दिली होती. नुकतेच पटवर्धनाचे पत्र आल्यावरही त्यानी मुमताजला पुन्हा बोलावून आणून तिला पुष्कळ छेडून पाहिले, पण तिला ह्या होन प्रकरणाची खरोखरीच माहिती नाहीं, आणि ती त्याबद्दल कोणापाशी कांही बोलली नाही, अशी तिने दिलेल्या उत्तरावरून त्यांची पूर्ण खात्री झाली. अर्थात् या मंडळीपुरतें तरी भीतीचें कारण नव्हते. राहता राहिला मुमताजचा पखवाजी, तो तर भीतीनें फरारीच झाला होता. तो एव्हाना आपला जीव बचावण्यासाठी कोठे तरी लाब पळून गेला असेल, अर्थात् त्याच्याकडूनही ही बातमी फुटण्याचा संभव नाहीं, असेंच अखेर नबाब व खंडेराव यानी ठरविले आणि आपल्या मनास धीर दिला.

पण नबाब आणि खंडेराव यांनी अशा प्रकारें आपल्या मनास आश्वासन देण्याचा कितीही प्रयत्न केला तरी त्याची हुरहूर कांहीं केल्या कमी होईना. अपराधी मनुष्याचा अपराध उघडकीस येऊन त्याबद्दलचें शासन त्याला मिळेपर्यंत त्याचें स्वतःचे मन त्याला जी यातना देत असते तीच त्याला प्रत्यक्ष शासनाहून अधिक असह्य होते, असा न्याय आहे; आणि तोच आताच्या प्रसंगीं अनुभवास आला. शेकडो लोकांच्या देखत जी गोष्ट घडली, ती सर्वथैव गुप्त कशी राहील, ही शंका नबाबाच्या आणि त्याच्या दिवाणाच्या मनांत एकसारखी डांचत राहिली. त्यांना आपलें उगीचच असें वाटे कीं, आपलें बिंग कोठून कां होईना, गोपाळरावास कळलें आहे, एरवीं त्याच्याकडून असा सडेतोड निरोप केंधीही यावयाचा नाहीं! अखेर बराच वेळ भवति न भवति करून त्यांनीं असें ठरविलें कीं, गोपाळरावाच्या निरोपा

प्रमाणें नबाब आणि खंडेराव यांनीं त्याच्या गोटांत जाऊन रात्रीं त्याची भेट घ्याव-याची, गोपाळरावाला आपलें गुपित कळलें आहे कीं काय याचा प्रथम ठाव काढा वयाचा, तें कळलें आहे असें दिसलें तर होन मुकाट्यानें त्याच्या स्वाधीन करावयाचे, कळलें नाही असें दिसलें तर त्याच्या लुटारू वृत्तीबद्दल त्याचा निषेध करावयाचा, ही हकीगत श्रीमंत पेशवे सरकारांना कळवूं अशी त्याला दहशत घालावयाची, आणि पुढें प्रसंग येईल त्याप्रमाणें वर्तणूक करावयाची ! कांहीं झालें तरी प्रकरण निकरावर येऊं द्यावयाचें नाहीं असा सावनूरकरांनीं निश्चित बेत ठरविला. सध्या तरी त्याची स्थिति अगदींच अगतिक होती. त्याची तीन हजार फौज पेशव्याच्या मदतीस गेली होती, अर्थात् त्यांच्याजवळ अगदीं थोडीच फौज शिल्लक असून प्रसग गोपाळरावा-सारख्या प्रबळ व पराक्रमी सरदाराशीं होता. हे सर्व मनांत आणूनच सावनूरकरांनी वरील विचार ठरविला आणि सभा बरखास्त केली.

तिसरा प्रहरपासून सावनूरच्या किल्ल्याच्या पायथ्याशी असलेल्या पूर्वेकडील विस्तीर्ण माळावर पटवर्धनाचें सैन्य येऊन उतरूं लागलें. प्रथम बुनगे, कहीवाले, झाडतोडे, कामकरी वगैरे लोकांची एक टोळी पुढे आली आणि तिनें झाडझुडपं तोडून व जमीन साफ करून तळाची जागा तयार करावयास प्रारभ केला. त्याच्या पाठोपाठ बैलगाड्या, ओझ्याचीं तट्टें वगैरे येऊन पोचलीं आणि त्यातून राहुट्या, डेरे, पालें वगैरे अवजड सामानसुमान उतरण्यात आलें. राहुट्या उभ्या होऊं लागल्या, डेरे खडे झाले, पालें ठोकलीं गेलीं. मात्र ह्या माळावर एकच मुक्काम व्हावयाचा असल्यामुळें डेरेराहुट्यांच्या आणि पालाच्या उभारणींत पक्का बंदोबस्त करण्याकडे कामकरी लोकांची विशेष प्रवृत्ती दिसत नव्हती. सर्व काम तात्पुरतें करावयाचें असल्याप्रमाणें बेताबानाचीच खबरदारी घेण्यात येत होती. पण ही सैन्याच्या तळाची जागा तयार होते आहे तोपर्यंत आम्ही वाचकांस सावनूरच्या पश्चिम तटाकडे असलेल्या झाडींत अमळ घेऊन जातों. त्या पहा वाचकहो, या झाडींत मुमताज व तिची दासी रोशन आपल्या दोघी शिष्यिणींचा निरोप घेत आहेत. मुमताज व रोशन या दोघींनीही प्रवासाचा वेष केला असून रोशनच्या हातांत एक गाठोडें दिसत आहे. शिष्यिणींचा निरोप घेऊन मुमताज कोठें चालली असावी बरें? पण आपण उगाच तर्क वितर्क करीत बसण्यापेक्षा क्षणभर त्यांचा संवादच ऐकूं.

‘मासाहेब,’ मुमताजची एक शिष्यीण हुंदके देत तिच्या गळ्यात पडून म्हणाली, ‘आतां तुमचा विरह आम्ही कसाहो सहन करावयाचा? तुम्ही कोठें जाणार तें सांगत नाहीं, किती दिवसांनीं परत येणार ते सांगत नाहीं, आणि जाणार तर म्हणतां, अशा स्थितींत आम्हांला कसा बरें धीर निघेल?’

'बेटा गुलाब,' मुमताज ह्मणाली, मी कोठें जाणार हें माझें मलाच जर ठाऊक नाहीं, तर मी तुह्मांस तरी तें कसें सागणार बरें? तुह्मां दोघींना सोडून जावयाचें माझ्या जिवावर आले आहे. पण मी तरी काय करूं? माझ्या नशिबाचें तारूं काळाच्या दर्यावर सोडलें आहे खरें, आतां त्याचा कर्णधार त्याला जिकडे नेईल तिकडे त्याला जाणें भाग आहे.'

'मासाहेब, नकाहो असे बोलूं,' मुमताजची दुसरी शिष्यीण ह्मणाली, 'तुह्मी कोठें जाणार हे जरी आह्मांला सांगितलें नाहींत, तरी कधी परत येणार ते तरी सागा. तेवढे दिवस तुमची आठवण काढीत आह्मी कसे तरी कढूं.'

'बेटा रहीम,' मुमताज आपल्या दुसऱ्या शिष्यणीची समजूत काढीत ह्मणाली, 'मी आताच ह्मटले ना, की मी कोठे जाणार हे माझे मलाच ठाऊक नाहीं ह्मणून? अर्थात् केव्हा येणार हे तरी मी कसे सांगूं? तुह्माला एवढे सागते की, अल्लाच्या कृपेने मला एक भाऊ जोडला असून तो माझे कल्याण करावे या हेतूने मला घेऊन जात आहे. अल्लाची मर्जी असेल तर माझे मनोरथ पूर्ण होऊन मी तुमच्या भेटीस लवकरच परत येईन. नाहीतर हीच तुमची माझी शेवटची भेट असे समजा–'

'बाईसाहेब, नका हो असे अमंगळ बोलू,' रोशन ह्मणाली, 'अल्ला आपले भलेच करील. त्याला कांहीं दया माया नसेलच का?'

'अग त्याला दया आहे ह्मणूनच त्याने माझ्या ऐन सकटात मला एका प्रेमळ भावाची जोड करून दिली,' मुमताज ह्मणाली, 'आणि तोच माझे मनोरथ पूर्ण करील अशी मला आशा उत्पन्न झाली. पण मेले वेडे मन नाही नाही त्या कुशंका काढतें त्याला मी काय करू?'

मुमताज व रोशन यांचा हा संवाद अगदीच मोघम असल्यामुळे मुमताजच्या शिष्यिणीना त्यातला बराचसा मजकूर कळला नाहीं, व त्यानीही कळून घेण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्या बिचाऱ्या विरहदुःखात चूर होऊन रफुदरफुदून रडत होत्या. मुमताजने त्यांना पोटाशीं घेऊन त्याची समजूत काढली व ती त्यांना ह्मणाली, 'मुलीनो, मी तुह्मांस सोडून जात आहे ह्मणून वाईट वाटून घेऊं नका. तुह्मांला अबरूने राहता येईल इतपत गाण्याचें शिक्षण मी तुह्माला दिलें आहे. तुह्मी जर नेकीनें राहिलांत तर तुह्मांला आपल्या विद्येवर अबरूने आयुष्य काढता येईल. चला आतां परत, मी येते. अल्ला तुमचे कल्याण करो.' असें ह्मणून तिनें त्या मुलींचा निरोप घेतला. त्या मुली जड पावलानें परत फिरल्या, आणि मुमताज रोशनला घेऊन उत्तरेच्या वाटेस लागली.

सुमारें दहा घटका रात्र झाली असेल, अशा वेळीं गोपाळराव पटवर्धनांच्या राहुटींत गोपाळराव पटवर्धन, आनंदराव रास्ते, नीळकंठराव पटवर्धन, सावनूरचा

नबाब अबदुलमजीदखान, त्याचा दिवाण खंडेराव आणि दोघांकडील कांहीं निवडक कारकून मंडळी, इतक्यांची बैठक भरली होती. बैठक खासंगी स्वरूपाची असल्यामुळें परवानगीवांचून कोणीही खाशा राहुटीच्या आसपास येऊं नये अशी लष्करच्या लोकांस ताकीद देण्यांत आली होती. नमस्कार चमत्कार व प्रास्ताविक कुशल प्रश्न झाल्यावर खंडेरावानें गोपाळरावाच्या निरोपा विषयीं बोलणें काढलें. पेशवे सरकारांनीं सावनूरकरांचें हैदरअल्लीपासून आजपर्यंत कसें संरक्षण केले, त्यांच्यावर कसा लोभ ठेवला, वगैरे सांगून तो ह्मणाला, ' राव , आपला निरोप सकाळीं येतांच नबाबसाहेब क्षणभर अगदीं गोंधळून गेले. चालू सालची खंडणी आह्मी नुकतीच दिली असून, आपण ही जादा मागणी एकाएकीं कशी केली, हेंच त्यांना समजेना. आह्मी पुष्कळ विचार केला, पण आपलें लिहिणें अगदींच संदिग्ध असल्यामुळें— '

' होय तें मी मुद्दामच संदिग्ध ठेवलें होतें, ' गोपाळराव ह्मणाला, ' कारण माझी मागणी खंडणीबद्दल नव्हती, कर्ज ह्मणूनही नव्हती, किंवा लूटपट्टीदाखलही नव्हती. तर तो एक दंड होता— '

' दंड कशाबद्दल? ' नबाब अबदुलमजीदखान उसळून ह्मणाला, ' आह्मी आपला असा काय गुन्हा केला आहे, कीं त्याबद्दल आपण आह्मांला दंड लावावा? '

' आपण माझा गुन्हा केला नाहीं, ' गोपाळराव शांत, पण निश्चयी स्वरानें ह्मणाला, ' पेशवे सरकारांचा केला आहे. आपण त्यांचे मांडलिक असून हैदरासारख्या त्यांच्या शत्रूला चोरून खंडणी देतां याबद्दल हा आपणांस दंड झाला आहे. '

' कोण ह्मणतो आह्मी हैदरास चोरून खंडणी दिली ह्मणून ? ' खंडेरावानें उसना आवेश आणून विचारलें , ' राव, पुराव्याशिवाय उगाच साप साप ह्मणून दोरी धोपटणें तुह्मांसारख्या सुज्ञास तरी निदान शोभत नाहीं. '

' दिवाणसाहेब, ' गोपाळराव ह्मणाला, ' आपणच सर्व कारस्थानाच्या बुडाशी असून असें वेड पांघरतां हे आपणास शोभतें कां? आपण हैदरास नजर केलेल्या चार पखवाजांची आणि चार तंबोऱ्यांची कारवाई आह्मास कळली नाहीं अशी का आपली समजूत आहे? '

'तो केवळ एक शिष्टाचार होता, ' नबाब ह्मणाला, ' आणि तितपत शिष्टाचार कोणाशीही पाळावा लागतो हें आपण जाणतांच. '

' होय, पण तंबोऱ्यात व पखवाजात होन भरून ते नजर करणें हा सुद्धां शिष्टाचारच कीं काय? ' गोपाळरावानें करकरून टोमणा दिला, ' तसें असेल तर तोच शिष्टाचार आपण दुप्पट अगत्यानें आमच्याशीं दाखवा ह्मणजे झालें. '

‘ कुभांड, केवळ कुभांड ! ’ खंडेराव निराशेचें अवसान आणून ह्मणाला, ‘ राव आपणांस हें कोणीतरी निवळ आमच्या द्वेषबुद्धीनें सांगितलेलें दिसतें. आपण तें योग्य पुराव्याशिवाय अगदीं खरें मानूं नका. ’ खंडेराव हे शब्द ठासून बोलला खरा, पण त्याचा व त्याच्या धन्याचा गोरामोरा झालेला चेहराच त्यांच्या उलट साक्ष देत होता.

‘ एकूण आपणांस पुरावा पाहिजेच ह्मणतां ? ’ गोपाळराव ह्मणाला, ‘ हा घ्या तर पुरावा! तुमच्यापुढें मूर्तिमंत उभा आहे. ’ खंडेरावानें व नबाबानें वर मान केली, तों मुमताज कलावंतीण बुरखा घेऊन राहुटीच्या एका कोंपऱ्यांत उभी आहे असें त्यांस दिसून आलें. ते दोघेही काळे ठिक्कर पडले, काय बोलावें हेंच त्यांना सुचेना. पण आतांचा प्रसंगच असा होता कीं कडेपर्यंत हातपाय झाडीत राहणें त्यांना भाग होतें.

‘ हाच कां पुरावा ? ’ नबाब कृत्रिम हास्य करून ह्मणाला, ‘ राव, ही दीड-दमडीची कलावंतीण सांगते तें खरें, आणि आह्मी सांगतों तें खोटें होय ? ’

‘ ही कलावंतीण एक दीडदमडीची असेल, ’ गोपाळराव ह्मणाला, ‘ पण हा तिचा पखवाजी देखील तसेंच सांगतो आहे, हाही दीड दमडीचाच कीं काय ? ’

खंडेरावानें व नबाबानें पुन्हा एकदा वर पाहिलें, तों मुमताजचा फरारी झालेला पखवाजी खरोखर आपणापुढें उभा आहे असें त्यांस दिसून आलें. आता मात्र त्यांचा धीर सुटला. तरी पण एकदा सुरू केलेला दावा अखेर पर्यंत लढावयाचा असा त्यांनीं निश्चय केला.

‘ पखवाजी झाला तरी तो ह्या कलावंतिणीचाच साथीदार ना ? ’ नबाब बळेंच हसून ह्मणाला, ‘ राव, अहो या कलावंतिणीची आणि तिच्या पखवाजीची बिदागी आह्मी त्यांच्या अव्वाच्या सव्वा मागणीप्रमाणें दिली नाही, ह्मणून हीं दोघे आमच्यावर फिरली आहेत, दुसरे काय ? ’

‘ पण माझी बिदागी आपणास अव्वाच्या सव्वा का वाटावी समजत नाहीं, ’ पखवाजी आपली कृत्रिम दाढी उपटून टाकीत ह्मणाला, ‘ माझ्या सारख्या श्रीमंत पेशवे सरकारांच्या सरदाराने आपल्या मोहबतीखातर साजिंद्याचे काम केल्यावर ऐंशी हजार होनांची बिदागी ही काही फार नव्हे, हे आपण सुद्धा कबूल कराल. ’

नबाबाने आणि खंडेरावाने आपली नजर पुन्हा एकदा वर केली, तो त्यास काय दिसलें ? पखवाजाचे रूपातर होऊन आपणापुढे परशरामभाऊ पटवर्धन उभे आहेत असें त्यांस दिसून आले !!

त्याच रात्री ऐंशीं हजार होनाची रक्कम गोपाळराव पटवर्धनाकडे पटविण्यांत आली. नबाब अबदुलमजीदखान आणि खंडेराव दिवाण अमळ महाग पण उपयुक्त

शहाणपण शिकून सावनुरास परत गेले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं सावनुराहून गोपाळराव पटवर्धनांचा तळ हलला. मात्र लष्कर निघतेवेळीं परशरामभाऊंच्या पथकांत गुलजारखान आणि दिलदारखान नांवाच्या दोन मुसलमान शिपायांची नवीन भर पडलेली दिसून आली.

---

## प्रकरण १४ वें.

मराठ्यांचें आरमार ( पारसनीस )
माध. पे. रोज. ३३८–३४४
खरे ऐ. ले. ८३०-३२-१०१२ इ.]

### गोंधळांत गोंधळ.

[ माघ शु. ५-११.

मागील प्रकरणात सांगितलेल्या हकीगतीस एक महिना होऊन गेला असून आज माघ शुद्ध पंचमी होती. आह्मी आज वाचकास पेशवे सरकाराच्या विजयदुर्गच्या किल्ल्यावर घेऊन जात आहोत. विजयदुर्गचा किल्ला हा सांप्रत मराठ्यांच्या आरमारी सामर्थ्याचें केंद्र असून पश्चिमेकडील तमाम बंदराचें नाकेंच होता ह्मटलें तरी चालेल. शिवछत्रपतींच्या वेळीं या जलदुर्गाचा उपयोग फक्त लढाऊ जहाजावरील तोफा आणि दारूगोळा ठेवण्याकडेच होत असे, पण अलीकडे पेशवे सरकाराच्या अमदानीत तो आरमाराच्या तळाची जागा झाला होता. हा मध्यवर्ती किल्ला धरून पेशवे सरकाराचें आरमार उत्तरेच्या बाजूनें कुलाब्यापर्यंत व दक्षिणेस मंगळूरपर्यंत बंदराबंदराच्या आश्रयानें वाटून राहिले होते, व साऱ्या पश्चिम किनाऱ्यावर त्याची हुकमत चालत होती. सन १७५६ मध्ये तुळाजी आंग्र्याच्या बंडाचा मोड करून पेशव्यांनीं कुलाब्याचा तळ उठविला आणि आरमाराचा नवा सुभाच निर्माण करून तो आनंदराव धुळप या प्रसिद्ध दर्यासारंगाच्या ताब्यांत दिला.

आमच्या कथानकाच्या काळीं पेशवे सरकाराच्या आरमारात मोठीं छोटीं मिळून पन्नास जहाजें होतीं. दोन किंवा तीन शिडाच्या गलबतास पाल किंवा गुराब अशी संज्ञा असून छोट्या गलबतांना होडी, तारू, जूग, मचवा, महागिरी इत्यादि संज्ञा असत. दोन शिडांच्या गुराबाला दुघोसी, आणि तीन शिडांच्या गुराबाला तिरकसी असें ह्मणत. गुराबांचीं नांवें नारायणपाल, महादेवपाल, शिवप्रसाद, दर्यादौलत, समशेरजंग, अलीमदत, फत्तेजंग, इत्यादि असून, छोट्या जहाजांचीं नांवें नरनाथ, फत्तेलष्कर, संभू, हिरकणी, सडक, वारू इत्यादि असत. गुराबांची शक्ती तीनशें टन पर्यंत ओझें वाहण्याची असून, छोट्या गलबतांची

दीडशें ते दोनशें टन पर्यंत ओझें वाहण्याची असे. जहाजांच्या लांबीच्या मानानें त्यांच्या रुंदीचें प्रमाण जरा अधिक असे व ती शेवटाकडे अगदीं निमुळतीं केलेलीं असत. त्यांच्या नाळी पुढें आलेल्या असून त्यांच्यावर चांगले खंबीर मजले केलेले असत.

हीं जहाजे बाधण्याचे कारखाने रत्नागिरी, विजयदुर्ग आणि अजनवेल या तीन ठिकाणी असून प्रत्येक जहाज बाधण्याचा खर्च त्याच्या आकारमानाप्रमाणें दहा हजार रुपयापासून चाळीस हजार रुपयापर्यंत येई. जहाज तयार होऊन आरमारात सामील झाले ह्मणजे त्याच्यावर हशम, खलाशी आणि कारागीर अशा तीन प्रकारच्या लोकाची नेमणूक होई. हशमात लढाऊ शिपाई, गोलदाज आणि बरकदाज इतक्याचा समावेश होत असे. खलाशामध्यें सारंग, तांडेल, पाजरी आणि खलाशी अशा उतरत्या पाहिऱ्या होत्या. आणि कामगार लोकात लोहार, सुतार, अरकसी, पिंजारी, कलफती इत्यादिकाचा भरणा असे. पेशव्यांच्या प्रसिद्ध फत्तेजग जहाजावर २२६ हशम, १६ गोलंदाज आणि १३२ खलाशी होते! प्रत्येक जहाजावर गर्नाळी, हातगर्नाळी, तोफा आणि जंबुरे इत्यादि प्रकारच्या तोफापैकीं काही तोफा, आणि गर्नाळी, गर्भछाटी इत्यादि नावाच्या बंदुका असत. त्याचप्रमाणें गलबतावरून औषधें, मालमी ( दिशा पाहण्याचे होकायंत्र ), वाळूची घड्याळें आणि दुर्बिणी इत्यादि जरूरीच्या यंत्राचा संग्रह असे. पेशव्याच्या सर्व आरमारातून मिळून जवळ जवळ पावणे तीनशे तोफा वाटलेल्या असून त्याचा मगदूर दोन पौंडापासून नऊ पौंडापर्यंत कमीअधिक वजनाचे गोळे टाकण्याचा होता. ही गलबते सुरक्षित ठिकाणी नागरलेली असत. परकीय जहाज दिसलेंरे दिसलें की, ती त्याचा पाठलाग करीत. वारा अनुकूळ असला तर हीं जहाजे खूप जलद चालत. तो प्रतिकूळ असला तरी तीं वल्ह्याच्या जोरावर, पण अमळ मंद जात. अशा रीतीनें मराठी आरमार त्या वेळीं सर्व दृष्टींनी सुधारलेलें असून पाश्चात्य राष्ट्राना किंवा चांचे लोकांना त्याने शेंदीडशें वर्षे नुसती वर मान देखील करू दिली नाही ही गोष्ट खरी आहे.

आमच्या कथानकाच्या काळी आरमाराचा स्वतंत्र सुभा करून देण्यात आला असून विजयदुर्ग तालुक्यातील संवदळ हा महाल त्याच्या खर्चाकरिता तोडून दिला होता. आरमाराचा कुलखर्च सालीना दीड दोन लाखापासून पाच लाखापर्यंत असे. अर्थात् सवदळ प्रांताचे पंचवीस हजार रुपयाचें उत्पन्न या खर्चाला पुरणें शक्य नव्हते. पण उत्पन्नाच्या आणखी काहीं बाबी असून त्याच्या आधारावर या खर्चाची तोडमिळवणी होत असे. त्या बाबी कौलावण, मोहोरणावळ, नजरमिठारू शिबाड आणि पैदास्त ह्या होत. कौलावण ह्मणजे परराष्ट्रीय व्यापाऱ्यांच्या जहाजावर बसविलेली

जकात होय. या जकातीचें उत्पन्न सालीना दहा पासून वीस हजारांपर्यंत असे. मोहोरणावळ ह्मणजे स्वदेशी व्यापारी शिबाडांवर बंदरोबंदरीं जाण्यायेण्याचा जो परवाना द्यावयाचा त्या परवान्याचा कर होय. प्रत्येक परवान्यास साडेचार रुपये फी असे. हिचेंहि उत्पन्न बरेंच असे. नजरामिठारू शिबाड म्हणजे समुद्रावरून जागजागीं मिठाचा व्यापार करणाऱ्या शिबाडांकडून सरकारांत मिळणारी नजर होय. ही प्रत्येक शिबाडाकडून एक मण मीठ व अर्धा रुपाया रोख याप्रमाणें मिळत असे. पण खरी उत्पन्नाची बाब पैदास्त ही होय. जीं परराष्ट्रीय जहाजें सरकारी कौलावण न भरतां समुद्र किनाऱ्यावरून हिंडत, त्यांच्यावरील जप्त केलेल्या मालाचें उत्पन्न ह्मणजे पैदास्त. हें फार मोठें, कधीं कधीं सालीना पन्नास हजारांपर्यंत देखील असे ! या खेरीज व्यापारी जहाजांस सरकारी जहाजानें सोबत केल्यास मिळणारी वलावा उर्फ रक्षणावळ, खासगी शिबाडानीं सरकारी वेठ चुकविल्यास त्याजकडून मिळणारा दंड, इत्यादि आणखी कांहीं उत्पन्नांच्या किरकोळ बाबी होत्या.

उत्पन्नाप्रमाणेंच आरमाराच्या खर्चाच्याही बाबी दांडग्या होत्या. बदलमुशाहिरा ह्मणजे नोकर लोकांचे पगार, खेरीज मुशाहिरा ह्मणजे नोकरभाडे, दप्तरखर्च, तेवजखर्च, पोस्तखर्च, देहनगी, वार्षिक धर्मादाय, इत्यादि खर्चाच्या अनेक बाबती होत्या. शिवाय आरमाराच्या सामानखरेदीला लागणारा खरेदीखर्च आणि जहाजे दुरुस्त करण्यास लागणारा तामरात ऊर्फ दुरुस्तीखर्च याही दोन मोठ्या बाबी होत्याच. या बाबींखेरीज युद्धात कौशल्य दाखविणाऱ्या शिपायाना नक्त रकमा बक्षिसांदाखल दिल्या जात असत, किंवा पालखी वगैरे सरंजाम बहाल केले जात, त्यांचा खर्चही पुष्कळ होत असे. आमच्या कथानकाच्या काळीं आनंदराव धुळप हे पेशवे सरकारांच्या आरमाराचे सुभेदार असून त्याचे धाकटे बंधु हरबाजीराव आणि दोघे चुलते जानराव व भगवंतराव असे चौघे धुळप एकजुटीने राहून आरमाराची व्यवस्था पहात असत. अलीकडे काही दिवस धुळप मंडळी दर्यावरील पैदास्तीपैकीं रकमा मधल्यामध्ये खातात, असा पेशवे सरकाराना संशय आला होता, आणि म्हणून त्यानी धुळपाकडाल हिशेब पुण्यास तपासावयासाठीं मागितले होते.

वाचकहो, "स्वदेशीं भोगी विपत्ति, सांगे वाडिलाची कीर्ती, तो एक मूर्ख" असें श्रीसमर्थानीं ह्मटलें आहे, हें आपणास ऐकून ठाऊक असेल, आणि ह्मणून आपण या आमच्या आरमारवर्णनास बुजाल अशी भीती वाटते. पण आह्मी आपणांस अशी हमी देतों कीं, समर्थांची वरील उक्ति वाडिलाची कीर्ती गाऊन स्वतः निष्क्रिय राहणाऱ्या आळशाला उद्देशून आहे, वडिलांच्या कीर्तीचें पारायण करून देशसेवेसाठीं झगडणाऱ्या वीरांना उद्देशून नव्हे. काय, कान्होजी आंग्रे,

आनंदराव धुळप, परशुरामभाऊ व गोपाळरावदादा पटवर्धन अशांची कीर्ती गाणें हा मूर्खपणा? छे छे, वाचकहो, समर्थांचा आशय तसा कधींच असणार नाहीं. वडिलांची कीर्ति गाऊन आपण तिजवर विकूं पाहणें हा मूर्खपणा, असाच समर्थांचा आशय असला पाहिजे. विजयदुर्गच्या किल्ल्याच्या पायथ्याशीं दहापंधरा गुराबा आणि तीस चाळीस जहाजें सर्व शस्त्रास्त्रांनिशी आणि दरोबस्त सरंजामानिशीं सिद्ध होऊन राहिलीं आहेत, सलामीच्या तोफांचे धडाड धडाड आवाज प्रत्यक्ष रत्नाकराच्या घनगर्जनांना गिळून टाकीत आहेत, खलाशी लोक चकवे ह्मणजे दर्यावरील गीतें गात आहेत, आणि आनंदराव धुळप, शिवाजीराव सुर्वे, विठोजीनाईक बांवकर अशा कसलेल्या दर्यासारगांच्या हुकमतींत छातीचे कोट करून काळाशीं झगडणारे हशम तरवारी परजीत आहेत, किंवा गरनाळींना कुरवाळीत आहेत, हा देखावा पाहून खुद्द श्रीसमर्थांना आनंदाचें भरतें येऊन ते बेहोष झाले असते, मग आपणही जर क्षणभर या डोळ्याना भुलविणाऱ्या, कानाना खुलविणाऱ्या आणि मनाला फुलविणाऱ्या पूर्वजाच्या कीर्तीची उजळणी करीत राहिलें तर समर्थ आपणास कसे बरें मूर्खांत काढतील?

प्रकरणाच्या आरंभी ह्मटल्याप्रमाणे आज माघ शुद्ध पंचमी असून आठ नऊ घटका रात्र झाली होती. विजयदुर्ग येथील सुर्व्यांच्या वाड्यांत सदरेवर बरीच बायकामंडळी जमली असून त्यात एक सुंदर बालिका प्रमुखत्वानें चमकत होती. हिचे वय सुमारे बारा वर्षांचें दिसत असून वयाच्या मानानें ती अमळ थोराड दिसत होती. तिचे रूप अव्यंग असून बांधा अत्यंत नाजूक दिसत होता. काळाभोर केशकलाप, विशाल व पाणीदार डोळे, सरळ नाक, इत्यादि सौंदर्याच्या विकासित आणि अर्धविकासित लक्षणातही ती अत्यंत मनोहर दिसत होती. या बालिकेचे नाव हंसा असे असून ती शिवाजीराव सुर्व्यांची मुलगी होती. तिचा नुकताच आनंदराव धुळपाचा पुतण्या जानराव याच्याशी वाङ्निश्चय झाला असून त्याचा समारंभ नुकताच ओसरला होता. पुरुष मंडळी उठून खाली बंदराकडे गेली होती, आणि मागें बायका मंडळींचा थट्टाविनोद चालला होता. हसाच्या मैत्रिणी तिची नाना प्रकारानीं मस्करी करून तिला चिडवावयास पहात होत्या. बावकराची मुलगी सारजा हिनें तर हंसाची टवाळी करण्याकरिता पुढील चकवा ह्मटलाः—

## चकवा १

वाय वारू, हकाल तारू। भरतारा, निजवारा, सावलि सुंदरा।
जाते मी निज माहेरा ॥धृ॥
चोळीची गांठ सोडी ठाणकर्णी। लुगड्याचा घोळ तुझा ठाणकर्णी।

**हलुहलु चाल पोरी ठाणकर्णी । भरतारा, निजवारा, सावलि सुंदरा ।**
**जाते मी निजमाहेरा ॥ ०॥**

वरील गाणें ह्मणत असतां सारजानें हंसाला उद्देशून नाना प्रकारचे अविर्भाव केले, हात नाचविले, डोळे मोडले, तऱ्हातऱ्हा केल्या, पण त्यांचा कांहींच उपयोग झाला नाहीं. हंसा मुळींच चिडली नाहीं. उलट एक पोक्त बाई सारजालाच दटावीत ह्मणाली, “ इश्श, आजच्या प्रंसगाला माहेरचें गाणें कसलेगं ह्मणतेस? सासरचें एखादें ह्मण तुला येत असेल तर.”

सारजाला तेवढेंच निमित्त पुरलें. तिनें उत्तर दिले, “ सासरचें गाणें हंसाला चांगलें येतें अत्याबाई, तिला म्हणायला सांगा. तिनें त्या गाण्यात नवऱ्याचें नांव मुद्धां घेतले आहे!” सारजाचे शद्ब ऐकतांच बायकामुलींचा मोर्चा हंसाकडे वळला आणि त्यानीं तिला ते गाणें म्हणण्यासाठी अगदीं भंडावून सोडलें. अखेर हंसाचा निरुपाय होऊन तिनें पुढील दर्यागीत म्हटलें:—

## चकवा २

**नवतिची उगवली रात, अलमदर्यांत, तळ कांकणीं ॥**
**पालास धडकलें पाल सखे साजणी ॥ धृ ॥**
**तेवत्या चंद्रजोतीस, लागले घोस, लाल हिरकणी, लाल हिरकणी**
**रात्रिचा जाहला दिवस विजयपाटणीं ॥**
**दाटलें शिडाला शीड, सोडुनी भीड, पाठराखणी पाठराखणी ॥**
**करितात एकमकीस चटकचांदणी ॥**
**जंबुरे आणि गरनाळि, करुनिया वळी, बाळमैत्रिणी, बाळमैत्रिणी ॥**
**राखिती धन्याचा आब दिवसयामिनी ॥**
चाल-**मचवे महागिरी, ह्याच जहागिरी ॥**
**एगढें वतन, करून जतन ॥**
**धुळपसुर्व्यांची अंगेजणी ऽऽऽऽ ॥**
**भरदार आम्ही सरदार, जळावर स्वार, आमचे धणी ॥ १ ॥**

**हबशांनीं घातला घोळ, मातले पोळ, आली वरदी, आली वरदी ॥**
**मग आम्ही कशाचे धुळप पानगारदी? ॥**
**सोडले तडक हुकूम, मातली धूम, बंदरामधीं, बंधरामधीं ॥**
**महाराष्ट्रशाहिची बळकट आहे सदी ॥**
**पातले करुनि पोशाख, लष्करी झाक, वीर मुत्सदी, वीर मुत्सदी ॥**
**आज्ञेत सर्व, पुसती न काय, अन् कधीं ॥**
**मामाजि जुने चाकर, झाले उतार, करुनि पारधी, करुनि पारधी ॥**

नटविली नावमचव्यांची धावरी नदी ॥
चाल–जानरावांनीं, ग संकेत निशाणी ॥
केली डोळ्यांनीं, ती पाहिली कां कुणी ॥
झालीग आज्ञेची बजावणी ऽऽऽऽ ॥
इतक्यांत धडकली तोफ, हालला गोफ, ठाण सोडुनि ॥ २ ॥

घेउनी हशम तांडेल, गड्यांचा मेळ, जीवकैवारी ॥
लोटल्या गुराबा चंचल लाटांवरी ॥
मामींची माया धीट, लाविली तीट, कपाळावरी, कपाळावरी ॥
मी आणुन दिधली त्यांत मीठमोहरी ॥
काहणी सांगु मग काय, टाकिला पाय, गुराबीवरी, गुराबीवरी ॥
सरदारि ऐट ती जातिवंत ग खरी ॥
सांडिली सर्वही लाज, विसरुनी काज, बंदरावरी, बंदरावरी ॥
राहिले घेत मी दृष्टभेट घाबरी ॥
चाल–धुळप सुर्व्यांचें, रक्तच जातिचें ॥
त्यांच्या सुनामुली, संभाळुनी चुली ॥
झालों जहागिरदारिणी ऽऽऽऽ ॥
जाहला तोंच निरोप, उडाली धोप, मानसांतुनी ॥ ३ ॥

पण चला वाचकहो, हसाला आणि तिच्या मैत्रिणींना अशाच थट्टाविनोदात सोडून सुर्व्यांच्या वाड्यापासून जवळच बंदरात आजच्या कुळाचारानिमित्त गोंधळ चालला आहे तेथे जाऊं. तें पहा, फत्तेजंग पाल सुंदर शृंगारण्यांत आलें असून, दर्यादौलत आणि वारू ही दोनी जहाजे दोनी बाजूंनीं त्याला जखडून एकच भला मोठा ताफा बनविण्यात आला आहे. तीनी जहाजावरून बैठकी टाकण्यांत आल्या आहेत. मधल्या फत्तेजंग जहाजावर गोंधळ्याचा गोंधळ चालला असून श्रोते-मंडळींत आनंदराव धुळप, हरबाजीराव धुळप, शिवाजीनाईक सुर्वे, विठोजीनाईक बावकर, इत्यादि सरदार मानकरी दर्यासारंग बसले आहेत. जहाजाचीं शिडें फड-फडत राहिली असून त्याच्यावरून सुटलेले गोंडे मशालीच्या उजेडात चमकत आहेत. बाजूच्या दोनी जहाजावरून, हशम आणि दर्यावर्दी लोक बसले असून सर्वांचें लक्ष्य गोंधळाकडे लागले आहे. मशालींच्या प्रकाशात चंद्रजोतीच्या प्रकाशाची भर पडून चादण्याचा भास होत आहे. पण आनंदराव धुळपाच्या शेजारींच त्याच्या लोडाला टेकून बसलेला हा पाणीदार मुलगा कोण असावा बरें? याचें वय अठरा एकोणीस वर्षांचें दिसत असून याला नुकतीच मिसरूड फुटूं लागली आहे. याचे डोळे तरतरीत, अवयव नीटस, चेहरा बांधेसूद आणि वर्ण काळसांवळाच पण

खूप तजेलदार दिसत आहे. एवढासाच छोकरा पण ऐट एखाद्या पोक्त सरदारा-सारखी दिसते आहे! वाचकहो, हाच आनंदराव धुळपांचा पुतण्या जानोजी असून, याच्याच लग्नाचा वाङ्‌निश्चय आज सुर्व्यांची मुलगी हंसा इजबरोबर झाला होता, आणि तन्निमित्तच आजचा गोंधळ चालला होता.

अशा प्रकारें आज विजयदुर्गच्या बंदरांत सर्वत्र आनंदी आनंद पसरला होता, पण खुद्द आनंदराव धुळपांचा चेहरा मात्र उदासीन व सचिंत दिसत होता. आणि त्यांना चिंता उत्पन्न होण्याजोगें तसेंच कारणही पण झालें होतें. गेल्या आश्विन महिन्याच्या प्रारंभीं पेशवे सरकारांकडून आनंदरावास एकाएकीं असा हुकूम आला होता कीं ' आपले बंधु भगवंतराव यांस दक्षिण कर्नाटकांत दोड्डबाळापूरचे सुभेदार नेमण्यांत आलें आहे. तरी त्यांस तिकडे पाठवावें, आणि आरमाराच्या जाब-त्याचा हिशेब देण्याकरितां आपले चुलते जानराव आणि आपले दुय्यम मोत्याजीराव विचारे यांस पुण्यास पाठवावें. ' हा हुकूम येतांच आनंदरावानें ओळखलें की, आपणाविषयीं श्रीमंतांचें मन कलुषित झालें असून आरमाराच्या सुभ्यांत कांही तरी खदलाबदल करण्याचा त्यांचा विचार आहे. पण तें कांही असलें तरी सरकारी हुकमाची तामिली ताबडतोब केलीच पाहिजे हें जाणून त्यानें भगवंतरावाची रवानगी बाळापुरास केली आणि जानरावास व मोत्याजीरावास पुण्यास पाठविले. कांहीं दिवसांनीं जानराव एकटाच परत आला, आणि आनंदरावास सांगूं लागला कीं, ' श्रीमंतांना मी आरमार सुभ्याचा हिशेब दिला, पण त्यांचें समाधान झाल्याचें दिसत नाही. त्यांनीं मजवर चौकी देखील बसविली होती, पण अखेर मी त्यांची खात्री करून दिल्यावर त्यांनीं मला इकडे येण्यास परवानगी दिली. मात्र मोत्या-जीरावास मागें ठेऊन घेतले आहे. ' चुलत्याच्या तोंडची ही हकीगत ऐकताच आनंदरावाच्या पोटांत चर्र झालें! श्रीमंताचा त्याला जो स्वभाव ठाऊक होता, त्यावरून मोत्याजीरावास मागें ठेवून घेण्यांत आरमाराचा सुभा आपणाकडून काढून त्याला देण्याचा श्रीमंतांचा हेतु असावा असा त्यास संशय आला, आणि या गोष्टीस बरेच दिवस झाले असूनही मोत्याजीराव जेव्हां अजून आला नव्हता, तेव्हां तो अधिकच दृढ होऊन राहिला. आजच्या त्याच्या सचिंतपणाचें कारण आतां वाचकांच्या लक्ष्यांत आलें असेल.

पण कथानकाचें सूत्र पुढें चालविण्यापूर्वी एकदोन गोष्टींचा खुलासा करणें जरूर आहे. पहिली गोष्ट अशी कीं चालू प्रकरणांत जानराव हें नांव दोघां धुळपांच्या संबंधानें येत आहे, हें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें. पुण्यास गेलेला जानोजीराव हा आनंदरावाचा चुलता असून भगवंतरावाचा सख्खा वडील भाऊ होता. ह्या जानोजीचा मुलगा हरबाजीराव आणि त्याचा मुलगा तो दुसरा जान-

राव. ह्याच जानरावाचा आज हंसाशीं वाङ्निश्चय झाला होता. दुसरी गोष्ट अशी कीं, आरमाराचा काय किंवा दुसरा कोणचा काय, एकाचा सुभा काढून दुसऱ्याला देण्यांत श्रीमंतांचा फार खोल हेतु होता. सरंजामी पद्धतीचे दोष त्यांच्या लक्ष्यांत आले असून ती पद्धत अजीबात मोडून तिला मेणासारखी लवचीक बनवावी असा त्यांचा बेत होता. ह्मणून त्यांनीं एकाचा सुभा काढून दुसऱ्यास देणें, सरंजामांतला कांहीं भाग पाहिजे तेव्हां जप्त करणें आणि पाहिजे तेव्हां बहाल करणें, सरंजामाचें उत्पन्न एखाद्या सालीं सबंधाच्या सबंध सरकारांत भरण्याची सरंजामदारास ताकीद देणें, इत्यादि प्रयोग सुरू केले होते! आणि श्रीमंतांची जरब अशी होती कीं, हे त्यांचे हेतु बिनतकरार अमलात येऊं लागलेही होते. श्रीमंत आणखी कांहीं वर्षे जगते, तर कोणताही सरंजामदार मध्यवर्ती सत्तेला शिरजोर होऊं नये अशी त्यानी कायमची व्यवस्था केली असती आणि हिंदुस्थानचा इतिहास आज निराळयाच शद्बांत लिहिणें भाग पडले असतें. पण हिंदुस्थानाच्या ऐन लाभकालीं बिब्बा घालावयाची काळाला संवयच लागून राहिली आहे, त्याला कोण काय करणार?

गोंधळी लोकाचा गोंधळ ऐन रंगांत आला आहे, इतक्यांत आनदरावाची नजर सहज बंदराकडे वळली, तों मशालीच्या उजेडांत बंदरावरून एक होडी फत्तेजंग जहाजाकडे यावयास निघाली आहे असे त्याच्या दृष्टीस पडलें. त्याने त्या होडीकडे अमळ बारकाईने निरखून पाहिले, तो तिजमध्ये मोत्याजीराव विचारे, व बाळाजीपत घाटे बसले आहेत असे त्यास दिसून आले. ही दिसावयास अगदी साधारण गोष्ट खरी, पण मोत्याजीरावांचा तो नेहमीपेक्षां अगदीं वेगळाच दिसणारा नूर, ती नजरेची ऐट आणि बाळाजीपंताच्या कानाशीं लागून त्यांची चाललेली कुजबूज ही पाहतांच आपले दुःस्वप्न खरें झाले अशी आनंदरावाची खात्री झाली आणि त्याचा चेहरा खाडकन् उतरला? इतक्यांत होडी येऊन पोंचली आणि मोत्याजीराव व बाळाजीपंत तिजवरून उतरून फत्तेजंग जहाजावर आले. ते येताच तीनी जहाजावरील लोकांचें लक्ष्य एकदम त्याच्याकडे लागले. मोत्याजीरावाने येऊन आनंदरावास मुजरा केला आणि श्रीमंतांचा लखोटा त्याच्या हातांत दिला. आतां कोठें हरबाजी-रावाची स्वारी जागी झाली, आणि त्यानें आनंदरावाकडे वळून लखोट्यावर नजर टाकली. आनंदरावानें लखोट्यांतील आज्ञापत्र वाचलें, त्यांत "आरमाराचा सुभा यापुढें मोत्याजीराव विचारे यांजकडे सोंपविला आहे. तो देखत हुकूम त्यांचे ताब्यांत देऊन आपण बाळापुरास जावें व पुढील हुकमाची वाट पहावी" अशा आशयाचा मजकूर होता. हुकूम वाचून आनंदरावाच्या पोटांत काय खळबळ उडाली असेल याची वाचकांनींच कल्पना करावी! होणाऱ्या मानहानीपेक्षां प्राण-

त्याग करणें बरें, असेंही क्षणभर त्याच्या मनांत आलें, पण तो विवेकी व धूर्त असल्यामुळें आपल्यावरचें हें आभाळ लवकरच जाईल अशी मनाशीं खूणगांठ बांधून त्यानें आपला उमाळा आवरला. पण हरबाजीरावाजवळ तितका विवेक नसल्यामुळें ' आरमाराचा सुबा कोन घेतुया बगतो कीं, त्येला आपला जीव नगोसा झाला असल ' असें म्हणत त्यानें आपली तरवार उपसली ! छोट्या जानरावानेंही तरवारीस हात घातला. आनंदरावानें त्या दोघांची समजूत घालून त्यांस गप केलें व जमलेल्या सर्व मंडळीस उद्देशून तो मोठ्यानें म्हणाला, ' ऐकाहो मंडळी, उद्या-पासून आरमाराचा सुबा शिरमंतांनीं मोत्याजीराव इचाऱ्यांच्याकडे सुपूरत केला हाय. समद्यांनीं त्येंच्या आज्ञत चालावं अन् इमानानं नोकरी करावी, रामराम!, आनंद-रावाच्यानें पुढे बोलवेना. त्याचा गळा दाटून आला. गोंधळ्याचा गोंधळ बंद होऊन इतरांचाच गोंधळ सुरू झाला !

---

## प्रकरण १५ वें.

हंटर वॉरन हेस्टिंग्स पान ४३ } **नवऱ्याचा आत्मयज्ञ.** माघ वद्य ३०

मागील प्रकरणांत सांगितलेल्या हकीगतीस तीन आठवडे होऊन गेले असून आज माघ वद्य अमावास्या होती. ह्या दिवशीं मद्रास येथें बॅरन् इम्हॉफच्या बंगल्यांत बॅरनची बायको हेन्रिएटा आणि वॉरन हेस्टिंग्स हीं दोघें जण गप्पागोष्टी करीत बसलीं होती. भर दोनप्रहरची वेळ असून मनस्वी उकाडा होत होता, त्यामुळेंच कीं काय, हेन्रिएटाच्या मुखमंडळावर एक प्रकारची मृदुमधुर लाली पसरून राहि-लेली दिसत होती. तिच्या कपाळावर व गालांवर घर्मबिंदु चमकत होते, आणि त्यामुळें तिच्या तोंडाला झडीच्या पावसांत भिजलेल्या गुलाबाच्या फुलाची शोभा आली होती. हेन्रिएटा हेस्टिंग्सवर नाराज झाल्याचे मागील एका प्रकरणात वाच-कांस कळलेंच आहे. त्यावेळच्या त्याच्या वागणुकीवरून तिने एक गोष्ट नक्की ओळखली, ती ही की हेस्टिंग्स आपल्या प्रेमाचा कितीही भुकेला असला तरी आपल्या राष्ट्राच्या हिताचा प्रश्न जेव्हां येईल, तेव्हां तो आपली मुळींच पर्वा करणार नाहीं. अर्थात् तेवढ्या अनुभवावरून तिनें योग्य तो धडा घेतला आणि आपणही हेस्टिंग्सबरोबर तशाच सावधगिरीनें वागावयाचें असा निर्धार केला. उलट पक्षीं हेस्टिंग्सच्या मनाला हेन्रिएटा आपणावर रागावली या गोष्टीची मोठी चुटपूट लागून राहिली आणि दुसऱ्याच दिवशीं त्यानें पत्रद्वारें क्षमा मागून आपणास पुन्हा

भेट देण्याविषयीं तिची प्रार्थना केली. हेन्रिएटानें त्याचें पत्र न फोडतां तसेंच परत पाठविलें. त्यानंतर हेस्टिंग्सनें तिला आणखी एक दोन पत्रें व कांहीं निरोपही पाठविले. पण हेन्रिएटानें कशालाच दाद दिली नाहीं. अखेर एके दिवशीं बॅरन इमहॉफ घरी नाहीं असें पाहून हेस्टिंग्स हेन्रिएटाच्या घरी गेला, आणि त्यानें हेन्रि-एटाची गांठ घेण्याचा प्रयत्न केला. हेन्रिएटा त्याला भेटली, पण तिनें त्याची प्रथम खूपच संभावना केली. हेस्टिंग्सनें गुडघे टेकून तिची क्षमा मागितली आणि नाना प्रकारचीं आर्जवें करून व आणाशपथा वाहून आपल्या प्रेमाविषयीं तिची खात्री करण्याया प्रयत्न केला. हेन्रिएटाचा राग अमळ कमी झाला व तिनें हेस्टिंग्सला पूर्ववत् भेटावयास येण्याची परवानगी दिली.

दुसऱ्या भेटीला हेन्रिएटा बरीच खुषींत आहे असे हेस्टिंग्सला दिसून आलें आणि त्याने अमळ धीटपणाने तिच्या हाताचें चुंबन घेतलें. हेन्रिएटानें त्या गोष्टीचा प्रतिकार केला नाहीं, यावरून तिचा राग आता पूर्णपणें गेला अशी हेस्टिंग्सची खात्री झाली आणि तो तिच्याशी अधिक लघळपणा करू लागला. त्या-बरोबर हेन्रिएटाने एकदम उग्ररूप धारण केलें आणि असला अतिप्रसंग आपणास खपणार नाही असें त्यास चक्क बजावलें! हेस्टिंग्स चकित झाला, किंबहुना त्याचा विरस झाला ह्मटले तरी चालेल. आपल्या मनातील हेतु सफळ होण्याचे त्याला चिन्ह दिसेना. अशा स्थितीत तिच्या नवऱ्याला कोठे तरी दूर कामगिरीवर पाठवून तिच्या मनाचा ठाव पहावा असा त्याने विचार केला आणि आपल्या वरिष्ठाकडून बॅरन इमहॉफ यास 'चिकबाळाप्पा दलाल यास ताबडतोब जाऊन भेटावें आणि इकडून पुन्हा लिहून येईपर्यंत कपाशीच्या पिकाची तपासणी दलालमजकूर याजबरो-बर करीत फिरावें,' अशा आशयाचा हुकूम त्याने देवविला. तो हुकूम बॅरन इमहॉफ यास कालच मिळाला होता आणि आज दुपारी अमळ लवकरच जेवण करून व जरूर ते सामान बरोबर घेऊन बॅरन इमहॉफनें आपल्या बायकोचा निरोप घेतला होता. अर्थात् तो आता कित्येक दिवस परत येणार नाही अशी हेस्टिंग्सची खात्री होती आणि त्यामुळेंच त्याला एक प्रकारचा निर्धास्तपणा वाटत होता. याच भरंशावर आज तो हेन्रिएटाच्या भेटीस आला होता आणि प्रकरणाच्या आरंभी ह्मटल्याप्रमाणें त्याच्या गप्पागोष्टी सुरू झाल्या होत्या.

'एटा, लाडके,' हेस्टिंग्स आपली नजर हेन्रिएटावर रोखून ह्मणाला, 'तूं आपल्या हृदयाचा अंत मला का बरे लागूं देत नाहींस? तुला माझ्या प्रेमाबद्दल अंदेशा तर वाटत नाहींना?'

'कां बरें?' हेन्रिएटानें प्रश्न केला, 'तुह्माला अशी शंका का आली?'

'तुझ्याच वागणुकीवरून,' हेस्टिंग्स ह्मणाला, 'तूं आपलें प्रेम माझ्यावर

आहे ह्मणतेस, पण तुझ्या वृत्तींत एक प्रकारचा संकोच दिसून येतो. त्यामध्यें मनाचा मोकळेपणा दिसत नाहीं. '

'माझ्या वागणुकींत जर संकोच असता,' हेन्रिएटा ह्मणाली, 'तर मी अशा तुमच्या चोरट्या भेटी घेतल्या नसत्या.'

'नुसत्या भेटींत काय?' वॉरननें प्रश्न केला, 'सामान्य ओळखीचीं माणसें सुद्धां एकमेकांच्या भेटी घेतात आणि बोलत बसतात.'

'पण सामान्य ओळखीच्या माणसांच्या भेटींत आमच्या भेटीसारखा चोरटेपणा असत नाहीं,' हेन्रिएटा हसत हसत ह्मणाली, 'बॅरन घरीं नाहींत अशी संधी साधून तुह्मी माझ्याकडे येणें, तासचे तास बोलत बसणें, प्रेमालाप करणें, आणि सर्वांत विशेष ह्मणजे मी त्यांना उत्तेजन देणें, या गोष्टी सामान्य ओळखीच्याच नुसत्या निदर्शक ह्मणतां येणार नाहींत.'

'तूं कांहीं ह्मण,' हेस्टिंग्स ह्मणाला, 'पण तुझें मजवरचें प्रेम असावें तितकें मोकळें नाहीं.'

'तुह्मांला असें कां वाटावें समजत नाहीं,' हेन्रिएटा खवचट नजरेने त्याजकडे पाहत ह्मणाली, 'मी तर असें प्रतिज्ञेवर सांगावयास तयार आहे की तुमच्यावांचून या जगांत मला आतां कोणतीच प्रिय वस्तू राहिलेली नाहीं!'

'तर मग मी तुला स्पष्टच विचारतों' हेस्टिंग्स आतुरपणानें ह्मणाला, 'तूं मला प्रेमाच्या सवलती कां देत नाहींस? मी जवळ आलों कीं तूं मागें सरतेस, मी अलिंगनासाठीं हात पसरले कीं तूं ते मागें लोटतेस—'

'तर मग मीही तुह्माला स्पष्टच सागते,' हेन्रिएटा निश्चयाच्या स्वरात ह्मणाली, 'कीं त्या सवलती भोगण्याचा हक्क तुम्हाला अद्याप प्राप्त झाला नाही. माझा नवरा हयात असता मी तुमच्यावर प्रेम करूं लागले ही देखील त्याच्याशीं माझी बेमानगिरीच आहे, पण तिची मजल यापुढें जाणार नाहीं. मी कर्तव्यभ्रष्ट झाले असले तरी शीलभ्रष्ट होणार नाहीं.'

वॉरन हेस्टिंग्स चकित झाला! हेन्रिएटा आपल्या मिठ्ठास भाषणाला, नाटकी आविर्भावाना आणि प्रशस्त आणाशपथांना बळी पडून आपणास वश होईल अशी जी त्याला जबर आशा होती ती जमीनदोस्त झाली. तो निराशेच्या स्वरात म्हणाला, 'तर मग तुझा नवरा बॅरन इमहॉफ जिवंत असेपर्यंत तूं माझी होणार नाहींस असेंच मी मानून चाललें पाहिजे?'

"हो तसें ह्मणावयास कांहीं हरकत नाहीं," हेन्रिएटानें उत्तर केलें, "मी मनानें आतांही तुमचीच आहे पण तुह्मी ज्या अर्थानें मला आपलीशी करावयास पाहतां त्या अर्थानें मी तुमची होणें तूर्त तरी शक्य नाहीं."

"तूर्त तरी ह्मणजे बॅरन इमहॉफ ह्यात असेंपर्यंत, असेच तुझें ह्मणणें?" हेस्टिंग्स खिन्न स्वरानें ह्मणाला, "तुझी प्राप्ती होण्याकरितां मला बॅरनच्या मरणाची वाट पहात राहिले पाहिजे!"

"नको, तशी वाट पाहण्याचें कारण नाहीं," एक अज्ञात आवाज ओरडला, आणि भितलिगत असलेल्या एका मोठ्या कपाटाचे दार उघडून बॅरन इमहॉफ बाहेर आला! त्याचे डोळे गुंजासारखे लाल झाले होते, ओठ थरथरत होते, भिंवया आकुंचित झाल्या होत्या, आणि कपाळावरचे केस ताठ उभे राहिले होते! बॅनरला पाहताच हेन्रिएटा किंचाळून उठली आणि हेस्टिंग्सही खडबडून उभा राहिला. आपल्या निंद्य कृत्याचा जाब विचारणारा काळ आपल्यापुढे उभा राहिला आहे, ही जाणीव होऊनच की काय, हेस्टिंग्सची मान आपोआप खालीं वळली. शरम, पश्चाताप, भीति इत्यादि मनोविकाराचें मिश्रण एका क्षणात त्याच्या चेहऱ्यावर प्रतिबिंबित झाले! भयाने त्याची बोबडी वळली!

आणि हेन्रिएटा? ती बिचारी तर भीतीनें अर्धमेली होऊन कोचावर पडली होती आणि स्फुदस्फुदून रडूं लागली होती. तिनें आपले तोंड लपविले होतें. आपल्या अपराधाचें माप पुरें भरलें अशी खात्री होऊन तिच्या काळजाने ठाव सोडला होता.

'हेस्टिंग्स,' बॅरन इमहॉफ हेस्टिंग्सवर आपली जहरी नजर व बंदूक एकदमच रोखून ह्मणाला, 'तुला आपणा स्वतःबद्दल काय वाटते? ह्या जगात मनुष्यकल्प नेला जितका ह्मणून नीचपणा शक्य आहे तितका तुझ्या अंगी साठवला आहे असें तुला नाहीं वाटत? मनुष्याचे मन दुबळें असेल, सुंदर स्त्रीचा मोह त्याला होईल, हे सर्व खरे असले तरी आई, बहीण, भावजय, मित्रपत्नी असा काहीं तरी विवेक त्याला असतोच असतो. पण बोकडाप्रमाणे आपल्या मित्राच्या पत्नीला आपली पत्नी करूं इच्छिणारा सैतान तूं एकटाच आहेस असें तुला नाहीं वाटत? मी तुला काळाच्या दाढेतून ओढून काढण्याकरिता झटलों, आणि तूं माझ्या मृत्यूची वाट पाहत आहेस? मनुष्यत्वाकरिताच मनुष्याला जर जगण्याचा हक्क असेल तर तो मलाच आहे, तुला नाहीं. आणि ह्मणूनच मी तुझा प्राण घ्यावा हेंच रास्त आहे. पण जिच्याकरिता मी तुझा प्राण घ्यावयाचा ती माझी हानि आता भरून येणें शक्य नाहीं हें एक, आणि सूडाखातर तुझा प्राण घेतल्याची रुखरूख माझ्या सात्विक मनांतून कधींही निघून जाणार नाहीं हें दुसरें, अशा दोन कारणानी मी तुला जीवदान देत आहे. जा, आतां एक क्षणभरही माझ्यासमोर उभा राहूं नको. माझ्या क्षुब्ध मनःस्थितीचा मला स्वतःलाच विश्वास लागत नाहीं.' असें ह्मणून बॅरनने हातांतील बंदूक कोपऱ्यांत फेंकून दिली.

हेस्टिंग्सला दोन वेळ सांगण्याची आवश्यकताच नव्हती! तो चोरासारखा मुकाट्यानें बाहेर पडला.

" छिनाल स्त्रिये ! " बॅरन् इमहॉफ आपल्या बायकोकडे वळून ह्मणाला, ' तूं माझ्या प्रेमाची फेड अशा तऱ्हेनें केलीस अं ! मी निर्धन होतों, पण माझें प्रेम निर्धन नव्हतें. मी थोडा उतारवयस्क होतों, पण माझें प्रेम म्हातारें नव्हतें. हेन्रिएटा काय केलेंस हें ! एवढा अपराध सोडून तूं दुसरा कोणताही अपराध करावयाचा होतास, तो मी तुला माफ केला असता. पण तूं माझ्या सर्वस्वावरच निखारे ठेव-लेस. एवढ्या दारुण विपत्तींशीं मी जो आजपर्यंत झगडत राहिलों, तो केवळ तुझ्या प्रेमाखातरच नव्हे कां ! नाही तर या जगात मला अशी कोणती ओढ होती कीं, जिच्यासाठी मी जिवाचा एवढा आटापिटा करावा ? हाय हाय ! एटा, माझा केवढा घात केलास हा ! ' बोलतां बोलतां बॅरनचा कंठ भरून येऊन त्याच्यानें पुढे बोलवेनासें झालें.

बिचारी हेन्रिएटा ! ती काय बोलणार ? तिला बोलावयास तोंडच नव्हतें. तिनें खरोखरीच नवऱ्याचा असा अपराध केला होता कीं, त्याची भरपाई या जन्मी तरी करणें शक्य नव्हतें. आपल्या पापाचें प्रमाण लक्ष्यात येऊनच कीं काय, ती ओकसा बोकशीं रडूं लागली.

' एक काळ असा होता, ' बॅरन पुढें बोलूं लागला, ' की तूं सावलीप्रमाणें माझी साथ करीत होतीस. आपल्या स्निग्ध कटाक्षांनीं, मधुर बोलांनी आणि मोहक चेष्टांनीं तूं माझ्या दरिद्री नरकतुल्य प्रपंचाचें दिव्य नंदनवन बनविले होतेंस. तीच तूं आज माझ्या मरणाची वाट पहात आहेस. पण आतां त्या स्वप्नवत् झालेल्या प्रसंगाच्या आठवणी नकोत, ' इतके बोलून व उसासा टाकून बॅरन् घोगऱ्या आवा-जांत ह्मणाला, 'हेन्रिएटा, हेस्टिं–त्याच्याशी लग्न करण्यापासून तुला सुख लागणार आहे ना ? ठीक आहे, मी तुला जिवत असून मेल्यासारखा होतों. तूं माझ्या-वर बदफैलीपणाचा आणि कठोरपणाचा आरोप ठेवून न्यायकचेरींत काडीमोडीचा दावा कर. '

' काय ? काडीमोडीचा दावा करूं ? ' हेन्रिएटा ताडकन् उठून ह्मणाली, 'आणि तो तुमच्यावर बदफैलीपणाचा आणि कठोरपणाचा आरोप ठेवून ? छे, ती गोष्ट कालत्रयीं होणार नाही. ज्या तुह्मी मला आजवर एका शब्दानें देखील दुख-विली नाहींत, किंवा कृतीनें मला अंतर दिलें नाहींत, त्या तुमच्यावर बदफैलीपणाचा आणि कठोरपणाचा आरोप करून मी कुठल्या नरकाचें साधन करूं ? त्यापेक्षां मीच माझें पातकी जिणें प्रथम संपवितें. ' वाचकहो, हेन्रिएटाला या वेळीं खरोखरीच पश्चात्ताप झाला होता. तिला आपला नवरा एखाद्या देवदूतासारखा दिसूं लागला

होता. त्याच्या उदात्त शीलाशीं आपल्या सडक्या चरित्राची तुलना करून ती लाजेनें आणि पश्चातापानें होरपळून निघाली होती.

'तुला आत्महत्या करण्याचें कारण नाहीं,' बॅरन ह्मणाला, 'तुझ्यासारख्या तरुणीशीं आपलें तादात्म्य होईल असें मानण्यांत माझीच चूक झाली, असें मला वाटूं लागलें आहे. जा, मी ह्मटलें त्याप्रमाणें माझ्यावर दावा कर, न्यायकचेरींत त्या आरोपांना मी एकदम आपली संमति देईन. तूं पुनर्विवाह करायला मोकळी होशील.

'नाथ,' हेन्रिएटा बॅरनच्या पायावर लोळण घेऊन, आणि आपल्या अश्रूंनी त्याचे पाय भिजवून हुंदके देत ह्मणाली, 'आपण मला काय सांगतां हें? हें माझ्या हातून कधींही होणार नाहीं. पण आपण माझा अपराध पोटात घालणार नाहीं कां? मी अपराधी आहे, नीच आहे, अधमाधम आहे, पण देहानें तरी अजून शुद्ध राहिले आहे. मग नाथ, माझ्या पापाला प्रायश्चित्त नाहींच का?'

'त्याला एकच प्रायश्चित्त,' बॅरन निश्चयी स्वरानें ह्मणाला, 'मी सांगतों त्याप्रमाणें तूं माझ्यावर फिर्याद लावावीस.'

'आणि मी नाहीं लावली तर?' हेन्रिएटा वर मान करून सजल नेत्रांनीं बॅरनकडे पहात ह्मणाली.

'तर मी तुझ्यावर व्यभिचाराचा आरोप ठेऊन फिर्याद लावीन,' बॅरन खोल आवाजाने ह्मणाला, 'तूं देहानें अद्याप शुद्ध आहेस हें मी जाणतों. पण तुझें मन अगदी सडून गेलें आहे आणि अशा स्थितीत आपला यापुढे सुखानें संसार होणे शक्य नाहीं. हेस्टिंग्सची तुला आलेलीं पत्रे मी पाहिली आहेत आणि आज मला कर्नाटकात कपाशीच्या पाहणीकरिता रवाना करण्यांत त्याचा हेतु काय होता तेंही आता स्पष्टच दिसून आले आहे. मी तर तिकडे जातोंच, पण मला तिकडे महिना दोन महिने रहावें लागेल तेवढ्या अवधींत तूं हेस्टिंग्सच्या भुलथापांना बळी पडून आपलें शील मात्र गमावूं नको एवढेंच माझें तुला अखेरचें सांगणें आहे.'

हेन्रिएटा बॅरनच्या पायाला मिठी मारून हुंदके देत ह्मणाली, 'नाथ, एकवार मला क्षमा करा आणि यापुढें मी कशी वागते याची परीक्षा करा.'

'त्याचा कांहीं उपयोग नाहीं,' बॅरन पत्नीच्या मिठीतून आपला पाय सोडवीत ह्मणाला, 'तूं मनाचा कितीही निर्धार केलास तरी तो आपल्या विषम परिस्थितीत टिकणें शक्य नाहीं आणि तुझ्या मनावर असले कृत्रिम दडपण घालण्याची माझी बिलकूल इच्छा नाहीं. एका शब्दांत सांगावयाचें म्हणजे आपण दोघें आजपासून एकामेकांस मेलों आहोंत. आपल्या धर्माप्रमाणें पतिपत्नींची ताटातूट होण्यास एकानें दुसऱ्यावर काडीमोड मिळविलीच पाहिजे, त्याला उपाय नाहीं. त्यातून स्त्रीची बेअब्रू

होण्यापेक्षां पुरुषाची झालेली बरी, एवढ्या एकाच विचारानें मी तुला हा सल्ला दिला आहे. तुला न्यायकचेरींतून काडीमोड मिळेपर्यंत आपण पतिपत्नींच्या नावानें एकत्र राहूं, पतिपत्नींच्या धर्मानें राहणें शक्य नाहीं, हें तुला कळतेंच आहे. तेव्हां आतां जितक्या लवकर तूं माझ्यावर फिर्याद लावशील तितकें तुझ्या हिताचें आहे. याउप्पर तुला कसें बरें दिसेल तसे कर,' असें ह्मणून बॅरन तडक बाहेर पडला.

---

## प्रकरण १६ वें.

खरे. ले. ८५७ ते ले ९०० ] **मोहिमीचा प्रारंभ.** [ मार्ग. व. १३ ते माघ व. ३

मार्गशीर्ष वद्य त्रयोदशीच्या दिवशीं कोपळचे मुक्कामी श्रीमंतानीं मोहिमीचें धोरण आखून गोपाळराव पटवर्धनास निरोप दिला ही हकीगत वाचकांच्या स्मरणात असेलच. त्या गोष्टीस आज तीन महिने पुरते होऊन गेले होते आणि माघ महिना संपून गेला होता. एवढ्या अवधींत श्रीमंतांच्या लष्कराच्या हालचालीही बऱ्याच झाल्या व त्याने कामागिरीही पुष्कळच केली. त्या सर्व विस्ताराने लिहीत गेल्यास आमच्या [illegible]ची वाढ बेसुमार होण्याचा संभव आहे. यास्तव त्यांचा संक्षेपानें निर्देश करून [illegible] धागा मात्र-वद्याच्या अखेरीस आणून मिळवूं.

गोपाळरावास जरूर त्या सूचना देऊन त्याची परत सावनुरास रवानगी केल्याबरोबर श्रीमंतानीं कोपळाहून आपला तळ उठविला आणि तुंगभद्रा उतरून ते श्रीरंगपट्टणच्या रोखानें निघाले. वाटेने जाता जाता बुधेहाळास मुक्काम पडला व त्याच दिवशीं तें ठाणें काबीज झालें. आत बाराशें प्यादे व दोनशें पठाण होते, पण तोफाचे पाच सात बार होताच त्याची हिंमत खचून गेली व त्यानीं निमूटपणे ठाणे हवालीं केले. हागलवाडी, हंदिकिरे आणि चिकनायकनहळ्ळी हीं ठाणी विशेष श्रम न पडता ताब्यात आलीं. कंदिकिऱ्याच्या लोकानीं ठाणें झुंजविण्याचा निश्चय दाखविल्यामुळें मराठ्यानी तोफा लावून त्या ठाण्याची तटबंदी पाडून टाकली व तें लुटून फस्त केलें! श्रीमंतानीं चिकनायकनहळ्ळींतून एक लक्ष पसतीस हजार व हंदिकिऱ्यापासूनही थोडी बहुत खडणी वसूल केली. पुढें तुरविकिरें नावाचें ठाणें लागलें, तेंही काबीज करण्यात आलें. नंतर श्रीमंताची फौज श्रीरंगपट्टणच्या रोखानें नागमंगलपर्यंत जाऊन पोंचली. वाटेनें जाता जातां तिनें आगखोंही पुष्कळ ठाणीं काबीज केलीं. त्यातल्या कांहींवर श्रीमंतांनी आपली

शिबंदी ठेवून दिली, व बाकीचीं पाडून टाकली. असें करण्याचें कारण हें कीं, पट्टण प्रांतीं किलेवजा ठाणीं फार असल्यामुळें, तीं सर्व राखावयाचीं ह्मटलें असतें तर त्यात ठेवावयास गारदी पुष्कळच लागले असते. श्रीमंतांजवळ अगोदर गारदी पंधरा हजारच होते. आणि त्यांतले कोठें दोनशें, कोठें तीनशें, असे ठाण्यांतून ठेवता ठेवता आता त्याच्याजवळ गारद्यांचें बळ थोडेच राहिलें होतें. आणि जे राहिलें होतें तें लष्कराला अगदीं जरूरीचें होतें. यामुळें त्यांनीं वर लिहिल्याप्रमाणें ठाणीं पाडून टाकण्याचा उपक्रम केला होता. पण पुढें तसे करून भागण्याजोगें नाही अशी ठाणीं जेव्हा लागूं लागलीं, तेव्हा त्यांनी कोठें आपले लोक, तर कोठें चित्रदुर्गसारख्या संस्थानिकाचे लोक, तर कोठें हैदराच्या जुन्या शिबंदीतले लोक देखील ठाण्यातून ठेवण्यास प्रारंभ केला! मात्र त्यांच्यावर देखरेख करण्याकरिता दर ठाण्यातून थोडेथोडे मराठे शिपाई ठेवण्याची ते खबरदारी घेत होते. विशेषतः ज्या ठाण्यातून थोडीबहुत खंडणी मिळे त्या ठाण्यांत श्रीमंत असा बंदोबस्त करीत.

यानंतर नागमंगल व बेळूर हीं दोन ठाणी श्रीमंताच्या हातीं लवकरच आलीं. त्यापैकीं नागमंगल पाडून टाकून श्रीमंतानी बेळूर आपणाकडे ठेवलें व त्यात दारूगोळा आणि धान्यसामग्री भरून याच्या शिबंदीचीही व्यवस्था केली. इकडे हैदर जो मासूरच्या बारींत एकदा जाऊन दडून बसला तो काही केल्या तोंडच बाहेर काढीना! त्यानें आपल्या राज्याची जणु काय आशाच सोडली. नाही ह्मणावयास श्रीरंगपट्टण व बेंगरूळ या दोन किल्याचा मात्र त्यानें पक्का बंदोबस्त करून ठेवला होता. त्याला आता एकच आशा होती, ती ही कीं, पावसाळ्यात पेशव्याच्या फौजा देशीं परत गेल्या कीं आपण आपला सर्व मुलूख जिंकून परत घेऊं. या एकाच आशेवर तो आपल्या मुलखाची चाललेली दुर्दशा डोळे मिटून पहात होता. दरम्यान् कालहरण करण्याकरिता त्याने श्रीमंतांबरोबर तहाचे बोलणें चालूं ठेवलेंच होते. पण दोघाच्या अटींत जमीन अस्मानची तफावत होती. हैदर ह्मणे मी फक्त बारा लक्ष रुपये खंडणी देईन, व पेशवे सरकार ह्मणत होते, आपण एक कोट रुपये घेऊं! अर्थात् अशा अमर्याद फरकाने चाललेले बोलणे तोडीस आलें नाहीं हें सांगावयास नकोच. हैदरास आणखी एक मोठी आशा होती कीं, पेशवे पट्टण किंवा बेंगरूळ घेण्याच्या नादास लागावे आणि त्या स्थळाच्या दुर्भेद्यत्वामुळे त्याची सर्व शक्ति त्या दोन स्थळाना जिंकून घेण्यांतच खर्च पडावी, ह्मणजे अनायासेंच आपल्या इतर मुलखाचा बचाव होईल. पण श्रीमंत रावसाहेब हैदराच्या बारशास जेवलेले असल्यामुळें ते असल्या भलत्या भरीस न पडतां, कोल्हार व चिकबाळापूर परगण्यांच्या रोखानें निघाले. या संधीस

श्रीमंतांच्या सैन्यांतही आणखी भर पडली. चित्रदुर्गकर संस्थानिक तीन हजार उत्तम पायदळ व कांहीं स्वार घेऊन आला. देशाहून सदाशिव रामचंद्र, नारो शंकर राजेबहाद्दर आणि बाजीपंत अण्णा हे सरदार आणि नागपुराहून मानसिंगराव वाघ व मजीदखान रोहिला हे आले, त्यांबरोबर एकंदर आठ नऊ हजार स्वार होते. थोड्याच दिवसांत कडपें व कर्नूळ येथील नबाब आणि गुत्तीकर मुरारराव घोरपडे हेही येऊन मिळाले. मुरारराव चार हजार फौज व दोन तोफा घेऊन आला त्यामुळें श्रीमंतांना चांगलाच आधार आला.

श्रीमंतांनीं हैदराचें पूर्वेकडील सर्व राज्य जिंकावें असा बेत करून महिमाजी शिंदे नांवाच्या सरदारास तीन हजार फौजेसह गुर्रमकोंडा प्रांत लुटावयास पाठविलें. हा गुर्रमकोंडा प्रांत श्रीमंतांनीं आपणास फितूर झालेला हैदराचा मेहुणा मीररेझा यास जहागीर दिला होता, पण तो मीर बेमान होऊन प्रस्तुत हैदरास जाऊन मिळाला असल्यानें श्रीमंतानी गुर्रमकोंडा प्रात पुन्हा जप्त करण्याचा विचार करून ही योजना केली होती. मीर रेझास ही बातमी लागतांच तो हैदराच्या लष्करांतून फुटून पाच हजार फौजेसह गुर्रमकोंड्याच्या रक्षणासाठीं धाऊन आला. मीर रेझा जितका यलमी तितकाच महिमाजी शिंदे अडाणी असल्यामुळें, श्रीमंतानी महिमाजीस परत बोलावून राघो बापूजी व आनंदराव गोपाळ नांवाच्या सरदारास मीर रेझाच्या तोंडावर पाठविले. हे सरदार येताच मीर रेझा पळून गेला, आणि मराठी फौजेनें सारा गुर्रमकोंडा प्रात लुटून जाळून बेचिराख करून टाकला!

चिकबाळापूरच्या बाजूस आल्याबरोबर श्रीमंतानी प्रथम भैरवदुर्गास वेढा घातला. हा मजबूत पहाडी किल्ला बेंगळुरापासून अवघ्या आठ कोसांवर असून तो शहाजीराजे भोसले यांनी शके १५३१ साली बांधविला होता. तेथे भैरवाचे देवस्थान असून लोकवस्तीही पुष्कळ होती. शिवाय भोंवतालच्या गावातले हजारों लोक आपली वस्तवानी घेऊन तेथे आसऱ्याकरितां गोळा झाले होते. त्या किल्लयास श्रीमंतांनी मोर्चे देऊन तोफा सुरूं केल्या, आणि माघ वद्य प्रतिपदेच्या दिवशी पहाटेच्या सुमारास किल्ला जिंकून घेतला. नंतर लूट सुरूं झाली ती सर्व दिवसभर चालली होती. तिजमध्यें गांवचे यजमान आणि परगावचे सर्व पाहुणे वस्त्रपात्रानिशीं साऱ्या जिनगीस नागवले जाऊन बाहेर हकालले गेले. त्यात अनेक ब्राह्मणही होते. श्रीमंतांना ही बातमी कळताच त्यांनीं त्या ब्राह्मणांस बोलावून आणून जेवावयास घातलें व एकेक वस्त्र देऊन पाठवून दिलें. हा किल्ला मजबूत व नाक्यावरचा असल्यामुळें श्रीमंतांनीं तेथें चारशें गारदी ठेऊन किल्लयाचा चांगला बंदोबस्त केला आणि तेथून ते मागडीवर गेले. ताबडतोब तें ठाणें जिंकून त्यांनीं पाडून टाकलें आणि तेथली पेठ लुटून फस्त केली. देवनहळ्ळीच्या ठाण्या-

चीही तीच दशा झाली. देवनहळ्ळी घेतल्यावर श्रीमंत चिकबाळापुरास गेले.

श्रीमंत इतके लांब गेले असें पाहून हैदरला धीर आला आणि त्यानें हात पाय हलविण्यास सुरवात केली. तो मासूरच्या बारीच्या तोंडाला उडगणी येथें असून तेथें त्यानें तोफांच्या बातेऱ्या बांधल्या होत्या. आपलें सर्व बुनगें उडगणीस ठेवून तो सड्या फौजेनिशीं बाहेर पडला आणि तरीकिऱ्याच्या रोखानें निघाला. पण गोपाळराव पटवर्धन त्याच्या पाळतीवर असल्यामुळें हैदरानें कूच करतांच त्यानेंही आपला तळ हलविला आणि हैदर तरीकिऱ्यास जातो तोंपर्यंत गोपाळराव त्याच्या पाठीवर हरिहरास येऊन राहिला. तरीकिऱ्यापासून हरिहर तीस कोस मागें आणि चिकबाळापूर पन्नास कोस पुढें आहे. आपण तरीकिऱ्यास आहों तोंपर्यंत गोपाळराव आपल्या पिछाडीस असावयाचा अशी हैदराची खात्री होती. पेशव्यांची मुख्य फौज चिकबाळापुरास पेशव्याबरोबर होती, ती तिकडील मुलूख लुटण्यांत व किल्ले घेण्यांत गुंतली आहे, आणि मधला पन्नास कोसांचा टापू रिकामा आहे, ही संधि साधून आपलीं गेलेलीं ठाणीं परत मिळवावीं आणि चित्रदुर्ग, शिरें, मदगिरी वगैरे पेशव्याचा आणि त्याच्या मांडलिकाचा मुलूख जाळून लुटून उध्वस्त करावा असा बेत करून हैदरानें हालचाली करण्यास प्रारंभ केला.

चिकनायकनहळ्ळीत श्रीमंतांनीं अकराशें शिबंदी ठेवली होती, तिजमध्यें सुमारें सव्वाशें दीडशेंच काय ते मराठे होते. चारशें लोक चित्रदुर्गकरांचे होते, आणि बाकीचे तर खुद्द हैदराच्याच तैनातीतले पूर्वीचे लोक होते. ह्या जुन्या लोकानीं चित्रदुर्गकराच्या लोकास फितवून आपणाकडे वळवून घेतलें आणि माघी पौर्णिमेच्या रात्रीं हैदराचे तीन हजार शिपाई भिंतीस शिड्या लावून आत घेतले. त्याची चाहूल मराठ्यास यत्किंचित् लागली नाहीं. मग त्या सर्व लोकाचा मारा शेंदीडशें मराठ्यावर पडला. चार घटका मराठ्यानीं खूप तारफेची लढाई केली. पण चार हजार लोकापुढे एवढ्या लोकाचा किती वेळ टिकाव लागणार? त्याचे पंचवीस असामी ठार झाले. चाळीस सुमारे असामी जखमी होऊन शिऱ्यास पळून आले. बाकीच्या ऐशीं जणांस शत्रूच्या लोकानीं धरून हैदरखानाकडे तरीकिऱ्यास नेलें. त्यानें त्यांचे नाक कान कापून त्यांस सोडून दिले! चिकनाइकनहळ्ळीची बातमी कळताच कंदीकिरें व हंदीकिरे या ठाण्यांतल्या लोकानीं दहशत खाऊन पळ काढला, आणि तीं ठाणीं विनायासें शत्रूच्या हातीं सापडलीं! हैदरानें या संधीचा फायदा घेऊन तुरीविकिऱ्याच्या ठाण्यावर छापा घातला व तेंही काबीज केलें. मीर रेझानेंही याच संधीस बरीच धामधूम उडवून दिली. त्यानें शिऱ्यावर हल्ला करून तेथली पेठ लुटण्याचा प्रयत्न केला, पण तेथला किल्लेदार मुकुंदराव श्रीपाद हा सावध असल्यामुळें रेझाची कांहीं

मात्रा चालली नाहीं. मीर रेझा तेथून जवळच असलेल्या बुकापट्टण नांवाच्या ठाण्याकडे वळला आणि त्याने तें घेऊन लुटलें. पण तेथील ठाणेदार साजो शामजी यानें त्याच्यावर बंदुकीचा असा मारा केला कीं रेझाला लूट टाकून पळून जावें लागलें! नंतर मीर रेझा तेथून निघाला तो आसपासचे दहा बारा गांव लुटीत देवराजदुर्गावर आला. पण श्रीमंताच्या लष्करातून मल्हारराव पानशे आठ हजार स्वारानिशी आपल्या पाठीवर आले हें कळताच तो जो पळाला तो हैदरास जाऊन मिळेपर्यंत थाबला नाही.

चिकनायकनहळ्ळीची हकीगत ऐकून श्रीमंतांच्या अंगाची लाही झाली. त्यानी ताबडतोब नरसिंगराव धायगुडे, शहाजी भोसले अक्कलकोटकर व महिमाजी शिंदे यांना तीन हजार स्वारानिशीं चिकनायकनहळ्ळीच्या रोखें रवाना केलें आणि गोपाळराव पटवर्धनासही हरिहराहून मतोडास तळ नेण्याबद्दल हुकूम पाठविला. एकीकडून वर उल्लेखिलेले तीन सरदार आणि दुसरीकडून गोपाळराव पटवर्धन आपणावर चालून आले हें पाहताच चिकनायकनहळ्ळी, कंदीकिरे व हंदीकिरे या तीन्ही ठाण्यातले हैदराचे लोक ठाणी सोडून पार पळून गेले आणि ती ठाणी पुन्हा मराठ्याच्या हातात आली. लगेच तुरीविकिऱ्याचे ठाणेहि पडले. पण या ठाण्यातून शिबंदी ठेवून ती राखण्याचा प्रयत्न करणे एकदरीत श्रेयस्कर नाही असा विचार करून गोपाळरावानें त्या चारी ठाण्याची तटबंदी पाडून जमीनदोस्त केली व तो मतोडासच तळ देऊन राहिला. श्रीमंतानी तर मुलूख काबीज करण्याची आणि किल्ले घेण्याची नुसती झोड उठवून दिली ! बरोबर सैन्य असूनही या मुदतीत त्याच्या हालचाली इतक्या त्वरित होत होत्या की, बहुधा कोणत्याही गावी एक दिवसाच्यावर त्याचा तळ पडलाच नाही !

हैदरअली तरीकिऱ्यास राहिला असून त्याच्या मनात चित्रदुर्गकर मराठ्याना मिळाल्याबद्दल त्याचा सूड घ्यावा आणि पेशव्याच्या मागून हळू हळू जाऊन त्यानीं जिंकून घेतलेलीं आपली ठाणी परत जिंकून घ्यावी, असे होते. परतु मराठी मुलूख पाठीशी घालून भोवतालची ठाणी साभाळण्याकरिता गोपाळराव पटवर्धन त्याच्या छावणीपुढे अठराच कोसावर तळ देऊन राहिला असल्यामुळे त्याचा कांहीं इलाज चालेना. हैदर पूर्वी उडगणीस होता, तेव्हा धारवाडचा सुभा व सावनूरचें राज्य लुटण्याचा त्याचा बेत गोपाळरावानें साधू दिला नव्हता. या काचणींतून एकदा सुटण्याचा प्रयत्न करावा आणि आपला मुलूख सोडवून घ्यावा असा विचार करून तो आता तरीकिऱ्यास ला तरी गोपाळराव येथेंही दत्त ह्मणून उभा आहेच! बरें, मैदानांत उतरून एखाद्या मातबर ठाण्यास वेढा घालावा तर एकीकडून गोपाळराव पटवर्धन व दुसरीकडून पेशवे यांच्या दामटींत सापडून आपला चुराडा उडेल असें त्यास फार भय होतें. बरें, एखादें ठाणें लुटण्याकरिता

एखादी लहानसहान टोळी पाठवावी तर गोपाळराव तिला गांठून तिचा नायनाट करील ही दहशत होती. आणि सारी फौज घेऊन त्याच्यावर एकदम तुटून पडावें तर तो घटकेत पळून जाणार आणि पुढच्याच घटकेंत अंगावरही चालून येणार! अशा स्थितींत हैदरअल्ली इतका वैतागून गेला कीं, गोपाळराव पटवर्धन हा त्याला जन्मजन्मातरींच्या दुष्मानासारखा दिसूं लागला आणि त्याच्यावर चोरून छापा घालून त्याच्या फौजेचा निःपात केल्याशिवाय आपली सुटका होत नाही अशी त्याची खात्री झाली, व तो तशा संधीची वाट पाहत राहिला.

पण हैदरानें गोपाळरावावर छापा घालण्याचा बेत जरी केला, तरी तो अमलात आणणें तितकेंसे सोपें नव्हतें. गोपाळरावाची व त्याची जानपछान काहीं आजकालची नव्हती. त्याच्यावर छापा घालण्यासाठी आज बारा वर्षे हैदर टपला होता, तरी ती गोष्ट त्याला एकदा देखील साध्य झाली नव्हती. कारण हैदरअल्ली ह्मणजे काय चीज आहे हें जाणून गोपाळराव त्याच्याशी फार सावधगिरीनें वागत असे. त्याची छबिन्याची फौज गोटापासून कोस अर्धा कोसावर रात्रभर पहारा करीत हिंडत असे. तलाव्याची फौज तरीकिऱ्याच्या बाजूस रोज दहाबारा कोस जाऊन परत येई. गोटापासून पाच सहा कोसावर शत्रूचे तरीकिरा व अजमपूर या तालुक्याचे गाव लागत गेले होते. त्यापैकीं लष्करास दाणावैरग पुरविण्याकरितां दररोज एक दोन तरी लुटून उध्वस्त करण्यात येत होते. पण त्या कामावर सुद्धा तीन चार हजार चागली फौज व एखादा सरदार पाठविण्यात येत असे. तलाव्याकरिता एक दिवस स्वतः गोपाळराव, एक दिवस त्याचे चुलतबंधू नीळकंठराव व परशरामभाऊ, आणि एक दिवस आनंदराव रास्ते याप्रमाणे पाळीपाळीनें जात असत, व पञ्चवीस पचवीस कोसांची देखील दौड मारून परत येत असत! छबीन्यास सुद्धा पाळीपाळीनें हे सरदारच उभे रहात असत. इतक्या तजविजीनें राहणाऱ्या आपणावर हैदराचा छापा येणे हें गोपाळरावास आणि तो घालणें हैदरअल्लीस अशक्य वाटत होते, यात नवल काय? पण अशा परिस्थितीतही हैदरला काहीं गोष्टी अनुकूल होत्या, आणि त्यांचा उपयोग करून हैदरानें गोपाळरावावर छापा घालावयाचा बेत केला. तो मुलूख सर्व कानडी होता, आणि रयत, जमीनदार, पुंड आणि पाळेगार असे सर्वच लोक हैदराच्या बाजूचे होते. त्याची आपल्या लष्करांत इतकी जरब होती कीं, त्याच्या लष्करातील लोकांच्या तोंडून त्याच्या हालचालींची खरी बातमी महसा बाहेर फुटत नसे. उलट त्याचे हेर मात्र मराठ्यांच्या लष्करांतील बातमी त्यास बिनचूक पुरवीत असत.

माघ महिना जसजसा सपत आला, तसतसा हैदरानें आपला बेत सिद्धीस नेण्याचा मोठ्या कुशलतेनें उपक्रम केला. गोपाळरावास भूल पाडण्याकरितां त्यानें

जिकडे तिकडे पुकारा केला कीं, आता आपण थेट श्रीरंगपट्टणास जाणार. एके दिवशीं तो स्वतःच तरीकिऱ्याहून निघाला तो दक्षिणेकडे सहा कोसांवर संकरापट्टणास जाऊन राहिला. त्याच्या व गोपाळरावाच्या फौजांमध्यें जे पूर्वी अठरा कोसाचें अंतर होतें तें चोवीस कोसांचें होऊन राहिलें. संकरापट्टणहून तो दरकूच श्रीरंगपट्टणाकडे जावयास निघाल्याची अगदीं खात्री पटण्याजोगी बातमी गोपाळरावास वारंवार कळूं लागली, आणि ती त्यास खरी वाटून त्याच्या बंदोबस्तांत कांहींसा शिथिलपणा व बेसावधपणा आला. हैदर संकरापट्टणास तीन दिवस होता. तेथून माघ वद्य त्रयोदशीच्या रात्रीं तो कडूर येथें आला. दुसरे दिवशी दोन प्रहरीं बारा तेरा हजार गारदी, चार हजार स्वार, पंचवीस तोफा, व बाणाचे पन्नास उंट बरोबर घेऊन तो जो एका आडवाटेनें निघाला, तो सारा दिवसभर व सारी रात्रभर चालून पहांटेस पाच घटका रात्र असता छबिने चुकवीत चुकवीत गोपाळरावाच्या छावणीसमीप येऊन ठेपला !

---

## प्रकरण १७ वें.

### ज्योतिषीबुवा [ माघ व ३० इं. ता. २५-२-१७७०

त्याच म्हणजे माघ वद्य अमावास्येच्या दिवशी तिनिसाजच्या सुमारास पुणे येथें शनवार वाड्यात जाभळी दरवाजासमोरच्या हौदावर भिक्षुक मंडळींचे संध्यावंदन चाललें होतें. काहीं भिक्षुकाचीं स्नाने झाली होती, आणि काहींचीं होत होतीं. स्नानें केलेली मडळी आपापल्या तावे पंचपात्र्या भरून घेऊन, धावळ्या किंवा मृगाजिने हौदाजवळील कट्ट्यावर पसरून संध्येला बसली होती. त्याच्या कपाळावरचे भस्माचे त्रिपुंड्र, त्याच्या चर्येवरील शुचिर्भूतपणाचे तेज, आणि त्याच्या तोंडातला वेदमंत्राचा घडघडाट यानीं सभोवतालच्या वातावरणात एक प्रकारचे पवित्र चैतन्य उत्पन्न करून सोडलें होतें. आजच्या तर्कप्रधान काळात ह्या ब्रम्हवृंदाच्या भावनाप्रधान मृत्युजयानुष्ठानासारख्या दैवी उपायावर विश्वास ठेवणारे लोक फारसे सापडणार नाहीत हे खरें, पण आमच्या कथानकाच्या काळचा बहुजनसमाज अशा प्रकारच्या उपायावर पूर्णपणे श्रद्धा ठेवीत होता. त्यातून ज्याचें आचरण चोख आहे अशी लोकांची खात्री असे, अशा ब्राह्मणाच्या दृष्टिक्षेपात, शब्दांत, संकल्पात, फार काय पण नुसत्या सांनिध्यांत देखील दैवी शक्ति वास करीत असते अशी त्याची भावना असे. असल्या ब्रह्मवृंदाला समाज अत्यंत पूज्य मानीत असे. आमच्या विधानाचे

प्रत्यंतर पहावयास फार दूर जावयास नको. तो पहा वाचकहो, जांभळी दरवाज्या-वरचा पहारेकरी देवीसिंग परदेशी आपल्या एका सोबत्याच्या कानांत पुटपुटतो आहे, ' या भटांच्या स्नानसंध्येच्या गुनानं तरी सरकार खाशाची तब्येत चांगली राहो बाबा, ' आणि मणिराम त्याला परत धीर देतो आहे, ' अरे दोस्त, राहील यांत काय तुला संशय वाटतो होय ? अरे असल्यांच्या मंतर तंतरानें जर सरकार स्वारीला गुण वाटला नाहीं, तर काय तुमच्या आमच्या यंतरानें येणार आहे ? '

पण देवीसिंगाला आपल्या यंत्रासंबंधी अभिप्राय व्यक्त करावयास फुरसतच झाली नाही, कारण तितक्यांत एक प्रतिष्ठित पोषाख केलेला ब्राह्मण जाभळी दरवा-जाशीं आला, आणि देवीसिंगाला उद्देशून ह्मणाला, ' हवालदार, वाड्यांत जाण्याची वाट हीच असेल नाही बरें ? ' त्याचा तो एकंदर पोषाख, चेहऱ्यावरची बेफिकीर ऐट, बोलण्याची सफाई वगैरे चिन्हांवरून हा कोणी तरी परस्थ ब्राह्मण आहे, अशी देवीसिंगाची खात्री झाली व तो त्या भटजीस उद्देशून ह्मणाला, ' भटजी, वाड्यात जाण्याची ही वाट नव्हे. तुह्मी असे उजव्या बाजूनें वळून दिल्ली दरवाजाशी चला ह्मणजे तेथले पहारेकरी तुमची वर्दी लाऊन देतील. पण तेथें झालें तरी नाना फड-णिसाकडे तुमची वर्दी लागून त्यांची परवानगी झाल्यावाचून तुह्मांस आंत सोडणार नाहींत. '

' अरे बाबा, नानाची गांठ घेण्याकरितांच तर मी वाड्यांत जाणार आहे, ' भटजी ह्मणाला, ' मी प्रथम नानाच्या घराकडे शोध केला, तों असें समजलें कीं ते अद्याप वाड्यातच आहेत. तेव्हा मग येथें आलों. मला काय, कोणीकडून तरी नानांची भेट झाली ह्मणजे झाले. '

' तरी सुद्धा तुह्मांला त्याच दरवाजावर गेलें पाहिजे, ' मणिराम ह्मणाला, ' या दरवाजानें माणूस सोडावयाची आह्माला परवानगी नाहीं. '

' भल्या गृहस्था, तो दरवाजा काय, नि हा दरवाजा काय, आम्हांला दोनींचा हिशेब सारखाच ' भटजी ह्मणाले, ' आह्मी नाशिककडचे ज्योतिषी, पंतप्रधानाच्या दरबारात गुणिजनाचा चागला परामर्ष घेतात असे समजल्यावरून येथपर्यंत आलों. पण येथें पहावे तों आत जाण्यासच छपन्न परवाने आणि पासष्ठ चौक्या ओलां-डाव्या लागतात असें दिसते. अशा स्थितींत आमची दाद काय लागणार हें दिसतेंच आहे. इतक्या जिकीरीनें नानांची गांठ घेण्याची आम्हाला गरजच नाहीं. ' असें ह्मणून भटजीने पाय वळविल्याचा आविर्भाव केला.

देवीसिंगाच्याच काय, पण मणिरामाच्या मनावरही भटजीच्या निस्पृहपणाचा थोडाबहुत परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. पण ते तरी बिचारे काय करणार? जांभळी दरवाजानें बाहेरचा मनुष्य आंत सोडावयाचाच नाहीं असा नानांचा सक्त

हुकूम असल्यामुळें त्यांना त्या भटजीबद्दल कितीही सहानुभूति वाटली तरी त्याला त्या दरवाजानें आंत सोडणें त्यांच्या हातीं नव्हतें. तथापि त्याला क्षणभर पहाऱ्यावर बसवून घेऊन त्याची नौनांना वर्दी देणें आणि त्याची परवानगी आल्यास तिच्या मोघमपणाचा उपयोग करून त्या भटजीचा आंत प्रवेश करून देणें एवढें त्याना करितां येण्याजोगें होतें. आणि काय असेल तें असो, भटजीचा एकंदर नूर पाहून देवीसिंगाच्या मनांत त्याच्याबद्दल आदर उत्पन्न झाला आणि हा प्रयोग करून पाहण्याचें त्यानें ठरविलें. त्यानें भटजीला हाक मारून देवडीवर बसवून तर घेतलेंच, पण शिवाय त्याला उगाच ताटकळत बसण्याचा प्रसंग येऊं नये ह्मणून तो त्याची वर्दी पोचविण्याकरिता कोणी सरकारी हुजऱ्या जवळून येतो जातो कां याची वाट पाहूं लागला.

पण देवीसिंगाला फार वेळ वाट पहावी लागली नाही. थोड्याच वेळात एक हुजऱ्या लालचौकाकडून येऊन मोतीचौकाकडे जात असलेला त्यास दिसला. त्याला पाहतांच देवीसिंग त्यास हटकून ह्मणाला, 'मल्हू, नाना फडणिसास्नी भेटाया ह्ये जोतिशी बुवा आले हैती, त्येंची त्येवडी वर्दी द्ये बरं?' मल्हारीनें वळून एकदा ज्योतिषीबुवाकडे नजर टाकली, पण त्याची त्याला ओळख लागलीसे त्याच्या चर्येवरून दिसलें नाहीं. त्यानें विचारलें, 'कन्च्या गावच जोतिशी ह्मनून सागूं जी?' देवीसिंगाला ज्योतिषीबुवाचे गाव नक्की ठाऊक नव्हतें. म्हणून तो ते ज्योतिषीबुवाना विचारणार, तों ज्योतिष्यानेंच खणखणीत आवाजात उत्तर केलं, 'नाशिकचे ह्मणून साग.' मल्हारी 'वर्दी घेतों, तवर हतच बसा,' असे ह्मणून निघून गेला आणि ज्योतिषीबुवा आपल्या उत्तराचा समोरच्या हौदावर स्नानसंध्या करीत असलेल्या ब्रह्मवृंदाच्या कानावर आणि मनांवर काय परिणाम झाला असावा हे अजमावीत देवडीवर बसून राहिले.

आणि ज्योतिषीबोवाच्या उत्तराने हौदावर असलेल्या भिक्षुक मंडळीची जिज्ञासा जागृत केली खरीच. हे नाशिकचे ज्योतिषी आहेत हे ऐकताच ब्रह्मवृंदापैकीं बहुतेकाची नजर आपोआप त्याच्याकडे वळली होती आणि 'काय हो, यांची कोणाला ओळख लागते का?' अशा प्रश्नार्थक आशयाची मुद्रा करून प्रत्येक जण एकमेकाकडे आणि ज्योतिषीबुवाकडे आळीपाळीनें पाहूं लागला होता. बापूभट पाळंद्याची कुतूहलबुद्धि तर इतकी बळावली कीं, ते आपली सध्या आटोपून उठले, ते खाकोटीत गवाळे घेऊन तडक ज्योतिषीबुवाच्या जवळ आले आणि 'आपलें नांव काय हो?' म्हणून त्यानीं ज्योतिषी बुवांना एकदम प्रश्न केला! पण ज्योतिषीबुवानीं त्या प्रश्नाचें उत्तर मोठ्याने न देता आपले तोंड हळूच बापूभट पाळंद्यांच्या कानाशी नेले आणि ते त्याच्या कानात काहीं पुटपुटले. तोंच काय चमत्कार सांगावा? बापुभटजींच्या हातातलें गवाळें पटकन् खालीं

पडलें, त्यांचा चेहरा एकदम गोरामोरा झाला, आणि ते एखाद्या वेड्या मनुष्याप्रमाणें ज्योतिषीबुवाच्या तोंडाकडे टकमक पाहत राहिले! इतर वैदिक मंडळी हा प्रकार पहात होतीच. बापूभटजी पाळंद्यांनीं ज्योतिषीबुवांना काही तरी विचारिले, ज्योतिषीबुवानीं त्याच्या कानांत काही तरी सांगितले, आणि त्याचा बापूभटजींवर विलक्षण परिणाम झाला हे सर्व पाहून बाकीच्या मंडळींच्या मनात प्रबळ जिज्ञासा उत्पन्न झाली, आणि त्यातले बरेच जण हौदाच्या चौथऱ्यावरून उतरून खाली येऊन 'कायहो बापूभटजी, त्यानीं तुम्हाला काय सांगितले?' असें विचारीत देवडीपाशी गोळा झाले. पण त्याना उत्तर देण्याजोगी बापूभटजींची मनःस्थितीच नव्हती. ते आश्चर्याने मूढ होऊन जे एकदा तोंड वासून राहिले होते ते अद्याप तसेच होते! तेव्हा काय झाले ते आपण ज्योतिषीबुवानाच विचारून घ्यावें, अशा हेतूनें महादेवशास्त्र्यानीं ज्योतिषीबुवाना प्रश्न केला, 'कायहो ज्योतिषीबुवा, त्याना आपण काय सांगितलेत?' ज्योतिषीबुवानीं महादेवशास्त्र्याचा प्रश्न ऐकताच क्षणमात्र त्याच्या चेहऱ्याकडे रोखून पाहिले आणि अमळ पुढे मान करून ते शास्त्री मजकुराच्या कानात काही पुटपुटले. तोंच काय आश्चर्य? महादेवशास्त्र्याचा चेहरा खर्रकन् उतरला, त्याच्या पोटात कसली तरी भीती उत्पन्न होऊन त्याना तेथे उभे राहण्याचा धीर होईना. त्यानी तेथून हळूच पाय काढला. त्याच्या पाठोपाठ बापूभटजी पाळंद्यानींही पोबारा केला.

बापूभटजी आणि महादेवशास्त्री याना आलेला अनुभव पाहून इतर भिक्षुक मंडळींना ज्योतिषीबुवाना कसलाच प्रश्न विचारण्याचा धीर होईना. हा फटकळ ज्योतिषी त्या दोघाची काही तरी वर्माची गुपित गोष्ट बोलला असला पाहिजे, हे त्यानीं ओळखले आणि त्याला मुद्दाम डिवचून त्याच्याकडून आपली शोभा करून घ्यावयाची नाही असा धूर्त विचार करून बहुतेक वैदिक गप्प उभे राहिले. कित्येक जण परतही गेले. देवीसिंगाच्या आणि इतर पहारेकऱ्याच्या मनावर मात्र या सर्व प्रकाराचा इतका परिणाम झाला की, आपल्या शेजारी असलेले ज्योतिषीबुवा ह्मणजे कोणी तरी असामान्य विभूती आहे असे त्याना वाटूं लागलें आणि त्याच्या अद्भुत सामर्थ्याची स्वतः प्रचीत पाहण्याची त्याना अनावर इच्छा उत्पन्न झाली. देवीसिंग तर 'ज्योतिशी महाराज, मला काहीं दाकला सागा बगू' असे ह्मणत त्याच्यापुढेच येऊन उभा राहिला. त्यानें इतकें ह्मणण्याचा अवकाश, ज्योतिषीबुवा कट्ट्यावर बसल्या बसल्याच अमळ ओणवे होऊन त्याच्या कानात दोन चार शब्द बोलले. त्याबरोबर जादूचा प्रयोग केल्यासारखे झालें! देवीसिंग जागच्या जागींच टुणदिशी उडी मारून ओरडला, 'इचभन ही काय येताळा खंकाळाची शिद्दी तर न्हवं? ह्ये तुमास्नी कसं कळलं जी ज्योतिशीमहाराज?'

ज्योतिषीबुवांनीं नुसतें स्मित करण्यापलीकडे त्याच्या प्रश्नास कांहीं उत्तर दिलें नाहीं हें सांगावयास नकोच. इतका प्रकार होईपर्यंत नाना फडणिसांना वरदी देण्यासाठीं गेलेला मल्लारी हुजऱ्या परत आला आणि 'हवालदार, आज नानांची गाट ज्योतिशीबुवास्नी पडायचा लाग न्हाई दिसत बगा, त्ये लई कामांत हैती' असें म्हणाला. तें ऐकतांच ज्योतिषीबुवांनीं तोंड वाईट केलें आणि ते म्हणाले, 'बरं, नाहीं योगायोग, त्याला काय करावयाचें? श्रीमंतांचा दरबार बोलून चालून, त्यांत असेंच चालावयाचें! तरी बरें, या दरवाज्यावरून वर्दी तरी पोचविण्याचा प्रयत्न झाला, दुसऱ्या एखाद्या दरवाजावरून तोही झाला नसता! मला तसेंच निघून जावें लागलें असतें.'

ज्योतिषीबुवाच्या तकरारींत बरेंच तथ्य आहे, असें मल्लारी हुजऱ्या, देवीसिंग परदेशी आणि मणिराम गारदी या सर्वांनाच वाटलें, पण त्याचें गाऱ्हाणें दूर करण्याचें सामर्थ्य त्यांच्यापैकीं कोणापाशींच नसल्यामुळे ते बिचारे मनांतल्या मनांत हळहळत राहिले. कौतुकानें पुढें आलेल्या भिक्षुकमंडळींपैकीं बहुतेक जण एवढ्या वेळांत परत गेले असून एकटे भीकजोशी पंचनदीकर मात्र देवडीच्या तोंडाशी उभे होते. त्यानाही ज्योतिषीबुवांबद्दल कणव उत्पन्न होऊन ते म्हणाले, 'ज्योतिषीबुवा, आज अमावास्या आहे, तुमची व नानांची गाठ पडूनही काही उपयोग झाला नसता. तुह्मी फिरून उद्या या, आणि याल ते याच दरवाजावर या, म्हणजे ही हवालदार मंडळी तुमची ताबडतोब वर्दी लावून देतील बरेंना?' भीक जोशानीं आपल्या सौजन्याची केलेली गर्भित प्रशंसा ऐकून देवीसिंगाला अमळ बरें वाटलें व त्यानें जोशीबुवाना अश्वासन दिलें, 'व्हय जोतिशीमहाराज, आपन उंद्या या, आपली मी तवाच वर्दी लावीन.'

पण या अश्वासनानीं ज्योतिषीबुवाचें समाधान झालेंसे दिसले नाही. त्याच्या चर्येवरून नाना फडणिसांची गांठ न पडल्यामुळें त्यांचा मोठा हिरमोड झाल्याचे स्पष्ट दिसत होतें. कांहीं वेळ थाबून व थोडे घुटमळल्यासारखें करून ते म्हणाले, 'बरें हवालदार, नानांची नाही तर नाही, पण निदान श्रीमंत पंतप्रधानाची तरी गाठ पडेल कां?'

'शिरमंत सरकार हतं न्हाईत कीं जी,' देवीसिंग म्हणाला, 'त्येंची सवारी कर्नाटकच्या मोहिमीवर गेली हाय.'

'भटजी, तुम्ही अगदींच नवखे दिसतां' भीकजोशी पंचनदीकर परत फिरता फिरतां म्हणाले, 'तुह्मी उद्यां येऊन नानांना भेटा म्हणजे सर्व कांहीं ठीक जमेल. आतां अवेळ झाली आहे.' असें बोलून भीकजोशांनीं तेथून पाय काढला.

पण ज्योतिषीबुवा मोठे चिकट होतेसें दिसलें. ते कांहीं केल्या तेथून हलेनात.

ते ह्मणाले, ' एकूण आज कोणाच्याच भेटीचा योग नाहीं तर ? बरें पण काय हो हवालदार, श्रीमंत दादासाहेबाची तरी मला भेट होईल कां ? '

जोशीबुवांचा प्रश्न ऐकतांच देवीसिंगाची मुद्रा कशीशीच झाली. त्याच्या चिकटपणाचा त्याला कंटाळाही आला असावा असे दिसलें. तो किंचित् त्रासिक स्वरानें ह्मणाला, ' जातिशीमहाराज, एकदा बोललात त्ये बोललांत. पुन्हा ह्मनून असली गोष्ट काढू नगा. तुमच्याजवळ आह्मी असल्या गोष्टी बोलत होतों इकतं जरी नानाना समाजलं, तरी आमच्या समद्याच्या खडाखड नोकऱ्या जात्याल बगा.'

' काय, दादासाहेबाच्या संबंधी नुसत्या गोष्टी बोलण्यानें तुमच्या नोकऱ्या जातील ह्मणता ? ' ज्योतिषीबुवानीं आश्चर्यचकित होऊन प्रश्न केला, 'हें तर मोठेंच आश्चर्य आहे. श्रीमंत रावसाहेब पंतप्रधान याचा श्रीमंत दादासाहेबावर राग झाला आहे इतके मी सुद्धा ऐकले होते, पण चुलत्या पुतण्यामधला बेबनाव इतक्या पल्याला गेला असेल अशी माझी कल्पना नव्हती. ' असें म्हणून ज्योतिषीबुवानीं आपल्या अंगरख्याच्या खिशातली चंची काढली !

आता मात्र ज्योतिषीबुवाच्या लोचटपणाचा देवीसिंगाला खरोखरीच राग आला. तो जरा तुसडपणानेच म्हणाला, ' भटजीमहाराज, ह्या थोरामोठ्याच्या गोष्टी, त्येची पचाईत तुम्हाआमासारक्यास्नी काय करायची ? आपन आपल्या तोलानं चालावं. '

आता अधिक ताणण्यात अर्थ नाही हें ज्योतिषीबुवानी ओळखले आणि तयार केलेल्या पानाचा बोळा तोंडात कोंबीत त्यानी आपली चंची गुंडाळण्यास सुरवात केली. या वेळी चागली करकरीत तिनीसाज झाली असून अंधार पडूं लागला होता. हौदावरचे सर्व ब्राम्हण निघून गेले होते. वाड्यातले मशालजी दिवल्याची आणि कंदिलाची साफसुफी करू लागले होते. आता यापुढे आपला बेत सफळ होण्याचा संभव उरला नाही अशी ज्योतिषीबुवाची खात्री होऊन त्याची मुद्रा खिन्न झाली व त्यानी निघण्याची तयारी केली. इतक्यात त्याची नजर समोरच्या हौदावर जाऊन ते कावरेबावरे झाले. त्याची एकदम चलबिचल झालेली पाहून देवीसिगानेही हौदाकडे नजर टाकली तो त्यास दादासाहेबाचे आश्रित कुदुंबाशास्त्री हौदावर येऊन हातपाय धूत आहेत असे दिसून आले. तरी पण कुदुंबशास्त्र्याना पाहताच ज्योतिषीबुवाची इतकी धादल का उडावी याचे कारण देवीसिगाच्या लक्ष्यात येईना. उलट पक्षीं ज्योतिषीबुवा तर अधिकाधिक चुळबुळ करू लागले. त्याच्या मनात कुदुंबाशास्त्र्याशीं काही तरी बोलावयाचें होतें असे उघड दिसले, मग तें सलोख्याचें होतें कीं कलहाचें होतें त्याचें त्यानाच ठाऊक ! पण नुकत्याच आलेल्या अनुभवामुळें दादासाहेबाच्या परिवारातल्या मनुष्याशीं बोलण्याचा त्याना धीर

होईनासें दिसलें. ज्योतिषीबोवांची ही मनःस्थिती देवीसिंगाच्याही लक्ष्यांत आली असावी. तो त्यांस म्हणाला, ‘ जोतिशीमहाराज, तुमची अन् कुटिंबाशास्त्र्यांची ओळख हाय जनु ? त्येंना बगून तुमी लई कावरबावरऽ झालासा ? ’

देवीसिंगाच्या प्रश्नानें ज्योतिषीबुवा भानावर आले, किंबहुना त्यांच्या धोरणाला गति मिळाली म्हटलें तरी चालेल. ते कुटुंबाशास्त्र्याकडे दृष्टिक्षेप करीत म्हणाले, ‘ अहो, कावराबावरा कां नाहीं होणार? हा मनुष्यच तसा पाजी आहे. ह्याला वाड्यांत ठेवणें म्हणजे पागोट्यांत विंचू पाळण्यासारखें आहे ! ’

देवीसिंगाला ज्योतिषीबुवाच्या मनःस्थितीचें कारण समजलें, आणि तें खरेंही असल्यामुळें तो कांहीं बोलला नाही. कुटुंबाशास्त्र्यांच्या कानावर ज्योतिषीबुवाचे शब्द, निदान शेवट शेवटचे शब्द तरी खास ऐकू गेले, आणि त्यानी एकदम वळून ज्योतिषीबुवांकडे नजर टाकली. दोघाची दृष्टादृष्ट झाली. कुटुंबाशास्त्री एकदम गोरेमोरे होऊन जागच्या जागीच एक क्षणमात्र घुटमळले. दुसऱ्याच क्षणीं ते हौदावरून ताडकन् उडी मारून पटांगणात उतरले, आणि ‘ अरे हा पाजी बदमाष इथें कसा आला ? ’ असें म्हणत ते तडक ज्योतिषीबुवाच्या अंगावर चालून आले ! हा प्रकार इतक्या त्वरेनें झाला कीं पहारेवाल्या गारद्याना त्याची चांगलीशी कल्पना येईपर्यंत कुटुंबाशास्त्र्यांनी ज्योतिषीबुवाचें पागोटें हिसकावून घेऊन त्याना अर्धचंद्र दिला देखील ! झालें, ज्योतिषीबुवा कट्ट्यावरून ओढले जाऊन खाली आले आणि कुटुंबाशास्त्र्यांनी त्यांना ढकलीत दरवाज्याच्या दिंडीकडे नेण्यास सुरवात केली. दोघाच्याही तोंडाचा पट्टा चालू झाला. ‘ तुझ्या बापाचा वाडा नव्हे, मला इथून हकालणारा तूं कोण ? ’ इत्यादि शब्दप्रयोग ज्योतिषीबुवा वीररसांत आणि निषादाचा स्वर लावून करूं लागले, आणि ‘ वाडा कोणाचाही असला तरी तुझ्यासारख्या हलकटानी प्रवेश करण्याकरिता नाही ’ इत्यादि मुक्ताफळें कुटुंबाशास्त्री रौद्ररसात आणि तारपड्जाच्या स्वरांत वर्षू लागले ! दोघाचें झोंबट बराच वेळ चालून अखेर कुटुंबाशास्त्र्यानी ज्योतिषीबुवाना दिंडीच्या बाहेर तर ढकललेंच. पहारेकऱ्याना बिचाऱ्याना काय करावें हेंच समजेना. ते मुकाट्यानें हा तमाशा पहात राहिले !

ज्योतिषीबुवांना बाहेर ढकलताच कुटुंबाशास्त्र्यानी दिंडीचें दार ताडकन् लावून घेतलें, व क्रोधाचे निश्वास टाकीत ते तेथेंच क्षणभर उभे राहून आपल्या निऱ्या सावरून कडोसरी आवळूं लागले. दिंडी बंद झालेली पाहतांच ज्योतिषीबुवांनीं कुटुंबाशास्त्र्यांवर न भूतो न भविष्यति असा शिव्याचा वर्षाव केला ! ‘ नाना फडणिसांच्या घराकडे जाऊन दाद मागतों, चोरा माझें पागोटें घेऊन जातोस, पहारेवाले देखील तुलाच सामील झाले आहेत म्हणून सांगतों, ’ इत्यादि दहशत घालावयास त्यांनीं सुरवात केली. आतां मात्र आपण मध्यें पडल्यावांचून गत्यंतर नाहीं असें

देवीसिंगास वाटलें, आणि त्यानें कुदुंबाशास्त्र्यांस गप्प करून ज्योतिषीबुवांचें पागोटें त्यांच्या हातून काढून घेतलें व दिंडीचे दार उघडून बाहेर तणतणत असलेल्या ज्योतिषीबुवांस तें परत केलें. नंतर त्यानें त्यांची कशीबशी समजूत काढून त्यांना एकदाचें वाटेस लावलें. इकडे कुदुंबाशास्त्रीही फणफणत माघारे फिरले. पण त्या दोघांचें वैर कशाकरितां होते आणि सरकारी वाड्यासारख्या ठिकाणी ते इतक्या वर्दळीवर कसे आले, याचा पत्ता देवीसिंगाला लागला नाही तो नाहीच. रात्री पहारा बदलल्यावर देवीसिंग जेव्हा नाना फडणिसाना वर्दी देण्यास गेला आणि त्याने कुदुंबाशास्त्र्याच्या आणि ज्योतिषीबुवाच्या झगड्याची हकीगत नानाना खुलासेवार कळविली, तेव्हा देखील त्याला त्याच्या भांडणाचें कारण सांगता आले नाहीच!

---

## प्रकरण १८ वें.

खरे ले ८९९, ९०१ इ० ] **चोरटा छापा.** [ माघ व. ३०–१६९१

त्याच म्हणजे माघ वद्य अमावास्येच्या दिवशी सुमारे सात आठ घटका रात्र झाली असेल अशा वेळी बुधेहाळ गावापासून एक कोसावर पडलेल्या गोपाळराव पटवर्धनाच्या छावणीत चलण्याविषयी आम्ही आमच्या वाचकास विनंति करीत आहों. चोहोंकडे काळा कुट्ट अंधार पडला असून त्याच्या गडदपणात राहुट्यांचा पांढरा शुभ्र रंग देखील गडप होऊन जात होता. माघ महिन्याची अखेर झाली होती तरी थंडीचा कडाका अजून बराच जाणवत होता. बहुतेक झाडांची पालवी झडलेली असून त्याचे उभे सोट काळोख्या रात्री सृष्टीवर गस्त घालीत उभे असलेल्या पहारेकऱ्यासारखे दिसत होते. छावणीत चोहोंकडे जाग होती तरीहि चांदण्या रात्री शिपाई प्याद्यातून चालणारे पोवाडे, लावण्या, गोष्टी, गप्पासप्पा इत्यादि प्रकार चालू नसल्यामुळे ती जाग नेहमीसारखी जोरकस दिसत नव्हती. गोपाळरावाने आपल्या नेहमीच्या शिस्तीस अनुसरून आपल्या छावणीसाठी सोइस्कर जागा पाहिली होती. पिछाडीस अर्ध्याच कोसावर असलेला एक ओढा आणि दोनी बाजूंस तरीकिऱ्याच्या आसपासची पिकास आलेली शेतें आणि गवताची रानें असा आसमंत छावणीला मिळाला असल्यामुळें, जनावराच्या वैरणीची आणि दाणापाण्याची चांगली तरतूद झाली होती. त्यामुळें तूर्त तरी गोपाळरावाचे हाल विशेष होत नव्हते. हैदरखान आपल्या छावणीपासून वीस कोसांवर शंकरापट्टण येथें आहे अशी निश्चित बातमी असल्यामुळें छावणींतील लोक बिनघोर होते.

गोपाळराव आपली संध्या व फराळ आटपून आपल्या राहुटींत गादीवर आडवे झाले होते व त्यांचा हुजऱ्या परशुराम शिंदा त्यांचे पाय चेपीत बसला होता. नेहमीच्या वहिवाटीप्रमाणें म्हटलें तर गोपाळरावांची ही झोपावयाची वेळ नव्हती, पण आज त्यांची प्रकृति ठीक नसल्यामुळें ते अमळ लवकरच गादी टाकवून घेऊन लवंडले होते. अलीकडे बरेच दिवस मलावरोध, पोटफुगी, बरगड्यांस व पाठीस तणावे लागणें इत्यादि विकार त्यांना होत असून त्यांतच मोहिमींतील श्रमांमुळें आणि जेवणखाणाच्या आबाळीमुळे त्यांच्या प्रकृतीला बराच ताण बसला होता. त्यांना आपल्या अंगीं जडपणा आल्याचा भास होई व तहान वरचेवर लागे. पण हे सर्व विकार मोहिमेंत होणाऱ्या आपदांमुळेंच उत्पन्न झाले आहेत असें समजून गोपाळराव तिकडे विशेष लक्ष्य देत नव्हते. मिरजेस असलेल्या आपल्या वडिलांना व चुलत्यांना ते मोहिमीच्या हकीगतीचीं पत्रें वरचेवर लिहीत पण त्यात देखील आपल्या प्रकृतीचा उल्लेख बहुधा करीत नसत. आज त्यांना विशेषच थकवा वाटू लागल्यामुळें त्यांनीं थोडेंच भोजन केले होतें आणि वर म्हटल्याप्रमाणें ते परशुराम शिंद्याकडून पाय चेपून घेत पडले होते. या वेळीं त्याच्या राहुटीत आनदराव रास्ते, परशुरामभाऊ पटवर्धन, नीळकंठराव पटवर्धन आणि माधवराव पटवर्धन ही मंडळी बसली होती आणि त्याच्या इकडच्या तिकडच्या गोष्टी चालल्या होत्या. प्रथम मंडळींनीं कोणातरी चागल्या वैद्याचें औषध घेण्याविषयीं गोपाळरावाना सुचविलें आणि तेरदळच्या रणछोड वैद्याला बोलावून आणण्याविषयीं विनंति केली. पण गोपाळरावांनीं ‘ मोहीम आटोपल्यावर पाहूं ’ असें उत्तर दिल्यामुळे त्याचा नाइलाज झाला. नंतर त्यांच्या मोहिमीसंबंधीं गोष्टी सुरूं झाल्या आणि याच संधीस आपण तेथे जात आहोंत.

‘ भाऊ, ’ गोपाळराव परशुराम भाऊंना हाक मारून म्हणाले, ‘ काल तलाव्याला तूं गेला होतास नाहीं बरें ? काय, काही विशेष खबरबात ? ’

‘ खबरबात विशेष कांही नाहीं, ’ भाऊ म्हणाले, ‘ हैदरनाइकाने शकरापट्टण सोडले आहे आणि तो श्रीरंगपट्टणाच्या रोखानें निघाला आहे म्हणतात. ’

‘ म्हणतात नाही, निघाला, ’ आनंदराव रास्ते म्हणाले, ‘आज मी नगीकिऱ्याच्या बाजूला गेलों होतों, तेव्हा मला पाच सहा असामींनी वाटेत सागितलें. मी तर म्हणतों, त्याच्या मुक्कामाची उद्याच नक्की बातमी काढून आपण आपला तळ हलवावा व त्याच्या मागावर निघावे. ’

‘ दादा,’ रास्त्यांना उद्देशून गोपाळराव म्हणतात, ‘ हैदरखान पट्टणाकडे चालला हें तुह्मी इतक्यातच खरें मानूं नका. अहो तो महाठक आहे. अशी खोटी हूल

उठवून छाप्यास केव्हां येईल याचा नेम नाहीं. तो खरोखरीच जाण्यास निघाला अशाबद्दल नक्की पुरावा मिळाल्या खेरीज तें खरें मानावयाची सोय नाहीं.'

'अगदीं नक्की पुरावा मिळाला,' आनंदराव रास्ते म्हणाले, 'एक नव्हे, दोन नव्हे, सहा असामींनीं आज मला वाटेंत सांगितलें. तेव्हा त्याबद्दल आतां शंकेला जागाच राहिली नाहीं.'

आनंदरावाला जरी आपल्या बातमीच्या खरेपणाबद्दल शंका राहिली नव्हती तरी गोपाळरावांना मात्र तसें वाटत असल्याचें त्यांच्या चर्येवरून दिसलें नाहीं. हैदर इतका विलंदर आहे कीं, तो आपला माग कळूं न देण्यासाठीं शत्रुपक्षीय सरदारांच्या वाटेवर मुद्दाम आपलीं माणसें ठेवील आणि त्याच्या तोंडून खोटी बातमी वदवून शत्रूची दिशाभूल करील, अशी गोपाळरावाची खात्री होती आणि ह्मणूनच रास्त्यानीं आणलेल्या बातमीवर त्यांचा एकाएकीं विश्वास बसेना. ते काही बोलणार होते, पण इतक्यांत राहुटीच्या दाराशी असलेल्या पहाऱ्यावर कोणाची तरी मोठ्यानें बोलाचाली चालली आहे असा त्यास भास झाला आणि त्याचे लक्ष्य एकदम तिकडे खेचले गेलें. ते अमळ कान देऊन ऐकूं लागले तों कोणी तरी परका इसम आत येण्याकरिता पहारेकऱ्याबरोबर हिसकाहिसकी करितो आहे आणि "खोटें ठरलें तर माझा जीव घ्या, पण मला दादाची भेट घेऊंद्या" असें मुसलमानींत मोठ्या आवेशाने म्हणतो आहे असा त्यास भास झाला. त्याबरोबर त्यानीं पहारेकऱ्यास हाक मारून 'काय आहे' ह्मणून विचारलें. पहारेकऱ्याने राहुटीच्या तोंडाशी येऊन उत्तर केलें, 'हैदरखानाकडील कोणी गारदी आला असून काही महत्वाची बातमी सांगावयाची आहे असे ह्मणतो, काय आहे ती सांग म्हटलें, तर दादापाशीं सांगेन, खोटी ठरली तर जीव घ्या असे ह्मणतो.' पहारेकऱ्याचे शब्द ऐकून गोपाळराव चकित झाले आणि त्याना थोडी शंकाही आली. हैदराकडील मनुष्य आपणाकडे यावयाचा म्हणजे काही तरी दगा करण्याकरिताच यावयाचा, एरवी सहसा याव-याचा नाही असा विचार त्याच्या मनात आला, आणि 'त्याला आंत सोडूं नको, सकाळपर्यंत पहाऱ्यात ठेव' असे पहारेवाल्यास सांगण्याकरिता त्यांच्या ओठावर शब्द आले, पण त्याना ते उच्चारण्यास फुरसतच झाली नाही. कारण पहारेकरी त्याना वर्दी देण्याकरिता अमळ आतल्या बाजूस आला आहे, ही संधी साधून त्या आलेल्या इसमाने त्याला मागाहून तुरमुंडी दिली व झपाट्याने आंत येऊन त्यानें गोपाळरावांच्या पुढे 'हुजूर, कसूर माफ' ह्मणत लोटांगणच घातले!

गोपाळरावांना त्या इसमाच्या फाजिलपणाचा राग आला यांत शंकाच नाहीं. त्यांतून तो मुसलमान गारदी दिसत असल्यामुळें त्यांचा संशय अधिकच दृढ होऊन

ते बिछान्यावर ताडकन् उठून बसले. रास्ते, परशुराम भाऊ वगैरे मंडळीही चपापून त्याच्याकडे पाहूं लागली. पहारेकऱ्याला तर बिचाऱ्याला काय करावें हेंच समजेना. त्या गारद्याला गोपाळरावांशीं बोलण्याची संधी द्यावी, कीं त्याला धक्के मारून बाहेर काढावें याचा त्याला निर्णय करितां येईनासा होऊन तो त्या गारद्याकडे, भाऊ वगैरे मंडळीकडे आणि गोपाळरावाकडे आळीपाळीनें टकमक पहात राहिला !

‘हुजूर,’ तो गारदी उठून मुसलमानींत बोलूं लागला, माझी ‘ विनंति एकदा ऐकून घ्या, आणि मग पाहिजे तर खरी माना अगर मानूं नका. हैदरखान तुमच्यावर छापा घालण्याकरिता कडूराहून निघाले आहेत, आणि आता अगदी जवळ तीन कोसावर येऊन ठेपले असतील. एका प्रहरात त्याचा छापा तुमच्या गोटावर येऊन पडणार आहे हुजूर!’

गोपाळरावाची मति गुंग झाली. त्या गारद्याचा तो एकंदर आविर्भाव, पळत आल्याप्रमाणे तो देत असलेल्या धापा, त्याच्या आवाजातील ती खरेपणाची कळकळ वगैरे अनेक गोष्टींचा परिणाम त्याच्या मनावर झाल्यावाचून राहिला नाही. आणि तरी देखील तो हैदराच्या लष्करातील गारदी असल्यामुळे त्याच्या शब्दावर विश्वास ठेवण्यास त्याचे मन तयार होईना. अशा स्थितीत त्याला प्रथम थोडे छेडून पहावें असा विचार करून ते ह्मणाले, ‘कायेर, तुझें नाव काय, आणि आमच्याबद्दल तुला इतकी कळकळ का बरे वाटते ?’

‘ माझें नाव मोहबतखान,’ गारद्यानें उत्तर केलें, ‘मी पूर्वी काहीं दिवस पेशवे सरकाराचें निमक खाल्लें आहे आणि त्याची आठवण अजून विसरलो नाही हुजूर. पेशव्याच्या सरदाराना धोक्याची इशारत देणें हें माझें कर्तव्यच आहे.’

‘ पण तू हल्ली हैदराच्या लष्करात नोकर आहेसना ?’ गोपाळरावांनीं प्रश्न केला.

‘ होय हुजूर ’ गारद्याने न चपापता उत्तर केलें.

‘ मग ही आह्मांला छाप्याची बातमी देणें, ह्मणजे आपल्या धन्याशीं बेमान गिरी करण्यासारखें नाहीं का होत ?’ गोपाळरावांनीं तिढ्याचा प्रश्न टाकला.

‘ नाहीं हुजूर,’ गारदी ह्मणाला, ‘ आमचे धनी आपल्याशीं उघड मैदानात सामन्याला उभे राहिले असते तर मी त्याच्याशीं दगाबाजी केली नसती. उलट त्याच्या बाजूने इमानेइतबारें समशेर चालविली असती. पण ते दगलबाजीनें आपणांवर अंधारात छापा घालण्याचें नामर्द कृत्य करीत आहेत ह्मणून आपणास त्याची वर्दी दिली आहे.’

गोपाळरावांना, भाऊ वगैरे मंडळींना, फार काय पण गोपाळरावांच्या शेजारी दक्षतेनें उभा राहिलेल्या परशुरामपंतालाही गारद्याच्या तर्कवादाचें मोठें कौतुक वाटलें. पळ गोपाळरावांच्या मनातला संशय अजून पुरतेपणीं दूर झाला नव्हता. त्यांनीं गारद्यास अखेरचा प्रश्न केला, ' आणि तुझी बातमी खोटी ठरली तर ? '

' माझी गर्दन मारावी, ' गारद्यानें एकदम उत्तर केलें, ' सकाळपर्यंत मला चौकींत बसवून ठेवावें आणि तेवढ्या वेळात छापा आला नाहीं तर बेलाशक माझी मान छाटावी हुजूर ! '

गोपाळराव निरुत्तर झाले. त्यांनीं एकवार आनंदराव रास्त्यांकडे आणि परशुरामभाऊंकडे नजर टाकली. ' तुह्मांस काय वाटते ? ' असे जणु विचारण्याचा त्यांचा हेतु असावा. त्या दोघानी गोपाळरावाचा आशय ओळखला, पण गोपाळरावाप्रमाणे गारद्याच्या शब्दावर त्याचाही विश्वास बसेना. कारण हैदरखान श्रीरंगपट्टणच्या रोखानें एक दोन मजली गेला अशी त्याची पक्की खात्री होती, त्यामुळे तो परतून आपणावर छाप्यास येईल, आणि तोही इतक्या लवकर येईल हें त्याना शक्य वाटेना. विशेषतः आनंदराव रास्त्याना गारदी अगदीं खोटा वाटला. त्यानीं त्याच्या लबाडीचें माप त्याच्या गळयात घालण्याचा आव आणून प्रश्न केला, ' कायरे, हैदरनाईक छाप्याला येणार ह्मणतोस तो कोठून येणार ? आणि त्याचा मुक्काम कोठें होता साग पाहूं. '

' आज त्याचा मुक्काम कडूरास होता हुजूर, ' गारद्याने उत्तर केलें, ' आणि ते तेथूनच छाप्यास यत आहेत. '

आनंदराव चपापला. त्याची तर पक्की खात्री की, हैदराचा मुक्काम संकरापट्टणच्या दक्षिणेकडे पाच दहा कोसावर असला पाहिजे आणि गारदी तर ठासून सांगतो की, तो कडूरास ह्मणजे सकरापट्टणच्या उत्तरेस होता ! आपली ऐकीव बातमी खरी मानावी की गारद्याची अनुभवाची बातमी विश्वसनीय मानावी याचें त्याला कोडे पडलें. तो ह्मणाला, ' पण आज संध्याकाळी तुरीकिऱ्याच्या वाटेवर मी पाचसहा कर्नाटकी कुणब्याना हैदराचा ठावठिकाणा विचारला आणि त्या सर्वांनीं एकच उत्तर केलें की, तो सकरापट्टणहून दक्षिणेकडे कूच करून गेला; हे कसे काय ? '

' ते हैदरखानानी मुद्दाम आपल्या वाटेवर ठेवलेले हेर होते हुजूर, ' गारद्याने शातपणें उत्तर केलें.

आनंदरावाचा चेहरा यावेळीं पाहण्यासारखा झाला होता. आपण ज्या बातम्या मोठ्या धूर्तपणानें काढून आणल्या असे समजतों त्या काय किंमतीच्या असतात याविषयीं त्याची पूर्ण खात्री झाली आणि तो क्षणमात्र गोंधळला. हैदरनाईक आपणांपेक्षां कितीतरी उच्च दर्जाचा कारस्थानी आहे असे त्याच्या मनात

आलें व तो मनांत थोडासा वरमला. तथापि बाहेर तसें दिसूं द्यावयाचें नाहीं आणि आपलीच छाप ठेवावयाची अशा इराद्यानें तो ह्मणाला, ' हंः तूं कांहीं तरी थाप देतो आहेस झालें. तुझें ह्मणणें खरें मानून आह्मी आपला तळ येथून उठवून मागें न्यावा एवढ्याकरितांच हा सारा कावा दिसतो, दुसरें कांहीं नाहीं. '

आनंदराव हे शब्द बोलला इतकेंच काय तें, पण ते त्याचे त्यालाच खरे वाटत नसावे असें त्याच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होतें. गोपाळरावांची तर गार द्याच्या खरेपणाबद्दल बहुतांशीं खात्री झाली, आणि आतां पुढें वाट काय, हा प्रश्न त्यांच्यापुढें दत्त ह्मणून उभा राहिला. त्यांनीं परशुराम शिंद्याला त्या गारद्यास नेऊन सकाळपर्यंत चौकींत बसवून ठेवण्यास सांगितलें आणि ते आनंदराव, भाऊ, वगैरे मंडळींना बरोबर घेऊन राहुटींतून बाहेर पडले. या वेळीं मध्यरात्रीचा सुमार झाला असून जिकडे तिकडे सामसूम झालें होतें. चोहोंकडे काळोख दाट पडला असून छावणीभोंवतालचा आसमंत भयाण दिसत होता. गोपाळराव बरोबरच्या मंडळीसह एकदा सर्व छावणींतून हिंडून आले व त्यांनी जागजागच्या चौकीवाल्यास सावध राहण्यास इषारा दिला. त्यांनीं अमळ पुढें जाऊन हैदराच्या लष्कराची कांहीं चाहूल लागते कां तें पाहण्याचा प्रयत्न केला, पण ती त्याना लागली नाहीं. नंतर रास्त्यांच्या, भाऊंच्या, आणि आपल्या स्वतःच्या शिलेदारांच्या पथकाना सावध राहण्याचा इषारा देऊन, त्यानीं रास्त्याना, भाऊंना, नीळकंठरावाला, आणि माधवरावाला निरोप दिला. थोडा वेळ इकडे तिकडे हिंडून ते आपल्या राहुटीत परत आले आणि बिछान्यावर अमळ आडवे झाले. प्रस्तुतच्या मनःस्थितींत त्यांना झोप येणें अशक्य होतें. ते विचार करीत पडून राहिले होते. घटके घटकेला उठावें, एकटेंच बाहेर जाऊन छावणीतून हिंडून यावें, चौकीवाले हुषार आहेत कीं नाहींत पहावें, आपापल्या घोड्याजवळ पडून राहिलेल्या शिलेदारापैकी कित्येकांना हटकावें, आणि पुन्हा बिछान्यावर येऊन पडावें असा त्याचा क्रम सारी रात्र चालू होता. अशा स्थितीतच त्याच्या थकलेल्या देहयष्टीला निसर्गापुढें हार खावी लागून उत्तर रात्रीच्या सुमारास त्याचा डोळा लागला.

पहाटेचा अंमल सुरू होऊन पूर्वेकडे किंचित् लाली फुटूं लागली होती. तरी देखील काळोखाचा अंमल ह्मणण्यासारखा कमी झाला नव्हता. जागजागचे चौकीवाले, शिलेदार, प्यादे, आणि शिपाई छाप्याची भीती उरली नाहीं असें समजून डारडूर घोरूं लागले होते. चोहोंकडे स्तब्ध शांतता पसरली होती. इतक्यात एकाएकी धाडकन् तोफेचा आवाज ऐकूं येऊन सारें लष्कर हदरून जागें झालें. गोपाळरावांना विजेचा धक्का बसल्यासारखें होऊन ते बिछान्यावर ताडकन् उठून उभे राहिले. छापा आला असा चोहोंकडे एकच गोंगाट होऊन साऱ्या लष्करांत

चोहोंकडे धूम माजली ! इतक्यांत तोफेचा दुसरा आवाज ऐकूं आला आणि 'दीन दीन' चा अस्पष्ट ध्वनी आमावस्येच्या गडद शांततेंत घुमूं लागला. ही वेळ अत्यंत आणीबाणीची होती. यावेळीं जर गोपाळरावांनीं लवमात्र धीर सोडला असता तर साऱ्या लष्कराची कत्तल होऊन गोटही लुटला गेला असता. पण गोपाळराव जातिवंत सेनापती असल्यामुळें त्यानीं ही वेळ अत्यंत कौशल्यानें व हिमतीनें निभाऊन गेली. ती कशी नेली याचें अद्‌भुतरम्य वर्णन सुदैवानें त्यांच्याच हातचें आपणांस उपलब्ध झालें असल्यामुळें आह्मी तेंच आमच्या वाचकांस सादर करीत आहों. सदर पत्र गोपाळरावांनीं आपला धाकटा चुलतभाऊ मोरोबा यास पेशव्यांच्या छावणींत लिहिलें आहे.

"इकडील वर्तमान तर हैदरखान संकरापट्टणाकडे कूच करून गेल्याचें वर्तमान लिहिले होतें, त्यास संकरापट्टणास छ २४ सवालीं गेला. तेथून पट्टणाकडे जावयाची आवई घालून इकडे माणूस येईल याजकरिता चौक्यांचा बंदोबस्त करून तीन दिवस संकरापट्टणास राहिला. आह्मांकडील फौजा तलाव्यास अजमपुरापावेतों जात होत्या त्यास गांवखेड्याच्या माणसांची बातमी 'संकरपट्टणाहून कुच करून गेला' असेंच सांगत. तेव्हा आमच्या मतें काय कीं, श्रीमंतांची स्वारी बाळापुराकडे गेली, याजकरिता पट्टणाकडे जाऊन मागडीच्या सुमारें जाईल असें भासत होतें. परंतु छ २७ सवालीं कडुरास आला. तेथून छ २८ सवालीं रविवारीं अमावास्येस सडें सामान बारा तेरा हजार गाडदी व चार हजार फौजेचा अजमास व पंचवीस तोफा येणेंप्रमाणें सामानानिशीं दोनप्रहरी कडुराहून कूच करून रातवा [ रात्रभर ] खपोन छाप्यास आह्मांकडे आला. पहाटेच्या पाच घटका रात्रीस गोटांबाहेर उभा राहून गोळे व बाणाचा मार करूं लागला. अंबाऱ्या व नौबद मात्र लादलेली होती. व वरकड घोड्यावर जीन देखील नाहीं ! आमच्या घोड्यांवर एक दुसऱ्यावर जीन होतें. त्याचा गोळा वाजताच घोड्यावर बसोन मागें नौबत याप्रमाणें बाजारापुढें [ आमच्या घाबरलेल्या लष्करापुढे ] आघाडीस येऊन उभें राहिलों. नौबत वाजतच होती, तेथें वरचेवर लोकानीं जीन ठेऊन येऊन काही जमले. नौबती टकारे ऐकून अगदी तोफाचा मार ( शत्रूने ) आह्मावर धरिला. चार साडे चार घटका तोफाचा व बाणाचा मार खाऊन उभे राहिलों. परशराम शिंदा पोरगा आमच्या डाव्या हाताजवळच होता त्यास गोळा लागोन ठार झाला. मेंदू आमच्या आंगावर उसळून अंग अगदी रक्तानें भरलें. घोडे माणूस त्याच जाग्या वर गोळ्यानीं व बाणानी ठार फार झाले. चिरंजीव राजश्री माधवराव अण्णाचे घोड्यास गोळी लागून घोडी ठार झाली. उजव्या गुडघ्यास चिरंजीव अण्णाच्या गोळी लागून वरील मामकातड्याच्या चिंध्या झाल्या ! हाड व गुडघ्याची वाटी

शाबूत राहिली. त्याच गोळ्यानें तीच घोडी पडली! सारांश अण्णाची ईश्वरें खैर केली. चिरंजीव राजश्री भाऊच्या बसत्या घोडीवर बसले असतां दोन घोड्या गोळे लागून पडल्या. एक कोतवाल पडली. एकूण तीन घोड्या चिरंजीव राजश्री भाऊच्या पडल्या! दिशा प्रकाश व्हावयाचे वेळेपर्यंत तसेंच उभे राहिलों, याजकरितां जामदारखाना व डेरे, राहुट्या वगैरे गोट लादावयास फुरसत पडली. गोळ्यांचा व बाणांचा मार असा कधीं जाहला नसेल. पाच सहाशे गोळा तितक्यांत सुटला. दिशा प्रकाश होऊं लागताच जरा डाव्या बाजूनें ओढ्याचा आसरा होता तेथें जाऊन उभे राहिलों. तेथे मार अतिशय झाला. तों पाच घटका दिवस आला तोंपर्यंत गोटास [शत्रूंचा] हात लागला नाहीं. तोंपावेतों गोटातील [काही सामान] गडबडींत राहिले होते तें आणविलें. राहतापैकीं मुदबखाच्या डेऱ्याची पड्याची सलिता एक व व जामदारखान्याकडील राहुटी व रामचंद्र रुद्र याचा डेरा येणेंप्रमाणें तळावर राहिले. ते समयी उटे नाहींशी झाली म्हणोन तीन दागिने राहिले त्यांस आग लाविली. पाच घटका दिवस आल्यानंतर त्याजकडील लोक गोटांत फिरों लागले. ते समयीं आम्हाकडील लोकानी घोडी घातली. संताजी पवार म्हैसाळकर वगैरे दहा पाच माणूस चांगले ठार झालें. त्यांनी बुरूज बाधोन तोफाचा बाणाचा मारा फारच केला. अघाडीचा मार भारी, (म्हणून) घोडी फारशीं घालूं दिलीं नाहींत. तसेंच दम धरून उभें राहिलों. पाच घटका दिवसानंतर ते गोटात शिरोन तळास आगी दिल्या. तिसरा प्रहरपर्यंत तळावरच होता. आमचे बुनगे या मुक्कामास लाऊन दिले आणि आह्मी संध्याकाळपर्यंत तेथेंच उभे राहिलो होतों. तिसरे प्रहरपपर्यंत हैदरखान तळावर होता. तिसरे प्रहरीं निघोन माघारे कट्टराकडे गेला. तीन कोस-पर्यंत गेल्यानंतर रात्रौ आम्ही निघोन गोटास आलो. श्रीमंताच्या पुण्यप्रतापें करून खैर झाली. + + + + घोडी तिन्ही पथकाची मिळोन ऐशी पावेतो ठार व पचवीस माणूस ठार झाले. शंभर दीडशे माणूस जखमी आहे. वीस पावेतो माणूस हैदरखानाचें पाडाव आहे. गारदी याचे आवईनें आह्मी गडबडोन निघालो नाहीं एवढा दोष कोण्ही ठेवला तर सुखरूप ठेवोत! परतु त्याचा चाकर – त्याचे खरे कसे मानावे? बंदोबस्ती करीत होतों परंतु अवकाश सापडला नाहीं."

वाचकहो, गोपाळरावाना अवकाश सापडला नसेल, पण त्याची कर्तबगारीच अलौकिक असल्यामुळें त्यांनीं अगदी थोड्या हानीवर हा सर्वनाशाचा प्रसंग टाळला. खेदाची गोष्ट इतकीच कीं माधवराव पटवर्धनांची जखम विकोपास जाऊन ते लवकरच तिला बळी पडले!

---

## प्रकरण १९ वें.

### तोंडीस तोंड.

[ फाल्गुन शु. १-१६९१

दुसरा म्हणजे फाल्गुन शुद्ध प्रतिपदेचा दिवस होता. सकाळीं सुमारें बारा तेरा घटका दिवस आला असून, आपण आज शनिवार वाड्यांतील मोतीचौकांत जर अमळ डोकाऊन पाहूं तर आपणास असें दिसून येईल कीं, दादासाहेब पेशवे आपले सर्व आन्हिक व भोजन आटोपून दिवाणखान्यांत बसले आहेत. वाचकांना जातां जातां एक गोष्ट कळवून ठेवणें अवश्य आहे, ती ही की आनंदवल्लीच्या मुक्कामीं दादासाहेबांची स्नानसंध्या जरी तिसरा प्रहर पावेतों लांबत असे, तरी प्रस्तुत त्यांचें भोजन शनिवार वाड्यांतील खाशा पंगतीलाच होत असल्यामुळें ते आपलें आन्हिक अमळ लवकरच आटोपतें घेत असत आणि पंगतीची होतां होई तों खोटी करीत नसत. आज तर त्यानी आपलें देवकार्य रोजच्याहूनही अधिक लवकर आवरलें होते आणि आपल्या मुत्सद्दी मंडळास घेऊन ते दिवाणखान्यांत बसले होते. त्रिमंगलाचार्य, खंडो दीक्षित, कुटुंबाशास्त्री आणि भैरवभट पुराणिक ही जुनी वेचक मंडळी भोवती बसलेली असून मध्यभागी लोडास टेकून श्रीमंत दादासाहेबांची स्वारी बसली होती. दादासाहेबांच्या पुढे एक पत्र पडलेलें असून त्यांत पुढील मजकूर होताः—

‘ पोष्य शिवरामाने साष्टाग नमस्कार विज्ञापना. तागायत माघ शुद्ध प्रतिपदे पावेतों मुक्काम गरुडेश्वर, श्रीमंताचे आशीर्वादे सुखरूप असो विशेष. येथें बन्सीधर नावाचे महंत भले सिद्ध मात्रिक श्रीमंताचे पूर्व परिचित आहेत, त्यास अनुकूल करून घेऊन श्रीमंताच्या राजयोगास आड येणारावर त्यांचेकडोन प्रयोग करवावा असा हेतु आहे. इकडून माझे वडील बंधु वे. शा. ती. गोपाळभट दादा लिमये यास पाठविले आहे, त्याचेपाशीं आज्ञापत्र दिल्यास गुंता सत्वर उरकून टाकीत आहे, विदित होय ही विज्ञापना.’

आमच्या वाचकांनीं पत्रातील मजकुरावरून ओळखलेच असेल कीं, हें पत्र शिवरामभट लिमये यानें गरुडेश्वराच्या मुक्कामाहून दादासाहेबाना लिहिलें असून त्यात त्याने बन्सीधर महाराजांकडून रावसाहेब पेशव्यावर मूठ मारविण्याकरितां परवानगी मागितली होती. मागे एका प्रकरणात तो बन्सीधर बोवाच्या सेवेला राहिला असल्याचे वाचकांना कळलेच आहे. तेथे राहण्यात त्याचा हेतु काय होता हे वाचकाच्या आता चांगलेंच लक्ष्यात आले असेल. तो रावसाहेब पेशव्याचा द्वेष स्वयंप्रेरणेनेच

करीत असल्यामुळें त्यांच्यावर मूठ मारावयास खरें ह्मटलें तर त्याला दादासाहेबांच्या परवानगीचीच आवश्यकता होती असें नाहीं; पण बन्सीधरबोवा हे फार सत्वशील असल्यामुळें मूठ मारण्याची गोष्ट त्यांच्यापाशीं काढली आणि ते जर रागावलेच तर दादासाहेबांचें पत्र त्यांना दाखवून आपण नामानिराळें व्हावें असा शिवराम-भटाचा डाव होता. सुदैवानें त्याचा भाऊ गोपाळभट लिमये हा त्याचा शोध काढीत फिरत असतां गरुडेश्वरीं गेला आणि भावाभावांची गांठ पडली. त्या-बरोबर शिवरामभटानें त्याच्यापाशीं दादासाहेबांना देण्याकरितां आपलें पत्र दिलें. गोपाळभटाला शनिवार वाड्यातील बहुतेक बारीक सारीक माहिती असल्यामुळें त्यानें ती कामगिरी हौसेनें पतकरली व तो पुण्यास आला.

आता वाचकानीं हेरलेच असेल कीं, माघ वद्य अमावास्येच्या दिवशीं शनि-वार वाड्यांतील जांभळी दरवाज्यावर आलेला ज्योतिषी ह्मणजे दुसरा तिसरा कोणी नसून गोपाळभट लिमये हाच होय. अमावास्येच्या दिवशी आणि करकरीत तिनीसांजच्या वेळीं नाना आपली गांठ घेणार नाहींत हे त्यास पक्के ठाऊक असल्या-मुळें, तो मुद्दामच ती वेळ साधून जाभळी दरवाजावर आला होता. वाड्यातील पहारेकरी, जासूद वगैरे मंडळींची कांहीं बिंगें त्याला ठाऊक होतीं. त्याचा उपयोग करून त्यानें आपली छाप कशी शिताफीनें पाडली हे वाचकानी पाहिलेंच आहे. बापूभट जोगळेकर इत्यादिकाच्या कानात तो अदाजाने काही तरी बोलून गेला, पण तेंही त्याच्या सुदैवाने खरेच आल्यामुळे त्याच्या ज्योतिषीपणाची बोलबाला झाली. त्याला मुख्य काळजी ही होती की, दादासाहेबाच्या परिवारांतले एखादे ओळखीचे मनुष्य आपणास कसें भेटेल, आणि त्याचे हातांत आपण पत्र कसे देऊ शकूं. त्याच्या सुदैवानें कुटुंबाशास्त्री लवकरच हौदावर आलेले त्यास दिसले. नंतर त्याचें लक्ष्य आपणाकडे ओढून घेण्याकरिता गोपाळभटानें काय हिकमत केली हें वाचकाना कळलेंच आहे. कुटुंबशास्त्र्यानीं गोपाळभटास त्याच्या पालटलेल्या वेषात व आवाजांतही तत्काळ ओळखले, आणि त्याने स्वतःस दिलेल्या ‘ पागोट्यातील विंचवा ’ च्या उपमेपासून योग्य ती सूचना घेतली. नंतर त्या दोघाचे मारवाडी भाडण होऊन कुटुंबाशास्त्र्याने गोपाळभटास जबरदस्तीने दिंडीच्या बाहेर ढकल-ल्याचा बेमालूम देखावा केला, आणि त्याचे पागोटे हिसकावून घेतल्याचे सोग करून त्यांत असलेलें शिवरामभटाचें पत्र इतक्या सफाईनें काढून घेतले की, त्याचा देवीसिंगास व त्याच्या सोबत्यास बिलकूल सुगावा लागला नाही! इतकी प्रस्तावना करून कथानकाचा धागा पुढें चालवूं.

शिवरामभटाच्या पत्रास काय उत्तर द्यावे, याबद्दल दादासाहेबांचा व त्याच्या आश्रित मंडळींचा बराच वेळ खल चालला होता. श्रीमंत रावसाहेबावर मूठ मार-

ण्याच्या स्तुत्य प्रयत्नास त्यांच्या पार्षद मंडळीची तात्काळ अनुकूळता मिळाली हें सांगावयास नकोच, पण दादासाहेबांच्या मनांत पुतण्याविषयीं कितीहि आढी उत्पन्न झाली असली, तरी पुतण्याचा मृत्यु ओढवून आणविण्यास त्यांचें जुन्या संस्कृतींत मुरलेलें मन कांहीं केल्या तयार होईना. पण भैरवभटजींनी पांडवांचा प्राण घेण्यास उठलेल्या भीष्म-दुर्योधनादिकाचा दाखला देऊन त्यांची खात्री केल्यावर त्यानी शिवरामभटाच्या बेतास एकदाची संमती दिली. अखेरीस सर्वानुमतें शिवरामभटाच्या पत्रास पुढील उत्तर लिहून तयार करण्यांत आलें.

" आपले पत्र पावलें. महाराजाची व आमची पूर्वी एकदां गाठ पडली असून त्यांचेकडूनच आह्मास सूर्यानुष्ठानाचा मंत्र मिळाला आहे. आपण मनात आल्याप्रमाणें काम उरकावे व तें झाल्यावर इकडे येणेचें करावें. गुंता पुरता काढावा, अर्धाकच्चा ठेऊं नये. "

त्रिमंगलाचार्यांनीं पत्र लिहून तयार केले आणि त्यावर दादासाहेबांनीं रुजू केले. शिवरामभटाचे पत्र फाडून टाकून त्याचे बारीक तुकडे करण्यांत आले. पण त्या पत्रास लिहून तयार केलेलें उत्तर गोपाळभटाकडे पोंचते कसे करावयाचें हा प्रश्न उपस्थित झाला. दादासाहेबाच्या परिवारातल्या कोणाही माणसाला नानांच्या परवानगीवाचून बाहेर जाण्याची बंदी होती. आणि परवानगी मिळून कोणी बाहेर गेला तरी तो कोठे गेला होता, कशाकरिता गेला होता, इत्यादि चौकशा नाना केव्हां केव्हां करितात हे दादासाहेबाना ठाऊक होते. खुद्द कान्होबा शतघ्ने याना एकदा नानांनीं बोलावून नेऊन दादासाहेबाकडे जाऊन तुह्मी काय करीत असता, इत्यादि चौकशी केली होती. अशा स्थितीत शिवरामभटाच्या पत्राचें उत्तर गोपाळभटाकडे पोचते करण्यास एकच राजमार्ग होता, आणि तो ह्मणजे दादासाहेबांच्या परिवारात कोणीतरी आजारी पडल्याचा बोभाटा करून कान्होबाना बोलावून आणण्यासाठी ह्मणून खंडो दीक्षितानी जावयाचें आणि तेथून कांहीं तरी निमित्तानें बाहेर पडून गोपाळभट लिमयाच्या घरी जावयाचे व त्यास पत्राचें उत्तर पोचते करावयाचे. झाले, हीच युक्ति सर्वानुमतें पसंत ठरली. तत्काळ भैरवभट पुराणिकाच्या पोटात शूळ उटून तो गडबडा लोळूं लागला! नाना फडणिसाना ताबडतोब वर्दी देण्यांत येऊन कान्होबाकडे खंडो दीक्षिताना पाठविण्याबद्दल त्याची परवानगी मागण्यात आली. नाना या वेळी फडात काम पहात होते. त्याना वर्दी पोचताच त्यानीं अमळ स्मित करून परवानगीची चिठी दिली, आणि ती घेऊन दादासाहेबाचा हुजऱ्या बाहेर पडताच दुसरी एक चिठी जनार्दन हरी कोतवाल यास लिहिली. तिजमध्ये काय मजकूर होता हे कळण्यास प्रस्तुत आपणास

मार्ग नाहीं, पण इतकें मात्र खरें कीं, जनार्दन हरीचें घर गांवांतल्या गांवांत आणि अगदीं जवळ असूनही नानांनीं आपली चिठी त्याजकडे सांडणीस्वारामार्फत रवाना करविली, यावरून तिजमधील मजकुराची अमलबजावणी फारच त्वरेनें व्हावयास पाहिजे अशी त्यांची इच्छा असावी.

थोड्याच वेळांत खंडो दीक्षितांची स्वारी शनिवार वाड्यांतून मोठ्या लगबगीनें बाहेर पडली. त्याचे जवळ नानाचा परवाना असल्यामुळे त्याना पहारेवाल्यांनीं अडविलें नाहीं हें सांगावयास नकोच. खंडो दीक्षित कान्होबाच्या घरीं पोचले त्यावेळी मध्यान्ह उलटली असून कान्होबा नुकतेच भोजन करून झोपाळ्यावर विडा खात बसले होते. दीक्षितास अशा उन्हाच्या वेळी आलेले पाहताच कान्होबांनीं त्यांच्या येण्याचें कारण विचारलें. खंडो दीक्षितानीं भैरवभट पुराणिकाच्या प्रकृतीची हकीगत सांगून त्यांना पाहण्यास चलण्याविषयीं कान्होबाना विनंति केली. ही विनंति ऐकतांच कान्होबा अगदीं खुष झाले, आणि लगेच आपलीं कवचकुंडलें चढवूं लागले. पण खंडो दीक्षितानी 'येथून जवळूनच अमळ जाऊन येतों, मग मिळूनच वाड्यात जाऊं' असे ह्मणून तेथून पाय काढला. त्यामुळे कान्होबांचा नाइलाज होऊन त्याना थोडा वेळ थांबणेच भाग आले. खंडो दीक्षित कान्होबांच्या दारातून बाहेर पडूं लागतात तों एक कानफाट्या गोसावी 'गोऽपीऽ चंदा ढवळ्या नगरिका राऽजाऽरे' करीत त्याना आडवा आला. 'गाढवा दूर हो' शिवतोस की काय?' असे त्या कानफाट्याला दरडावून खंडो दीक्षित तेथून झटकले ते एक दोन गल्ल्याच्या मधले बोळ ओलांडून एका जुनाट दिसणाऱ्या घराच्या दाराशी येऊन थांबले, आणि 'गोपाळभट, अहो गोपाळभट' ह्मणून हाका मारूं लागले. ही वेळ भर दुपारची असल्यामुळे उन्हाची तिरीप चांगलीच जाणवत होती. रस्त्यातून विशेष रहदारी नव्हती. त्यामुळें खंडो दीक्षिताच्या हालचालीकडे कोणाचे लक्ष्य जाण्याचा फारसा संभव नव्हता. खंडो दीक्षितानी एक दोन हाका मारल्या असतील, इतक्यात एक पन्नास वर्षे उमरीचा, वर्णाने काळसावळाच पण मुद्रेने मोठा तरतरीत दिसणारा भट दिंडी उघडून बाहेर आला, आणि दीक्षितास पाहताच 'या दीक्षित,' असे ह्मणून त्यास आत घेऊन गेला. खंडो दीक्षिताना फार वेळ घालविण्यास सवड नसल्यामुळे त्यानी घाईघाईने दादासाहेबांचें पत्र गोपाळभटाजवळ दिले आणि त्याच्या कानात काही मजकूर सांगून ते लगेच परत फिरले. गोपाळभटही त्याना निरोप द्यावयास बाहेर पर्यंत आला. ते दोघे दिंडीच्या बाहेर येऊन एकमेकाना नमस्कार करितात तों काय आश्चर्य? मघांचा तो कानफाट्या नेमका ह्याच गल्लीतून चालला आहे असें खंडो दीक्षितांच्या नजरेस पडून ते चपापले. हा आपणावर मुद्दाम पाळत तर ठेवीत नसेलना,

असाही त्यांना क्षणमात्र संशय आला. पण छे, तो कानफाट्या आपल्या रस्त्यानें निमूटपणें चालला होता. त्यानें आपणास पाहिले देखील नसावें असें खंडो दीक्षितास वाटलें. त्यांनी चटकन् गोपाळभटाचा निरोप घेऊन कान्होबाच्या घरचा रस्ता धरला आणि गोपाळभटही दिंडीची कडी लावून आंत गेला.

यानंतर पुढचा मजकूर आह्मी न सांगताही वाचकांना कळण्यासारखा आहे. खंडो दीक्षित कान्होबांना घेऊन वाड्यांत कसे गेले, तेथें गेल्यावर कान्होबांनीं भैरवभट पुराणिकाची प्रकृति पाहून 'हा परिणामशूळ आहे' असें निदान कसे केले, नंतर खंडो दीक्षित त्याच्याबरोबर औषध नेण्यासाठीं कसे परत गेले, त्यांचेपाशी कान्होबानीं 'तडागमृत्तिकेश्वरा' च्या गोळ्या कशा दिल्या, इत्यादि सर्व तपशील सागून आह्मी वाचकाना कंटाळा आणीत नाही. थोडक्यात एवढेंच सांगतों कीं, कान्होबाचें औषध पोचल्यापासून — ह्मणजे वाड्यात पोचल्यापासून, तें भैरवभटाच्या पोटापर्यंत पोचलेच नाही, आणि पोचावयाचें नव्हतेंही — थोड्याच वेळात भैरवभटजीचा पोटशूळ अगदी थांबला, कान्होबांना तशी वर्दी देण्यात आली, आणि आपल्या औषधाच्या या अद्भुत करामतीनें (?) कान्होबा अत्यंत खुष होऊन राहिले !

त्याच दिवशी तिनिसाजचे सुमारास मोतीचौकांतील एका दिवाणखान्याच्या गच्चीवर दादासाहेब आपल्या परिवारासहवर्तमान गोष्टी करीत बसले होते. दिवसभर मनस्वी उकाडा झाल्यामुळे संध्याकाळी सुटलेल्या वाऱ्याच्या झुळकीचा गारवा दादासाहेबाना विशेषच आराम देत होता. एका प्रशस्त सतरंजीवर मध्यभागी लोड टाकला असून दादासाहेब त्याला टेकून बसले होते, आणि त्रिमंगलाचार्य, खंडो दीक्षित, कुटुंबाशास्त्री इत्यादि पार्षद त्याच्या दुतर्फा विराजमान झाले होते. शिवरामभटाने चालविलेला उद्योग हाच प्रस्तुत त्याच्या चर्चेचा विषय असून त्याच्या उद्योगाला यश येणार अशा भरंवशाने दादासाहेब विशेषच खुषीत आलेले दिसत होते. गोपाळभटाला पत्राचे उत्तर घेऊन जाण्यास किती दिवस लागतील याचा आपल्या भौगोलिक ज्ञानाच्या मगदुराप्रमाणें मंडळी अंदाज बाधीत होती, आणि दादासाहेब त्याची अगाध माहिती ऐकून पोट धरधरून हसत होते. इतक्यात तुळ्या पोवाराने गच्चीवर येऊन "नाना फडणीस भेटीसाठी आले आहेत" अशी वर्दी दिली. नानाचे नाव ऐकताच दादासाहेबाचा उल्हास पार मावळून त्याच्या कपाळास एकदम तीन आठ्या चढल्या. ते तुळ्याच्या अगावर एकदम खेकसून म्हणाले, 'आता या वेळीं नानाचें काय काम आहे ? मातक्यान् मातक्यान् येऊन त्रास काय देतोस ? ' तुळ्याला आपला अपराध काय झाला हेंच समजेना. शिवाय नानांची भेट घ्यावयाची नाही असेच आपल्या धन्याच्या मनांत निश्चित

आहे असेंही त्यास वाटेना. ह्मणून तो दादासाहेबांच्या तोंडाकडे पहात राहिला!

पण इतक्यांत दादासाहेबांच्या मनांत अशी शंका आली कीं, कांहीं तरी विशेष कारणाशिवाय आपणाकडे कधींही न येणारे नाना जेव्हां आज मुद्दाम आले आहेत, तेव्हां आजच्या आपल्या कारस्थानाचा त्याना कांहीं सुगावा तर लागला नसेलना? ही शंका मनात आली मात्र, दादासाहेबांना तीच अत्यंत संभवनीय वाटूं लागली, आणि तिचें निराकरण करून घेण्याकरितां कां होईना, नानाची गाठ घ्यावी असें त्यांच्या मनांत आलें. 'बरें, येऊं देत' असें तुळयास ह्मणून ते खंडो दीक्षितादि मंडळीकडे वळले व त्यांनीं त्यांना कांहीं नेत्रसंकेत केला. तुळ्या बाहेर गेला आणि थोड्याच वेळांत नाना फडणीस आंत येऊन दादासाहेबास नमस्कार करून उभे राहिले.

'या नाना,' दादासाहेब ह्मणाले, 'बसा, कां आले होतेत?'

'मी आज मुद्दामच आलों होतों,' नाना खालीं बसत ह्मणाले, 'माझा अधिकार नसूनही माझ्या मनांत श्रीमंताना एक प्रश्न करावयाचा होता. स्पष्ट विचारण्याची आज्ञा असेल तर विचारतों.'

नानांना आपल्या कारवाईचा काही तरी सुगावा लागला आहे हें तर दादासाहेबानीं ओळखलेंच, पण त्यांच्या मनात आपल्या आश्रिताच्या देखत तो विषय काढूं नये असें आहे हें जाणून दादासाहेब म्हणाले, 'बोला, खुशाल विचारा, मातक्यान् येथें कांहीं कोणी परकी नाहीं.'

'तर मग मी श्रीमंताना असें विचारतों कीं धाकट्या श्रीमंतांच्या जिवाविरुद्ध साधन करण्याचा खटाटोप श्रीमंत कधी बंद करणार?' नानांनी अमळ गंभीरपणानें प्रश्न केला.

'नाना मी तुमच्या बंदीत आहे, तो केवळ परेच्छाप्रारब्धामुळे आहे,' दादासाहेब चिडल्याचा आविर्भाव करून ह्मणाले, 'मातक्यान् त्या गोष्टीचा तुह्मी दुरुपयोग करीत आहात?'

'तसें मुळींच नाहीं,' नाना ह्मणाले, 'श्रीमंतानीं केवळ आपल्या कृतीने हा बंदिवास ओढवून घेतला आहे, आणि आश्चर्य हे की बंदिवासातही पूर्वीचीच कृति चालूं ठेवली आहे. अर्थात् तिच्या फळाचे खापर माझ्या शिरावर फोडावयास श्रीमंतांस मार्ग नाहीं.'

'नाना, असें मोघम बोलून माझ्या दुःखावर डागण्या देऊं नका,' दादासाहेब ह्मणाले, 'मातक्यान् काय ते स्पष्ट बोला.'

"माझे काय, स्पष्ट सागतों," नानानी उत्तर केलें, "शिवरामभट लिमयाचा भाऊ गोपाळभट याला मी नुकताच गिरफदार करवून त्याच्या जवळून ही श्रीमंताच्या

दस्तुरची चिठी काढून आणली आहे. या चिठीचा अर्थ काय, असा श्रीमंतांस माझा सवाल आहे, " असें म्हणत नानांनीं उपरोक्त पत्र दादासाहेबांच्या पुढें धरलें.

" पाजी मनुष्या !" एवढा वेळ कशी बशी संभाळलेली सभ्यता एकदम टाकून दादासाहेब उसळले, ' तूं हा प्रश्न कोणाला करीत आहेस ? मी तें पत्र महाराला लिहिलें आहे, मातक्यान् माझीं पत्रें अडविणारा तूं कोण ? '

' किती झालें तरी मी श्रीमंताचा आश्रितच आहे, ' नाना शांतपणें म्हणाले, अर्थात् श्रीमताचा अहेर तितक्याच तोलाने परत करण्याची माझी पात्रता नाही. पण इतके मात्र श्रीमंतास मी निक्षून कळवितों कीं, श्रीमत मला कितीही वंद्य असले, तरी मराठेशाहींची गादी त्याच्यापेक्षाही अधिक वद्य आहे, आणि तिच्या संरक्षणा-करिता प्रत्यक्ष परमेश्वराचे देखील व्यवहार अडविण्याचा मी प्रयत्न करीन; मग श्रीमंताची कथा काय ?'

आता मात्र दादासाहेबाना आपला क्रोध आवरेनासा झाला. ते नानावर शिव्याची लाखोली वाहत म्हणाले, ' बरें बरें तर, तूं माझे व्यवहार अडविण्याचा प्रयत्न कर; मातक्यान् मला काय करावयाचे ते मीही करीन. जा, एक क्षणभर देखील माझ्यापुढे उभा राहूं नको ! '

' मला मोठी आशा होती, ' नाना विषण्ण स्वराने ह्मणाले, ' की श्रीमंत या मोघम लिहिलेल्या चिठीचा काही तरी समाधानकारक खुलासा सांगतील, आणि पुढचा कठोर प्रसंग टाळतील. पण श्रीमतानी ज्या अर्थी विपरीतच दिशा घेतली आहे, त्या अर्थी मलाही कठोर उपाययोजनाच करणे प्राप्त आहे. श्रीमंताना मी कळवितो कीं, यापुढे त्याना किवा त्याच्या परिवारांतल्या कोणाही व्यक्तीला कसल्या ही कारणाकरिता वाड्याच्या बाहेर सोडले जाणार नाही. श्रीमंताचे काही काम असले तर ते प्रथम मला कळवावे लागेल, व ते माझ्या मार्फतच केले जाईल. '

' जा माकडा ! ' दादासाहेब ताडकन् उठून व गर्जना करून ह्मणाले, ' मला अडविण्याची तुझी काय प्राज्ञा आहे ? मातक्यान् मी असाच्या असा बाहेर निघून जाईन, आणि मला कोण आडवा येतो ते पाहीन ! '

' श्रीमंतानी वाटल्यास तो प्रयोग करावा ' नाना थंडपणाने ह्मणाले, ' आणि पहाऱ्यावर काय अनुभव येतो तो पहावा. पण तसा उपमर्द करून घेण्यात अर्थ नाहीं अशी श्रीमंतांस माझी सूचना आहे. '

दादासाहेबांना काय बोलावें हेंच कळेना. त्याच्या अंगाचा नुसता तिळपापड झाला होता. त्यांचे डोळे इंगळासारखे लाल झाले होते, आणि त्यांच्या नसांनसांतून द्वेषानल धुमसत होता. पण आपल्या असहाय स्थितीची त्याना जाणीव असल्या-

मुळें अधिक प्रसंग करण्याची त्यांची छाती होईना. त्यांचा दुबळा क्रोध भिन्न भिन्न इंद्रियांच्या कंपांतून हळू हळू ओसरत राहिला !

'श्रीमंतांना माझी अखेरची विनंति एवढीच आहे' नाना म्हणाले, 'कीं, त्यांनीं अद्यापही हा अधःपाताचा मार्ग सोडावा, आणि राज्याचें कल्याण चिंतून सुखासमाधानानें रहावें. श्रीमंत जर सरळ रस्त्यानें चालले, तर सारी दौलत त्यांचीच आहे,' असें म्हणून नाना माघारे फिरले, आणि खंडो दीक्षितादि गण आपल्या धन्याच्या तोंडाकडे पहात राहिले !

पण वाचकहो, नानांची स्थिति खरोखरीच अनुकंपनीय नव्हे का? त्यानी आपल्या धूर्तपणानें गोपाळभटरूपी तोतया ज्योतिष्याची कारवाई हा हा म्हणतां ओळखली, आणि जनार्दन हरी कोतवालाने कानफाट्या गोसाव्याच्या वेषानें ती उघडकीस आणून गोपाळभटास घरांतून बाहेर पडतांच पकडलें हें सर्व खरें; पण इतक्या आटोकाट धोरणानें राज्यरक्षण करणाऱ्या नानाना प्रत्यक्ष राज्याच्या धन्यावर पहारेकरी होण्याचा प्रसंग यावा, या पेक्षा खडतर दुर्दैव कोणतें ?

---

## प्रकरण २० वें.

खरे ले. ९३७. ] **नवे दर्यासारंग.** [ बु चैत्र शु. १ शके १६९२

मागील प्रकरणांत सांगितलेल्या गोष्टी घडून एक महिना होऊन गेला होता, आणि शके १६९२ चा चैत्र पाडवा उगवला होता. यंदाचा पाडवा बुधवारी आल्यामुळें वर्षाचा स्वामी बुध होता हें पंचांगप्रिय वाचकास सागणें नकोच. स्वामीच स्वतः दुबळा असल्यामुळे इतर अग्रधान्येश, रसेश वगैरे त्याचे कामगार कसे काय आहेत या गोष्टीस महत्व राहिलें नव्हतें आणि येत्या वर्षाच्या फलाविषयी महाराष्ट्रजनता एकंदरींत साशंकच होती. त्याचें प्रत्यंतर दाखविण्याकरितां आज आह्मी मुद्दाम आमच्या वाचकांस श्रीक्षेत्र रामेश्वरास घेऊत जात आहों. मात्र याचकांनीं आमच्यापासून श्रीरामेश्वरलिंगाच्या किंवा भगवंतांनीं रावणवधार्थ जाताना बांधलेल्या सेतूच्या परिचयाची अपेक्षा करूं नये. प्रस्तुतच्या धामधुमीच्या वेळी आपणांस क्षेत्रदर्शन करण्यास सवड नाहीं, तें आपण आणखी केव्हां तरी फुरसत झाल्यास करूं. तूर्त आपणामागें युद्धाची धुमश्चक्री लागली आहे आणि तिजमध्येंच 'हालमे ख्याल' या न्यायानें आपण आपल्या जिवाचे होईल तसें रंजन करून घेतलें पाहिजे.

ती पहा, वाचकहो, रामेश्वरापुढील हिंदीमहासागराच्या लाटांवर एक शर्यत चालली आहे! एका बाजूला दहा बारा फरांचीस व वलंदेज जहाजें असून दुसऱ्या बाजूला जवळ जवळ तितकींच मराठी पालें व जहाजें आहेत. फिरंगी जहाजें पश्चिमेच्या रोखानें हिंदुस्थानच्या दक्षिण किनाऱ्याला वळसा घालून जावयास निघाली असून मराठी जहाजें कोसा दीड कोसाच्या टप्यानें त्यांचा पाठलाग करीत आहेत. ही जहाजें कोठली व त्याचा हा पाठशिवणीचा खेळ चालण्याचें कारण काय, असा प्रश्न वाचकाच्या मनात येईल हे जाणून आह्मी त्याचा थोडक्यात खुलासा करतो. गेल्या माघ शुद्ध पंचमीच्या दिवशी विजयदुर्ग येथें आनंदराव धुळपाकडून आरमाराचा सुभा मोत्याजीराव विचारे याच्या ताब्यात आला हें वाचकाच्या स्मरणात असेलच. मोत्याजीराव आनदराव धुळपाच्याच तालमीत तयार झालेले असून त्यानीं आजवर अनेक दर्यायुद्धात चागली कामगिरी करून दाखविली होती. श्रीमंताची धुळप मंडळीवर अमळ इतराजी झाल्याचें कळताच मोत्याजीरावानी सखारामबापूंच्या मार्फत श्रीमंताकडे वशिला लावला, आणि धुळपाकडील आरमाराची सुभेदारी तर पटकाविलीच, पण श्रीमंताना मोत्याजीरावाच्या पराक्रमाइतकीच त्याच्या अडाणीपणाबद्दलची खात्री असल्यामुळे, त्यानीं बाळाजीपंत घाट्याना त्याचे कारभारी नेमून त्यांच्या दिमतीस दिले.

आरमाराचा ताबा घेतल्याबरोबर एक दोन दिवसातच मोत्याजीरावानी आपल्या बरोबर तीन चार गुराबा आणि सात आठ जहाजे घेऊन दक्षिण किनाऱ्याच्या रोखाने स्वारी करण्याचे ठरविले. प्रस्तुत हैदरावर मराठ्यांची मोहीम चालू असल्यामुळे पश्चिम किनाऱ्यावरील हैदराच्या ताब्यातलि बंदरे जिंकून घेऊन समुद्राच्या बाजूने हैदरास शह देण्याविषयी श्रीमताचा मोत्याजीरावाला हुकूम होता. त्याप्रमाणें मोत्याजीरावानी हैदराच्या ताब्यातील एक दोन बदरे जिकूनही घेतलीं होतीं, पण नतर मात्र त्यानीं स्वतःचेंच चातुर्य लढवून फिरग्याची जहाजे हुडकून काढून त्याचें पारिपत्य करण्याचा जो घाट घातला तो श्रीमंताच्या धोरणाला तूर्त तरी अगदी विसगत होता. बाळाजीपत घाट्यानी त्याना तसें स्पष्ट बोलूनही दाखविलें, पण "तुह्मा बामणभटाना त्यात काय कळते"? असे ह्मणून मोत्याजीरावानी बाळाजीपंताला धुडकावून दिले! अलीकडे फिरंग्याची जहाजे पेशवे सरकारांची दस्तुरी चुकवून व्यापार करीत, हें खरे होतें, व त्यांना केव्हा तरी शासनही करावयास पाहिजे होते, पण ते करण्याची वेळ ही नव्हे, हे मोत्याजीरावाच्या ध्यानात आले नाहीं. त्यांतच त्यांना अशी एक उडत बातमी लागली कीं, दहाबारा फरांचीस व वलंदेज जहाजे नुकतींच कालिकतवरून रामेश्वराकडे गेली. इतके ऐकताच मोत्याजीरावांचा उत्साह काय विचारावा? ते फिरंग्याच्या शासनासाठीं इतके आतुर बनले

कीं, आपल्या जहाजावर त्यानीं शिवाजीराव सुर्व्यांची मुलगी हंसा व तिची मावशी या दोघींना हंसाच्या आजोळीं उडपी बंदराजवळच्या एका खेड्यात पोचविण्यासाठी घेतलें होतें, तें अगत्यानें करावयाचें काम देखील त्यानीं तहकूब केलें आणि उडपी बंदर वगळून तडक कालिकतचा रस्ता धरला! त्यांनीं फिरंगी जहाजाचा अत्यंत जोरानें पाठलाग सुरू केला, आणि फाल्गुन वद्य एकादशीच्या सुमारास त्या जहाजांना रामेश्वरापाशीं गाठलें. तेथें दोनी काफिल्यांची थोडावेळ दुरूनच गोळा-गोळी होऊन फिरंग्यांचीं जहाजें पूर्वेकडे निसटून परत फिरल्याचा मोत्याजीरावाना भास झाला, आणि त्यांनी त्या जहाजांचा झपाट्याने पाठलाग सुरू केला. मोत्या-जीराव फिरंगी काफिल्याच्या मागें लागले आहेत, अशा स्थितीतच आपण त्यांच्या जहाजांवर जात आहोंत.

आज नव्या वर्षाचा पाडवा असून प्रहर दिवस आला होता. समुद्रावर बालसूर्याचे आरक्त किरण पडले असून त्यांच्या योगाने पाण्याच्या सपाटीवर एक मनोहर शोभा उत्पन्न झाली होती. आकाश निरभ्र आणि समुद्र शांत असल्या-मुळे मोत्याजीरावांची स्वारी मोठ्या उमेदींत होती. पाडव्यानिमित्त सारी जहाजे धुण्याचें व त्यांची पूजा करून गुढ्या उभ्या करण्याचें काम जहाजें चालू असतां-नाच चाललें होतें. जहाजावरच्या सर्वांत लांब काठ्या असतील त्यांच्या गुढ्या करण्याचा मोत्याजीरावानी हुकूम फर्मावला होता. ‘ इतक्या उंच गुढ्या उभ्या केल्या ह्मणजे फिरंग्याना त्या लांबून दिसतील आणि त्यांना आपला ठावठिकाणा समजून ते आपणास झुकांडी देऊन पळतील, ’ अशी बाळाजीपंत घाट्यानीं पुष्कळ तक्रार केली आणि तशा गुढ्या उभ्या करूं नयेत असें सुचविलें, पण मोत्याजी-रावांनीं असें रूढिबाह्य वर्तन करण्याचें साफ नाकारलें, आणि गुढ्या डोलकाठ्यावर जोडून मुद्दाम उंच चढविल्या! याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. फिरं-ग्यांना मराठी जहाजांची जागा नक्की समजत राहिली आणि मराठ्याना मात्र फिरंगी काफिल्याचा आदमासानें माग काढीत जावें लागलें! मोत्याजीरावाच्या अगाध व्यवहारज्ञानाचा फिरंग्यांनी भरपूर उपयोग करून घेतला. त्यानी आपल्या व मोत्याजीरावाच्या काफिल्यांतील अंतर सहसा अधिक उणें न होऊं देतां त्याना पुढें पुढें घुलवीत नेलें.

चैत्र शुद्ध तृतीयेच्या दिवशीं सकाळीं मोत्याजीरावांना फिरंग्यांचा काफिला आपल्या टप्प्यांत आल्याचा भास झाला. त्यांच्या नजरेला दूर अंतरावर एका फिरंगी जहाजाचीं शिडें दिसूं लागलीं आणि बराच वेळ तें एकच जहाज दिसत राहिलें यावरून फिरंग्यांनी आपलीं जहाजें सरळ रेषेंत चालविलीं आहेत असा मोत्याजीरावांनीं तर्क केला. मोत्याजीराव आनंदानें बेहोष झाले. घटके दीड

घटकेंत आपण फिरंग्यांच्या काफिल्याला गाठून त्याचा पुरता धुव्वा उडवून टाकू, मग आपली केवढी बोलबाला होईल, आपणांवर श्रीमंतांची किती बहालमर्जी होईल, इत्यादि रम्य कल्पनांत ते इतके गर्क झाले होते की, माध्यान्ह केव्हा टळून गेली याचें त्यांना भान राहिलें नाहीं! जेवणाची वर्दी आल्यावर त्यांनीं चौकशी केली तेव्हां कोठें त्यांना दोन प्रहर दिवस आल्याचें समजलें. जेवण करून ते पुन्हा आपल्या जाग्यावर येऊन पाहतात तों फिरंगी जहाज अमळ अस्पष्ट दिसूं लागल्याचा त्यांना भास झाला. त्याबरोबर फिरंगी जहाजे आपल्या तडाक्यांतून निसटून जातात कीं काय, अशी मोत्याजीरावाना भीति पडून त्याचा विरस झाला. त्यांनी आपल्या तांडेलाच्या ढिलेपणाबद्दल त्याना पुष्कळ शिव्या दिल्या, कडी तोडे बक्षीस देण्याची लालूच दाखविली आणि काय पाहिजे ते करून फिरंग्याच्या काफिल्याना गाठा असें त्याना बजावून सांगितलें. तांडेलांनीही आपली शिकस्त करून जहाजें चालविण्यास प्रारभ केला. एवढ्या अवधींत मराठी जहाजाचा काफिला कोलाचलाचें बंदर मागे टाकून त्रिवेंद्रमच्या बदराजवळ आला होता.

तिसरा प्रहर उलटून गेला. आता मात्र मोत्याजीरावाना धीर निघनासा होऊन ते आपल्या खलाशी मंडळीवर अत्यत चवताळले. त्यातच एवढा वेळ थोडे बहुत दृष्टीच्या टप्प्यात असलेले फिरंग्याचे जहाजही आता मुळीच दिसेंनासें झाले, आणि त्यांच्या तळव्याची आग मस्तकास जाऊन ते सतापाने बेफाम झाले. "तुह्मी अगदी पागल, निकालस बेवकूब मानसं आहात," "तुमासनी पोत्यांत घालून समिदरात बुडाविलं पाहिजे," 'इचभन खलाशी हैती का पडकी भिताड हैती कुनास टावं?' इत्यादि शेलकी पुष्पवृष्टी खलाशांवर करण्यास त्यानी आरंभ केला, व या सर्व आपेशाचें खापर त्यानी आनंदराव धुळपाच्या माथ्यावर फोडले. बिचारे खलाशी जिवापाड मेहनत करून जहाजें वल्हवीत होते व फिरग्याच्या काफिल्यास गाठण्याचा प्रयत्न करीत होते. पण फिरंग्याचा काफिला त्याना गाठताच येईना, त्याला ते तरी काय करणार? मोत्याजीरावानीं फणफणत उठून एक दोन असामींना डोलकाठ्यावर उंच चढविलें आणि फिरंग्याची जहाजे कोठे दिसतात कां पहावयास सांगितलें. त्या मंडळींनी दूरपर्यंत नजर टाकून मोत्याजीरावांना सांगितले की 'किनाऱ्याच्या पश्चिम बाजूनें फिरग्यांचा काफिला चालला आहे, निदान एक जहाज तरी आह्मांस स्पष्ट दिसते आहे.' इतकी खात्रीलायक बातमी मिळतांच मोत्याजीरावानीं खलाशाना फिरून एकदा उत्तेजन दिले व जिवाची पर्वा न करिता फिरंगी काफिल्याचा पाटलाग करण्याची आज्ञा केली. मराठी जहाजांवरचे खलाशी पांच सात दिवसांच्या अविश्रांत परिश्रमाने अगदी थकले होते, तरी देखील भावी यशाच्या आशेनें त्यांनीं फिरून एकदा झपाट्याने जहाजें हाकारली!

आणखी तीन चार घटका गेल्या. सूर्य अस्ताचलाकडे झुकूं लागला. मोत्याजी रावांचा जीव खालींवर होऊं लागला. इतक्यांत त्यांना अशी बातमी लागली की, आपण विजयदुर्गाहून निघतांना जी ‘ दोन महिन्यांची अडशेरी ’ बरोबर घेतली होती ती बहुतेक संपुष्टांत आली आहे. ही बातमी ऐकतांच मोत्याजीराव मनांतून गडबडले पण बाहेर तसें कांहीं न दिसूं देतां ‘ हरकत नाहीं, फिरंग्याच्या झाजांवर आमासनी पुष्कळ चंदी घावल ’ असा त्यानीं आपल्या लोकांस धीर दिला. पण आज [illegible] वेळच वाईट लागली होती असें दिसलें. एवढा वेळ अगदीं निरभ्र असलेल्या आकाशात एकाएकीं ढग येण्यास प्रारंभ झाला. प्रथम क्षितिजावर एक लहानसा काळा ठिपका चमकूं लागला. तोच थोडा वर सरकला, तोंच त्याला चिकटून पाठोपाठ दुसरा आला. त्याच्या मागून तिसरा आला. होता होतां घटकाभरांत सारें नभोमंडल आभ्राच्छादित होऊन सूर्य झांकून गेला, आणि चोहोंकडे गडद अंधार पडला. आकाशांत प्रचंड गर्जना दुमदुमूं लागून विजांचे थैमान चालूं झालें. एक महाभूत अशा रीतीनें बिथरतांच त्याच्या संसर्गानें दुसरेंही बिथरलें ! समुद्रपृष्ठावर मोठमोठ्या लाटा उठण्यास प्रारंभ होऊन मराठी जहाजे झोपाळ्यावर चढल्याप्रमाणे हेलकावे खाऊं लागली. मेघगर्जनांचा समुद्रगर्जनाशी जणुं काय प्रश्नोत्तररूप संवाद सुरूं होऊन त्याच्या कडकडाटानें हशम-तांडेलांच्या कानठाळ्या बसूं लागल्या ! मोत्याजीराव दर्यावरील प्रसंगांना पूर्वीपासूनच सराईत होते, पण त्यांना देखील आजच्या वादळाचा जोर असा काही विलक्षण वाटला कीं, ते क्षणमात्र गांगरून गेले. काय करावें हेंच त्यांना सुचेना. ते किनाऱ्याकडे वारंवार नजर टाकूं लागले, पण किनाऱ्यालगतची ही बाजू सर्व खडकाळ आहे असें त्यांना दिसून आल्यामुळें त्याचा निरुपाय झाला.

वादळाचा जोर तर क्षणाक्षणाला वाढत चालला. आकाशातून पटापट बोरासारखे पावसाचे थेंब पडण्यास सुरवात होऊन तेच बळावले व त्यांचा मुसळधार वळीव होतो कीं काय, अशी भीति उत्पन्न झाली. आपल्या क्षणिक दर्शनानें त्रिभुवनाचे डोळे दिपवून टाकणारी विद्युल्लता अनिरुद्ध संचार करूं लागली. लाटा तर एवढ्या मोठ्या येऊं लागल्या कीं त्याच्या हेलकाव्यांतून नाचत चाललेलीं जहाजें डोंगराच्या बोगद्यातून चालल्यासारखीं दिसूं लागलीं ! वर पहावें तों काळेकुट्ट मेघ विद्युत्स्फुरणरूपी अनंत हातांनी आपणास कवटाळून बुडविण्यास सज्ज झाले आहेत, आणि सभोंवतीं पहावें तों अंधारलेल्या दिशा काळाच्या दाढांप्रमाणें आ वासून आपणांस गिळावयास पहात आहेत असा भीषण देखावा दिसूं लागला ! अशा स्थितींत मोठमोठ्या निधड्या वीरांच्या काळजानें देखील क्षणमात्र ठाव सोडला असल्यास नवल नाहीं. मोत्याजीरावांची पाचावर धारण बसली आणि त्यांनीं आपली सर्व

जहाजें अर्धचंद्राकार लावून चालविण्याचा हुकुम सोडला. त्यांनीं आता फिरंगी काफिल्याचा पाठलाग करण्याची सर्व कल्पना टाकून दिली, आणि आपलीं जहाजें सुरक्षित बचावून नेण्याविषयीं ते मनांतून मल्हारी मार्तंडाचा धावा करूं लागले!

या वाचकहो, आपण मोत्याजीरावांना असेच ईश्वराच्या धाव्यांत सोडून त्याच्या फत्तेजंग जहाजावरील मधल्या गाळ्यात तयार केलेल्या एका पडद्यांच्या खोलीत अमळ डोकावून पाहूं. ती पहा शिवाजीराव सुर्व्यांची मुलगी हंसा आपली मावशी येसाबाई हिला धीर देऊन तिची समजूत काढीत आहे. काय, बारा तेरा वर्षांची कोवळी पोर पन्नास वर्षांच्या मावशीला धीराच्या गोष्टी सांगत आहे? होय वाचकहो, हंसा तेरा वर्षांची असली तरी ती शिवाजीरावासारख्या कसलेल्या दर्यासारंगाची मुलगी असल्यामुळें असल्या वादळाला पाहून ती मुळींच डगमगली नव्हती. तिची मावशी मात्र भीतीनें गर्भगळित होऊन रडूं लागली होती. "माझं मडं ग्येलं, समिदरावरनं माज्या बाईला आनायची अवदसा कुटनं मला आटवली, आतां माज्या बाईचं कसग होईल, आई अंबाबाई माझं एवड सोनं ह्या वादळातनं निबाऊन न्येलस तर तुला एकशेआट पुतळ्याची माळ वाहीन" इत्यादि टकळी तिनें एकसारखी चालू केली होती, आणि हंसा तिला धीराच्या गोष्टी सागत होती. हंसाच्या मावशीचें घर उडपी जवळच्या एका खेड्यात होतें, तेथे हंसाला आठ पंधरा दिवस घेऊन जाण्यासाठीं येसाबाई विजयदुर्गला मुद्दाम गेली होती. त्याच सुमारास मोत्याजीरावही आपले आरमार घेऊन दक्षिणेकडे निघाले होते. ते उडपीच्या बंदरावरून जावयाचें असल्यामुळें, आणि मोत्याजीरावाचा व शिवाजीरावांचा दाट घरोबा असल्यामुळें, हंसाला व तिच्या मावशीला उडपीच्या बंदरावर उतरून येसाबाईच्या गावीं पोचत्या करण्याची कामगिरी शिवाजीरावानीं मोत्याजीरावाकडे सोपविली होती. मोत्याजीराव शिवाजीरावाची कामगिरी अगत्यानें पतकरून निघाले, पण वाटेत त्याना फिरंग्याच्या जहाजाची बातमी मिळाल्यामुळें उडपीस मुक्काम करण्याचें त्यानी टाळले, आणि आपली जहाजें तशींच पुढें हाकारलीं. दर्यावरील भल्याबुऱ्या परिस्थितीत बायकामाणसे बरोबर नसावीं, ही साधी गोष्ट लक्ष्यात ठेवण्याइतपतही तारतम्य मोत्याजीरावाना सुचलें नाहीं! मात्र ते स्वभावाचे अत्यंत मायाळू असल्यामुळे त्यांनी हसाची बरदास्त अगदीं पोटच्या मुलीप्रमाणें ठेवली होती.

कांहीं वेळानें वादळाचा जोर थोडा कमी झाला. आकाश बरेच निवळलें आणि थोडथोडें दिसूंही पण लागले. आणखी थोडावेळ गेल्यावर आकाश बहुतेक निरभ्र होऊन पुन्हां एकदा सारा आसमंत प्रकाशित झाला. सूर्य आतां अस्तास जाण्यास फार तर दोन तीन घटका अवकाश राहिला असेल. इतक्यात "फिरंग्याचें जहाज जवळच दिसतें आहे" असा कल्लोळ मोत्याजीरावाच्या कानावर आला व ते

चटकन् उठून दुर्बीण घेऊन उत्तरेकडे पाहूं लागले. वल्हीवाल्यांनीं पुन्हा एकदां झपाट्यानें वल्हीं मारण्यास सुरवात केली. वादळ नाहींसें झालेलें पाहून हंसा आपल्या पडद्यांच्या बंदिशाळेंतून बाहेर येण्यास निघाली. पडद्याच्या आंत पुष्कळ वेळ डांबून राहिल्यामुळें ती अगदीं कंटाळली होती, आणि बाहेरच्या मोकळया हवेंत केव्हां एकदां जाईन असें तिला होऊन गेलें होतें. तिची जहाजावर जाण्याची कल्पना तिच्या मावशीला आवडली नाहीं. तिनें तिला असल्या कातरवेळीं उघड्या-वर जाऊं नको म्हणून परोपरीनें सांगितलें, पण ती अल्लड पोर कसची ऐकते ? ती चटदिशीं बाहेर आली आणि सुकाणाच्या बाजूवर चढून मोत्याजीरावाच्या जवळ जाऊन उभी राहिली देखील! मोत्याजीराव टप्यात सापडलेल्या फिरंग्याच्या काफिल्या-वर साऱ्या जहाजांतून एकाच वेळी तोफा डागण्याचा हुकूम देण्याच्या नादात होते, त्या मुळें त्यांचें लक्ष्य तिजकडे मुळींच गेलें नाहीं. आणखी एकच क्षण गेला असेल, मोत्या जीरावांच्या तोंडून 'एक, दोन, तीन' असे अंक मोठ्याने बाहेर पडले. तिसऱ्या अंका-बरोबर 'धाडकन्' तोफेचा आवाज होऊन फत्तेजंग जहाजावरून तोफेचा गोळा सुटला दुसऱ्या एखाद्या मुलीच्या कानठाळ्या बसून ती बेशुद्धच पडली असती, पण हंसा विलक्षण धीराची मुलगी असल्यामुळें तिला त्या तोफेच्या आवाजाचे काहीच वाटले नाहीं ! मात्र तोफेंतून गोळा सुटताच जहाजाला मागे लोटल्यासारखें होउन हंसाला उशी खाल्याचा भास झाला आणि तिच्या पायाखालची एक खिळखिळी झालेली फळी उचटून वर आली. त्याचक्षणी अर्धचंद्राकार पसरलेल्या इतर मराठी जहाजा वरूनही धडाधड तोफांचे गोळे सुटले आणि जहाजाच्या मधल्या रिकाम्या जागा व जहाजांवरचा भाग धुरानें भरून गेला. हंसा आपल्या पायाखालच्या सुटलेल्या फळीवर असलेला आपला देह सावरून धरते, इतक्यात फिरंग्यांच्या जहाजावरून एक तोफेचा गोळा फत्तेजंग जहाजावर येउन मोत्याजीराव व हंसा याच्या दरम्यान् आदळला. मोत्याजीरावाच्या डोळ्यात धूर भरून त्यानी क्षणमात्र डोळे मिटले आणि हसा आपल्या पायाखालच्या फळीसकट समुद्रात फेकली गेली! तोफाच्या धडाक्यात आणि धुराच्या लोटात तिजकडे कोणाचेच लक्ष्य गेले नाही. धक्का जोराचा बसल्यामुळे तिच्या तोंडून कसला आवाजही निघाला नाही. मात्र भीतीच्या पहिल्या झटक्यासरशीं तिचे हात फळीला कवटाळून राहिले !

थोड्याच वेळांत मराठी जहाजांनी लगट करून फिरंगी जहाज गाठले. पण मराठ्यांचे हशम आणि स्वतः मोत्याजीराव त्या जहाजावर चढून जाताच त्याना असें समजून आलें कीं, आपण मोठ्या प्रयासाने ज्याला गांठलें तो फिरंग्यांचा सारा काफिला नसून त्यांतलें फक्त एकच जहाज आणि ते जुनें आहे, बाकीचा काफिला आपल्या हातावर तुरी देऊन केव्हांच पूर्वेच्या बाजूनें निसटून गेला आहे. सांपड-

लेल्या जहाजावर सामानसुमान कांहीं एक नसून फक्त थोडे खलाशी व एक दोन गोलंदाज आहेत, आणि ते आपणास बिनशर्त शरण आले आहेत!! हा सर्व मजकूर कळून आल्यावर मोत्याजीरावाना आपल्या कर्तबगारीबद्दल काय वाटलें असेल याची कल्पना करण्याचें काम आह्मी वाचकावरच सोपवितों. नंतर पुष्कळ वेळानें हंसा जहाजावर नाहीं ही गोष्ट त्यांना समजली आणि त्यांच्या पोटांत धस्स झालें! त्यांनीं तिचा कसून शोध चालविला, सारा समुद्रकिनारा उलथा पालथा केला, पण त्यांना हंसाचा मुळीच पत्ता लागला नाहीं. आपण हे नसतें अपेश कोठून ओढवून घेतलें हा विचार मनात येऊन मोत्याजीराव खिन्न झाले आणि त्यांतच हंसाची मावशी येसाबाई हिनें त्याच्यावर तळतळाटाची व शिव्याशापांची लाखोली वाहिली! मग काय विचारावे? मोत्याजीरावाना मेल्याहून मेल्यासारखें झालें आणि निराशेनें त्यांनी आपल्या आरमाराचा मोर्चा विजयदुर्गाकडे वळविला.

* * * *

इकडे हंसा जी पाण्यांत पडली ती प्रसंगावधान राखून फळीस चिकटून राहिली. लाटा तुफान उसळून तिला वाहून नेत होत्या, मधून मधून तिच्या नाकातोंडांत पाणीही जात होतें, पण त्या धीट बालिकेनें धीर सोडला नाहीं. अखेर अखेर मात्र तिला गुदमरल्यासारखें होऊन ती कासावीस झाली आणि किनाऱ्यावर जाऊन पडली ती बेशुद्धच झाली! ती तशा स्थितींत पडली असतानाच जवळून चाललेल्या दोन सांडणीस्वारांचे तिजकडे लक्ष्य जाऊन त्यांनी तिला उचलून उंटावर घेतली व ते मार्गस्थ झाले.

---

## प्रकरण २१ वें.

| खरे, ले. ९७३-९७५<br>हरि. ब. पान ३१ | निजगलचा वेढा. | वै. शु. ५<br>२९-४-१७७० |
|---|---|---|

गोपाळराव पटवर्धन आणि त्याचे बंधुवर्ग यानीं हैदराचा छापा परतविला ही बातमी ऐकून श्रीमंत फार खुष झाले, पण पटवर्धन मंडळीजवळ फौजेचा भरणा असावा तितका भरपूर नाहीं हे जाणून त्यांनी राघो बापूजी व आनदराव गोपाळ नांवाच्या दोन सरदारांस फौजेसह त्यांच्या कुमकेस पाठवून दिलें. शिवाय गुत्तीकर मुरारराव घोरपड्याचा पुतण्या मालोजी याचीही रवानगी त्यानी गोपाळरावाकडे करून दिली. पटवर्धनांच्या फौजेत अशा रीतीने सहा हजार फौजेची नवी भर पडताच त्याना खूपच जोर चढला आणि ते हैदराला भारी झाले. थोड्याच दिवसात गोपाळरावानीं बुधेहाळ, हल्याळ, आणि कडब हीं ठाणी जिंकून पाडून टाकलीं आणि हागलवाडीच्या ठाण्याचा बंदोबस्त केला. श्रीमंत स्वत: मुलबागलाहून बेंगरुळाकडे निघाले. त्यानी बेंगरुळास वेढा घालण्याची हूल दाखविली पण तें ठाणें दुर्भेद्य आहे हें त्यांस पक्कें ठाऊक असल्यामुळें त्याला वेढा घालण्याच्या भरीस न पडतां ते वळसा घेऊन देवरायदुर्गाजवळ आले. थोड्याच दिवसात मिजगलदुर्ग आणि देवरायदुर्ग हे किल्ले त्याच्या हाती आले. आपल्या राज्याची अशा प्रकारें वाताहत सुरू झालेली पाहून हैदर मासूरच्या बारींतून बाहेर पडला आणि बाणावरपर्यंत आला. ही संधी साधून त्याला आपल्या व गोपाळराव पटवर्धनाच्या सैन्याच्या दामटींत धरावा, असा श्रीमतानीं घाट घातला. पण आपल्या पिछाडीस पटवर्धनांच्या पथकाच्या हालचाली सुरू झालेल्या पाहताच हैदरनाइकाने श्रीमताचा कावा ओळखला आणि श्रीरंगपट्टणाकडे पोबारा केला.

श्रीमंत



थोरले माधवराव.

हैदर श्रीरंगपट्टणात जाऊन बसला हे पाहताच श्रीमंतानीं गोपाळराव पटवर्धनास पुढें येऊन निजगलच्या किल्यास वेढा घालण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें गोपाळरावानी सैन्य आणून चैत्र वद्य षष्ठीच्या दिवशी निजगलच्या किल्यास वेढा दिला. हा किल्ला अत्यंत बळकट असून त्याच्या आसपास पाण्याचें दुर्भिक्ष होते. किल्यात निवडक पण मुबलक शिबंदी होती. त्या शिबंदीने निकराने किल्ला झुंजविण्यास सुरवात केली. गोपाळरावांनी शेजारच्या एका टेकडीवर तोफा चढवून किल्यावर मारा करून पाहिला, पण त्याचा कांहीं उपयोग होईना. मरा-

त्यांनीं दिवसभर मारगिरी करून किल्याच्या तटाला एखादें भगदाड पाडावें आणि किल्लेकऱ्यांनीं तें रातोरात मुजवून घ्यावें असा प्रकार होऊं लागला. वैशाख शुद्ध प्रतिपदेच्या दिवशी श्रीमंत आपल्या फौजेसह निजगलास येऊन पोहोंचले आणि मग वेढ्यास खरा रंग चढला. श्रीमंताच्या फौजेंत या वेळीं नरसिंगराव धायगुडे, शहाजीराजे भोसले, गोपाळराव पटवर्धन आणि त्याचे बंधु, राघो बापूजी, आनंदराव गोपाळ, आनंदराव रास्ते, भापकर, इत्यादि बहुतेक मोठमोठीं घेंडे असून प्रख्यात सरदार मुराराव घोरपडे गुत्तीकर हेही सैन्यासह त्याना नुकतेच येऊन मिळाले होते. पण असले धुरंधर सरदार आणि एवढा प्रचंड सेनासमुदाय वेढा घालून बसला असतां चैत्र वद्य षष्ठीपासून वैशाख शुद्ध चतुर्थीपर्यंत बारा तेरा दिवसपर्यंत किल्ला झुंजतच होता ! आतापर्यंत निजगलपेक्षाही अभेद्य असे अनेक किल्ले आपण हा हा म्हणता घेतले असून हा किल्ला इतका दमवितो, या गोष्टीची श्रीमंताना इतकी खंत वाटू लागली की, चतुर्थीच्या साऱ्या रात्रींत त्यांना मुळींच झोंप आली नाही, सारी रात्र त्यानी बेचैन जागून काढली !

वैशाख शुद्ध पंचमीचा दिवस उजाडला. श्रीमंताची स्वारी सकाळपासूनच नाराज दिसत होती. ते अमुक एका व्यक्तीवर व अमुक एका कारणासाठीं रागावले होते असे नाहीं. त्याच्या भोवतालच्या सर्वच व्यक्ती आपल्या कर्तव्यात रतिमात्र चुकत नव्हत्या. श्रीमंत सौभाग्यवती रमाबाईसाहेब त्याच्या खाण्यापिण्याची बरदास्त उत्तम प्रकारे ठेवीत होत्या. त्याचे बंधु नारायणराव त्याची हरएक प्रकारें मर्जी संभाळून त्याच्या अर्ध्या वचनात वागत होते. त्याचे सरदार वेढ्याच्या कामीं आपल्या पराक्रमाची शिकस्त करून सोडीत होते, आणि त्याचे शिपाईप्यादे जिवावर उदार होऊन लढत होते. अशा स्थितींत श्रीमंत रागावणार तरी कोणावर? पण मानी मनुष्याला आपणाकडे यत्किंचित् कमीपणा आलेला खपत नाहीं असा सामान्य नियम आहे ; तो दुसऱ्याच्या कसुरीमुळें आला तर तो दुसऱ्यावर रागावतो आणि अपरिहार्य परिस्थितीमुळें आला तर स्वतःवरच रागावतो, मिळून कोणावर तरी रागावल्यावाचून त्याला चैन पडत नाही. श्रीमंताची आज अशीच स्थिती होऊन ते आपणा स्वतःवरच जळफळत होते. ते आज कोणाशी मोकळेपणानें बोलत नव्हते, कसले हुकूम देत नव्हते, तर उजाडल्यासून घोड्यावर स्वार होऊन आपल्या सैन्यात हिंडत होते. त्याची आज खरोखरीच त्रिधा स्थिती झाली होती. त्यांचा देह सैन्यातून फिरत होता, डोळे किल्ल्याच्या तटाचे निरीक्षण करीत होते, आणि मन, जवळ येऊन ठेपलेल्या पावसाळ्यात कर्नाटकातच छावणी करून रहावें की पुण्यास परत जावे याचा निर्णय करण्यांत गुंतलें होते! चोहोंकडून मोर्चेबंदी झालेली असून त्यांतून आज सकाळपासून किल्ल्यावर तोफांच्या गोळ्यांचा पाऊस

पडत होता. सरदारशिपाई जिवाची तमा न धरितां बेगुमानपणानें शत्रूच्या माऱ्या खालीं हिंडत होते, हें दृश्य पाहून श्रीमंतांना आपल्या सैन्याविषयीं मनांतून मोठा अभिमान वाटला. पण बाहेर तसें कांहीं दिसूं न देतां ते दुपारच्या सुमारास राहुटी-कडे परतले आणि भोजनास बसले.

श्रीमंतांनीं एखादाच घास घेतला असेल इतक्यांत 'चिकबाळाप्पा नावाचा एक कर्नाटकांतला दलाल आपला कापसाचा माल मराठ्यांच्या लष्करानें अडविला आहे' असें गाऱ्हाणें घेऊन आक्रोश करीत आला आहे अशी त्यांना वर्दी मिळाली. अगोदर त्यांना भूक अशी विशेष नव्हतीच, त्यात असमाधानास हें एक नवेंच कारण उपस्थित झालेलें पाहून त्यांनीं चिकबाळाप्पाची भोजनाची सोय करण्यास सांगितली आणि स्वतः कसेबसे दोन चार घास खाऊन ते उठले व आचवून कचे-रीच्या डेऱ्याकडे गेले. नंतर चिकबाळाप्पाचें भोजन झाल्यावर त्यांनीं त्यास तेथें बोलावून घेतलें आणि त्याची विचारपूस केली. त्यावरून त्याना असे समजले की, सदर चिकबाळाप्पा हा कापसाचा दलाल असून कर्नाटकांतील कपाशीच्या मालाच्या सुमारें पांचशें गाड्या अर्काटकडे विकावयासाठीं नेत आहे, त्याच्या गाड्या सडकेनें चालल्या असतां मराठ्यांच्या लष्करानें त्या अडविल्या आहेत, आणि त्या गाड्या सोडण्यासाठीं ते जबर खंडणी मागत आहेत. चिकबाळाप्पाच्या तोंडून वरील हकीगत ऐकतांच आपल्या कोणा तरी सरदारांनीं, विशेषतः पटवर्धन मंडळींनीं त्याच्या गाड्या अडविल्या आहेत हें तर श्रीमंतांनीं ताडलेंच, पण चालू मोहिमेत त्यांनीं आपल्या लष्कराला लूट करण्याची परवानगी दिली असल्यामुळे त्याना कांहीं बोलतां येईना! ते क्षणभर स्तब्ध झाले. इतक्यांत त्यांच्या मनांत काही कल्पना येऊन त्यांनी चिकबाळाप्पास प्रश्न केला, 'कायहो नाईक, इतका माल तुह्मी अर्का-टला कोणीकडे नेत आहांत?'

'इंग्रज कंपनीकडे' बाळाप्पांनी उत्तर केले, 'येथल्या पेठात माल विकण्या-पेक्षां इंग्रज कंपनीला विकण्यांत आह्मांला भाव थोडा अधिक मिळतो, आणि विक्रीही रोखीनें होते महाराजरी!' चिकबाळाप्पाचें मोडके तोडके मराठी आह्मी शुद्ध करून लिहीत आहोंत हें वाचकानी ओळखलेंच असेल.

हिंदुस्थानांतला इतका माल इंग्रज कंपनकिडे विकावयास जाण्याची कल्पना श्रीमंतांना कशीशीच वाटली. त्यानी पुन्हा प्रश्न केला, 'अशा किती गाड्या इंग्रज कंपनीकडे जातात?'

'म्हैसुराकडून सातआठशें गाडी गेली,' बाळाप्पानाईक तपशील सांगूं लागले, 'सावनुराकडून जवळ जवळ तेवढीच गेली, निजगलावरून तेवढीच चालली

आहे व इकडची तिकडची मिळून सुमारें दोन हजार गाडी जाईल. यंदा पहिलेंच साल असल्यामुळें याहून अधिक गाडी जाण्याचा रंग दिसत नाहीं सरकाररी!'

विकावयास जाणाऱ्या गाड्यांची संख्या याहूनही अधिक असावी, अशी चिकबाळाप्पा नाइकाची जरी स्तुत्य इच्छा होती तरी श्रीमंताना तसें व्हावेंसें वाटलें नाहींसें दिसलें. ते आश्चर्यानें ह्मणाले, ' काय, ह्मणजे दक्षिण कर्नाटकातील जवळ जवळ सारीच कपाशी इंग्रज कंपनीकडे विकावयास नेण्याचा तुमचा बेत दिसतो?'

' होय सरकाररी, ' चिकबाळाप्पानी शातपणें उत्तर केलें.

' आणि सगळा कापूस तिकडेच गेल्यावर येथल्या कोष्ट्याचा धंदा कसा चालणार?' श्रीमंतानी अधिकच चकित होऊन पृच्छा केली.

' कोष्ट्यांना देखील कंपनी आपणाजवळ नोकरीस रहावयास बोलावते आहे महाराजरी, ' बाळाप्पा नाईक खुलासा करिते झाले, ' कांहीं कोष्टी रहावयास गेले देखील!'

ऐकलेल्या प्रकारात अनिष्ट काय आहे हें श्रीमंतास नक्की समजेना, पण त्यांना तो बरा वाटला नाहीं खास. इंग्रज कंपनीविषयीं ते नेहमींच साशंक होते ह्मणून असो, किंवा चाललेल्या व्यवहारात कांहीं तरी भयंकर आपत्तीची अंधुक जाणीव झाल्यामुळें असो, इंग्रजाच्या प्रस्तुत उद्योगाविषयीं त्याना तीव्र जिज्ञासा उत्पन्न झाली आणि त्यानी बाळाप्पानाइकास पुन्हा प्रश्न केला, ' पण कायहो नाईक, साऱ्या शेतकऱ्यांची इंग्रज कंपनीकडे माल नेण्याविषयीं प्रवृत्ति कशी काय झाली बरें?'

' त्याला कारण कंपनीचा रोख आणि चोख व्यवहार महाराजरी!' बाळाप्पा नाईक बोलले, ' नुकतीच डोंगरची भाकणूक झाली तिच्यात सुद्धा शेतकऱ्यांनी आपला माल कंपनीकडेसच विकावयास न्यावा असेंच आलें!'

आता मात्र श्रीमंताच्या मनात बराचसा प्रकाश पडला. कंपनीच्या दीर्घसूत्रीपणाची त्याना बरीच कल्पना येऊन बाळाप्पाविषयीं त्याच्या पोटात एकदम तिरस्कार उत्पन्न झाला. वाचकहो, या व्यवहारात अर्थशास्त्राच्या दृष्टीने देशाची होणारी हानी सारीच्या सारी श्रीमताना उमगली असे ह्मणण्याचे धारिष्ट आमच्याने करवत नाहीं, पण हा चाललेला प्रकार अत्यत घातुक असावा – असलाच पाहिजे, असें मात्र त्याच्या मनानें पुरतेपणी घेतले व ते अगदी बेचैन झाले. ' जाणारा बहुतेक माल हैदराच्या मुलखातील असल्यामुळे खंडणी घेतल्याशिवाय आह्मास तो सोडता येत नाहीं, ' असे सागून चिकबाळाप्पास त्यानी धुडकावून लावले आणि ते लष्कराकडे निघाले. पण चिकबळाप्पा, कापसाच्या गाड्या, आणि इंग्रज कपनी ही त्रयी कांहीं केल्या त्यांच्या मनांतून जाईना.

त्याच दिवशीं तिसरा प्रहरचे सुमारास श्रीमंतांची स्वारी एका मोर्चामध्यें मुरारराव घोरपड्यांचे बंधु दौलतराव यांच्या बरोबर बुद्धिबळें खेळत बसली होती. दौलतरावांच्या बाजूला श्रीमंत नारायणराव पेशवे, व विनायक भास्कर पटवर्धन हे डाव सुचवीत होते, आणि श्रीमंताच्या बाजूला धोंडो भास्कर पटवर्धन मदत करीत होते, मोर्च्याच्या आसपास शत्रूकडील बंदुकांचे आणि तोफांचे गोळे एकसारखे येऊन पडत होते. इतक्या उघड्या जागीं बसू नका, असे मुरारराव घोरपड्यांनी श्रीमंतांस सुचविले असूनही आपल्या लोकास उत्तेजन मिळावें ह्मणून ते मोर्चातच डाव लावून बसले होते. गोळ्याचा इतका वर्षाव होत होता तरी श्रीमंत आणि त्यांचा निधड्या छातीच्या परिवार त्याची मुळीच पर्वा करीत नव्हता. शत्रुपक्षाकडील तोफांचे आवाज आपल्या पक्षाकडील तोफाच्या आवाजात मिसळून जाऊन कानठाळ्या बसवीतच आहेत, एखादा गोळा शेजारीं येऊन पडला कं त्याच्या आघाताने उठलेली धूळ अंगावर उडतच आहे, आवेशाने तोफा डागणाऱ्य गोलंदाजांच्या आणि तटावर अचूक निशाणबाजी करणाऱ्या बरकंदाजांच्या आरोळ्या आसमंतांत घुमतच आहेत, क्षणोक्षणी अमका पडला, तमका जखमी झाला अशा बातम्या येतच आहेत, आणि मोर्चाचा अंतर्भाग बहुतेक धुराने भरलेलाच आहे अशा गलबल्यांत श्रीमंत शातपणें पटावर नजर लावून बसले होते. त्याची दृष्टि पटावर होती इतकेंच, पण त्याच्या मनांत दुसरेच काही तरी विचार घोळत असावे ही गोष्ट त्याच्या अंगावर आलेल्या डावावरूनच सिद्ध होत होती. खेळास प्रारं होऊन दहापांच खेळ्या झाल्या नाहीत तोच दुरक शह लागून श्रीमतांचा वजी गेला आणि मग त्याच्या व धोंडोपंताच्या संयुक्त कसबालाही डाव आवरणे अशक्य झालें. मुरारराव घोरपड्याचे देखील न ऐकता श्रीमंत मोर्चात बसले आहेत हे ऐकून त्यांची स्वामिनिष्ठ सरदारमंडळी हवालदील झाली होती, पण श्रीमताच्य विलक्षण जरबेमुळे त्याना तेथून उठावयास सक्तीने सागण्याची कोणाचीच छाती होत नव्हती. त्यामुळे धायगुडे, भापकर, भोसले वगैरे त्याचे हितचिंतक आपापसात चुळबुळ करीत, मोर्चात येत, श्रीमंताच्या जवळपास क्षणभर उभे रहात, आणि श्रीमंतानीं ‘ कायहो ? ’ ह्मणून प्रश्न केला ह्मणजे ‘ कांही नाही, एरवीच आलें होतों, ’ असें उत्तर देऊन परत जात, असा प्रकार चालला होता !

आणखी एक घटका गेली असेल. निजगलच्या किल्ल्यावर तोफाचा धडाक चालूच होता. इकडे मोर्चातही डाव खूपच रंगला होता. डाव अंगावर शेकला असे पाहतांच श्रीमंतांनीं अमळ चिडल्यासारखें करून आपला डाव शक्य तितक्या कौश ल्यानें वांचविण्यास सुरवात केली होती. पण त्याचा फर्जीच गेला असल्यामुळें डावाची बाजू लंगडी पडली होती, व ती अशा तऱ्हानें सावरण्याजोगी नव्हती. इतक्यांत मोर्चा

वर शत्रूचे गोळे अधिकाधिकच येऊन पडूं लागले. तेव्हां आनंदराव रास्ते मोर्चांत येऊन 'येथें मनस्वी गोळे येऊन पडताहेत, तरी श्रीमंतानी राहुटीत जाऊन बसावें हें बरें' असे म्हणाले. पण श्रीमंतानीं त्याना कांहीच उत्तर दिलें नाही. आसपासच्या परिस्थितीची त्याना मुळीच जाणीव होत नसावी असे दिसलें. आपल्या विनंतीचा कांहींच उपयोग होत नाही असें पाहून आनंदराव रास्ते परत फिरले. ते मोर्चातून बाहेर पडावयास आणि बंदुकीची एक गोळी सू सूं करीत यावयास एकच गाठ पडली! गोळी जी आली ती श्रीमंत नारायणराव पेशव्याच्या मनगटास चाटूनच गेली. त्याबरोबर नारायणराव 'आयायाई ऽ' करीत व हात झाडीत उठले. ते शद्ब ऐकून श्रीमंतानीं मान वर केली, तो आपल्या भावाच्या मनगटास गोळी लागली असून तिने त्याला चांगलीच जखम केली आहे असे त्यास दिसून आले. त्याबरोबर ते खडबडून उठले आणि नारायणरावांस जवळ घेऊन त्यानी त्याची जखम पाहिली. नंतर त्यानी आपल्या खिजमतगाराना नारायणरावास राहुटीत नेऊन त्याच्या जखमेस मलमपट्टी करण्यास सांगितलें. त्यानी नारायणरावास नेल्याबरोबर ते पुन्हा पटावर येऊन बसले आणि आपली नजर त्यानीं पुन्हा एकदा पटावरील मोहऱ्यावर रोखली! खुद्द श्रीमंतच येऊन बसल्यावर दौलतराव, विनोबा, धोंडोबा इत्यादि मंडळीना पटावर येऊन बसणेंच भाग आले. डाव पुढे चालविण्याचा श्रीमंताचा मनोदय स्पष्ट दिसू लागला!

श्रीमंतानी बराच वेळ विचार करून एक मोहरे खेळावयाठी उचलले आणि आता ते त्यास उद्दिष्ट घरी ठेवणार, इतक्यात रागाने बेफाम झालेले मुरारराव घोरपडे मोर्चांत शिरून थेट श्रीमंताच्या पटापाशीं आले आणि "दौल्या रडवीच्या, तू मानूस हैस का जनावर हैस?" असे आपल्या बंधूस ह्मणत त्यानीं तरवारीच्या टोकाने श्रीमताच्या पुढचा पट उधळून दिला! खेळात आलेले विघ्न पाहून श्रीमतानीं वर मान केली मात्र, मुरारराव त्याच्यावर कडाडले, "चल ऊठ माकडीच्या, हतं बसून मरनार हैस व्हय? तुला दगा फटका झाल्यावर आमी काय तुज्या नावानं बोंब माराची ह्मनतूस?" गुत्तीकर सेनापती इतके बोलूनच थांबले नाहीत, तर त्यानी दंड धरून श्रीमताना खेचूनच काढले! मुराररावाचे शद्ब श्रीमंतानी खास ऐकले, ते अत्यंत उर्मटपणाचे आहेत हेही त्यांना जाणवलें, पण त्या शद्बाच्या अक्षरा अक्षरातून वाहणारी ममतेची प्रखर आच, आणि वडीलपणाची जरब या दोनी गोष्टी श्रीमताच्या इभ्रतीहूनही भारी असल्यामुळे श्रीमंताची मान आपोआप खाली वळली, ते मुकाट्याने उठून उभे राहिले, त्याच्या हातांतलें मोहरें गळून खाली पडले आणि एक अक्षरही न बोलता मुराररावाच्या मागून ते मोर्चाच्या पिछाडीपर्यंत एखाद्या मेंढरासारखे आले! पण तेथें येतांच त्यांच्या मानी स्वभा-

वानें उचल खाल्ली आणि ते अडून मुराररावांस म्हणाले, 'राव, किल्ला हातीं आल्या-शिवाय मी आज राहुटीत जाणार नाहीं, मग मला तुह्मी कांहीं ह्मणा.'

'त्ये समदं खरं सरकार,' मुरारराव जिकीरीला आल्यासारखा स्वर काढून म्हणाले, 'पन आपुन हतं बसल्यानं किल्ला ताबलतोड हाती येतुया, असं हाय कां? त्यो यायचा तवाच येणार.'

'मी बसल्यानें किल्ला हाती येत नाही हे खरे,' श्रीमंत आर्जवानें म्हणतात, 'पण किल्ल्यावर चढून जाणाऱ्या माझ्या एकाड्याना आणि बारगीर – शिलेदाराना मी समक्ष हजर असल्याशिवाय कशी बरें हुरूप येईल?"

मुरारराव काहीं तरी बोलणार होता, विशेषतः एकांड्या शिलेदारावर त्याचा राग असल्यामुळें त्यांना उद्देशून तो कांहीं तरी तुच्छतेची भाषा बोलण्याच्या बेतात होता, इतक्यांत किल्ल्याच्या दरवाजावर तोफांचा मारा लागू होऊन दरवाज्याचा बुरूज ढासळला आहे अशी बातमी घेऊन एक शिपाई त्यांच्या पाशी धावत आला. ती ऐकतांच ह्मातान्या मुराररावाची कळी एकदम उमलली व तो आनंदानें टाळी वाजवून ह्मणाला, 'बस बस, झालं काम सरकार, आपुन आता जरा आडोशाला बसा, अन् ह्या ह्मातान्या खोडाची कामगारी बगा. पानाला चुना लावी पातुर किल्ला सर करून दावतों सरकार.' इतकें बोलून व श्रीमंताना आडो शाला क्षणमात्र बसावयाची पुन्हा विनंति करून मुरारराव तेथून जो झटकला, तो पटवर्धनांची एक टोळी किल्ल्याच्या दरवाजावर हल्ला करावयास निघाली होती तिच्या आघाडीस मिसळला. त्याच्या पाठोपाठ दौलतराव, विनायक भास्कर व धोंडो भास्कर पटवर्धन इत्यादि मंडळीही हल्ल्यांत सामील झाली. हां हां ह्मणता हजार दीड हजार मराठे शिपाई 'हरहर महादेव'ची गर्जना करीत किल्ल्याच्या दरवाजापर्यंत चढून गेले. किल्ल्यावरील शिबंदीने निराशेच्या भरांत त्याच्यावर आगीचा पाऊस पाडला आणि त्यांतले बरेच लोक ठार व जखमी केले. पण मराठ्यांची ही लाट अशातशानें थांबणार नव्हती! त्यानीं क्षणार्धांत पडलेल्या बुरुजाच्या आश्रयानें किल्ल्याच्या वेशीवर हल्ला केला, आणि तेथल्या पहारेकऱ्यास कापून काढून ते आत घुसले. एकदा आत शिरल्यावर त्यानी घटकाभर जी हाणा-मार व कापाकापी केली ती ऐकून वाचकांच्या अंगावर शहारेच येतील. मुरारराव, गोपाळराव, परशुरामभाऊ, इतर एकाडे पटवर्धन, आनंदराव रास्ते इत्यादि मंडळींच्या तरवारी रक्तानें माखून निघून त्यावरून घळघळा रक्त गळत राहिलें. सुमारे घटकाभर अशी दंगल चालली असेल. पचमीचा सूर्य अस्तास जाण्यापूर्वीच किल्ल्यावर सर्वत्र सामसूम झालें. हैदराची बहुतेक शिबंदी खतम झाली. जी थोडी जिवंत राहिली ती शरण आली. मुराररावानें निशाणाच्या

बुरजाला शिडी लावून आपल्या हातानें हैदराचे निशाण उतरविलें. पण शिडीवरून मराठ्यांचें निशाण मागून घेण्यासाठीं त्यानें खालीं मान केली, तेव्हां त्यास काय दिसले ? वाचकहो, शिडीच्या दुसऱ्याच पाहिरीवर शत्रूंच्या रक्तानें न्हालेले श्रीमंत रावसाहेब पेशवे जातीनें उभे असून त्यांनीं आपल्या हातांत मराठ्यांचें भगवें निशाण वर चढविण्यासाठीं घेतलें होते ! आपणांत व ' अर्ध्या ' रावात कालाच्या नैसर्गिक अतरावांचून दुसरी तफावत नाही अशी ' सबंध ' रावाची क्षणार्धांत खात्री झाली !

---

# प्रकरण २२ वें.

| खरे, ले १४६-१४९<br>पे. ब. ४३७-३८ | **श्रीमंतांचें प्रयाण.** | वै. व. २<br>११ मे १७७० |
|---|---|---|

मागील प्रकरणांत सांगितलेल्या हकीगतीस बारा दिवस झाले होते, ह्मणजे आज वैशाख वद्य द्वितीया होती. श्रीमंतांच्या सैन्याचा तळ शिरें प्रांतापैकीं होसूर या गावी असून तेथेंच आज आह्मी वाचकांस घेऊन जात आहोंत. निजगलचा मजबूत किल्ला हातीं आल्यावर हैदराच्या राज्यातील आग्नेयीकडील आणि पूर्वे कडील बहुतेक ठाणी श्रीमंतांच्या हातीं आली. मोहिमेस सुरवात झाल्यापासून आतापर्यंत श्रीमतांनीं जिकून घेतलेला हैदराचा मुलूख जवळ जवळ एक कोट रुपये सालिना वसुलाचा होता इतकें कळविलें ह्मणजे हैदर नाइकाच्या झालेल्या हानीची वाचकाना थोडीशी कल्पना होईल ! पण इतके झाले तरी हैदर नाईक मुकाट्यानें खडणी देऊन तह करण्यास कबूल होईना. उलट तो आता असे ह्मणूं लागला कीं माझी नुकसानी व्हावयाची ती तर आता होऊनच गेली, आता मी खंडणी कां ह्मणून द्यावी ? त्याला अशी खात्री वाटत होती कीं, पेशव्यानीं सध्या आपला कितीही मुलूख जिंकून घेतला तरी बरसात सुरू होण्याच्या सुमारास ते पुण्यास परत जाणारच, आणि ते निघून गेल्यावर आपला मुलूख परत जिकून घेणे आपणांस काहीं अवघड नाही. हैदराचा हा मुरदाडपणा पाहून श्रीमंतास खरोखरीच मोठी पंचाईत पडली. त्याना क्षणभर अशी शंका आली की, हैदराला पुण्याहून दादासाहेबाची काहीं तरी फूस मिळत असावी, आणि तिच्याच आधारावर हैदरानें इतकी चिकाटी धरली असावी. पण दादासाहेबांचा बंदोबस्त नाना फडणिसांनीं अगदी कडक ठेवल्याचें त्यांना नुकतेंच कळल्यावरून त्यांची ती शंका दूर झाली. श्रीमंतांस दुसरी भीती सखारामबापूची वाटत होती. तो हल्लीं कामावरून घरी राहि-

त्यामुळें कांहीं तरी भानगड उपस्थित करील असा संभव होता, ह्मणून त्रिंबकराव मामा पेठे पुण्याहून यावयाचे होते, त्यांच्या बरोबर श्रीमंतांनी बापूस कर्नाटकात आणवून घेतलें.

पण अशा रतीनें श्रीमंतानी आपल्या राज्यांतून हैदरास फितूर न मिळण्याची जरी तजवीज केली तरी मुख्य प्रश्न जो आता हैदराची पुढे वाट काय करावयाची, तो शिल्लकच राहिला होता. हैदर आपण होऊन कौलास येत नाहीं, हे तर जवळजवळ ठरल्यासारखेंच झालें होते. अर्थात् त्याच्याबरोबर चिकाटीने युद्ध चालू ठेवून त्याचा पुरता निःपात करणें श्रीमंतांना भाग होते, आणि तसे त्याच्या मनात वागतही होते. पण त्यांना खरा पेंच पडला होता तो हा की, हें युद्ध असेच पुढे चालू ठेवण्यास जो बेसुमार खर्च येईल तो कोठून करावयाचा ? त्याची प्रकृति सध्या तरी टीक होती, अर्थात् पावसाळ्यात छावणी करून कर्नाटकात रहावयाचेच ह्मटले तर प्रकृतीपुरती तरी त्याना अडचण नव्हती. पण त्याचा तळ पडला म्हणजे मनस्वी खर्च होणार त्याची व्यवस्था कशी करावयाची, याचे त्याना मोठे कोडे पडले होतें. पुण्याहून आणलेला खजिना, गोपाळराव पटवर्धनानी सावनूरकराकडून वसूल केलेले होन, गावोगांवीं आणि प्रांतोप्रांतीं वसूल झालेली खंडणी, इत्यादि सारे भांडवल आतांपर्यंत चालविलेल्या मोहिमीत बहुतेक खर्च पडले होते. अशा स्थितींत आपण स्वतः छावणीस राहून खर्चात खर्च वाढाविणे श्रीमंतास इष्ट वाटेना. त्यापेक्षा बरसातीपुरते पुण्यास जावे, आणि दसरा झाल्यावर पुन्हा कर्नाटकात यावे असे विचार श्रीमंतांच्या मनात घोळूं लागले. मात्र आपल्या पाठीमागे मोहिमीची सूत्रें चालविण्यास कोणी तरी कुशल सेनापती निवडण्याची आवश्यकता होती, पण तसे सेनापति श्रीमंतांच्या पदरीं अनेक असल्यामुळे त्याही गोष्टीची त्याना विशेष फिकीर वाटली नाहीं. असा विचार करून श्रीमंतानी पावसाळ्यांत पुण्यास जावयाचे तर ठरविलेंच, पण या बाबतीत आपल्या सरदार-सरंजामदाराचे काय मत पडतें, तेंही पाहावें म्हणून त्यानी होसूरच्या मुक्कामी आपल्या तमाम सरदारांची एक सभा भरविली आणि त्या सभेसच आज आम्ही वाचकास घेऊन जात आहों.

रात्रींच्या वेळीं श्रीमंताच्या खास बादल डेऱ्यात बैठक जमली होती. मध्य-भागीं लोडास टेकून साबाजीराव भोसले, शहाजीराजे भोसले, आणि श्रीमंत रावसाहेब असे त्रिवर्ग बसले असून त्याच्या उजव्या बाजूला सखारामबापू बोकील, त्रिंबक-राव मामा पेठे, नरसिंगराव धायगुडे, इत्यादि सरदार बसले होते. डाव्या बाजूला चित्रदुर्गकर संस्थानिक, गुत्तीकर मुरारराव घोरपडे, गोपाळराव पटवर्धन, आनंदराव रास्ते, परशुरामभाऊ आणि इतर पटवर्धन मंडळी, भापकर इत्यादि संस्थानिक व सरदार विराजमान झाले होते. आमच्या ‘ पौर्णिमा ’ कादंबरीच्या

कथानकाचे अखेरीस सखारामबापूंनीं अधिकारन्यास केल्याचें वाचकांच्या स्मरणांत असेलच. त्यानंतर बापू आतापर्यंत घरीं बसूनच होते. ते श्रीमंत रावसाहेबांच्या मुत्सद्दीगिरीपुढें खरोखरीच निस्तेज झाले होते ह्मणून असो, किंवा त्यांना मनापासून उपरतीच झाली ह्मणून असो, त्यानी अलीकडे कसलाही फंद न करिता उदासीनपणें राहण्याचें धोरण ठेवलें होतें, आणि आज देखील त्यांच्या चर्येवर उदासीनपणाचीच छटा मारीत होती. त्रिंबकराव मामा पेठे सदाशिवराव भाऊसाहेबांचे सख्खे मामा असून मोठे शूर व धोरणी होते. त्यांचें वय या वेळी जवळ जवळ पन्नास वर्षांचें असून श्रीमंताचा त्यांच्या कर्तबगारीवर पूर्ण विश्वास होता. त्यांच्याकडे दक्षिण कर्नाटकच्या मोहिमीची सूत्रें सोंपवून आपण पुण्यास जावें असें श्रीमंतांच्या मनांत घोळत असल्यामुळें त्यांनीं मामाना मुद्दाम पुण्याहून बोलवून घेतले होतें.

श्रीमंतांचे बहुतेक सरदार मानकरी आजच्या सभेस हजर होते खरे, पण त्या सर्वांच्या चेहऱ्यावर एकंदरीत उदासीनतेचीच छाया पसरली होती, यांत शंका नाहीं. खरें ह्मटलें असता ही मोहीम चालू झाल्यापासून श्रीमंतांच्या सैन्यास आतांपर्यंत एकमारखा जयच येत गेला होता, लूटही मनस्वी करावयास सापडली होती, तेव्हा अशा परिस्थितीत श्रीमंतांचे सरदार विजयाच्या उन्मादानें उल्लसित असावयास पाहिजे होते, पण प्रत्यक्ष वस्तुस्थिति मात्र त्याच्या अगदी उलट दिसली. बहुतेक मंडळी खिन्न आणि नाराज दिसत होती, आणि त्यांच्या विमनस्कतेला वेगवेगळी कारणें होती. या मोहिमीचे मुख्य आधारस्तंभ जे गोपाळराव पटवर्धन तेच आधीं अत्यंत वैतागलेले दिसत होते. त्यांच्या वैतागाचीं कारणें त्यांच्याच शद्वांत सांगावयाचीं ह्मणजे पुढीलप्रमाणें होतीं. *‘ आमचे लढे कोणकोणते ह्मणाल तरी आह्मास सरंजाम दिला आहे तो फार ( करून ) होनाचा. वरकडास नक्त रुपयाचा सरंजाम दिला आहे. आमच्या सरजामाचा ( रुपयास ) पावणा रुपया होतो... आनंदवल्लीकडे गेलों त्या साली व घोडपेच्या साली जसा खर्च लागला त्याचें ( श्रीमंतापाशीं ) बोलोन घ्यावें. श्रीमंतानी ( आपणास ) अदवानीकडील सरंजाम दिला त्यापासून ठाणीं घ्यावयाचा सुभेता ( फुरसत ) पडलाच नाहीं. याजकरिता

* पुढील उतारे अस्सल पत्रांतून घेतले आहेत. त्यांतील तक्रारींचा सारांशः--

(१) पटवर्धनांना सरंजाम होनांच्या रूपांत मिळत असल्यामुळें होनांचे रुपये करण्यांत त्यांचे शेकडा पंचवीस रुपये नुकसान होई. (२) ‘ पौर्णिमा ’ कादंबरीत वर्णिलेल्या घोडपच्या मोहिमीत पटवर्धनांना आलेला खर्च पेशवे सरकारांतून अद्याप मिळाला नव्हता. (३) हा खर्च अदवानीकडील खंडणी वसूल करून भरून घ्यावी अशा परवानगी श्रीमंतांना दिली होती, पण तसें करावयास गोपाळरावास सवड मिळाली नव्हती. आणि (४) मंगळवेढे करकंब, वगैरे पटवर्धनांच्या सरंजामी प्रांतांत नापीक झालें होतें.

तो सरंजाम परिच्छिन्न कामाचा नाहीं. ...मिरज प्रांताचें नापीक झालें. मंगळ-वेढें व करकंबची पायमल्ली झाली,' इत्यादि. गोपाळरावांची अशा रीतीनें केवळ सांपत्तिक हलाखीच होती असें नाहीं. त्यांनीं व त्यांच्या सैन्यानें शारीरिक कष्टही मनस्वी सोसले होते. शिवाय गोपाळरावाची प्रकृति अलीकडे अगदी खालावली होती आणि त्यामुळेंही ते व इतर पटवर्धन दिलगीर होते. इतर सरदारांपैकीं पुष्कळांच्या मनांत श्रीमंतानी पुण्यास जाऊं नये असें होते, आणि ते जाणार हें निश्चित दिसूं लागल्यामुळें ते नाउमेद झाले होते.

खुद्द श्रीमंतही आज अमळ रंजीसच दिसत होते. हैदराचा पक्का बंदोबस्त केल्याशिवाय पुण्यास जाऊ नये असेच त्याच्या मनात होते, पण केवळ पैशाच्या टंचाईमुळें त्याना जाणे भाग आले होते. आपल्या पश्चात् मोहिमीची सूत्रे कोणा-कडे द्यावी याबद्दल त्याच्या मनाचा पुरता निश्चय होत नव्हता. त्यातच मद्रास-कर इंग्रजानी अर्काटचा नबाब महमदअल्ली याला आपल्या पक्षास मिळूं दिले नाही, या गोष्टीचें शल्य त्याच्या मनात डाचत होते. शिवाय दक्षिण कर्नाटकातला काप-साचा व्यापार मद्रासकर कंपनीच्या हाती चालल्याचे दृश्य त्याच्या डोळ्याना नुक-तेच दिसून आले होते आणि त्याचे परिणाम कसे काय होतील याबद्दल त्याना एक प्रकारची अनिश्चित धुकधूक वाटत होती. त्याची सांपत्तिक दृष्ट्या फार ओढ झाली होती, आणि हैदर नाईक तर काहीं केल्या कौलास येत नव्हता. या सर्व गोष्टीचा एकत्रित परिणाम होऊन श्रीमंत नाउमेद झाले होते, आणि अशा स्थितीं-तच त्यांनी आजची बैठक बोलावली होती.

बराच वेळपर्यंत कोणी काही बोलले नाहीं. सर्व मंडळी जागच्या जागीं स्तब्ध बसली होती. जो तो श्रीमंताची इच्छा काय आहे हें जाणण्यास आतुर झालेला दिसत होता. अखेर श्रीमंतानीच बोलण्यास सुरवात केली. ते ह्मणाले, 'मंडळी, आज मी सर्वांना मुद्दामच बोलवून घेतले आहे. सालमजकुरी हैदर नाइकावरची मोहीम संपेलसे दिसत नाही. त्याने तर कौलास यावयाचेंच नाहीं असा निश्चय केलेला दिसतो. अशा स्थितीत हा प्रश्न आमच्या इभ्रतीचा होऊन बसला आहे. मराठेशाहीचें सर्वस्वही प्रसंगी इरेस घालून ही मोहीम तडीस नेली पाहिजे असें मला वाटतें.'

'अलबत नेली पाहिजे!' नरसिंगराव धायगुडे उद्गारले.

'न नेऊन भागायचेंच नाही,' शहाजी राजे भोसल्यांनी धायगुड्यांस दुजोरा दिला, 'मोहीम अर्धीच सोडली तर हैदर नाइकाला आमचा अंदाज लागल्यासारखें होईल.'

'होय तर, ह्यातारी मेल्याचें दुःख नाहीं, पण काळ सोकावून बसेल, तें उपयोगाचें नाहीं,' साबाजीबावा भोसल्यांनीं भाष्य केलें.

'तेव्हां मोहीम तडीला नेली पाहिजे हें तर ठरलेंच,' श्रीमंत स्मित करीत बोलूं लागले, 'आता दुसरा प्रश्न असा कीं, मी येथें छावणी करून रहावयाचें कीं नाहीं. माझ्या स्वतः विषयीं ह्मणाल तर मला येथेंच छावणी करून रहावें असे मनापासून वाटतें. पण मी छावणीस राहिलें तर मोहिमीचा खर्च बेसुमार वाढणार, आणि आपली तर खर्चाची मनस्वी ओढ झाली आहे हें तुम्हांस ठाऊकच आहे. शिवाय पुण्यात झालें तरी मी फार दिवस हजर नसणें हें एकंदरींत अनिष्टच आहे. अशा स्थितीत बरसातीत येथे छावणी करून निरुद्योगी राहण्यापेक्षा तूर्त चातुर्मास पुण्यास जाऊन दसरा झाल्यावर फौजेची आणि पैक्याची भरती करून पुन्हा इकडे येणे मला बरें वाटते. मग तुम्हांला कसें वाटतें बघा.'

आपापला व्यक्तिशः अभिप्राय व्यक्त करण्यास श्रीमंताची आपणास पूर्ण परवानगी झाली आहे हे सर्वच सरदारानी ओळखले, पण श्रीमंतांच्या बोलण्यांतच अशी कांहीं जादू होती कीं, त्यांचे शब्द ज्याच्या कानांवर पडतील त्याचें मत त्याच्या मताशी कितीही विरोधी असेल तरी तो क्षणार्धात आपले मत सोडून त्याच्या मतास मिळावा. आतांही तसेच झाले. श्रीमंतानी पुण्यास जाणेच इष्ट आहे अशी सर्व सरदाराची तत्काळ खात्री झाली. भास्कर आवेशाने उद्गारले, 'आमा समद्यासनी बी तसच वाटतया सरकार, हत उगाच माशा मारीत बसन्याकिंदी पुन्यास जाऊन नव्या दमानच आल्यालं बरं'.

'शिरमताचा ब्योतच हाय त्यात ठीक हाय,' मुरारराव घोरपडे बऱ्याच विचाराअंती आपली खात्री झाल्याचा आविर्भाव करीत ह्मणाले, 'शिरमंतानी मोहीम आमच्या अंगावर सोपवून बिनघोर पुन्यास जावं. हतली अक्षी पंचात करू नये.'

'जायला कांहीं हरकत नाहीं,' एवढा वेळ स्तब्ध असलेले सखारामबापू ह्मणाले, पण येथील मोहिमीची सूत्रे ज्याच्याकडे सोपवावयाचा, त्याच्या आज्ञेत सर्वांना चालावें अशी व्यवस्था करून मगच गेलेलें बरें. हैदर नाईक इतका बिकट शत्रु आहे कीं आमच्या सरदारात यत्किंचित् फूट किंवा बेशिस्तपणा दिसून आला तर त्याचा तो तत्काळ फायदा घेतल्यावाचून राहणार नाही.' हे शब्द बोलत असता सखारामबापूंनी गोपाळराव पटवर्धनांकडे इतक्या सफाईने दृष्टिक्षेप केला कीं इतर मंडळीना बापू गोपाळरावाची संमति विचारण्याकरितांच जणु काय त्याच्याकडे पहात आहेत असें वाटले, पण बापूंच्या नजरेंतील खोच गोपाळरावाच्या ध्यानात आल्यावांचून राहिली नाहीं. आपण श्रीमंतांकडे नेहमी तक्रारी करितों, पूर्वी तर

एकदां उघड उघड बेदिली करून निजामअल्लीला मिळालों होतों, इत्यादि गोष्टींना उद्देशून बापूंनीं हा टोमणा आपणांस दिला हें गोपाळरावांनीं निश्चित ओळखले, आणि त्यांच्या अंगाचा तिळपापड झाला. आपणही बापूंचें कांहीतरी वर्म काढून उलट टोमणा द्यावा ह्मणून त्यांची जीभ शिवशिवूं लागली. पण गोपाळराव कितीही वजनदार व पराक्रमी सरदार झाले तरी त्यांना देखील श्रीमंताचा धाक हा होताच ह्मणून त्यांना बापूंचा वर्मप्रहार मुकाट्यानें सोसावा लागला. तरी पण त्याच्याने निखालस गप बसवेना. ते अमळ कुर्‍यानेच ह्मणाले, 'बापूंचे ह्मणणें खरं आहे. श्रीमंत ज्याच्या हातीं मोहिमीचीं सूत्रें देतील त्याला श्रीमंताच्या जागीं मानून त्याच्या आज्ञेंत चालावयास आह्मी सर्व जण तयार आहोत. निदान पटवर्धन मंडळीपुरती हमी तरी मी स्वत:च भरतो. इतकेंच काय, पण मी मुळीं असेंच ह्मणतों कीं, श्रीमंतांनीं मला मिरजेस जाण्यास परवानगी द्यावी. माझी प्रकृती बरी नाहीं, आणि माझ्या हातून आतां पूर्वीसारखी मोहिमीची दगदगही होत नाहीं. भाऊ आहे, नीळकंठराव आहे, मी घरीं गेल्यावर वामनरावाला पाठवून देईन --'

'भलतेंच कांही तरी,' श्रीमंत मध्येंच उद्गारले, 'असें कोठें झालें आहे का? राव, कर्नाटकच्या मोहिमींचे तर तुह्मी जुने सूत्रधार, आणि तुह्मीच निघून गेल्यावर मोहीम कोण चालविणार? आतां तुमची प्रकृति बरी नाहीं ह्मणतां तर मी मुख्य सेनापतीची जबाबदारी फार तर तुमच्यावर टाकीत नाहीं. ते काम पेठे मामा बघतील. मला अशी उमेद आहे कीं, तुमच्या सुद्धां झाडून सर्व मानकरी, सरदार, सरंजामदार मामांच्या विचारें चालून मी यानयाच्या आंत मोहीम फत्ते करतील.'

'कबूल, एकदम कबूल!' मुरारराव घोरपडे उद्गारले, 'मामासाहेबासारखा तडफदार सेनापती मिळाल्यावर आमी हकडची दुनिया तकड करून टाकूं, मग त्या हैदर नाइकाची बिशाद काय सरकार?'

गोपाळरावांचा चेहरा खर्रकन उतरला. आपण कितीही नाराजी दाखविली तरी आपण कर्नाटकांतले पुरे माहितगार आणि मान्या मराठेशाहीतले कर्तबगार सरदार ह्मणून कर्नाटकाच्या मोहिमीचीं सूत्रें श्रीमंत आपल्याच हातीं देतील, अशी त्यांना मोठी आशा, नव्हे खात्री वाटत होती. पण तें बाजूस राहून श्रीमंतांनीं त्या पदावर त्रिंबकराव मामा पेठ्याची नेमणूक केली हा आपला मोठा अपमान झाला असें त्यांना वाटलें, आणि त्यांच्या अंगाची लाही झाली. पण जाणून वा अजाणतां आपला अपमान करणारे खुद्द श्रीमंत आहेत हें जाणून गोपाळरावास आपला क्रोध गिळावा लागला. ते अमळ रुष्ट आवाजांत म्हणाले, 'हो, पेठे मामा असूं देत, नाहीं तर आणखी कोणी असूं दे, आह्मांस काय, आह्मी श्रीमंताच्या हुकमाचे ताबेदार, ते सांगतील तसे चालूं.'

श्रीमंतांच्या चाणाक्ष नजरेनें गोपाळरावांच्या चर्येवरील भाव तेव्हांच ओळखला. ते ह्मणाले, ‘ राव, तुह्मी हे मनापासून बोलला नाहीत. या मोहिमीची सूत्रे खरे म्हटले तर तुमच्याकडे सोपवावयास पाहिजेत हे मला देखील कळत होते, पण आपली प्रकृति बरी नाहीं असें तुह्मीच सांगितलेंत ह्मणून मी ती मामांकडे सोपविली, इतकीच गोष्ट. खरोखर सेनापती या नावात काय आहे? पराक्रमाच्या दृष्टीने पाहिलें तर एखादा सामान्य शिपाई देखील सेनापतीला चरचढ टरेल. तुमच्यासारखे भारी सरदार हे नेहमीच सेनापति आहेत. आणि त्यातूनही सेनापतीच्या पदाचे जोखीम तुह्मी पतकरीत असाल–’

“ नको नको, ” गोपाळराव वरमून ह्मणाले, “ मामाच सेनापति असू देत आणि आह्मीच त्याच्या आज्ञेत चालू. ”

“ आज्ञेत चालू असे ह्मणू नका, ” श्रीमंत ह्मणाले, “ विचारे चालू, असे ह्मणा, प्रसंगी त्यांना आज्ञा करा, तुमचा तितका अधिकारच आहे. एका शब्दात सांगावयाचे ह्मणजे तुह्मी सारे जण माझ्या पाठीमागे एक दिलाने आणि आपलेपणाने वागून ही मोहीम तडीला न्या. मनात कसलेही किल्मिष ठेऊ नका. राव, या मोहिमीत तुह्मी आणि तुमच्या पथकाने कष्ट सोसण्याची शर्थ केली आहे, हे मी जाणतो, आणि योग आला तर तुमच्या श्रमाचे चीजही पण होईल. पण सध्या तुह्मास माझे इतकेच सांगणे आहे की, हे कार्य माझे एकट्याचे नसून, तुह्मी सर्वांचे, सार्‍या मराठेशाहीचे आहे हे ध्यानात ठेवा, आणि त्या धोरणाने चला. ”

श्रीमंताच्या मुत्सद्दीगिरीने गोपाळरावास जिंकले. गोपाळराव सद्गदित होऊन ह्मणाले, “ श्रीमंतांची आज्ञा मला आणि इतर पटवर्धनानाही प्रमाण आहे. आह्मी श्रीमंताच्या उपदेशाप्रमाणेच चालू, कधीही अन्यथा वागणार नाही. ”

‘ अन तुमीरं बाबानु? ’ मुरारराव घोरपड्यांनी इतर सरदाराकडे पाहून पृच्छा केली, “ ह्यो आपला धनी – आपला कटमनी सांगतुया तस वागनार का न्हाई? ”

“ वागणार! ” चोहोंकडून एकाच वेळी आणि एकाच स्वरात गर्जना झाली. श्रीमंत संतुष्ट झाले, सभा बरखास्त झाली, व सरदार मंडळी श्रीमंताचा निरोप घेऊन आपापल्या राहुट्यांस परतली.

दुसर्‍याच दिवशी श्रीमंताची स्वारी सौभाग्यवती रमाबाईसाहेब व नारायणराव पेशवे यासह पुण्यास जाण्यास निघाली. त्यांच्या बरोबर काही हुजरात, सखाराम बापू, नारो शंकर राजे बहादर, साबाजीबावा भोसले, मल्हारराव पानशे, अप्पा बळवंत आणि इतर कांही किरकोळ पथके निघाली. वाटेंत सावनूरच्या नबाबाचा मुलगा, मोगलाकडून कुमकेस आलेला तहवारजंग आणि चित्रदुर्गचा संस्थानिक यास त्यांनी आपापल्या ठिकाणी जाण्यास निरोप दिला. वैशाख वद्य अमावा-

स्येस सूर्यग्रहण होतें. त्याकरितां त्यांनीं निवृत्तिसंगमीं कृष्णेच्या उत्तर तीरीं सुवर्ण-तुला केली. नंतर ते रामतीर्थ, वाळेखिंडी, काझरें, शंभुमहादेव, ह्मसवड, सिंगण-पूर, फलटण, रेवडी, जेजुरी, थेऊर असे मुक्काम घेत ज्येष्ठ वद्य पंचमीच्या दिवशीं पुण्यास येऊन पोंचले.

---

## प्रकरण २३ वें.

### जाळ्यांतील हरिणी. [ ज्ये. शु. १३-१६९२

आज ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी असून संध्याकाळ झाली होती. अद्याप जरी प्रत्यक्ष बरसातीस सुरवात झाली नव्हती तरी पावसाळ्याची छाया सर्वत्र जाणवूं लागली होती. आकाशांत पडलेला मेघांचा मंडप, हवेत उत्पन्न झालेला गारठा, वातावरणात पसरलेला कुंदपणा, आणि सृष्टिशोभेच्या खुलेपणावर मारणारी अधारी इत्यादि चिन्हांवरून ग्रीष्म ऋतूनें आपली कारकीर्द प्रथमपासूनच सौम्य धोरणावर सुरू केल्याचें स्पष्ट दिसत होतें. वसंत ऋतूच्या प्रारंभीं आटून गेलेल्या नालेतलावाना वैशाख महिन्यात झालेल्या वळवाच्या पावसानी पाण्याचा पुरवठा केल्यामुळे ते पुनश्च तुडुंब भरुन राहिले होते. झाडाझुडपाना पालवी पुरती फुटल्यामुळे तींही टवटवीत दिसत होती. राजवटी पालटल्या ह्मणजे ज्याप्रमाणे पूर्वीच्या राजाच्या कृपे तले लोक निस्तेज होतात, आणि नव्या राजाच्या आश्रयाने नवेच लोक भाग्यास चढतात, त्याप्रमाणें शिशिर ऋतूच्या कारकीर्दीत रानावनातील लतावृक्ष पल्लवहीन होऊन शेतांतील पिके ऐश्वर्यसंपन्न झाली होती, पण वसंताच्या अमदानीपासून तो मनु पालटत जात जात ग्रीष्माच्या शासनकालात वनसृष्टीलाच बहुतेक वैभव प्राप्त झालें, आणि बिचारी शेते उजाड पडली होती! मानवी सृष्टीत चालू असलेल्या भयंकर रक्तपाताची आपणास जणू दादच नाही अशा थाटाने निसर्गाचा कारभार बिनबोभाट चालला होता!

अशा वेळी आह्मी वाचकाना श्रीरंगपट्टणच्या पूर्व बाजूला कोलार, होसकोट आणि चिकबाळापूर या गांवाशीं साधारणपणें सारख्या अतरावर पडलेल्या मुसल मानी लष्कराच्या एका छावणीत घेऊन जात आहोत. हैदर नाईक या वेळी श्रीरं गपट्टणात जाऊन राहिला होता, आणि बरसात संपेपर्यंत स्वतः बाहेर पडावयाचें नाहीं असा त्याचा निश्चय ठरला होता. त्याचें बहुतेक राज्य पेशव्यांच्या फौजेने जिंकून घेतलें होतें तरी त्यानें लढाईची उमेद अजून सोडली नव्हती. त्यांतच

श्रीमंत पेशवे कर्नाटकांत छावणीस न राहतां पुण्यास परत गेले ही बातमी ऐकून त्याला मोठाच धीर आला होता, आणि त्यानें पेशव्यांच्या सैन्याला आणि मुलखाला सतावून सोडण्याचा बेत केला होता. त्याने आपला सरदार लालामिया याच्या नेतृत्वाखालीं पांचसहा हजार फौज घेऊन त्यास पूर्वेकडील मराठ्याच्या टापूवर स्वारी करण्यास सांगितले. लालामियाने आपल्या फौजेच्या तीन टोळ्या करून त्यातील एक टोळी कोलारवर, दुसरी होसकोट्यावर आणि तिसरी चिकबाळापुरावर पाठविली. या तिसऱ्या टोळीचे आधिपत्य त्याने स्वतःकडे घेतले. वर म्हटल्याप्रमाणे चिकबाळापूरच्या अलीकडे थोड्या अंतरावर आपल्या सैन्याची छावणी करून तेथून रोज चिकबाळापुरावर सैन्यासह जावयाचे, चिकबाळापूरच्या किल्ल्यावर तोफांचा मारा करावयाचा आणि संध्याकाळी छावणीस परत यावयाचे, असा क्रम गेले पांच सात दिवस त्याने ठेवला होता. चिकबाळापूरचा किल्ला या वेळी धुळप मंडळीच्या ताब्यात असून, विजयदुर्ग येथे आरमाराचा सुभा मोत्याजीराव विचाऱ्याच्या हवाली केल्याबरोबर आनंदराव, भगवंतराव, जानराव काका वगैरे वडील मंडळी आणि तरुण जानबा हे सारे धुळप वीर चिकबाळापूरच्या किल्ल्यात येऊन राहिले होते. त्यांनी पांच सात दिवस किल्ला मोठ्या मर्दुमकीने झुजविला होता, पण रोजच्या रोज किल्ल्यावर तोफांची मारगिरी सुरू झाल्यामुळे किल्ल्याचा तट अगदी खिळखिळा होऊन गेला होता आणि तो केव्हा ढासळेल याचा नेम राहिला नव्हता. इतकी स्थिति झाल्यावर म्हाताऱ्या जानराव धुळपाने तेथून पचवीस कोसावर असलेल्या गोपाळराव पटवर्धनांना पत्र पाठवून आपली स्थिति कळविली आणि तो त्याच्या कुमकेची मार्गप्रतीक्षा करीत राहिला. रोजच्याप्रमाणे आजही लालामिया आपला तोफखाना बरोबर घेऊन चिकबाळापुरावर गेला आणि किल्ल्यावर त्याने गोळ्यांचा पाऊस पडला! आधीच खिळखिळ्या झालेल्या किल्ल्याला आज मोठमोठी भगदाडे पडली आणि संध्याकाळच्या सुमारास त्याची अगदी दुर्दशा होऊन गेली. लालामिया आपल्या गोलंदाजास खूपच आवेशाने प्रोत्साहन देत होता. त्याच्या मनात आजच्या आजच किल्ल्यावर हल्ला करून तो ताब्यात घ्यावा असे होते, पण संध्याकाळचा सुमार झाला असल्यामुळें किल्ला सर करण्याचे काम दुसऱ्या दिवसावर टाकून तो सैन्यासह छावणीकडे परत यावयास निघाला. तो येऊन पोहोचण्यापूर्वीच आपण त्याच्या छावणीत प्रवेश केला आहे.

ती पहा वाचकहो, छावणीच्या मध्यभागी असलेल्या एका राहुटीत एक बारा तेरा वर्षांची हिंदु बालिका कपाळास हात लावून सचिंत बसली आहे! तिच्या शेजारीं एक मुसलमान वृद्ध बाई तिची समजूत काढीत बसली आहे. ही बालिका दुसरी तिसरी कोणी नसून शिवाजीराव सुर्व्यांची मुलगी हंसा हीच होय. हंसा

समुद्रकिनाऱ्यावर बेशुद्ध पडली असतां तिला दोन सांडणीस्वारांनीं उंटावर घालून आणली हें वाचकाच्या स्मरणात असेलच. हे साडणीस्वार लालामियाच्या लष्करातले असून ते बंदरावर काही कामगिरीकरितां गेले होते, ते समुद्रकिनाऱ्यावरून चालले असता त्यानी तिला पाहिले आणि ते तिला उंटावर घालून लालमियाकडे घेऊन आले. तसे करण्यात त्याचा जो हेतु होता तो चागलाच सफळ होऊन त्या सरदाराकडून त्याना मोठे बक्षीस मिळाले. हिंदूंच्या रूपवान् बायकामुली भ्रष्ट करण्याबद्दल लालामियाची फार ख्याति असल्यामुळे व त्याना नाही तेथून हुडकून काढण्याबद्दल त्याची आस्था सर्वत्र महशूर असल्यामुळेच त्या सांडणीस्वाराची वरील कृत्य करण्याकडे प्रवृत्ति झाली होती, हे वाचकाच्या लक्ष्यात आलेंच असेल. पण हंसा लालामियाच्या बंदिवासात येऊन पडल्यापासून काय असेल तें असो, त्यानें आपला नेहमीचा जुलमी क्रम सोडून तिची अगदी उत्कृष्ट बरदास्त ठेवली. तिजबद्दल त्याच्या मनात कामवासना उत्पन्न झाली नव्हती असे नाहीं. ती तर उत्पन्न झालीच होती, नव्हे तिच्या रूपगुणानी तो अगदीं पागल बनला होता ह्मटले तरी चालेल, पण त्याच्या या पापवासनेला एक प्रकारचें पवित्र किंवा उच्च दर्जाचे स्वरूप आले होते. त्यामुळे तिच्याशी लग्न करुन तिला आपली जन्माची सोबतीण करावी असे त्याच्या मनाने घेतलें होते. त्याने हंसाला आपणाबरोबर स्वारीत घेतले व आपली आत्या महबूब हिला हंसाच्या दिमतीला ठेवून, तिची सर्व प्रकारे काळजी घेऊन आपणाशी लग्न करण्यास तिला तयार करण्याची कामगिरी तिजकडे सोपविली. हंसाने पहिला पंधरवडा तर निवळ रडून व आकांत करूनच काढला. नंतर, आलेल्या प्रसगानेच तिच्या मनाला धीर उत्पन्न होऊन तिने स्वतःच आपल्या मनाची समजूत केली व योग्य संधी साधून या बंदिवासातून पळून जाण्याचा बेत करून ती बाह्यात्कारीं आपले दुःख विसरल्याचा देखावा दाखवू लागली. होतां होता ही पोरगी आपलें घरदार सोडून लालामियाशी लग्न करण्यास तयार होईल अशी आशा महबूबला वाटू लागली आणि तिने एक दिवस हंसापाशी त्यासंबंधी गोष्टही काढली. पण आपल्या आप्तेष्टाची आठवण अद्याप आपल्या मनात ताजी असल्यामुळे लालामियाशी इतक्यातच लग्न करण्याचा धीर आपल्या मनाला होणार नाही, असे सागून हंसाने ती वेळ मारून नेली. आणखी काही दिवस गेले. आता मात्र लालामियाला धीर निघेनासा होऊन तो अगदीं उल्लू बनला आणि महबूबला त्याने एकसारखा तगादा सुरू केला. मात्र हंसाच्या भेटीस स्वतः जाऊन तिच्याशी मुद्दाम बोलण्याचा प्रयत्न त्यानें केव्हांही केला नाही. अखेर हंसाला येऊन दोन महिने होऊन गेले तरी देखील तिची जेव्हा आपणाशीं लग्न करण्यास संमति मिळण्याचे त्याला चिन्ह

दिसेना तेव्हां तो फारच अधीर झाला आणि त्यानें गोष्ट निकरावर आणण्याचा बेत केला. शेजारीं असलेल्या जंगमकोटा नांवाच्या गांवीं जाऊन त्यानें तेथल्या काजीस व इतर एक दोन मुसलमान गृहस्थांस अनुकूळ करून घेतलें आणि ज्येष्ठ वद्य द्वितीयेच्या रात्री हंसाला इसलामची दीक्षा देऊन तिच्याशी जबरीनें लग्न करण्याचा बेत मुकरर केला. आपल्या या विचारास हंसाचें मन थोडेंबहुत तयार झालेलें असावें अशा इच्छेनें छावणींत आल्याबरोबर महबूबकरवी त्यानें आपला बेत हंसास कळविला. तो त्याचा बेत ऐकतांच हंसाची अवस्था कशी काय झाली असेल याची कल्पना करण्याचे काम आह्मी वाचकावरच सोपवितो. तिनें सारा दिवस आकात केला, नाना प्रकारें परमेश्वराची करुणा भाकली आणि अन्नपाण्यास स्पर्श देखील केला नाहीं. संध्याकाळच्या सुमारास तिचे रडे थांबले, पण ते तिचें दुःख कमी झाले ह्मणून नव्हे, तर तें तिच्या नाजूक देहयष्टीच्या सहनशक्तीपलीकडे गेलें, ह्मणून थांबले. तिच्या मस्तकात दुःखद विचारांचे आणि घरच्या आठवणींचे काहूर उसळले होते, आणि आज झालें तरी ती अशाच मनःस्थितीत असतां आपण तिला पाहत आहोत.

हंसाचें दुःख नैसर्गिक आहे हे महबूबनें ओळखले होतें आणि ह्मणूनच तिनें एवढा वेळ तिला मनसोक्त रडूं दिले होते, पण आता तिचे दुःख अमळ कमी झालेसे पाहताच तिनें तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. ती ह्मणाली, 'बेटा, ज्या गोष्टी आपल्या हाती नाहींत, किंबहुना ज्या अल्लाच्या मर्जीनेंच घडून येत आहेत त्याच्याबद्दल आपण नाराजी का बरे दाखवावी? माझा लाला का वैभवानें, का रूपानें, का गुणानें वाईट आहे, ह्मणून तूं त्याच्याशीं लग्न करण्यास इतके आढेवेढे घेत आहेस, सांग पाहूं.'

हंसा बिचारी काहीच बोलली नाहीं. तिनें उत्तर देण्याचा प्रयत्न केला, पण तिला हुंदका आवरेनासा होऊन तिचा गळा दाटून आला व एक दीर्घ उसासा टाकून ती गप राहिली. निराशेच्या भरांत आपलें मनोगत एकदा महबूबपाशी बोलून मोकळे व्हावे असे तिच्या मनात वरचेवर येत होते, पण आपण दिलेल्या उत्तरापासून आपली अधिकच विटंबना होईल, या गोष्टीची तिला जाणीव असल्या-मुळें तिला बोलण्याचा धीर होईना. शिवाय आजपर्यंत आपण ज्या गोष्टीला मतलबाकरितां ह्मणून का होईना, स्पष्ट विरोध दर्शविला नाहीं तो आतांच एकदम दर्शविणें तिला इष्ट वाटलें नाहीं. तिनें पदरानें एकवार डोळे पुसले आणि ती आपल्या दुःखद विचारात निमग्न होऊन राहिली.

या वेळी करकरीत तिनिसांज झाली असून छावणींत सर्वत्र अंधार पडला होता. बहुतेक लष्कर चिकबाळापुराकडे गेलें असून छावणींत हरकारे, चौकीवाले,

जासूद; इत्यादि कामकरी लोक मात्र राहिले होते. अंधार पडलेला पहातांच मशालजी लोकांनीं वेगवेगळ्या राहुट्यांतून कंदील आणि मशाली पेटविण्यास प्रारंभ केला. हंसाला ज्या राहुटींत ठेवण्यांत आलें होतें त्या राहुटींतही एक इसम येऊन कंदील लावून गेला. तो बाहेर पडतो इतक्यांत दोन गवळणी डोक्यावर दुधाच्या दोन पाट्या घेऊन राहुटीसमोर आल्या आणि "दूध येथेंच घालावयाचें कां?" असें मुसलमानींत विचारीत हंसाच्या राहुटींत शिरूं लागल्या. "ए लवंड्यानो, तुमचे डोळे आहेत कां बेलट्याचीं भोकें आहेत?" असें ह्मणून पहारेकरी त्यांच्या अंगावर खेकसला आणि त्यानें त्यांस मुदपाकाच्या डेऱ्याकडे जाण्यास सांगितलें. पण इतक्यांत महबूब पहारेकऱ्यास ह्मणाली, "इब्राहीम, थांब, त्यांना आत येऊं दे. हंसाबाईनें आज कांहीं खाल्लेलें नाहीं. ती थोडें दूध तरी पिते का पाहूं." महबूबनें असें ह्मटल्यावर इब्राहीमचा नाइलाज झाला आणि त्यानें गवळणींस मुकाट्यानें आंत सोडलें. गवळणींनीं आंत जातांच आपल्या दुधाची मनस्वी वाखाणणी केली आणि "थोडें तरी घेऊन बघा, आणि मग उद्यापासून रतीब लावा" अशी महबूबला शिफारस केली. महबूबनें त्याचे दूध पसंत केलें आणि हंसाला त्यांतले थोडें पिण्याचा आग्रह केला. हंसा आपणास दूध-बीध कांहीं नको असे ह्मणण्याच्या बेतात होती पण इतक्यात त्या गवळणीपैकीं एकीनें तिला चटकन् काय खूण केली न कळे, ती दूध पिण्यास एकदम कबूल झाली. महबूबला मोठा आनंद होऊन तिने एक सुंदर नक्षीदार चांदीचा पेला त्या गवळणींपुढें केला. एका गवळणीनें पाटीतील तांब्या काढून आपल्या मापाने त्यांतले दोन मापें दूध पेल्यात ओतलें आणि राहिलेलें दूध मुदपाकाच्या डेऱ्यामध्यें घालण्यासाठीं त्या निघून गेल्या. हंसा दूध प्याली आणि तिला अमल हुषारीही वाटली. मात्र ती दुधामुळें वाटली कीं गवळणीनें केलेल्या संकेतापासून उत्पन्न झालेल्या आशेमुळें वाटली हें आह्मास सांगता येत नाही. लालामियाच्या लष्कराचा तळ तेथें पडल्यापासून जंगमकोट्यांतून आणि दुसऱ्याही आसपासच्या खेड्यांतून रोज रतिबाचें दूध येत असे, त्यापैकींच हें असावें अशी इब्राहीमची खात्री असल्यामुळें त्यानें त्या गवळणीकडे विशेष लक्ष्य दिलें नाहीं.

* * * * * * * *

मध्यरात्रीचा सुमार झाला असून छावणींत सर्वत्र सामसूम झाली होती. मोहिमीवरून आलेले शिपाईप्यादे जेवणेंखाणें आटपून डाराडूर झोपी गेले होते. लालामिया स्वतः आपल्या राहुटींत गाढ निद्रासुख अनुभवीत पडला असून त्या निद्रेंत हंसाशीं आपले लग्न लागल्याचें मनोरम दर्शनसुख भोगीत होता. जागजागच्या चौक्यांवरचे पहारेकरी आपापल्या चौक्यांवर अर्धवट पेंगत बसून राहिले

होते. छावणींतील दिवट्या, मशाली व इतर चिराख यांच्या मिणमिण प्रकाशानें छावणीपुरता जरी कसाबसा प्रकाशाचा पुरवठा केला होता, तरी छावणीभोंवतालचा सारा आसमंत गाढ अंधकारांतच बुडाला होता. आकाश अभ्राच्छादित असून गार झोंबरा वारा सुटला होता. अशा वेळीं दोन व्यक्ति अंधारांतून झपाझप पावलें टाकीत छावणीकडे आल्या. दोनी व्यक्तींच्या अंगावर काळे झगे असल्या-मुळें त्यांचे पेहेराव किंवा चेहरे दिसण्यास कांहींच मार्ग नव्हता. छावणीपासून थोड्या अंतरावर येतांच त्यातील एक व्यक्ति तेथेंच उभी राहिली व दुसरी व्यक्ति 'बाईसाहेब, मी आता एकटीच जाते. अल्लाची कृपा असली तर कामगिरी बिनबोभाट करून आपल्या भेटीस परत येईन. त्याची नामर्जी झाली तर काय व्हावयाचें असेल तें होईल. कांहीं झालें तरी माझ्या तोंडून एक शद्ब देखील बाहेर फुटावयाचा नाहीं ही खात्री बाळगा" असे म्हणून तेथून झपाट्यानें निघाली ती एखाद्या सराईत माणसाप्रमाणें दोन चौक्याच्या मधून वाट काढून पावले न वाजवितां छावणींत शिरली. पहिली व्यक्ती "रोशन, रोशन," अशा हांका मारीतच जाग्यावर राहिली, तिच्या हांका रोशनला ऐकूं गेल्याच नाहींत. आता या दोघी व्यक्ती म्हणजे मुमताज कलावंतीण आणि तिची दासी रोशन याच होत हें वाचकांनी ओळखलेंच असेल. रोशन लपत छपत निघाली ती, हंसा ज्या राहुटीत होती त्या राहुटीच्या पिछाडीस आली. इब्राहीम पहारेवाला अर्धवट पेंगत खांद्यावर तलवार टाकून इकडून तिकडे व तिकडून इकडे हिंडत राहुटीच्या तोंडाशीं पाहरा करीत होता. त्याला रोशनची मुळींच चाहूल लागली नाही.

हंसाची राहुटी एका प्रचंड वृक्षाच्या आश्रयानें उभी केली होती. त्या झाडाची एक फादी राहुटीवरून आडवी गेली असून राहुटीचा मधला खांब त्या फांदीला येऊन टेकला होता. ही वस्तुस्थिती रोशनला ठाऊक होती. खरें सांगा-वयाचें म्हणजे संध्याकाळीं लालामियाच्या छावणींत दूध घालवयास आलेल्या गौळणी म्हणजे दुसऱ्या तिसऱ्या कोणी नसून मुमताज व रोशन याच होत्या. त्याच वेळीं रोशननें हंसाच्या राहुटीची परिस्थिती बारकाईने पाहून ठेविली होती व त्या माहितीचा उपयोग आता करून घेण्याचा तिचा विचार होता. थोडा वेळ झाडाच्या आडोशाला उभी राहून रोशननें चोहोंकडे सामसूम असल्याबद्दल आपली एकदा खात्री करून घेतली, आणि नंतर ती हळूं हळूं झाडावर चढली. मग आपला झगा झाडावर हळूंच काढून ठेऊन ती फांदीवर आडवी झाली आणि सरकत सरकत पुढें निघाली. तिनें आपली हालचाल इतकी सावधपणानें व सावकाश चालविली होती कीं राहुटीच्या खांबापर्यंतचें पांच चार

हातांचें अंतर तोडावयास तिला तब्बल दोन घटका लागल्या!. खांबाजवळ येतांच रोशननें आपल्या लहंग्याखालून एक सुरा काढला आणि खांबाभोंवतालचें तंबूचें जाड कापड चिरून चांगली एक हात व्यासाच्या वर्तुळाइतकी ऐसपेस जागा खुली केली. तिनें हें सर्व कृत्य इतक्या सफाईनें केलें की राहुटीच्या दाराशीं पाहरा करीत हिंडणाऱ्या इब्राहिमला तिच्या कारवाईचा मागमूस देखील लागला नाहीं! आत उतरून जाता येण्याजोगी वाट तयार झाली असें पाहताच रोशन राहुटीच्या खांबाला धरून तयार केलेल्या भोकातून हळू हळू खालीं उतरली. राहुटीच्या आत येताच तिनें प्रथम एकदा राहुटीच्या अंतर्भागावर सभय नजर टाकली. हंसा अगर महबूब यांच्यापैकीं कोणी जागी असल्यास आपणास उतरताना पाहून एकदम किंचाळल आणि आपला सगळा व्यूह ढासळून पडेल ही तिला मोठी भीति वाटत होती. पण सुदैवानें त्या दोघींनाही गाढ झोप लागली आहे असें तिला दिसून आलें. इब्राहीमची भीति बाळगण्याचें आता तिला कारण नव्हते, कारण राहुटीत जरी एक कंदील मिणमिण करीत होता तरी राहुटीच्या तोंडाला भली मोठी कनाथ आणि शिवाय तिला जोडून एक चिकाचा पडदा सोडला असल्यामुळें राहुटीत चाललेला प्रकार त्याला बाहेरून दिसणें शक्य नव्हते. नंतर रोशन बेतावेताने खाली उतरली आणि हंसाजवळ आली. पण हंसाला जागी कशी करावयाची हाच आता तिला मोठा प्रश्न पडला. हंसाला मोठ्यानें हांका मारावयाची तर सोयच नव्हती. बरें, पायाला किंवा हाताला बारीक चिमटा घेऊन किंवा अन्य काही खूण करून तिला जागी करण्याचा प्रयत्न करावा, तर जागी होताच आपणास पाहून ती मोठ्यानें किंचाळेल असा संभव होता. अशा स्थितींत रोशनने पुढील तोड काढली. तिनें आपल्या तोंडावरच बुरखा दूर करून हंसाला जागी करण्याचें ठरविलें. संध्याकाळी गवळणीच्या वेषांत हंसानें आपणास पाहिली असल्यानें व आपण तिला केलेला संकेत ओळखला असल्यानें, आपला चेहरा दिसताच ती गप राहील अशी तिला खात्री वाटली. रोशनची अटकळ बरोबर ठरली. तिनें हंसाच्या पायाच्या अंगठ्याला हळूच चिमटा घेतल्याबरोबर हंसानें डोळे उघडले, तोंच रोशनचें हांसरें मुख आपणास बोटानें चूप राहण्याविषयी खुणावीत आहे असें तिला दिसलें आणि ती निवांत राहिली. इतकें झाल्यावर रोशनने राहुटींतला दिवा मालवून टाकला आणि ती हंसाजवळ जाऊन तिच्या कानांत हळू हळू बोलत राहिली. त्या दोघींचें काय बोलणें झालें, हें आपणांस कळण्यास प्रस्तुत मार्ग नाहीं. इतकें मात्र खरें कीं, सुमारें एका घटकेनें रोशन पुन्हा राहुटीच्या खांबावरून चढून गुपचूप फांदीवर गेली, आणि तशा अंधारातच आपला झगा पालटून झाडाखालीं उतरली

व सुरक्षित निघून गेली. थोड्या अंतरावर जातांच तिची व मुमताजची गांठ पडली आणि त्या दोघी आपल्या वाटेनें निघून गेल्या.

सकाळच्या प्रहरीं प्रथम महबूबचें लक्ष्य राहुटीच्या माथ्यावर दिसूं लागलेल्या भोकशाकडे गेलें आणि तिनें ती बातमी ताबडतोब लालामियास कळविली. मियानें स्वतः येऊन त्या भोकाची पाहणी केली, पण तें कसें पडलें असावें या विषयीं त्याचा काहीं तर्क चालेना. त्यानें इब्राहिमला पुष्कळ छेडून पाहिलें, "तुझें पाहऱ्यावर लक्ष्य नव्हते" असाही त्याच्यावर आरोप केला, पण इब्राहिमनें अल्लाची कसम खाऊन आपण खडा पाहरा केल्याचें सांगितल्यावर मियानें त्याला दोषमुक्त केलें. जिन्नसपानस काहींच गेला नसल्यामुळें चोराचिलटाची शंका आली नाहीं. अखेर रात्रीं वारा सुटून झाडाच्या फांदीचा दाब राहुटीवर पडल्यामुळेंच राहुटी चिरली असावी, हेंच निदान कायम करण्यांत आलें!



मराठेशाहीचा वध्यपक्ष

——:0:——

(२)

# प्रतिपदा.

( उत्तररात्र. )

———— ————

लेखक

साधुदास

( वनविहार, रणविहार, गृहविहार इ० काव्याचे व मराठीची
सजावट इ० गद्यग्रंथांचे कर्ते. )

सन १९३५.

किंमत १। रुपाया

# अनुक्रमणिका.

# प्रकरण २४ वें.

खरे, ले. ९७९-८० ] **चिकबाळापूरची लढाई.** [ ज्ये. शु. १४ शके १६९२

दुसऱ्या ह्मणजे ज्येष्ट शुद्ध चतुर्दशीच्या दिवशीं चिकबाळापूरच्या किल्यात पहाटेपासूनच मोठी गडबड उडून राहिली होती. जानराव काका, आनंदराव, भगवंतराव आणि तरुण जानबा अशी धुळप मंडळी लवकर स्नानें आटपून आपल्या वाड्यात सदरेवर बसली होती आणि आता पुढें काय करावे याबद्दल त्याचा विचार चालला होता. किल्याच्या शिबंदीपैकीही कांहीं अधिकारी वाड्यात जमले होते आणि आपल्या मगदुराप्रमाणे सल्लामसलत देत होते. सदरेवर एक प्रशस्त बैटक टाकण्यात आली असून तिच्या मध्यभागीं ह्मातारा जानराव आणि त्याच्या भोंवर्ती कडें करून इतर धुळप व शिबंदीतले लोक बसले होते. आकाश आजूनही अभ्राच्छादित असून हवेमध्यें खूपच गारठा जाणवत होता, त्यामुळेंच की काय शिबंदीतली मंडळी सरदल्यासारखी दिसत होती. शिवाय आदल्या दिवशी लालामिया आणि त्याचा दुय्यम चंद्रोजी जाधव यानी किल्यावर जो तोफाचा भडिमार केला होता त्याने किल्ल्याच्या तटाचा बराच भाग ढासळला होता, आणि रात्रीच्या रात्री तो बाधून काढणे शक्यही झाले नव्हते. किल्ल्यावर शिबंदी अगदी थोडी, पाच चारशे माणूस, इतकीच असून ती आज लालामियाच्या हल्ल्यापुढे टिकाव धरील अशी अधुक देखील आशा करण्यास जागा नव्हती. आनदराव धुळपानें पचवीस कोसावर असलेल्या गोपाळराव पटवर्धनाना आपली हकीगत कळवून त्याच्यापाशीं कुमकेची याचना केली होती, पण त्याची कुमक येण्याचा अजून कांहींच सभव दिसत नव्हता. अशा स्थितीत आनदराव, भगवतराव याच्या सारख्या रणगाजींच्याही काळजानें ठाव सोडला असल्यास नवल नाहीं.

पण ह्मातारा जानराव जरी आता पिकले पान झाला होता, आणि मनातून घाबरून गेला होता, तरी त्याने बाहेर मात्र तसे मुळींच दिसू दिले नव्हते. तो आपल्या भावास, पुतण्यास, आणि नातवास धीर देतच होता, आणि शिबंदीचे लोक घाबरून गेले आहेत असे कळल्यावरून त्याच्यापैकीं कांहीं मुख्य पुढाऱ्यास बोलवून आणून त्यानाही तो उमेदीचे शब्द बोलतच होता. त्यातच त्याचा धाकटा भाऊ भगवंतराव हा आदल्याच रात्री शेंपन्नास लोकानिशीं दोड्डुबाळापुराहून त्याच्या कुमकेस आल्यामुळे त्याला एक प्रकारचा आधार वाटू लागला होता. भावाभावाचे बराच वेळ हितगूज चाललें होते. भगवतरावाने सारी परिस्थिति एकवार

नीट समजून घेतली आणि आपला पुतण्या आनंदराव यास प्रश्न केला, ‘ आनंदा, गोपाळरावांसनी तूं पतर पाठविलस त्येला किती दिस झालऽ ह्मने ? ’ ‘ चार रोज झालऽ ’ आनंदरावानें उत्तर केलें.

“ आन् येतो ह्मनूनशान् त्येंचं उत्तारबी आलं हुतं ? ” भगवंतरावानें पुन्हा पृच्छा केली.

“ व्हय तर, अक्षी टाकोटाक निघून येतों असं त्येंनीं लिवलं हुतं ” आनंदरावानें खुलासा केला.

“ मग मोटंच आचिर्य हाय, ” भगवंतराव अर्धवट आनंदरावास उद्देशून व अर्धवट स्वतःशींच ह्मणाला, “ राव मुद्दाम कुचराई करनारा मानूस न्हवऽ अशी माझी निकालस खात्री हाय. ”

“ माजीबी हाय ” ह्मातार्‍या जानरावानें दुजोरा दिला, “ गोपाळराव माज्या जिवाला जीव देईल. आमा धुळपावर त्येची ह्मोबतच तशी हाय. ”

“ आजाबा, ” इतका वेळ वडील मंडळींचें संभाषण निवांतपणे ऐकत असलेला तरुण जानराव ह्मणाला, “ आज त्ये [illegible] न्हायाचऽ न्हाईत. यकादस, द्वादस करून निगालऽ असत्याल आन आज जवळ पास आलऽबी असत्याल. ”

गोपाळराव पटवर्धन एकादशीच्या कष्ट तिथीला निघावयाचे नाहीत, ते द्वादशी सोडूनच निघणार, असे हेरण्यात तरुण जानरावाने जे व्यवहारज्ञान दाखविलें त्याचे म्हातार्‍या जानरावाला इतकें कौतुक वाटलें की, त्यानें नातवाला मोठ्या प्रेमानें जवळ ओढून घेतले, आणि त्याच्या पाठीवरून ममतेने हात फिरवीत तो ह्मणाला, ‘ खरं ज्ये खरं ल्येका, तू ह्मनतोस त्ये अक्षी खरं हाय. त्यो बामनभाई यकादशीला कंदी निगायाचा न्हाई. त्यो द्वादस सोडूनच निगनार आन कालचा रोज वाट चालून आज येऊन पोचनार ह्येच खरऽ. ” हे शब्द बोलत असत नातवाच्या चलाखी विषयी वाटणारा अभिमान ह्मातार्‍याच्या चर्येवर स्पष्टपणे प्रतिबिंबित झाला होता. माझ्या नातवावरून सारे ब्रह्मांड ओवाळून टाकावे असेंच जणूं काय ह्मातार्‍याचीं सारी गात्रे भोवतालच्या मंडळींना बजावीत आहेत असें दिसलें.

‘ पोरग्यानं अक्षी बराबर ह्येरलंऽ ’ आनंदराव धुळप म्हातार्‍याच्या अभिमानांत अंशभागी होऊन म्हणाला, “पन त्येच्या शानपनाचं चीज कुटं होतंया ! शिरमंतांच्या दरबारांत गुनाला मोल हाय कुटं ? त्येंनीं आमा धुळपांची भाकरी काडून घेटलीच कीं न्हाई ? ”

' भाकरी काढून घ्येटली असं ह्मनू नगोस आनंदा ' ह्मातारा जानराव पुतण्याचा निषेध करीत म्हणाला, ' ती भाकरी काढून घेटली तर ही दुसरी दिली. '

' आन् तीबी परत मिळनारच न्हाई म्हनून कुनी सांगावं ? ' भगवंतराव म्हणाला, ' मोत्याजीराव इचाऱ्यांनीं आमांवर वरचड करून आरमाराचा सुबा मिळविला हाय, पन त्ये त्येला किती रोज निबाऊन नेत्यात बगू कीं. आतांच त्येंनीं फिरंग्यांची ह्माजं हातात घावल्यालीं सोडलीं ह्मनूनशान बोभाटा आला हाय. ह्मालंच तर शिवाजीराव सुर्व्यांची पोरगी हंसा हिलाबी त्येनीं मावशीच्या घरीं पोचविन्यासाटीं संगाट घेतली हुती, तिचाबी कुठं पत्या न्हाई ह्मनत्यात. '

" काय, हंसाचा पत्त्या न्हाई ह्मनतुस ? " ह्मातारा जानराव जागच्या जागीं उशी घेऊन उद्गारला, " ह्मंजे भगवंता ह्मनतोस तरी काय तूं ? ती मुसलमानांच्या–"

" छे छे, तसलं काइ न्हाई, " भगवंतराव ह्मणाला, " मोत्याजीरावांनीं हंसाला आन् तिच्या मावशीला उडपीला तिच्या गांवाजवळ सोडायासाटी ह्मनून आपल्या संगाट घेतली हुती. पन त्ये त्या दोगीस्नी उडपीला न सोडतां ह्मोरंच घेऊन ग्येलऽ. चैत्राच्या तिनव्या दिसापर्यंत त्या दोगीबी त्येंच्या गुराबावर हुत्या. तिनवीच्या रात्रीं हंसा येकायेकीं पालावरून दिसनाशी ह्माली, अशी उडत उडत बातमी माज्या कानावर आली हाय. मग काय ती समिंदरात निसरून पडली, कां तिला काय दुसराच अपगात ह्माला, कळत न्हाई. "

" ही काय मोत्याजीरावाची मानुसकी ह्माली ? " आनंदराव धुळप रागानें बेफाम होऊन ह्मणाला, " लोकाची जिनगानी जिवापल्याड जतन कराया हवी हुती का न्हाई ? आमचऽ काय, आमच्या पोरग्याला याक सोडून धा पोरी येत्याल, पन शिवाजीरावाचा क्येवडा घात ह्माला बरं ? "

तरुण जानरावाला चुलत्याची विचारसरणी पटली असावीसें दिसलें नाहीं. हंसासारख्या रूपगुणसंपन्न मुली दहा तर राहोतच, पण एखादी सुद्धा मिळणार नाही असें त्याला वाटलें. ती नाहींशी झालेली ऐकताच त्याच्या पोटात कालवाकालव सुरू झाली, आणि त्याच्या डोळ्यातही एक अश्रुबिंदू चमकूं लागला. तो आपल्या वडील मंडळींना दिसू नये ह्मणूनच कीं काय, तो तेथून उठून सदरेच्या कडेला जाऊन उभा राहिला व शिळेतून एक चकवा गुणगुणूं लागला. पण त्याचा हा पोरप्रयत्न फुकट गेला, कारण त्याच्या शिळेचे करुण स्वरच त्याच्या पोटांत चाललेली गलबल व्यक्त करीत होते !

" बर, कस काय येसाजीराव, " आनंदराव आपल्या शेजारीं बसलेल्या शिबंदीच्या नाइकाला उद्देशून ह्मणाला, " आज निर्वानीचा वखुत आलाया,

आपल्या शिबंदीचऽ लोक जिवावर उदार होऊन तलवार करत्याल ना ?"

"त्ये मी कशाला सांगूं जी धनी ?" येसाजीरावानें उत्तर केलें, "आपन समक्शांतच बगाल माजीं मानसं तरवार कशी करत्याल तीं !"

"त्येच्याबद्दल आमची खात्री हाय म्हना," भगवंतराव म्हणाला, "पन आपलीं मानसं पडलीं थोडी, आन् मुसलमानांची जूट हाय मायंदाळ, म्हनून जरा काळजी वाटातिया इकतंच."

"आपन अशी काळजी करूं नगा धनी," शिबंदीवरचा दुसरा एक नाईक परसोजीराव म्हणाला, "आमचा योक योक मानूस त्येंच्या धा धा असामीस्नी भारी हाय."

म्हाताऱ्या जानरावाला आपल्या शिबंदीतल्या लोकाचा हा उत्साह पाहून मोटें समाधान वाटलें. आणि खरें म्हटलें तर त्या लोकाच्या स्वास्थ्याकरिताच तो चिकबाळापुरचा किल्ला इतक्या उमेदीनें आणि चिकाटीनें लढवीत होता. लालामियानें बाळापूरच्या किल्याला वेढा घातला नसल्यामुळें नुसतें आपल्या कुटुंबाचें संरक्षण किल्यांतून मुलांमाणसांसह निघून जाऊन सुद्धा त्याला करितां आलें असतें. पण असली नामर्दपणाची कृति धुळप मंडळींच्या हातून होणें शक्य नव्हते. मात्र आदल्या दिवशीं किल्याचा तट पुष्कळच ठिकाणीं ढासळला असल्यामुळे, जानरावाने आज मुसलमानाच्या बरोबर निकराने टक्कर द्यावयाची आणि नाइलाज झाला तर साऱ्या शिबंदीसह किल्ला सोडून जावयाचे, असा बेत केला होता. आणि या आपल्या बेतास अनुसरून त्याने किल्ल्यावरील लोकानी आपली बायकामुले सकाळीं लवकर जेवाखायला घालून तयार ठेवावीं, अशी द्वाही फिरविली होती, व त्याना किल्ल्यावरून चोरवाटेने सुरक्षित काढून नेण्याची तजवीजहि ठेविली होती. या वेळीं खुद्द त्याच्या घरची मुलेमाणसे जेवणेंखाणें उरकण्याच्या उद्योगास लागलीं होतीं, आणि हरबाजीराव धुळप त्याच्या बंदोबस्ताकडे गुंतला होता. शिबंदीतले शिपाईप्यादे आपल्या हत्यारा पात्यारासह तटावर जागजागी जमले होते, आणि त्याच्या तयारीची वर्दी देण्याकरिता येसाजी व परसोजी नाईक धुळपाच्या वाड्याकडे आले होते. साऱ्या किल्यावर चोहांकडे धादल आणि गडबड उडून गेलेली दिसत होती. सकाळीं घटकाभर दिवस आला नाहीं तोंच जानरावाने येसाजी व परसोजी यास निरोप देऊन किल्याच्या दरवाजापाशीं आपल्या लोकांसह तयारीने राहण्यास सांगितलें आणि तो आपल्या घरच्या मंडळींसह कपडे करण्यास उठला.

धुळपांच्या सदरेवरची बैठक खलास होऊन फार वेळ झाला नाहीं तोंच तोफेचा धाडकन् आवाज ऐकूं आला, आणि "दीन दीन" असा अस्पष्ट ध्वनि

दूर कोठें तरी सादावूं लागला. त्यावरून मुसलमान लोक हल्ला करावयास आले हे धुळप मंडळींनीं ओळखलें आणि ते लगबगीनें पोषाख करून व हत्यारें चढवून किल्ल्याच्या दरवाजावर आले. तेथें त्यांच्या शिबंदींतले तमाम शिपाईप्यादे जमा झाले होते. मुसलमानांची फौज किल्ल्यावर चढून येण्यापूर्वीच आपण त्यांना मैदानांत गांठावें आणि त्यांच्याशीं निकरानें लढाई द्यावी असा विचार करून आनंदरावानें म्हाताऱ्या व तरुण जानरावांना किल्ल्यावर राहण्यास, आणि लढाईचा रंग विपरीत दिसल्यास बायकामुलांसह चोरवाटेनें निघून जाण्यास सांगितलें. नंतर भगवंतराव व हरबाजीराव यांना घेऊन तो आपल्या शिबंदीसह खालीं निघाला. मुसलमान किल्ल्याच्या वेशीच्या रोखानें येत होते. त्यांच्यापेकीं बहुतेकजण किल्ल्यांत अमुक लूट सापडेल, तमुक बायका सापडतील, इत्यादि मनोराज्यांत दंग होते. इतक्यांत खाडकन किल्ल्याचे दरवाजे उघडले, आणि पांच चारशें मराठ्यांची टोळी "हरहर महादेव" अशी गर्जना करीत किल्ल्यावरून नीट चालून आली व मुसलमानांवर तुटून पडली. मुसलमानांचें पायदळ पुढें आलें असून, त्यांच्या बरोबर असलेल्या तीनी तोफा अमळ मागें राहिल्या होत्या. त्या पुढें यावयाच्या आंतच मराठ्यांचें सैन्य एखाद्या विजेच्या लोळासारखें त्यांच्यावर येऊन कोसळलें!

मुसलमानांच्या फौजेंत एक हजार गारदी, दोन हजार कर्नाटकी प्यादे, सातशें स्वार आणि तीन तोफा इतका सरंजाम होता. अर्थात् त्यांच्या मानानें मराठी टोळी ही दर्याम खसखसपेक्षांच होती. पण मुसलमानांना प्रतिकाराची मुळींच भीति नसल्यामुळें त्यांची फौज जी आली ती व्यवस्थित न येतां, सर्वांपुढें प्यादे, त्यांच्या पाठीमागें गारदी, त्यांच्या पाठीमागें तोफा आणि त्यांच्याही पुष्कळच मागें घोडेस्वार, अशा बेशिस्त क्रमानें आली. त्यामुळें त्यांच्या तोफांच्या माऱ्यांत न सांपडतां मराठ्यांना त्यांच्यावर तुटून पडावयास संधी मिळाली. किल्ला आज सर झाला नाहीं तर किल्ल्यास एखादा दुसरा दिवस वेढा द्यावयाचा अशा इराद्यानें मुसलमानांनीं आपल्याबरोबर राहुट्या, बैलगाड्या, दाणावैरण वगैरे अवजड सामान बरेंच आणलें होतें. त्या सामानाचा त्यांना प्रत्यक्ष युद्धांत कांहींच उपयोग होण्यासारखा नसून, तें संभाळण्याची जोखीम मात्र आतां त्यांच्यावर पडली. लालामियां आज सैन्याबरोबर आला नसून त्यानें आपला दुय्यम चंद्रोजी जाधव यास पाठवून दिलें होतें. या सर्व अव्यवस्थितपणाचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. चंद्रोजी जाधव आपल्या सैन्याची सावरासावर करितो इतक्यांत मराठ्यांची टोळी त्यांच्या आघाडीवर येऊन पडली, आणि तिनें कर्नाटकी प्याद्यांची एकसारखी कापाकापी सुरूं केली.

मराठ्यांचा हल्लाच इतक्या आवेशाचा होता कीं त्याच्या जोरानें चंद्रोजीच्या कर्नाटकी प्याद्यांची फळी फुटली आणि त्यांच्या टोळीचे दोन भाग होऊन दोघे दोनीकडे ढकलले गेले, आणि मराठ्यांची टोळी त्यांच्या दरम्यान् एखाद्या पाचरी सारखी घुसून राहिली! त्यांची लगट होईपर्यंत त्या प्याद्यांनीं बंदुकांची एक फैर

## चिकबाळापूरच्या लढाईचा नकाशा.




॰ कोलार

॰ होसकोटें

॰ बंगलोर

झाडली, पण मराठे त्यांना एकदा येऊन भिडल्यावर त्याचा कांहीच लाग चालेनासा होऊन त्याना बंदुकींच्या दस्त्यानीं आणि तरवारीनीं लढण्याचा प्रसंग आला. आनंदराव धुळपानें या मिळालेल्या संधीचा पुरतेपणी फायदा घेतला. आपल्या सैन्याच्या उजव्या बगलेचे आधिपत्य त्याने स्वतःकडे घेतले होतें आणि डाव्या बगलेचें भगवंतराव व हरबाजीराव याचेकडे सोपविले होते. आनंदरावाचा उत्साह त्याच्या सैन्याच्या अंगीं संचरला होतासे दिसले. त्यानीं कानडी प्याद्याची अशी लांडगेतोड सुरू केली कीं घटकाभराच्या आत शेदोनशे प्याद्याचे मुडदे जमीनीवर लोळले! दात ओंठ खाऊन एकमेकास प्रहार करणाऱ्या वीराच्या आरोळ्या, जखमी होऊन पडणाराच्या किंचाळ्या, मरत पडलेल्याचें कण्हणे विवळणें इत्यादि ध्वनि ऐकूं येऊं लागले. तुटलेले अवयव, रक्ताच्या चिळकांड्या व मांसाचा चिखल यांचा जमिनीवर सडा झाला. कर्नाटकी प्याद्यांची फळी फुटलेली पाहून त्यांच्यामागें असलेले गारदी त्याच्या मदतीला धावून आले, आणि

त्यांनीं मराठ्यांना चोहोंकडून घेरलें. मराठ्यांच्या अतुल पराक्रमानें मुसलमानांचे बरेच लोक जायबंदी झाले होते, तरी त्यांचें संख्याबळ फारच मोठें असल्यामुळें, त्यांच्या एकवटलेल्या सैन्यसागरांत मराठ्यांची चिमुकली टोळी बाजरीच्या कणसा-सारखी दिसूं लागली. एकीकडे भगवंतराव यांनीं आज पराक्रमाची शर्थ करून कैक मुसलमानांना कंठस्नान घातलें. त्यांच्या भोंवतीं प्रेतांचे ढीग पडले, पण मुसलमानांचें संख्याबळ प्रतिक्षणी वाढत जाऊन त्यांच्या प्रचंड लोंढ्यांत मराठ्यांची टोळी वाहून जाणार असा रंग दिसू लागला!

इतक्यात दूर अंतरावर घोड्यांच्या असंख्य टापा वाजूं लागल्याचा भास झाला आणि आनंदरावानें वर मान करून वायव्येच्या बाजूला अमळ नजर टाकली, तों धुळीच्या प्रचंड लोटांत पटवर्धनाचें सैन्य आपल्या मदतीस धांवून येत आहे असें त्यास दिसून आलें. मग तो आनंद काय वर्णावा? मराठ्यांच्या टोळीतून " हरहर महादेव " च्या गर्जनावर गर्जना उठू लागल्या, आणि पटवर्धनाच्या सैन्यांतून त्याना पडसाद मिळू लागला! मुसलमानाना आपल्या संकटाची जाणीव झाली. चंद्रोजीने एक शेवटचा बाण ह्मणून आपल्या घोडेस्वाराना मराठ्याच्या टोळीवर तुटून पडण्याचा हुकूम केला. पण वाटेत अस्ताव्यस्त पसरलेल्या सामानामुळे आणि बेशिस्त झालेल्या त्याच्याच सैन्यामुळे त्याच्या घोडेस्वाराना मराठ्यापर्यंत लगट करिता येईना. स्वतःच्याच सैन्यास तुडवीत ते इकडे तिकडे चाचपडूं लागले!

पण आता त्याना फुरसतच राहिली नाहीं. गोपाळराव पटवर्धनाचे पाच सहा हजार सैन्य त्यांच्यावर येऊन पडले, आणि साऱ्या सैन्याचा एकच गळाटा झाला. मग मराठ्यांच्या दोनी सैन्याच्या दरम्यान् त्याचा जो चेंदामेंदा झाला तो सांगता पुरवत नाहीं. चंद्रोजीने आपल्या जवामर्दीची पराकाष्ठा केली. त्याने तसल्या विपरीत परिस्थितीतही मराठ्याच्या सैन्याला एक प्रहरभर दाद दिली नाहीं. पण आता त्या झटापटीला युद्धाचें स्वरूपच राहिले नसून ती एकतर्फी कत्तलच चालली होती ह्मटले तरी चालेल. सूर्य अस्ताकडे झुकूं लागण्याच्या सुमारास मुसलमानाच्या सैन्यापैकी ठार व जखमी मिळून एक हजारावर माणूस जमिनीवर लोळत होते! त्याच्या तीनी तोफा, पांचशें घोडे, दारूगोळा राहुट्या वगैरे सारें सामान मराठ्यांच्या हातीं लागले. ज्यानीं दांती तृण धरिलें त्याना तेवढे मराठ्यांनीं सोडून बाकीच्यांची सररास कत्तल केली. चंद्रोजी जाधव जीव बचावून पळून गेला. गोपाळराव पटवर्धन, परशरामभाऊ पटवर्धन आणि नीळकंठराव पटवर्धन यांच्या व हरबाजीराव, भगवंतराव आणि आनंदराव धुळप यांच्या ऐन समरांगणावर भेटी झाल्या. सर्वांच्या तरवारीवरुन रक्त ठिबकत होतें. आता बहुतेक रणमैदान शांत झाले होतें.

दूर एका जागीं मात्र एक मुसलमानांची टोळी मराठ्यांच्या एका टोळीबरोबर अजून झगडत होती. पण थोडक्याच वेळांत तिचाही नायनाट होऊन मराठ्यांच्या टोळीला जय मिळाला, आणि त्या टोळींतून एक तरुण मराठा वीर पटवर्धन-धुळपांच्या घोळक्याकडे आला. आनंदरावाचें त्याच्याकडे सहज लक्ष्य गेलें तों तो तरुण दुसरा तिसरा कोणी नसून आपलाच पुतण्या जानराव आहे असें त्यास दिसून आलें, आणि "अर ल्येका, तूं कवा आलास ?" असें म्हणत त्यानें त्यास धावतच जाऊन कवटाळले ! इतर धुळप मंडळीनी आणि पटवर्धन मंडळींनींही जानबाचे फार कौतुक केलें. थोड्या वेळानें सर्व मंडळी चिकबाळापूरच्या किल्यात जावयास निघाली, पण परशुरामभाऊ पटवर्धन मात्र आपणास जरूरीचें काम आहे असे सागून आणि आपल्या बरोबर पन्नास निवडक घोडेस्वार घेऊन निघाले, आणि एका क्षणांत त्यांनी आपले घोडे भरधांव सोडले ! मग त्यांना इतकें निकडीचें काय काम होतें कोणास ठाऊक ?

---

## प्रकरण २५ वें.

### शादीची तयारी. [ ज्ये. शु ११ –

तिकडे चिकबाळापुरास मागील प्रकरणीं वर्णन केल्याप्रमाणे भयंकर रणधुमाळी चालली असता, इकडे जगमकोटा गांवातील एका घरात लग्न-समारंभाची तयारी सुरू होती. सदरहू घर शमसुद्दीन नावाच्या एका मुसलमान व्यापाऱ्याचे असून ते गांवाच्या अगदी एका टोंकास होते. जंगमकोटा हेंच मुळी त्यावेळी लहान खेडं, सुमारें शंभर एक उंबऱ्याचें गाव असेल, आणि त्यातही शमसुद्दीनचे घर गावाच्या अगदीं बाहेरच्या गल्लीला असल्यामुळे त्या घरावर आपोआपच एक प्रकारची निर्जनपणाची छाया पडली होती. शमसुद्दीनच्या घराच्या एका बाजूला पडके घर व भली मोठी बळद असल्याकारणाने त्याला खरा शेजार असा दुसऱ्या बाजूला असलेल्या शिवलिंगाप्पा नावाच्या वाण्याच्या घराचा होता. दोघांच्या घराचे परस एकच असून घराचा इमलाही एकच होता, व त्यात दोघे भाऊ वाटण्या करून राहतात त्याप्रमाणे ते राहिले होते. एकाच घरात एक लिंगाइताचे व एक मुसलमानाचे बिऱ्हाड कसें, अशी आमच्या वाचकांना शंका येईल तर त्याना आम्ही असें कळवितों कीं शमसुद्दीन हा शिवलिंगाप्पाचा सख्खा चुलतभाऊ असून, त्याचा बाप बाटल्या

मुळें केवळ तो मुलसमान झाला होता, आणि ह्मणूनच हे दोघे विधर्मी भाऊ एकाच घरांत नांदत होते. घराच्या सोप्यापुढील अंगण चांगलें प्रशस्त असून त्यांत शिवलिंगाप्पाच्या बापानें बरोबर मध्यावर एक भिंत घालून आपल्या भावाचा व आपला संबंध नुकताच तोडून टाकला होता. अर्थात् दोघांनीं आपापल्या भागापुरते स्वतंत्र जाबते करून अंगणापुढील सडकेच्या बाजूला दोन स्वतंत्र दारेंही पाडलीं होतीं, आणि मधला दरवाजा बुजवून रस्त्याकडील भिंतींत सामील करून टाकला होता.

गेल्या वर्षीच या दोघा चुलतभावांचे वडील थोड्या अंतरानें वारले व हे दोघे भाऊ आपल्यापुरते स्वतंत्र झाले. शिवलिंगाप्पाच्या घरीं त्याची बायको व एक लहान मूल एवढाच परिवार होता. शमसुद्दीनच्या घरात मात्र त्याच्या पांच वर्षे वयाच्या एका मुलाशिवाय घरचें असें दुसरें कोणीच नव्हते. त्याची बायको नुकतीच मेली असून त्यानें अद्याप दुसरें लग्न केलें नव्हतें. शिवलिंगाप्पा आणि शमसुद्दीन या दोघांचीही जंगमकोट्याच्या बाजारपेठेंत किराण्या मालाचीं दुकानें होतीं. भावाभावाची मनें भाऊबंदकीच्या द्वेषानें कलुषित होण्याचा संभव नव्हता, कारण परसातल्या एका आडाशिवाय समाईक असें त्यांचें कांहींच नव्हतें. पण मुसलमानाच्या संसर्गानें दूषित झालेल्या आडावर पाणी भरण्याचेंच शिवलिंगाप्पाने सोडून दिल्यामुळें तंट्याला तेवढेंही कारण राहिलें नव्हतें. तूर्त तरी धर्मांतरजन्य तिरस्कारावाचून शिवलिंगाप्पाच्या मनात शमसुद्दीनविषयी दुसरी कसली अढी नव्हती. अर्थात् भावाभावाचा सामान्य व्यवहारापुरता पूर्ण सलोखा असून शिवलिंगाप्पाची मंडळी शमसुद्दीनचा जरी कधी उंबरा चढत नसत, तरी शमसुद्दीन आणि विशेषत: त्याचा मुलगा शिवलिंगाप्पाच्या घरीं वरचेवर जात येत असत.

ज्येष्ठ शुद्ध द्वादशीच्या दिवशी शमसुद्दीन नित्याप्रमाणें आपला प्रातर्विधि उरकून व मुलाला शिवलिंगाप्पाच्या घरीं सोडून दुकानाकडे जाण्यासाठीं घराला कुलूप घालीत होता, इतक्यात एक तरुण मुसलमान सरदार घोडा उडवीत त्याचे घरापुढें आला आणि शमसुद्दीनला पाहून त्यानें आपला घोडा थांबविला. सदर सरदाराचा चेहरा मोठा मोहक व रुबाबदार असून त्याचे वय सुमारें तेवीस चोवीस वर्षांचे दिसत होतें. सरदार घोड्यावरून उतरून खाली आला आणि त्याने शमसुद्दीनला पुढे बोलावलें. हा मुसलमान सरदार खुद्द लालमियाच असून, हंसाशीं आपले लग्न करण्याची पूर्व तयारी जमवून आणावयासाठीं ह्मणून तो जंगमकोट्यास आला होता. त्याच्या सैन्याचा तळ जरी गांवापासून फार दूर नव्हता, तरी मुसलमान सैन्याच्या नेहमींच्या शिस्तीप्रमाणें आपल्या हद्दीतील गावांना आणि विशे-

पत: त्यांतील मुसलमान वस्तीला त्या सैन्यापासून उपद्रव होत नसे. अर्थात् त्या सैन्याच्या शेजाराची इतकीशी दहशतही मुसलमान समाजाला वाटत नसे. लालामियानें शमसुद्दीनला हांक मारतांच शमसुद्दीन धीटपणानें पुढें गेला, व लालामियाला अदबीनें सलाम करून त्यानें त्याचें स्वागत केलें व त्यास आपल्या घरीं चलण्याविषयीं विनंति केली. नंतर ते दोघे शमसुद्दीनच्या घरी गेले. आत गेल्यावर लालामियानें शमसुद्दीनला आपला लग्नाचा विचार कळवून त्याचें घर त्या कामांत उपयोगास देण्याविषयी आणि काजी वकील वगैरे मंडळीची जुळवाजुळव करण्याविषयीं त्यास विनंति केली, आणि त्याबद्दल चांगले इनाम देऊं केले. शमसुद्दीनने ते काम मोठ्या हौसेने पतकरले. दोघांचे बराच वेळ खलबत होऊन असें ठरलें कीं, शमसुद्दीनने लालामियाच्या लग्नाकरिता आपले घर झाडूनपुसून व शृंगारून तयार करावे, आपल्या गावातील मुसलमान जमातीला लग्नाच्या वेळी बोलावून आणावें, जंगमकोठ्यातील बुऱ्हाण काजीला लालामियाच्या छावणीकडे नेऊन त्याची व लालमियाची रुजवात घालून द्यावी, व लग्नाचे पुरोहितत्व त्याच्याकडे सोंपवावें, आणि दोन वकील व एक साक्षीदार पंच इतक्या मंडळीची तरतूद करावी. इतकी सर्व व्यवस्था करण्याची हमी शमसुद्दीनने पतकरल्यावर, तिसऱ्या म्हणजे चतुर्दशीच्या दिवशीं सायंकाळी हंसाला मुसलमानी धर्माची दीक्षा देणे आणि तिचें लालामियाशीं लग्न लावणे या दोनी गोष्टी एकदमच करावयाच्या ठरवून, लालामिया आपल्या छावणीकडे परत गेला आणि शमसुद्दीन आपल्या उद्योगास लागला. लालामियानें त्याला देऊं केलेलें बक्षीसच इतके मोठे होते कीं, ते मिळविण्यासाठीं शमसुद्दीन इकडची सृष्टि इकडे करावयास तयार झाला असता !

त्रयोदशीच्या दिवशीं पहाटेच्या वेळीं शमसुद्दीन आणि शिवलिंगाप्पा आपापल्या घरी उठून आपल्या नित्यकृत्यास लागतात न लागतात तोंच दोन तरुण मुसलमान सरदार त्यांचे घरापुढे आले. दोघांचीही वयें वीस बावीसच्या सुमारा[illegible] दिसत होतीं. दोघांचेही बांधे ठेंगणेठुमके जनानी थाटाचे दिसत असून दोघेही रूपानें खुपसूरत होते. दोघांनीही आपले फेटे इतके भरपूर बांधले होते कीं, लोकांना आपले चेहरे स्पष्ट दिसू नयेत असाच त्यांचा उद्देश असावा, असें कोणीही अनुमान केलें असतें. घरासमोर येताच त्यांच्या पैकीं एक सरदार शिवलिंगाप्पाच्या घरी शिरला व दुसरा शमसुद्दीनच्या घरात गेला. शमसुद्दीन उठून आपल्या गृहकृत्यास लागलाच होता. त्यानें त्या तरुण सरदारास पाहून त्याचें स्वागत केलें व त्याचे नावगांव विचारलें. सरदारने त्याला जी माहिती सांगितली तिजवरून असे दिसले कीं, त्याचें नांव दिलदारखान असें होते, तो हैदराच्या लष्करांत नोकरीस होता,

हैदरानें त्यास कांहीं गुप्त कामगिरीवर पाठविलें होतें, ती करून तो श्रीरंगपट्टणाकडे निघाला होता, आणि रात्रभर वाट चालल्यामुळें थकून घटकाभर विश्रांति घेण्यासाठीं तो एखाद्या मुसलमानाचें मकाण हुडकीत शमसुद्दीनचे घरीं आला होता. त्या सरदाराचा एकंदर रुबाब, त्याची बोलण्याचालण्याची ऐट, त्याचा विनयशील स्वभाव आणि त्याच्या जनानी आवाजातला आकर्षकपणा या सर्वांचा एकत्रित परिणाम शमसुद्दीनच्या मनावर इतका झाला कीं, त्याने त्या सरदाराला एक घटकाभरच काय, पण एक आठवडाभर राहण्याचा आग्रह केला. तो म्हणाला, "दिलदारखासाहेब, आपण नावाप्रमाणे खरोखरीच दिलदार आहात. आपल्या सारख्यांच्या पायाची धूळ आज माझ्या घरीं लागली, हे मी माझे मोठें भाग्य समजतो. उद्या माझ्या घरीं एक लग्नसमारंभ व्हावयाचा असून त्याची तयारी चालू आहे. तरी माझी आपणास अशी विनति आहे कीं, आपण निदान दोन दिवस तरी येथे रहावें, वधूच्या तर्फेचे कोणी मनुष्य नसल्यामुळे लग्नात तिच्या पक्षाकडील वकीलाचें काम करावें आणि लग्नसमारंभ साजरा करून परवाचे दिवशी श्रीरंगपट्टणास जावे." दिलदारखानाला शमसुद्दीनची विनंति मोठी अवघड आणि अशुद्ध झाली असावीसें दिसले. "आपणास तर निकडीचे काम आहे आणि तुह्मी तर असे म्हणता," "हैदरखासाहेबाचा कडक स्वभाव महशूरच आहे, तेव्हा हे कसे जमणार?" इत्यादि पुष्कळच कुरकूर करण्यास त्याने प्रारंभ केला. पण शमसुद्दीनचा फारच आग्रह पडल्यामुळे अखेर त्याचा नाइलाज होऊन त्याने दोन दिवस मुक्काम करण्याचे व दुसरे दिवशींचे लग्नात वधूपक्षातर्फे वकिली करण्याचेंही कबूल केलें.

इकडे हा प्रकार चालला असता, शिवलिंगाप्पाचे घरात दुसरा मुसलमान सरदार गेला होता, त्याचे शिवलिंगाप्पाशीं बोलणे चाललें होतें. ते काय होते, हे तूर्त आमच्याने वाचकास सांगवत नाहीं. इतके मात्र आह्मी सांगू शकतो कीं, त्या सरदाराचें नाव गुलजारखान असे होते, तोही श्रीरंगपट्टणाकडेच कामगिरीवर असून प्रवासाची दगदग झाल्यामुळे विश्रांति घेण्यासाठीं शिवलिंगाप्पाचे घरी आला होता, आणि शिवलिंगाप्पा मनापासून मुसलमानाच्या संसर्गाचा तिटकारा करीत असूनही त्याने गुलजारखानाची हकीगत ऐकल्यावर त्याला दोन दिवस आपल्या घरीं ठेऊन घेण्याचें कबूल केलें! इतकेच नव्हे, तर त्याला गुलजारखानाविषयीं इतका प्रेमाचा पान्हा फुटला कीं, त्याने आपली बायको कलव्वा हिला हाक मारून गुलजारखानाची चांगली बरदास्त ठेवण्याविषयीं तिला बजावले. गुलजारखानानेही आपल्या गोड व मोहक वाणीने प्रहर दोन प्रहरात शिवलिंगाप्पाचे घरी इतका आपलेपणा उत्पन्न केला कीं, दुपारीं दुकान बंद करून शिवलिंगाप्पा

जेव्हां जेवणासाठीं आपले घराकडे परत आला, तेव्हां आपली बायको स्वयंपाकघ-रांत स्वयंपाक करीत असतां गुलजारखान माजघरांत बसून तिच्याशीं गप्पागोष्टी करीत आहे, आणि आपल्या छोट्या मुलीला मांडीवर घेऊन खेळवीत आहे, असें त्यास दिसून आलें! पूर्वी परशुरामभाऊंच्या पथकांत गुलजारखान आणि दिलदार-खान नांवाच्या दोन मुसलमानांनीं नोकरी धरल्याचें वाचकांना आठवत असेलच, तेच हे दोघे मुसलमान सरदार होते. मग ते जंगमकोट्याला कां आले होते, त्यांनीं आपण हैदराच्या पदरीं आहों असें खोटेंच कां सांगितले, आणि त्यांतल्या एकानें शिवलिंगाप्पाच्या घराचा व दुसऱ्यानें शमसुद्दीनच्या घराचा आश्रय कां केला, समजत नाहीं!

दुसऱ्या म्हणजे चतुर्दशीच्या दिवशी शमसुद्दीनच्या घरीं लग्नाची दरोबस्त तयारी झाली. शमसुद्दीनच्या सोप्यावर प्रशस्त बैठक टाकण्यांत येऊन सोपा चांगला शृंगारण्यांत आला होता. अंगणांत मंडप उभारण्यात आला असून त्यांतही एक बैठक टाकण्यांत आली होती. बैठकीवर मऊ रुजामे अंथरले असून त्यांवर जागजागीं लोडगालिचे ठेवण्यात आले होते. दिव्यांची रोषनाईही भरपूर केली असून मशाली पेटविण्यांत आल्या हाल्या. अस्तमानाच्या सुमारास निमंत्रित बायकापुरुषांनीं शमसुद्दीनचें घर फुलून निघाले. अंगणात शेपन्नास पुरुषमंडळी बसली असून त्यांनीं लग्नसमारंभास साजेसे उंची पोषाख घातले होते. हैदरखा-नांचे सरदार लालामिया यांचें लग्न, आणि तेही एका हिंदु मुलीशीं होणार हें कळलें असल्यामुळें गांवांतील बहुतेक प्रतिष्ठित मुसलमान समारंभास मोठ्या हौसेनें आले होते. अंगणाच्या मध्यभागीं एका लोडाला टेकून लालामिया बसला होता. तो वयानें तरुण आणि चेहऱ्याने बांधेसूद असल्यामुळें आजच्या लग्नवेषात फारच खुलून दिसत होता. लालामियाचे शेजारी त्याच्या लष्करातले एक दोन अधिकारी बसले होते. खरे म्हटले असतां लालामियासारख्या सेनापतीच्या लग्नाला त्याचें सारेंच लष्कर लोटावयाचें, पण ते आज चिकबाळापुरावर हल्ला करण्यास गेलें अस-ल्यामुळें, केवळ सैन्यांतलीं अशी एक दोन माणसेच आजच्या समारंभास हजर राहूं शकलीं. चिकबाळापूर आज आपल्या हातीं येणार अशी लालामियाची पुरती खात्री होती, आणि तें हातीं आलें कीं आपल्या नूतन-परिणीत वधूसह उद्या त्यात थाटानें प्रवेश करावयाचा असा बेत मनांत योजूनच त्यानें आजचा लग्नसमारंभ घडवून आणण्याचा विचार केला होता. लालामियाच्या समोरच्या लोडाला टेकून बुऱ्हाण काजी बसला होता आणि त्याचे भोंवती गांवांतील निवडक मुसलमान शिष्ट बसले होते. मुसलमानी रिवाजाप्रमाणें सोप्याच्या आतल्या बाजूला माजघरांत

गोषांतील बायका असावयाच्या हें माहीत असल्यामुळेंच कीं काय, सोप्यावर कोणीही पुरुष दिसत नव्हता. त्यामुळें तेथली बैठक रिकामीच पडली होती. मुसलमानी लग्नपद्धतींत वधूवरांच्या तर्फे दोन वकील आणि एक साक्षीदार असे किमानपक्ष तीन तिऱ्हाईत लागतात, त्यांपैकीं वधूपक्षाची वकिली दिलदारखानाकडे सोंपाविण्यांत आली होती, वरपक्षातर्फेची वकिली स्वतः शमसुद्दीननें पतकरली होती, आणि गांवांतील एक प्रतिष्ठित मुसलमान साक्षीदार बनविण्यांत आला होता. शमसुद्दीननें वधूपक्षाकडील वकीलाची व साक्षीदाराची लालामियाला आणि काजीला ओळख करून दिली, आणि उद्दिष्ट कार्यास सुरवात झाली.

वधू परधर्मीय असल्यामुळें प्रथम तिला इस्लामी धर्माची दीक्षा देण्याचें काम काजीनें सुरू केलें. त्यानें लालामियाला वधूचें नांव गाव विचारिलें आणि लालामिया जरूर ती माहिती काजीला पुरवूं लागला. चला वाचकहो, तोंपर्यंत आपण शमसुद्दीनच्या माजघरात जाऊन वधूची काय हालहवाल आहे ती पाहूं. ती पहा हंसा एका भिंतीशीं टेकून बसली असून गांवांतील कांहीं प्रतिष्ठित बायका आणि महबूब तिजभोंवती कोंडाळे करून बसल्या आहेत. त्या साऱ्या जणींनीं बुरखे घेतले असून हंसाचें मनोहर मुख उघडें असल्यामुळें तें ढगांनी वेढलेल्या शरत्कालीन चंद्रासारखें शोभत आहे. हंसा आपणास कृश झालेली आणि खिन्न असलेली दिसेल अशी वाचकाची अटकळ असल्यास ती मात्र चुकणार आहे. कारण ती पहा हंसा हसतमुख, निदान प्रसन्नमुख दिसत असून महबूबशीं व इतर स्त्रियाशीं आनंदाने गोष्टी करते आहे. कृश तर ती निःसंशय झाली आहे, पण आपणाव येणाऱ्या प्रसंगाची तिला स्पष्ट जाणीव झाली असूनही तिच्या चेहऱ्यावर लवमात्र दुःखाची किंवा भीतीची छटा दिसूं नये हे आश्चर्य नव्हे का? लालामियाच्या बंदिवासात आणि महबूबच्या सहवासात महिना दोन महिने काढल्यानें तिची बुद्धि फिरली असेल व लालामियाच्या वैभवास भाळून ती त्याच्याशीं लग्न करण्यास तयार झाली असेल हे काहीं संभवत नाहीं. तर मग तिच्या समाधानी वृत्तीचा उलगडा कसा करावयाचा? तूर्त तरी हे कोडें आहे, आणि काही वेळ तें तसेंच राहणार आहे.

हंसाच्या इतर स्त्रियांबरोबर गप्पागोष्टी चालल्या आहेत इतक्यात दिलदारखा माजघराच्या दाराशीं आला, आणि दारांतूनच तिला "तुमची मुसलमान होण्याची इच्छा आहे काय, आणि असल्यास तुमचें नांव काय ठेवावयाचें?" असें विचारू लागला. खरें म्हटलें असतां हा केवळ देखावा होता. हंसानें नाहीं म्हटलें असतं तरी देखील लालामिया आणि काजी यांनीं तिची इच्छा आहे असें गृहीत धरू

तिला जबरीनें मुसलमानी धर्माची दीक्षा दिलीच असती. पण तितका प्रसंग आलाच नाहीं. हंसानें "आपली मुसलमान होण्याची इच्छा आहे आणि आपलें नांव "मुमताज" ठेवावें" असें महबूबमार्फत दिलदारखानास कळविलें, आणि दिलदारखान तसें काजीला कळविण्यासाठीं निघून गेला. पण तो जातांच हंसानें महबूबला निक्षून सांगितले की "मी आता मुसलमान होणार असल्यामुळें मला आगोदर बुरखा घालावयास द्या. उगाच हवें त्यानें दाराच्या तोंडाशी येऊन माझ्या तोंडाकडे पाहिलेलें मला खपावयाचे नाही." महबूबला हंसाच्या बोलण्याची यथार्थता पटली, पण आयत्या वेळी बुरखा कोठून आणावयाचा, याची तिला पंचाईत पडली. हंसाकरिता मुसलमानी पेहराव तयार करून ठेवण्याची तरतूद करण्याचें विस्मरणाने राहून गेले होतें. "तूं अजून लहानच आहेस, बुरखा नसला तरी काही चिंता नाहीं" असे ह्मणून भागवाभागवी करण्याचा महबूबने प्रयत्न केला, पण हंसा ते काहीं न ऐकता अडूनच बसली. जाता जाता ती गोष्ट शमसुद्दीनच्या कानावर गेली. त्यानें येऊन हंसाची समजूत काढण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा काहीं उपयोग झाला नाहीं. हंसा आपला हट्ट मुळीच सोडीना. अखेर शमसुद्दीननें आपल्या बायकोचा ठेवणींतला एक पेहराव होता, तो काढून हंसासाठीं दिला व महबूबनें एका खोलींत नेऊन तो तिला पेहरविला तेव्हा हंसाची समजूत झाली. तो पेहेराव हंसाला खूपच मोठा होत असल्यामुळे तेरा चौदा वर्षांची हंसा त्या पेहेरावात वीस बावीस वर्षांची प्रौढ बायको दिसू लागली!

हंसाचे मुसलमानी चालीरीतीविषयीं इतकें अगत्य पाहून महबूबला फार समाधान वाटलें. इतर स्त्रियांनींही "तूं आता मोठी मरदारीण होणार," इत्यादि समयोचित शब्दांनी तिची थट्टा मस्करी चालू केली. एकीनें तर "बाहेर आता इस्लामी दीक्षेचा कलमा सुरू होणार आहे, तो आटोपला की, तुझे लालामिया साहेबांशीं लगेच लग्न लावताहेत; अशी अधीर होऊ नको," असेंही बोलून दाखविण्यास कमी केलें नाहीं. हंसाने आता बुरखा घेतला असल्यामुळे हे शब्द ऐकून तिच्या चर्येवर काय परिणाम झाला हे आपणास कळावयास मार्ग नाहीं, तथापि इतकें मात्र खरें की, ती अंगावर शहारे आल्यासारखें करून ताडकन् उठून उभी राहिली आणि महबूबला उद्देशून "मला फार तहान लागली आहे, थोडें पाणी प्यावयास पाहिजे" असे ह्मणाली. महबूब शमसुद्दीनच्या घरांतून पाणी आणण्यासाठी उठली, पण हंसानें तिचा आशय ओळखून "आजचा दिवस तरी मला हिंदूच्याच घरचें पाणी पाहिजे, मुसलमानाच्या घरचे नको" असें तिला बजावलें. महबूबनें "आतांपर्यंत तूं हिंदु होतीस ह्मणून

आह्मी तुला हिंदूंच्याच हातचें अन्नपाणी देत होतों, पण आतां तूं मुसलमान होणार, आता मुसलमानाच्या घरचें पाणी पिण्यास हरकत नाही" वगैरे सागून तिची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. पण हंसा काही केल्या ऐकेना. ती ह्मणूं लागली की "मी आज आपली जातगोत सोडून मुसलमान होणार, तर आपल्या धर्माची शेवटची आठवण ह्मणून मला या वेळी तुह्मी हिंदूच्या हातचें पाणी द्या, नाही ह्मणूं नका." तिने अशा प्रकारे गयावया सुरू केल्यावर महबूबचा नाइलाज झाला व तिने तिचे ह्मणणे कबूल केलं. पण इतक्या अपरात्री हिंदूच्या घरचे पाणी कोठे मिळणार असे मनात येऊन महबूब फिकीरीत पडली. तिने जमलेल्या मुसलमान स्त्रियापाशी जवळपास एखादे हिंदूचे घर आहे का, ह्मणून चौकशी केली, पण त्यांना नाही ह्मणून सागितलें इतक्यात भाजघरच्या दाराशी घुटमळत असलेल्या दिलदारखानाने स्त्रियामधली ही प्रश्नोत्तरे ऐकून "काय पाहिजे?" असे विचारले. महबूबने त्याला उपस्थित झालेली अडचण सागितली व जवळ कोठे हिंदूच्या हातचे पाणी मिळाले तर पाहण्यास सागितले. त्याबरोबर दिलदारखान तिला ह्मणाला, "बाईसाहेब, हिंदूच्या पाण्याला हो काय तोटा? हे पलीकडचे घरच एका लिंगाईत काफिराचे आहे. आपण हसाबाईना घेऊन परसदाराशी चला आणि पलीकडच्या घराची मालकीण कळव्वाबाई याना हाक मारून त्याच्याकडून पाणी मागून घ्या. त्या अजून जाग्याच असतील."

दिलदारखानाचा सल्ला महबूबला पसत पडला. ती तशीच उठली आणि शेजारच्या कोनाड्यातील एक दिवली उचलून व हंसाला बरोबर घेऊन माजघरातून परसात गेली. शमसुद्दीनच्या घराचे परसू बरेच मोठे होते. त्याच्या व शिवलिंगाप्पाच्या घराला एकच परसू होते व त्याच्या मध्यावर एक तीन हात उचीची पडदी घालून त्याचे बरोबर दोन भाग केले होते. महबूब हसाला घेऊन परसात येते तो शिवलिंगाप्पाच्या घरची मंडळी जागीच असून मागल्या पडवीत गप्पागोष्टी करीत आहेत असे तिला दिसून आले. महबूबने कळवाला हाक मारताच ती उठून पडदीपाशी आली. महबूबने हसाला तहान लागली असल्याचे सागून तिला थोडे पाणी आणून देण्याविषयी कळवास सुचविले. कळवाने तिची विनति मोठ्या आनदाने मान्य केली व घरात जाऊन ती एक ताब्याभर स्वच्छ पाणी घेऊन आली, व पडदीवरून हात उच करून तिने तो ताब्या हंसाचे हाती दिला. हंसा खाली बसून थोडें पाणी प्याली व नंतर तिने उठून तो ताब्या कळवाचे हाती परत दिला. कळवा ताब्या घेऊन परत गेली आणि महबूब व हंसा घरात जाण्या-

साठीं परत फिरल्या. या वेळीं आकाश पूर्वीपेक्षांही आभ्राच्छादित झालें असून परसांत दाट काळोख पडला होता, आणि त्याच्या आवारांत रचून ठेवलेले शेणींचे, सडांचे आणि लाकडांचे ढीग काळ्याकुट्ट भुतांसारखे भयंकर दिसत होते, आणि त्यांच्या आडून कांहीं तरी खसपसल्यासारखा आवाज ऐकूं येत होता. त्यांतच वाऱ्याची एक झुळूक येऊन महबूच्या हातांतील दिवली गेली व एकदम गडद अंधार पडला. महबूबला आतां परसांत धीर निघेनासा होऊन ती लगबगीनें घरांत शिरली. हंसाला बरोबर न्यावयाची आहे याचें देखील भान तिला राहिलें नाहीं. दारांतून आंत गेल्यावर तिला हंसाची आठवण झाली व मागें वळून ती हंसाला हांका मारूं लागली. इतक्यांत हंसाही आंत आली, आणि त्या दोघी जणी माज-घरांत जाऊन आपल्या जाग्यावर बसल्या.

---

## प्रकरण २६ वें.

### वधूंची अदलाबदल. [ज्ये. शु. १४-१६९२.

या वेळीं सुमारें आठ घटका रात्र झाली असून थंड वेळ होती. आकाशात आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ चालला होता. मेघांनी चंद्राचे डोळे बांधून टाकले होते व ते इतस्ततः पळत होते. तो एखाद्या वाड मुलाप्रमाणें आपल्या डोळ्यावरचें आच्छादन हळूंच दूर करून पाहण्याचा प्रयत्न करी, पण ती लबाडी मेघाच्या लक्ष्यांत येऊन ते त्याचे डोळे पुन्हा बांधीत. असा प्रकार बराच वेळ चालला होता. वारा इतका गार वाहूं लागला होता कीं, लग्नघरातील मंडळींच्या अंगात चांगली हुडहुडी भरली. मधून मधून पावसाचे बारीक तुषार यावे, लगेच थांबावे, क्षणभरांत वाऱ्याची झोंबरी झुळक सुटावी, मध्येच आग्नेयीकडील वीज चमकावी, आणि केव्हा केव्हां मेघाचा गंभीर गडगडाट व्हावा, अशी परिस्थिति पुष्कळ वेळ राहिली होती. त्यामुळें ही वळवाच्या पावसाची प्रस्तावना आहे कीं झडीच्या बरसातीचा उपोद्‌घात आहे, याचा अंदाज लागेनासा होऊन, वातावरणाच्या या अनिश्चित स्थितीपेक्षां पावसाला तरी एकदा झपाट्यानें प्रारंभ व्हावा किंवा चोहों-कडे निरभ्र होऊन आकाश तरी मोकळें व्हावें असें प्रत्येकाला वाटूं लागलें. शम-सुद्दीननें आपल्या अंगणात मंडप घातला होता, आणि आपल्या मतें तो मजबूत रीतीनें आच्छादिलाही होता, तरी त्या आच्छादनांतून जागजागीं इतके भोकसे

राहिले होते कीं, त्यांतून पावसाच्या धारांना तर राहोच, पण वाऱ्याच्या झुळकीला, गारांना, किंवा प्रसंगोपात् वाऱ्यानें उडून आलेल्या कौलांना देखील मज्जाव झाला नसता!

तथापि आजच्या समारंभाला गगनमंडपांतलें वातावरण जरी एकंदरींत विरोधी असलें तरी शमसुद्दीनच्या मंडपांतलें वातावरण अनुकूल किंबहुना उत्तेजकच होतें, त्यामुळें प्रेक्षकांचा उत्साह चांगला टिकून राहिला होता. या वेळीं रात्रीचा अंमल जाणवूं लागल्यामुळें मंडपांत जमलेलीं लहान मुलें जरी जागजागीं निद्रावश होऊन आडवीं झालीं होतीं, तरी मोठ्या माणसांच्या जिज्ञासेला आणि कौतुकाला चलन देण्याजोगा भाग आजच्या समारंभात पुष्कळच असल्यामुळें त्यांची एकतानता भंग पावली नव्हती. एक तर आजचें लग्न विधर्मी जोडप्यांत व्हावयाचें होतें, त्यातूनही एका उच्च मराठे घराण्यांतली वधू बाटून मुसलमान व्हावयाची होती, आणि मग ती मुसलमानाच्या जनानखान्यांत यावयाची होती, ही कल्पनाच भावनाशील मुसलमानाच्या मनाला विशेष खुलविणारी होती, आणि तिच्या चिंतनाने होणारा आनंद प्रत्येकाच्या चर्येवर स्पष्ट उमटलेला दिसत होता. त्यांतही मनुष्य स्वभावाची अशी मौज कीं, ज्यांना बाटून दोन चार पिढ्या झाल्या होत्या, अशा मुसलमानापेक्षा नुकत्याच बाटलेल्या मुसलमानांना आजच्या समारंभाबद्दल विशेष आदर व अगत्य वाटत होतें, आणि ते त्याच्या उत्सुक व हसऱ्या मुद्रेवरून, सोन्माद दृष्टिक्षेपावरून, चोरट्या कुजबुजण्यावरून आणि उल्लसित आविर्भावांवरून व्यक्त होत होतें.

हसा मुसलमानी पेहरावाकरिता अडून बसली आहे, ही बातमी अंगणांतील मंडपात येऊन काजीच्या कानापर्यंत गेली होती, आणि तोही त्यासंबंधीं व्यवस्था व्हावी म्हणून थोडा वेळ थांबला होता. इतक्यात शमसुद्दीननें येऊन तिच्या पेहेरावाची तजवीज केली असल्याचें त्यास सांगितलें. आपल्या भावी वधूची मनःप्रवृत्ति पाहून लालामियाला आश्चर्य वाटलें व आनंदही झाला. महबूबच्या शिकवणीचा हंसाच्या मनावर इष्ट परिणाम होऊन मुसलमानी धर्माविषयीं व रिवाजांविषयीं तिला आवड उत्पन्न झाली असावी, असा त्यानें तर्क केला. थोड्याच वेळांत दिलदारखानही आला, आणि वधूची मुसलमान होण्याची तयारी आहे, आणि तिनें आपलें नाव मुमताज ठेवावें असें सांगितलें आहे, असें त्यानें काजीस कळविलें. 'मुमताज' हें नांव ऐकतांच लालामिया एकदम कावराबावरा झाला आणि दिलदारखानाच्या तोंडाकडे टकमक पाहूं लागला! त्याला दिलदारखानाचा क्षणमात्र संशय देखील आला असावासें दिसलें, पण दिलदारखानाचा तो उमदा आणि

निष्कपट चेहरा पाहून त्याचा संशय दूर झाला. काजीनें वधूला मुसलमानी धर्माची दीक्षा देण्यास अवश्य तो कलम पढण्यास सुरवात केली. कलमा पढत असतां त्यानें आपली दृष्टि अर्धोन्मीलित केली होती व गंभीर आवाज लाविला होता. मधून मधून तो विसावा घेण्यासाठीं ह्मणूनच कीं काय खाकरून आपला आवाज साफ करीत होता व दाढीवरूनही हात फिरवीत होता. कलमा पढून झाल्यावर या नवीन मुसलमान झालेल्या वधूला मुमताज या नांवानें संबोधून काजीनें अल्लाची प्रार्थना केली व त्याच्या नांवानें तिला शुभ आशीर्वाद दिला. हंसाचें धर्मांतर झाल्याची द्वाही फिरविण्यांत आली, आणि दिलदारखान तिला तसें कळविण्याकरितां सोप्यावर गेला.

या प्रमाणें हंसाच्या धर्मांतराची गौण बाब आटोपल्यानंतर, काजीनें तिच्या व लालामियाच्या लग्नाच्या मुख्य बाबीचा उपक्रम केला. वधूपक्षीय वकील दिलदारखान, शाहीद साक्षीदार शमसुद्दीन आणि वरपक्षीय वकील स्थानापन्न झालेले पाहून काजीनें लालामियास "मियासाहेब, आपण महार काय ठेवणार?" असा प्रश्न केला. आमच्या वाचकांपैकीं कित्येकांस काजीच्या वरील प्रश्नाचा अर्थ कळला नसण्याचा संभव आहे, ह्मणून त्याचा आह्मी थोडा खुलासा करितों. मुसलमान लोकांत लग्नाच्या वेळीं नवऱ्यानें वधूकरिता एक जामीनगत रकमेच्या रूपानें ठेवावयाची असते. ही जामीनगत काजीजवळच्या लग्ननोंदणीच्या वहींत नोंदली जाते आणि तिचा कायदेशीर हेतु असा असतो कीं, नवऱ्यानें जर पुढें मागें बायकोला काडी मोडून दिली किंवा अन्य कांहीं कारणानें तिला एकटीला निराधार राहण्याचा प्रसंग आला तर ही जामीनगतीची रक्कम तिला तिच्या नवऱ्याकडून किंवा त्याच्या वारसाकडून मिळावी आणि तिची उपासमार होण्याचा प्रसंग येऊं नये. या रकमेस 'महार' अशी संज्ञा आहे, आणि ही महाराची अट लालामियासारख्या पहिल्या प्रतीच्या सरदारापासून शमसुद्दीनसारख्या एखाद्या सामान्य माणसापर्यंत सारखीच बंधनकारक मानली जाते.

काजीचा प्रश्न ऐकून लालामिया भानावर आला. इतका वेळ तो आपणांशीं खुषीनें लग्न करावयास तयार झालेल्या हंसाबरोबर लग्नविधि खलास झाल्याबरोबर आपण प्रथम काय बोलावयाचें, तिची बरदास्त कशी ठेवावयाची, तिची यत्किंचित् हौस कशी पुरवावयाची, तिला कसल्या वस्त्रभूषणांनी सजवावयाची, इत्यादि मनोराज्य करण्यांत दंग झाला होता. त्या विचारांच्या गुंगींतच काजीचा प्रश्न एकदम त्याच्या कानावर येऊन तो चमकला व भावनेच्या भरांत ह्मणाला, "महार काय ठेवणार? काजीसाहेब आपणास काय सांगूं, माझ्या हंसाकरितां —"

" छे छे, हंसाकरितां नव्हे " काजीसाहेब मध्येंच ह्मणतात, " मुमताजकरितां ह्मणा; हंसाची आतां मुमताज झाली आहे. "

" बरोबर, बिलकूल बरोबर, " दिलदारखान काजीला दुजोरा देत ह्मणाला, " ' मुमताजकरितां ' असेंच ह्मटलें पाहिजे. मियासाहेब, आपला हेतु जरि तोच असला, तरी अल्लासमोर घ्यावयाच्या शपथेंतली भाषा शद्वशः कायदेशीरच राखली पाहिजे. "

" बरें तर, माझ्या मुमताजकरिता मी माझ्या सर्वस्वाचा महार ठेवावयास तयार आहे. माझी सारी दौलत, घरदार, कितावत, फार काय पण माझे पंचप्राण सुद्धां हंसा—मुमताजकरितां मी महार ठेवतों, " लालामिया काजीकडे पाहत ह्मणाला.

" तोबा तोबा, असा मोघम महार कसा चालेल सरदारसाहेब ? " काजी दाढीवरून हात फिरवीत ह्मणाला, ' आपण महाराची कांहीं तरी रक्कम ही ठेवलीच पाहिजे, निदान बोलून दाखविली पाहिजे. आपली वधू जरी आपल्या सर्व दौलतीची मालकीण होणार असली, तरी अल्लाच्या दरबारांत जी जामीनगत भरावयाची ती रकमेंतच भरली पाहिजे. '

" काजीसाहेब " लालामिया आवेशानें म्हणाला, " माझ्या प्रीतीचें मोल मी काय ह्मणून आणि किती म्हणून करूं ? तथापि तुमचा आग्रहच आहे तर माझ्या मुमताजकरिता मी सव्वा पांच लक्षाचा महार ठेवतो असें नमूद करा. "

" हा, आता कसें ठीक बोललात ? " काजीसाहेब ह्मणाले, ' ' अहो कायदा तो कायदा, तो सर्वांनीच पाळला पाहिजे. " इतकें बोलून काजीसाहेब दिलदारखानाकडे वळून ह्मणाले, " वकीलसाहेब, लालामियासाहेबानी मुमताजबाईकरिता सव्वा पाच लक्षाचा महार ठेवल्याचे तुह्मी ऐकलेंतच, तो मुमताजबाईंना कबूल आहे का, विचारून या बरें. "

दिलदारखान मुमताजची संमति विचारण्यास गेला. पण वाचकहो, इतका वेळ प्रफुल्लित असलेला लालामियाचा चेहरा असा निस्तेज व फटफटीत का बरें दिसूं लागला ? मघापासून मुमताज हें नाव त्याच्या कानावर दोन चार वेळ आल्यामळे त्याची एखादी जुनी पापस्मृति तर जागृत झाली नसेलना ? होय, वाचकहो, तेंच अनुमान बरोबर आहे. मुमताज नांवाच्या रूपवान् मुलीला त्यानें पूर्वी लग्नाचीं अभिवचनें देऊन आणि आपल्या ऐश्वर्याविषयीं गोड गोड थापा मारून भ्रष्ट केली आणि मग तिचा निष्ठुरपणानें त्याग केला होता, आणि याच गोष्टीची आज त्याला आठवण होऊन त्याच्या हृदयाला पश्चात्तापाच्या वेदना होत होत्या वाचकहो, खरं ह्मटलें असता अशा प्रकारचीं दुष्कृत्यें लालामियानें आजपर्यंत

अनेक केलीं होतीं. त्यानें कैक हिंदु आणि मुसलमान स्त्रियांना भ्रष्ट केलें होतें. पण मुमताजला वश करितांना त्यानें तिला इतक्या आणाशपथा दिल्या होत्या, इतकीं गोड गोड अभिवचनें दिलीं होतीं, कीं त्यांची आठवण होताच त्याच्या अत्यंत पापी हृदयाला देखील धडकी भरली आणि तें अनुतापानें तळमळूं लागलें! पण तो त्याचा अनुताप फार वेळ टिकला नाहीं. मुमताजच्या करुण मूर्तीपुढें हसाची रमणीय मूर्ति येऊन उभी राहिलेली त्याला दिसूं लागली, आणि मुमताजची मूर्ति अस्पष्ट होत होत अखेर मुळींच दिसेनाशी झाली!

थोड्याच वेळांत दिलदारखान परत आला, आणि सव्वापांच लक्षांचा महार आपणास मान्य असल्याबद्दल वधूची संमती त्यानें काजीकडे गुदरली. नंतर वधूवरांची परस्परांशीं लग्न करण्याबद्दल मान्यता घेण्याचें विधान सुरूं झालें. वधूतर्फे दिलदारखानानें " लालामिया साहेबांशीं सव्वा पांच लक्षांच्या महाराच्या अटीवर लग्न करण्यास मुमताजची संमति आहे " अशी हमी भरली. वरपक्षाच्या वकीलानें " लालामियासाहेब सव्वा पांच लक्षांचा महार ठेऊन मुमताजशीं लग्न करण्यास तयार आहेत " अशी कबुली दिली, आणि शमसुद्दीननें तिऱ्हाईत साक्षीदार या नात्यानें आपल्या देखत हा व्यवहार होत असल्याबद्दल आपली साक्ष काजीसाहेबाकडे सुपूर्त केली. काजीसाहेबानी आपली नोंदवही काढून त्यात वधूवराची व साक्षीदारांचीं नावे, महाराची रक्कम, इत्यादि जरूरीच्या नोंदी केल्या, आणि वकील, साक्षीदार आणि इतर महाजन याचे समक्ष आपणावर पडलेली जबाबदारी आपण अल्लाला स्मरून इमानें इतबारें बजावीत असल्याचें जाहीर केले. नंतर त्यानी आपल्या नोंदीवरून वधूवराची व वकील साक्षीदाराची नावे मोठ्याने उच्चारली आणि उपरोक्त वधूवरांचें लग्न आपण लावीत असल्याबद्दलची घोषणा करून लग्नासबंधी कुराणांतील कलमा पढण्यास प्रारंभ केला.

काजीसाहेबाचा कलमा बराच वेळ चालला होता. कलमा पढून झाल्यावर त्यानी अल्लापरवरदिगाराच्या नावानें वधूवराना व जमलेल्या श्रोतृसमुदायाला आशीर्वाद दिला, सर्वांचे एकवार अभीष्टचिंतन केलें आणि समारंभ खलास झाल्याचें जाहीर केलें. नंतर काजीसाहेबांनी दोनी वकील व साक्षीदार यांना मानाचे विडे व प्रसादादाखल वीस वीस खारका दिल्या, आणि इतर मंडळीना वाटण्यासाठी खारकांचें तबक शमसुद्दीनचे हवाली केले. शमसुद्दीनने [illegible] प्रारंभ करून जमलेल्या सर्व मंडळीना प्रत्येकी दहा दहा खारका वाटल्या, आणि मंडळीची पांगापाग होण्यास सुरवात झाली. इतके वेळ मंडपात असलेली गंभीर शांतता नष्ट होऊन चोहोंकडे कलकलाट सुरूं झाला. " अरे यासीन, ऊठ कीं लेका, इथें काय

शौंप घ्यायला आला होतास ?, " " अच्छा मोहद्दीनसाहेब, सलाम, आमची तुमची वाट निराळी आहे, आह्मी पुढें होतों, " " तोबा, काय उशीर झाला हा? बखत्यार, तुला खारका तरी मिळाल्या कां ? " इत्यादि नाना प्रकारचे उद्गार मंडपांतून ऐकूं येऊं लागले. पण थोड्याच वेळांत ते कमी कमी होत जाऊन मंडपांत पुन्हा एकदा शांत स्तब्धता स्थापित झाली. निमंत्रित पुरुष मंडळी निघून गेल्यावर, स्त्रियाही महबूबचा निरोप घेऊन बाहेर पडल्या. अखेर मध्यरात्रीच्या सुमारास सारा मंडप रिकामा होऊन काजीसाहेब, वकीलसाक्षीदार, लालामिया आणि त्याचे दोन सैन्यांतले हस्तक एवढी मंडळी मंडपांत शिल्लक राहिली. ह्या मंडळींचा मागे राहण्यांत ह्मणजे काही विशेष हेतु होता असें नाहीं. पण एखादें मोठें मंगलकृत्य घरात होऊन गेलें ह्मणजे, त्यात विशेष पुढाकार घेणारी मंडळी मागें गप्पा करीत बसतात असा सामान्य नियम आहे, त्याचप्रमाणे हीही मंडळी बसली होती. शिवाय आजच्या कार्याचे अधिदैवत जो लालामिया तो हैदराच्या पदरचा बडा सरदार असल्यामुळें त्याचा विशेष निकट परिचय करून घेण्यास ही संधी टीक आहे असेही या मंडळीस वाटले असावें व त्यांनीं मंडपांत शिळोप्याच्या गप्पा सुरू केल्या असाव्या !

पण लालामियाची मनःस्थिति या वेळी असल्या गप्पात रमण्याजोगी नव्हती. आपणास निवात एकात केव्हा एकदा सापडेल, आणि आपण शमसुद्दीनच्या माजघरात जाऊन हसाला केव्हा एकदा आपल्या बाहुपाशात घेऊं, असे त्याला झालें होते. अर्थात् अगणात गप्पा करीत बसलेल्या मंडळीची खाशी पंगत जसजशी लांब लागली तसतशी त्या मडळीची त्याला अधिकाधिक चीड येऊ लागली, आणि ती त्याच्या चेहऱ्यावर उमटूं लागली. हळूं हळूं त्याने त्याच्या बोलण्यात भाग घेण्याचे बंद केले, अगास आळोखेपिळोखे व जाभया देण्यास प्रारभ केला, " पुष्कळच रात्र झाली " अशा आशयाचे उद्गार काढून पाहिले, पण व्यर्थ ! काजीसाहेब आणि शाहीद साक्षीदार काही केल्या आपल्या गोष्टी बंद करीनात. अखेर लालामियाचा अधीरपणा इतक्या थराला गेला की त्याने सर्व भीड गुंडाळून ठेवली आणि अगणातून उठन तो तडक शमसुद्दीनच्या माजघरात गेला. त्याच्या अपेक्षेप्रमाणे हसा व महबूब याच्यावाचून माजघरात दुसरे कोणी नव्हतें. हंसा आता आपली पत्नी झाली आहे एवढेंच नव्हे तर ती मनापासून आपणास अनुकूल झाली आहे या विश्वासाच्या भरांत तिला आलिंगन देण्याकरितां लालामियाने आपले बाहु पसरले. त्याचा तो महबूबच्या समक्ष चाललेला अतिप्रसंग पाहूनच की काय, त्याची नवपरिणीत वधू चपापली व किंचित् मागें सरली ! पण त्या काम-

काला असला विनय कोठून रुचणार? त्यानें लगट करून तिला आपल्या बाहुपाशांत कवटाळली आणि ती तोंड चुकवीत असतां, जबरीनें तिच्या तोंडावरचा बुरखा दूर केला; तोंच त्याला एकदम विजेच्या झटका बसल्यासारखें होऊन तो आपल्या पत्नीला सोडून दहापांच पावलें मागें सरला! वाचकहो, लालामियानें आपल्या बहुपाशांत कवटाळलेली स्त्री त्याच्या अपेक्षेप्रमाणें सुर्य्योची हंसा नसून त्यानें पूर्वी भ्रष्ट केलेली मुलगी मुमताज होती!!

लालामिया आश्चर्यानें स्तंभित झाला. ही काय नजरबंदी आहे, कीं भुताटकी आहे, कीं दगलबाजी आहे, हेच त्याला समजेना. आश्चर्य, निराशा, आणि संताप यांचें भेसूर मिश्रण त्याच्या पांढऱ्या फटफटीत झालेल्या चेहऱ्यावर चमकूं लागून तो अधिकच भयंकर दिसूं लागला. महबूबला तर ही खास भूतचेष्टाच आहे असें वाटलें आणि ती किंचाळत साऱ्या माजघरभर पळूं लागली! क्षणभरानें लालामिया भानावर आला, मुमताजनें कपट करून आपणाशीं लग्न लावले ही गोष्ट त्याच्या ध्यानांत आली, आणि त्याच्या अंगाचा भडका झाला. तो दात ओठ खात मुमताजला म्हणाला, " दगलबाज लवंडे, तूं कपट करून माझ्याबरोबर लग्न लावलेस, पण लक्ष्यांत ठेव कीं, मी तुला कधींही नादविणार नाहीं. पायात वापरून टाकलेल्या पायपोसाप्रमाणें तुला दूर फेकून देईन!"

इतक्यांत " तो पायपोस आता तुझ्या डोक्यावर चढला आहे, आता तो तुझ्या बापाच्यानेंही दूर फेकवला जाणार नाही " असे कोणी तरी मुसलमानी भाषेंत मोठ्याने उच्चारलेले शब्द लालामियाच्या कानावर आले. ते कोणीकडून आले म्हणून लालामिया जो चपापून पाहतो तो शमसुद्दीनच्या परसाच्या दारानें एक मराठा सरदार आत आला. त्याच्या पाठोपाठ दहावीस मराठे शिपाई आत घुसले, आणि त्या सर्वांनी लालामियास गराडा दिला. त्याच वेळीं रस्त्याकडील दारानेंही तीस चाळीस मराठे शिपाई शमसुद्दीनच्या घरात शिरले, व तडक अंगणात येऊन, नागव्या तरवारी रोखून उभे राहिले. ती भुताप्रमाणें एकदम आलेली मराठ्यांची टोळी पाहताच काजीसाहेब वगैरे मंडळी, " या अल्ला, या खुदा, " करीत उठून उभी राहिली! पण मराठ्यांच्या टोळीपैकीं एकाने त्याना " भिऊं नका, तुम्हाला कांहीं धोका नाहीं " असे अश्वासन दिल्यावर त्या मंडळींना अमळ धीर आला. तरी पण काजीसाहेबाची भीती कांहीं लवकर कमी झाली नाहीं, त्यांची लटलट हलणारी दाढी त्याच्या गात्राचा कंप बराच वेळ चालूं असल्याचें सुचवीत होती!

तोंपर्यंत माजघरांत परशुरामभाऊंनीं – शमसुद्दीनच्या परसाच्या वाटेने आलेले

सरदार परशुरामभाऊ पटवर्धन होते हें वाचकांनीं ओळखलेंच असेल—लाला-मियाची खूपच हजेरी घेतली. ते त्याला ह्मणाले, "लालामिया, तूं इतका नीच व दगलबाज मनुष्य आहेस कीं, तुला येथल्या येथें कंठस्नान घालणेंच रास्त आहे. पण या माझ्या बहिणीखातर मी तुला जीवदान देत आहे. तिची योग्यता इतकी मोठी आहे की तूं तिला आपल्या गळ्यांतल्या ताइताप्रमाणेंच वागविली पाहिजेस. त्यांतून तुझी इच्छाच नसेल तर माझा आग्रह नाहीं. तू तिजकरिता जी जामीनगत पतकरली असशील ती तिच स्वाधीन कर, ह्मणजे ती उजळ माथ्यानें कोठेंही राहील." असे ह्मणून परशुरामभाऊ लालामियाला व मुमताजला घेऊन अंगणांत आले आणि काजीला उद्देशून ह्मणाले, "काजीसाहेब, आपण लालामियाचें लग्न ज्या मुमताजबरोबर लावलेत ती मुमताज ही. हिच्याशीं त्यानें पूर्वी दगलबाजी केली होती, ह्मणून तिनेही थोडे कपट करून ह्याच्याशी आपले लग्न लावून घेतलें. आपल्यासमक्ष लालामियाला मी फिरून एकदा बजावतों की, ह्याने तिला इच्छा असल्यास नांदवावी, नाहीतर तिचा महार तिचे स्वाधीन करावा. ह्याची फौज आज चिकबाळापुरावर हल्ला करावयास गेली होती तिचा निःपात झाला आहे. याला मी जिवंत सोडावा अशी याची मुळीच पात्रता नाही, पण मुमताजला मी माझी बहीण मानली असल्यामुळे तिच्याकरता याला मी जीवदान देत आहे. ह्या उप्पर ह्याची मर्जी असेल त्याप्रमाणे ह्याने करावे."

लालामियाची पुरती कबखती झाली होती. काय बोलावे हेंच त्याला सुचेना. त्याने पुष्कळ विचार केला. अखेर सव्वा पाच लक्ष रुपये भरण्यापेक्षा मुमताजला नादविणेच एकदरीत हितावह होय असे त्याने ठरविले. काजीनेही त्याला तसाच उपदेश केला. तो ह्मणाला, "साहेब, जिला तुह्मी अल्लाच्या साक्षीने पतकरलीत, तिला नादविणेच रास्त आहे. तोबा तोबा, अल्लाशी बेमानी करून आपण कुठल्या नरकाचें साधन करणार?"

बिचारा लालामिया सर्वथा लाचार झाला. हंसा हातची गेल्यामुळे तो निराश झाला होता, त्यातच काजीनेही भडिमार सुरू केल्यावर तो अगदी गोगलगाय झाला. काजीचे धोरण पाहून शमसुद्दीन व इतर मंडळीही त्याला तसेच सागू लागली. त्यातच आपल्या सैन्याची वाताहात झाल्याचे ऐकून त्याचा धीर अगदीच खचला. त्याने मुकाट्याने मुमताजला नादविण्याचें कबूल केलें. दिलदारखानही आता आपला कृत्रिम पुरुष-वेष टाकून रोशनच्या रूपानें मुमताजपाशीं येऊन उभा राहिला. भाऊंनीं त्या दोघींना लालामियाचे स्वाधीन केलें, त्यांचा चांगला प्रतिपाळ करण्याविषयी लालामियास बजाविलें, आणि शिवलिंगाप्पाच्या घरातून

हंसाला आणवून व तिला आपल्या बरोबर घेऊन त्यांनीं चिकबाळापुरास प्रयाण केलें.

मुमताजच्या तपश्चर्येला योग्य फळ मिळालें. वाचकांनीं आतां ओळखलेंच असेल कीं, दिलदारखान व गुलजारखान हेच रोशन व मुमताज होत, त्यांनीं लालामियाच्या हालचालीवर नजर राखली होती, गवळणींच्या वेषानें त्याच लालामियाच्या छावणींत गेल्या होत्या, हंसामार्फत त्यांना लालामियाचा बेत कळला, त्याचा त्यांनीं योग्य उपयोग करून घेतला, परशुरामभाऊंना त्याची वर्दी दिली, मुमताज शमसुद्दीनच्या परसांत लपून राहिली, हंसानें रोशनच्या शिकवणी बरहुकूम तहान लागल्याची बतावणी केली, महबूबच्या हातचा दिवा गेल्याबरोबर वधूंची अदलाबदल झाली आणि अखेर मुमताजबरोबरच लालामियाचें लग्न लागलें!

———:O:———

## प्रकरण २७ वें.

खरे, ले ६३१ १०१८ ] **आवाहितांचें विसर्जन.** [ भाद्र. शु. १२-१६९२]

मागील प्रकरणांत सांगितलेल्या हकीगतीस जवळ जवळ तीन महिने झाले असून आज भाद्रपद शुद्ध द्वादशी होती. आज सकाळीं आपण जर विजयदुर्गच्या किल्यावर जाऊन पाहूं, तर आपणांस तेथें अनेक मौजा दिसून येणार आहेत. चातुर्मास्यांत खवळलेला समुद्र आतां बराच शांत होत आला असून, किनाऱ्याजवळ त्याची दंगल काहींच दिशेनाशी झाली आहे. कोळ्यांच्या मच्छीमारी आणि मचवे समुद्रांत थोड्या अधिक अंतरापर्यंत जाऊं येऊं लागले आहेत. बंदराच्या धक्क्यावरून किल्यांतलीं व्रात्य पोरें समुद्रांत बेलाशक उड्या घेत आहेत. खुद्द बंदरांत मराठ्यांच्या आरमारा पैकीं बरींच जहाजें नांगरून पडलीं आहेत. सकाळच्या बालसूर्याचे आरक्त किरण समुद्रावर फार दूरपर्यंत पसरलेले असून त्याच्या योगानें समुद्राच्या पृष्ठभागाला आणि किनाऱ्याच्या आसमंताला मनोहर शोभा आली आहे. विजयदुर्गच्या किल्यांतील गोलबुरुजावर मराठेशाहीचा भगवा झेंडा फडकत असून आपल्या पल्लवरूपी हातानें आगंतुक दुष्ट दुर्जनांना तो जणु काय, अदबीनें वागण्याविषयीं बजावीत आहे. गेलीं शेंसव्वाशें वर्षें त्यानें आपली इभ्रत अबाधित संभाळली असून तिचा त्याला मोठा अभिमान वाटत असला पाहिजे असें त्याच्या डौलदार उंच मानेवरून दिसत आहे!

पण बंदरावर आज इतकी गडबड कसली चालली आहे बरें? ते पहा शिवाजीराव सुर्वे बंदराच्या धक्यावर हातात दुर्बीण घेऊन उभे राहिले आहेत आणि तिजमधून समुद्राकडे पाहून हातवारे करीत आहेत! त्याच्या भोंवतीं पाच पन्नास हाशम शिपायाचा ताडा गोळा झाला असून तेहि सगळे संतापलेले दिसत आहेत. शिवाजीरावाची मुद्रा तर कृतांतासारखी खवळलेली दिसत असून त्याच्या डोळ्यातून ठिणग्या पडत आहेत! वाचकहो, शिवाजीरावाच्या संतापाला तशींच अनेक कारणे झाली होती. एक तर त्यांना आपली मुलगी हंसा व मेहुणी येसाबाई यांची रवानगी मोत्याजीराव विचाऱ्याच्या बरोबर मेहुणीच्या गांवी करून दिल्यास पुरते सात महिने होऊन गेले होते, तरी अद्यापि हंसा परत आली नव्हती, आणि तिच्या सुरक्षितपणाबद्दलच काळजी उत्पन्न व्हावी अशी वेळ आली होती. "हंसाला महिना पंधरा दिवस ठेऊन घेऊन चांगली सोबत पाहून लावून देते" असे येसाबाईनें सांगितलें होतें, त्या ऐवजी तिनें तिला आणखी महिना पंधरा दिवस अधिक ठेऊन घेतली असे जरी मानलें, तरी एव्हांना तिनें हंसाला पाठवून द्यावयासच पाहिजे होतें. बरें, प्रस्तुत दक्षिण कर्नाटकांत युद्धाची धामधूम चालू असल्यामुळें चांगली सोबत पाहिल्याशिवाय तिला पाठवून देणें धोक्याचें आहे असे येसाबाईला वाटून तिनें अजून हंसाला ठेऊन घेतली असावी असे मानलें तरी तिजकडून एखादें क्षेमकुशलाचें पत्र किंवा हंसाला नेण्याची तजवीज करा अशा अर्थाचा कांही तरी निरोप तरी यावयास पाहिजे होता, पण तोही आला नाही. इतकेंच नव्हे, तर आदल्या दिवशीं येसाबाईच्या घरचा माणूस त्याच्याकडे एक पत्र घेऊन आला, त्यांत "सौभाग्यवती विजयदुर्गाला जाऊन सहा महिने होऊन गेले, तरी तिची रवानगी चांगली सोबत देऊन करावी आणि बरोबर चिरंजीव हंसाबाईलाही चार दिवस इकडे पाठवावी," असे येसाबाईच्या नवऱ्यानें शिवाजीरावास लिहिलें होतें! हे काय गौडबंगाल आहे हें शिवाजीरावास कळेना. त्याची अक्कल गुंग होऊन गेली. येसाबाईला पाठवून द्या असे तिचा नवरा लिहितो, ह्मणजे येसाबाई व हंसा अजून गांवीं पोंचल्या नाहींत की काय? अजून मोत्याजीरावांनीं त्यांना पोंचविलें नाहीं की काय? कां बरें पोंचविलें नाहीं? आरमाराचें तरें कांहीं बरें वाईट झालें नसेलना? आणि खरोखरीच तसें कांही झालें असेल तर? पुढील कल्पना मनांत येताच शिवाजीरावाच्या काळजांत चर्र झालें! त्याच्या बायकोनें तर कालचा सारा दिवस रडून आकांत केला. तिला धीर देतां देतां व तिची समजूत घालतां घालतां शिवाजीरावांना पुरेवाट झाली.

पण शिवाजीरावांनीं आपल्या कुटुंबाला जरी कितीही धीर दिला, तरी त्यांचा

स्वतःचा धीर मात्र सुटला होता. मुलीच्या अनिश्चित स्थितीमुळें त्यांच्या मनांत नाहीं नाहीं त्या कल्पना येऊं लागल्या व सान्या रात्रभर त्यांना झोप आली नाहीं. त्यांतच त्यांच्या मनस्तापाला आणखी एक कारण झालें. श्रीमंतांनीं अरमाराचा सुभा आनंदराव धुळपांकडून काढून मोत्याजीराव विचारे यांजकडे दिला आणि धुळप मंडळी चिकबाळापुराकडे व मोत्याजीराव आरमार घेऊन दक्षिणेकडे गेले इतकें समजतांच मुंबईकर इंग्रजांची दोन मोठीं जहाजें विजयदुर्गच्या आसपास घिरट्या घालूं लागली होती. ती फाल्गुन महिन्यांत विजयदुर्गच्या किल्ल्याजवळ नांगर टाकून चांगलीं आठ दिवस तळ देऊन राहिली होतीं. शिवाजीरावांना इंग्रज जहाजांच्या अतिप्रसंगाचा फार राग आला होता, पण त्यांचे हातीं स्वतंत्र अधिकार नसल्यामुळें ती गोष्ट पुणें दरबारांत कळवून त्यावेळीं ते स्वस्थ राहिले होते. तोंपर्यंत तीं जहाजें निघूनही गेलीं, व ती गोष्ट तितकीच राहिली. पण " तींच जहाजें फिरून काल संध्याकाळीं येऊन बंदरासमोर एक कोसावर नांगर टाकून राहिली आहेत " अशी बातमी आज सकाळीं उठल्याबरोबर जेव्हां त्यांना एका तांडेलानें दिली, तेव्हां मात्र त्यांच्या अंगाची लाही झाली आणि ते तडक उठून बंदरावर आले. ज्या मराठी आरमाराची अशी दहशत कीं, विजयदुर्गाच्या ऐन हद्दींत तर राहोच, पण त्याच्या आसपास पांचपंचवीस कोसांत देखील फिरक-ण्याची परकीय गलबतांची छाती नव्हती, त्याच मराठी आरमाराच्या ऐन टाण्या-समोर इंग्रजांचीं दोन गलबतें कोस अर्धाकोसाच्या अंतरावर बेगुमान येऊन रहावींत, या गोष्टीचें शिवाजीरावांना मनस्वी शल्य झालें. आधींच मुलीच्या सुरक्षितपणा-विषयीं अनिश्चितता उत्पन्न होण्याजोगी बातमी आल्यामुळें त्यांच्या मनाला अतिशय हुरहूर लागली होती व ते मनांतून मोत्याजीरावावर चडफडतच होते; त्यांतच मोत्याजीरावांच्या गैरवाकबपणामुळें मराठ्यांच्या आरमाराचा दरारा परक्यांना वाटे-नासा होऊं लागल्याचें प्रत्यक्ष प्रमाण त्यांच्या डोळ्यांपुढें उभें राहिल्यामुळें त्यांच्या रागांत अधिकच भर पडली. त्यांनीं मोत्याजीरावाचे अधिकार आपल्या हातांत घेऊन " तुह्मी आतांच्या आतां आपलीं जहाजें आमच्या हद्दींतून काढून घेऊन चला " असा निरोप एका मचव्यांतून इंग्रज कप्तानाकडे धाडला आणि त्याचें काय उत्तर येतें याची ते वाट पहात राहिले. ते रागानें डोळे फाडून इंग्रज जहा-जांवर आपली दुर्बीण रोखताहेत अशा संधीसच आपण तेथें जात आहों, हें आतां वाचकांनीं ओळखलेंच असेल.

शिवाजीरावांचा निरोप इंग्रजांकडे घेऊन गेलेली असामी ह्मणजे उगीच अशा तशापैकीं नसून आनंदराव धुळपांचा पट्टशिष्य विठोजी नाईक बांवकर ही होती.

अर्थात् आपला निरोप तो गुळमुळीत न सांगतां चांगला झडसून खडसून सांगेल, अशी शिवाजीरावाची खात्री होती, आणि म्हणूनच ते अधीर होऊन विठोजी नाइकाच्या परत येण्याची वाट पहात होते. सुमारें दोन घटकांनीं विठोजी नाईक परत आला तो कातावूनच आला, आणि " इंग्रज जहाजें सुखानें जातीलसें दिसत नाही, त्यांना हाकलूनच लावलें पाहिजे किंवा पाडाव तरी करून आणलें पाहिजे ", असा त्यानें आपला अभिप्राय शिवाजीरावास सांगितला. इंग्रज जहाजाचा तो उद्धटपणा पाहून शिवाजीरावाच्या तळव्याची आग मस्तकाला गेली. त्यांनी आपल्या हाशम व तांडेल मंडळींना बंदरांत शिल्लक असलेलीं आपली गलबतें ताबडतोब सज्ज करण्यास सांगितलें. रागाच्या भरांत आपल्या जहाजांवर तोफा नाहींत ह्या गोष्टीचें भान देखील शिवाजीरावांना राहिलें नाहीं! तांडेल मंडळी भराभर जहाजावर चढली, आणि वल्ह्याचा, डोलकाठ्याचा आणि लोखंडी लंगरांचा आवाज ऐकूं येऊं लागला.

शिवाजीराव जहाजें बंदरांतून बाहेर काढावयास हुकूम देणार, इतक्यांत त्यांची नजर सहज दक्षिण दिशेला वळली, तों त्यांना दहावीस जहाजांचा एक काफिला विजयदुर्गच्याच रोखानें येत आहे असें दिसून आलें. ते अमळ निरखून पाहूं लागले तों तीं जहाजें मराठ्यांचींच आहेत असें त्यास वाटलें. थोड्याच वेळांत मोत्याजीरावांनीं आपल्या बरोबर नेलेला जहाजांचा काफिला हाच होय अशी शिवाजीरावाची खात्री झाली. त्याबरोबर आपल्या प्राणाहून प्रिय असलेल्या मुलीचें स्मरण त्यांना होऊन ते मुलीला [illegible] अधीर झाले. त्यांच्या सर्वेंद्रियांना एकच ओढ लागली. इंग्रजी जहाजें आणि त्यांचें पारिपत्य या दोन्ही गोष्टी ते क्षणमात्र विसरून गेले. समोर दिसत असलेलें फत्तेजंग जहाज केव्हां एकदां येऊन धक्यास लागेल आणि त्यांतून हंसाला आपण झेलूनच वर घेऊं असें त्यांना झालें. पण आपली हंसा या जहाजावरून परत आली असेल का ? हो असणारच, ती मावशीच्या गांवीं जर गेली नाहीं, तर या जहाजावरून परत आली असलीच पाहिजे; मोत्याजीरावांनीं उडपीच्या बाजूला लढाईची धामधूम आहे हें ओळखूनच तिला तिकडे पोंचविली नसेल, इत्यादि अनेक विचार क्षणार्धांत त्यांच्या मनांत येउन गेले. जहाजांचा काफिला अगदींच मंद पावलांनीं किनाऱ्याकडे येतो आहे असा शिवाजीरावांना भास झाला, आणि आपणच पाण्यांत उडी टाकून झपाझप हात टाकीत फत्तेजंग जहाजावर जावें असेंही क्षणमात्र त्यांच्या मनांत आलें पण तसें करणें अगदींच पोरकट दिसेल अशा समजुतीनें त्यांनीं ती कल्पना टाकून दिली आणि ते जागच्या जागींच चुळबुळ करीत राहिले. बंदरांत सज्ज झालेल्या जहाजावरील

हशम ताडेलांचें लक्ष्यही मोत्याजीरावांच्या काफिल्याकडे गेलें असावें, कारण त्यांनींही आपली हालचाल बंद ठेवली व ते मोत्याजीरावांचा काफिला बंदरात येण्याची वाट पहात राहिले.

आणखी थोडा वेळ गेला. काफिला बंदराच्या अगदीं जवळ आला. फत्तेजंग जहाज बंदरांत शिरलें - शिवाजीरावांचा जीव खालीवर होऊं लागला, - जहाज येऊन धक्क्याला लागलें - मोत्याजीरावाची व शिवाजीरावाची दृष्टादृष्ट झाली. मोत्याजीराव, बाळाजीपंत घाटे, आणि इतर दुय्यम अधिकारी उतरून धक्क्यावर आले -- त्याच्या पाठोपाठ जहाजावरील पडद्याच्या खोलीतून येसाबाई बाहेर आली - आता हंसाही येईल -- एक क्षण गेला, दुसरा गेला, तिसरा गेला ! अरेरे हे काय ? हंसा कोठें आहे ? ती अजून का येत नाहीं ? शिवाजीरावाच्या पोटात धस्स झालें! क्षणार्धात त्याच्या पोटात नाना प्रकारच्या अनिष्ट कल्पना थैमान घालूं लागल्या. येसाबाई धक्क्यावर आली, आणि शिवाजीरावांनी तिच्याकडे एक सभय दृष्टिक्षेप केला. येसाबाईची आणि त्याची नजरानजर झाली मात्र, येसाबाईनें एक हृदयद्रावक किंकाळी फोडून आक्रोश करण्यास प्रारंभ केला. " अवऽ शिवाजीराव, हंसा समिंदरांत बुडाली वऽ, माजी गुनाची ठेवा सदा सोडूनशान गेली वऽ, आता गंगाला (शिवाजीरावाच्या पत्नीचें नांव गंगाबाई होतें) हे माजं त्वांड कसं वऽ दावूं, जळलं मलाच कसं वऽ तिच्या बाटनीच मरान न्हाई आलं त्ये ? "

शिवाजीरावाच्या डोळ्यापुढें अंधेरी आली. काय, आपली हंसा समुद्रांत बुडून मेली ? इतकीं जहाजें, इतके खलाशी, आणि इतके हशम तिच्या बरोबर असतां हंसा समुद्रात बुडून मेली याचा अर्थ काय ? या अनर्थाला जबाबदार कोण ? शिवाजीरावाचें मस्तक भिरभिरूं लागलें !

" अवऽ शिवाजीराव, " येसाबाईच्या आक्रोशाची दुसरी फेर सुरू झाली, " ह्या मोत्याजीरावांनीच आमचा गळा कापला वऽ, ह्येनीं जातानाच आमा दोघींस्नी जर उडपीला उतरिवलं असतं तर ह्यो परसंग कशापायीं आला असता वऽ, ह्येनीं हट्टान आमाला रामेसराकडं न्येलं कीं वऽ, आन् आता आपलं काळं त्वांड घेऊनशान परत आल्याती वऽ , आग लागली त्येच्या तोंडाला वऽऽऽ "

मोत्याजीराव खालीं मान घालून हा भडिमार मुकाट्यानें सहन करीत होते. तसें करण्यावाचून त्यांना गत्यंतरच नव्हते. ह्या हंसा प्रकरणात त्याच्या हातून इतक्या चुका–चुका कशाच्या, खिळेमोळेच ते-झाल्या होत्या कीं, त्यांना आपल्या तर्फेनें एक शब्द देखील बोलावयास जागा नव्हती. अगोदर मोहिमीवर जाताना त्यांनीं लोकाच्या मुलीला पोंचवावयाची जबाबदारी पतकरावयासच नको होती. बरें त्यातून

पतकरली, तर ती योग्य वेळेला पार तरी पाडावयास पाहिजे होती. तसें आपण कांहींच केले नाहीं, अर्थात् हंसाच्या मृत्यूला आपणच पर्यायानें कारण झालों असे वाटून त्याचे मन त्याना खात होते. आणि त्यातच आपल्या मूर्खपणाचा जाब विचारणारा हंसाचा बाप शिवाजीराव आपल्यापुढें कृतान्तासारखा उभा आहे हे पाहताच मोत्याजीरावाची पुरतीच गाळण उडाली. त्याची बोबडी वळली. शिवाजीरावाचे पाय धरावे, कांही तरी बोलून त्याचे सान्त्वन करावे, असें मोत्याजीरावाच्या मनात अनेकदा आलें, पण त्यांची सारी गात्रेच जड झाली, आणि ते एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणे स्तब्ध उभे राहिले !

शिवाजीरावाच्या मनावर मात्र मोत्याजीरावाच्या या वृत्तीचा अगदींच विपरीत परिणाम झाला. आपल्या मुलीच्या मरणाला कारण होऊनच्या होऊन, वर हा पाजी मनुष्य मुखस्तंभासारखा उभा आहे, दिलगिरीचा एक शब्दही बोलत नाही, असें पाहून शिवाजीरावाच्या तळव्याची आग मस्तकाला गेली! मुलीच्या मरणाच्या कल्पनेनें बेहोष झालेल्या त्याच्या मनाचा विवेक सुटला आणि त्याना कर्तव्याकर्तव्याची शुद्ध राहिली नाही. त्यानी दात ओठ खात वाघासारखी झाप टाकली, आणि, "हरामखोरा, माझ्या पोरीला मारून वर उजळ माथ्यानं माझ्यासमोर दिमाख दाखवाया येतुयास व्हय? थांब, तुला समिंदरातच मरान कसं असतं ते दावतो" असें ह्मणत मोत्याजीरावाची मानगुटी धरली !

आणखी एक क्षण जाता तर मोत्याजीराव समुद्रात पडत होते, आणि त्याना पोहावयास येत नसल्यामुळे ते खरोखरीच समुद्रार्पणच झाले असते. पण इतक्यांत पूर्वेच्या बाजूकडून कसला तरी गलबला, आणि त्यातच 'बाबा' अशी एक अस्पष्ट हाक शिवाजीरावाच्या कानावर आली, आणि मोत्याजीरावाच्या मानेवरचा त्याचा हात आपोआप बाजूस निघाला. ती ओळखीची हाक कानावर आदळतांच त्यांच्या हृदयातील एका तारेने तिला चटकन पडसाद दिला. शिवाजीरावांनी मागे वळून पाहिलें. तो आपली हंसा दुडुदुडु धावत येत असून तिच्या पाठोपाठ आपली बायको, घरातील इतर मंडळी, आनंदराव भुळप, हरबाजीराव भुळप, तरुण जानबा, त्याच्या घरच्या बायका, इत्यादि बऱ्याच मंडळींचा घोळका बंदराकडे येत आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. दोनच उड्यात हंसा धक्क्यावर आली. शिवाजीरावांनी हात पसरले, आणि क्षणार्धात ती त्यांच्या मिठीत जाऊन पडली! पण बापाच्या आणि लेकीच्या निर्व्याज उमाळ्याचा हा आनंद पेसाबाईने फार वेळ टिकू दिला नाहीं. "अगबाई माजी गुनाची बया आली ग ऽ आली," असे ह्मणत तिनें हंसाला शिवाजीरावाच्या मिठीतून ओढून घेतलें आणि आपल्या

पोटाशीं धरलें. तोंपर्यंत हंसाची आई गंगाबाई आणि धुळपांच्या घरच्या बायकाही धक्यावर येऊन पोंचल्या, आणि मग तेथें जो आनंदी आनंद झाला आणि हंसावर "आलिंगन-स्पर्शन-चुंबनांचा" वर्षाव झाला, तो वर्णन करण्यास आम्ही असमर्थ आहों !

मोत्याजीरावाना हायसें वाटलें आणि त्यांनीं समाधानाचा एक निश्वास सोडला. आपण एका कचाटांतून तर शीरसलामत सुटलों अशी त्याची खात्री झाली. पण दुसऱ्या एका अपराधाबद्दल त्याचें मन त्यांना खात होतें. हैदराच्या मुलखातील किनाऱ्यावरचीं सर्व बंदरे जिंकून घेण्याबद्दल श्रीमंतानीं आपणास सक्त ताकीद दिली असतां आपण त्याच्या हुकमाची अंमलबजावणी योग्य रीतीने न करितां फिरंग्याच्या जहाजांचा पाठलाग करीत रामेश्वरापर्यंत गेलों काय, आणि हात हालवीत परत आलें काय, याची त्याना मोठी शरम वाटत होती, आणि श्रीमंतांचा कडक स्वभाव त्यांना ठाऊक असल्यामुळें आपल्या अपराधाचें प्रायश्चित आपणास लवकरच मिळणार असें त्यांचें मन त्याना सागत होते. बाळाजीपंत घाट्यानें आपल्या गाफील मोहिमेची कच्ची हकीगत श्रीमंताना कळविली असावी असा त्याना अंदेशा होता, आणि त्यांतच आनंदराव वगैरे धुळप मडळी आज बंदरावर आलेली पाहून आपली भीती खरी ठरणार, असें त्याच्या मनानें घेतलें आणि त्यानी धुळप मडळींचा रामराम बाचकत बाचकतच घेतला. आनंदरावानीं अंगरख्याच्या खिशातून एक लखोटा काढून मोत्याजीरावांच्या हातीं दिला. मोत्याजीरावाची विद्वत्ता बेताचीच होती, तरी त्याना मोडी लिपी कशी बशी लावून वाचण्यापुरतें शिक्षण मिळालें होतें. त्यानी तो लखोटा फोडून वाचला. तो पुण्याहून आलेला असून त्यांत इतकाच मतलबाचा मजकूर होताः—

"आरमाराचा सुभा आपणाकडून काढून परत धुळपाकडे दिला आहे. तो देखत हुकूम त्यांचे हवाली करून आपण पूर्वीप्रमाणें त्याचे हाताखालीं काम करावे."

मोत्याजीरावाना देव पावल्यासारखे वाटलें ! नाहीं तरी आरमाराच्या सुभ्याचें जड जोखीम आपणास झेपणार नाहीं अशी त्याची खात्री झाली होतीच. पण आपण तसे म्हणण्यापेक्षा श्रीमंतानीच आपल्या इच्छेनें आपणास मोकळ केलें याचाच त्यांना मोटा आनंद वाटला व ते इतर मंडळीच्या गप्पा गोष्टीत मिसळले. शिवाजीरावानीं मोत्याजीरावाची क्षमा मागितली आणि मोत्याजीरावानींही आपल्या स्वारीचें वर्णन केलें. धुळपमंडळींनीं हंसाला परशुराम भाऊनीं सोडवून आणल्याचें सविस्तर वर्तमान सांगितलें व हंसा सापडतांच आपण पत्र देऊन एक साडणीस्वार विजयदुर्गला पाठविल्याचें सांगितलें. पण तें पत्र शिवाजीरावांना मिळालें

नाहीं, यावरून तो स्वार मुसलमानांच्या हातीं सांपडला असावा असें सर्वांनीं निदान केलें. बराच वेळ गप्पागोष्टी झाल्यावर शिवाजीरावानीं आनंदराव धुळपांना इंग्रजी जहाजांची हकींगत सांगितली. ती ऐकून आनंदरावांना आश्चर्य वाटलें व त्यांनीं दुर्बीण हातीं घेतली. पण काय, त्यांना इंग्रजी जहाजें कोठेंच दिसेनात. धुळपांच्या आगमनाची बातमी त्यांना एखाद्या कर्णपिशाचानें दिली म्हणूनच कीं काय, त्यांनीं तेथून केव्हांच पोबारा केला होता !

---

## प्रकरण २८ वें.

| खरे, ले. १००५-१०१३-<br>१०१८-१०२३-१०३७ | **गुलटेंकडीवरील प्रस्थान.** | अश्विन शु १०<br>ता ९-९-१७७० |
|---|---|---|

श्रीमंताची स्वारी ज्येष्ठ वद्य पंचमीस पुण्यास येऊन पोचली हें वाचकांना ठाऊकच आहे. मात्र, आज ते बऱ्याच दिवसानीं पुण्यास आले होते, तेव्हां त्यांनी थोडे दिवस तरी विश्रांति घेतली असेल, अशी वाचकांनी कल्पना केल्यास ती चुकीची ठरणार आहे. श्रीमंत रावसाहेब पेशव्याना विश्रांति हा पदार्थच ठाऊक नव्हता, किंबहुना त्याचा जन्म खडतर कष्टाकरिताच होता म्हटलें तरी चालेल. ते मराठेशाहीचे ऋणको होते आणि तिजकरिता आजन्म अविश्रांत परिश्रम करून व त्यांतच अखेरीस आत्मसमर्पण करून त्यांनी तिचें ऋण फेडलें. आतां परमेश्वराच्याच दरबारात मराठेशाहीची नापत झाली होती, त्यामुळे तिच्या कल्याण-याचनात्मक विनंतिपत्रावर त्याच्या मजुरीचे शिक्कामोर्तब झालें नाहीं ही गोष्ट वेगळी, पण तेवढ्यावरून तिचे मुनीम जे श्रीमंत त्यांच्या कामगिरीची योग्यता कांहीं कमी होत नाही. त्यांच्या अचाट कर्तृत्वाची बरीच साक्ष वाचकाना आजवर पटलीच आहे, यापुढेही पटेल, आणि मग आमचे वाचक आमच्या रावसाहेब माधव-राव पेशव्याची तुलना, छत्रपति शिवाजी महाराज, नेपोलियन बोनापार्ट असल्या विभूतींशीं करूं लागतील, अशी आमची खात्री आहे. आमचे वाचक तर स्वजनच आहेत, पण कनिंगहॅम काकासारखा परकीय इंग्रज गृहस्थ देखील ज्येष्ठ वद्य षष्ठीच्या दिवशीं त्याची प्रकृति तपासून परत निघाला असतां ' शिरमंट, आपन इटके कस्ट करूं नयेट असी मी पुना पुन्हा टाकीड डेट असून आपन टी मानट नाहीं याबद्दुल मला खेड होटो, पन आपल्या कस्टामुलेच मराठा रास्ट्राला

हिंदुस्टानात पहिला दर्जा मिळाला आहे हें मी आनंदानें कबूल करतो ' असें ह्मटल्यावाचून त्याच्यानें रहावलें नाहीं !

पुण्यास येतांच श्रीमतानीं नाना फडणिसांकडून एकदा पुण्यांतील सर्व हाल-हवाल समजून घेतली. आपल्या गैरहजिरींत नानानी ठेवलेला बंदोबस्त, आपल्या प्रकृतीच्या स्वास्थ्याकरिता त्यानीं चालविलेले मृत्युंजयाचे अनुष्ठान आणि दादा-साहेबांच्या अनिष्ट कारस्थानास त्यानी वेळीच केलेला प्रतिबंध या सर्वांचा श्रीमता-च्या मनावर फार परिणाम झाला, व आपल्या शिष्यमंडळांत स्वतःच्या तोलाचें कर्तृत्व एकट्या नानाच्याच अंगी उतरलें आहे अशी त्यानीं मनाशीं खूणगाठ बांधून ठेवली. श्रीमंत पुण्यास आल्याबरोबर त्याच्या हेराच्या आणि हरकाऱ्याच्या बात-म्यांचीं सूत्रें पुण्यास खेळूं लागलीं. कर्नाटकातील मोहिमीची आणि उत्तर हिंदु स्थानात रामचंद्रपंत कानडे, विसाजीपंत बिनीवाले, इत्यादि सरदारानी चाल-विलेल्या स्वारीची पत्रे पुण्यास येऊं लागली, व हैदराबादच्या निजाम आणि अर्काटचा नबाब इत्यादिकाच्या दरबारातील गुप्त कारस्थाने शनिवार वाड्यात येऊन सादावूं लागली. त्या सर्व बातम्यावरून चोहोंकडच्या परिस्थितीचा श्रीमतानी जो अंदाज बांधला त्यात त्याना एक गोष्ट निश्चित कळून चुकली, ती ही की साऱ्या हिंदुस्थानात, विशेषतः उत्तर हिंदुस्थानात जर मराठी साम्राज्यास कोणापासून खरा धोका असेल तर तो इंग्रजापासून होय. फिरंग्याची स्थिति सध्या कक्षात कांहीं नाहीं अशापैकी असूनही जर ते दिल्लीच्या कारस्थानात आपल्या सरदाराना इतके दमविताहेत, तर त्याना अमळ अवसर मिळून ते चांगले सावरल्यास, उद्या मराठे-शाहीला चांगलेच रिपु होऊन बसतील, अशी श्रीमताची पक्की खात्री झाली आणि त्यानीं इंग्रजाचें डोकेंच वर होऊं द्यावयाचें नाहीं असा निश्चय केला.

आपला निश्चय अमलात आणावयाचा ह्मणजे प्रथम दक्षिण हिंदुस्थान निष्कंटक केले पाहिजे हे श्रीमंतास ठाऊक होतें। आणि ह्मणूनच त्यानी प्रथम हैदराचा पुरता नायनाट करण्याचा निश्चय केला, आणि तदनुरूप पैक्याची व फौजेची तयारी चालविली. त्यानी राज्याच्या खर्चांत काटकसर सुरू केली. आपल्या खासगीचा खर्च कमी केला. फार काय, पण श्रावण मासाच्या दक्षिणेच्या खर्चांत देखील चालू साली त्यानी बराच काट मारला. त्यामुळे, प्रस्तुत पुण्याच्या बाजूला आबादानी आहे, या भरवशावर पुण्यास गोळा झालेल्या पुष्कळ भट-भिक्षुकाची निराशा झाली. श्रीमतानी आपल्या राज्यातील तमाम सरंजामदाराच्या सरंजामांचे, मामलतदाराच्या मामलतीचे, आणि संस्थानिकाच्या खंडण्याचे हिशेब पुरे करून मागितले. पेशव्याच्या राज्याचे या वेळीं एकंदर पंधरा मोठे सुभे

व दोनशें चवऱ्याहत्तर महाल होते. त्या सर्व महालांचे मामलतदार किंवा कारकून आपापल्या महालाच्या वसुलाच्या रकमा व हिशेब घेऊन पुण्यास दाखल झाले. त्यांचे हिशेब श्रीमंत व नाना फडणीस स्वतःच तपासूं लागल्यामुळें, त्यांच्या पैकीं खोटे जमाखर्च सादर करणाऱ्या कित्येक कारकुनांची व मामलतदारांची फार त्रेधा झाली, कित्येकांना दंड झाले. त्यांनीं घरीं ठेवलेल लबाडीचे कागद श्रीमंतांच्या हेरांनीं अचानक आणून श्रीमंताच्या हातीं गुपचूप द्यावे, आणि श्रीमंतांनीं हिशेब-रुजवातीच्या वेळीं ते त्यांच्या मालकांस दाखवून त्यांना फजीत करावें असा प्रकार होऊं लागला! त्यामुळें श्रीमंतांचा धाक सर्वच महालकऱ्यांना वाटूं लागून त्यांनीं आपले हिशेब चोख करून सादर केले, संस्थानिकांच्या खंडण्याही वसूल करण्यात आल्या आणि सरकारी खजिना भरून राहिला.

जमेप्रमाणे खर्चाच्या कामींही श्रीमतानीं कसूर केली नाहीं. त्यांनी कर्नाटकच्या मोहिमीकरिता फौजभरती करण्यास सुरवात केली. श्रावण महिन्यापासून नालबंदीची घडामोड सुरू होऊन शिलेदार लोकाच्या झुंडी पुण्यास येऊं लागल्या. पंधरा हजारापासून पंचवीस हजारांपर्यंत नवीन हशम व गारदी चाकरीस ठेवण्याचा श्रीमताचा बेत होता व त्याप्रमाणे पठाण, अरब, हबशी, रोहिले, वगैरे जातीचे लोक लष्करात दाखल करून घेतले जाऊं लागले. तोफा ओतण्याचा कारखाना जारीनें सुरू होऊन चाळीस चाळीस शेराच्या देखील तोफा ओतण्यात येऊ लागल्या! कित्येक युरोपियन गोलदाज हुशार व कसबी असे पाहून नोकरीस ठेवण्यात आले. फार काय, पण यदाची कर्नाटकची स्वारी श्रीमताच्या मनांत थेट बिदनूरपर्यंत नऊन भिडवावयाची असल्यामुळे त्या प्रातातील रान तोडून काढण्याचा पुढे प्रसग येणार हे अगाऊ जाणून त्यानी त्या कामासाठी दहा हजार कुऱ्हाडी नवीन तयार केल्या आणि रानतोडे लोकाच्या जमाती मुद्दाम चाकरीस ठेवल्या!

या सर्व तयारीवरून श्रीमंत पुन्हा कर्नाटकच्या स्वारीवर जाणार, आणि ती मोहीम ते जातीनें चालवून तडीला लावणार अशी सर्वांची खात्री झाली. ही समजूत दृढ होण्याला आणखी एक गोष्ट कारण झाली. ती ही की, "आपणांस कर्नाटकात पुष्कळ दिवस लागण्याचा संभव असल्यामुळें आपल्या मागें मुखत्यारीनें आपला कारभार पाहण्यासाठीं आपण एक दिवाण नेमणार आहोत" असे श्रीमंतानी जाहीर केले. श्रीमंतांचे मुख्य कारभारी पूर्वीपासून सखारामबापू हेच असून नाना फडणीस त्यांचे दुय्यम होते हें वाचकाना "पौर्णिमे" च्या कथानकात टाऊक झालेंच आहे. अलीकडे काहीं दिवस सखारामबापू रुसून घरीं राहिले

होते; तरी पण श्रीमंतांनीं आपणांस आर्जवें करून पुन्हा कामावर घ्यावें अशी त्यांची मनापासून इच्छा होती. त्यांतच श्रीमंत कोणाला तरी दिवाण ह्मणून नेमून आपण कर्नाटकांत जाणार हें कळल्यापासून ती दिवाणगिरी आपणासच मिळणार अशी सखारामबापूंना फार आशा होती. पण श्रीमंतांनीं बापूंना दिवाणगिरी न देतां ती आपले बंधु नारायणराव पेशवे यांस देण्याचें व नाना फडणिसांना त्यांचे मदतनीस कारभारी ह्मणून नेमण्याचें ठरविलें. असें करण्यांत श्रीमंतांचा हेतु फार खोल होता. आपणास कर्नाटकच्या मोहिमीवर निर्वेध जाण्यास सांपडावें, नारायणरावांना जबाबदारीनें थोड थोडें काम पाहण्याची संवय व्हावी, आणि तें पाहतांना त्यांना नाना फडणिसांकडून राजकारणाचें थोडथोडें शिक्षण मिळावें असा हा रावसाहेबांचा तिहेरी डाव होता. हा दिवाणगिरीचीं वस्त्रें देण्याचा समारंभ श्रावण वद्य दशमीस झाला. श्रीमंतांनीं दरबार भरवून नारायणरावांस आपल्या हातानें वस्त्रें दिलीं, आणि सखारामबापूंना त्यांचें मुतालिक नेमल्याचें जाहीर करून त्यांनीं नारायणरावांजवळ बसून कारभार करावा, व तो नारायणरावांना समजवावा अशी योजना केली. बापूंना यांत आपली मानहानी झालीसें वाटलें, तथापि श्रीमंतांच्या मर्जीखातर त्यांनीं दरबारांत तरी सदर योजनेस आपली संमती दिली. पण दुसऱ्याच दिवशी नारायणराव पेशवे फडांत जाऊन कारभारास बसले असतां बापू साऱ्या दिवसांत कचेरीस फिरकले नाहींत. श्रीमंतानींही त्यांना बोलावणें पाठविलें नाहीं. श्रीमंतांनीं मुत्सद्दीगिरींत आपणास पूर्णपणें जिंकलें असून आपण आतां राजकारणांतलें निर्माल्य झालो आहोंत अशी बापूंची खात्री झाली. याप्रमाणें बापूंचे तेज फिकें पडून मराठेशाहीच्या राज्यकारभारात नाना विशेष प्रामुख्यानें चमकूं लागले. कारभाराची व्यवस्था मनाजोगी झाली आणि युद्धाचेंही साहित्य मनाजोगें तयार झालें असें पाहून, श्रीमंतांनीं भाद्रपद शुद्ध त्रयोदशी रविवारीं प्रातःकाळच्या सुमुहूर्तावर शनिवार वाड्यांतून प्रस्थान केलें आणि दोन तास दिवसास ते गुलटेकडीवर येऊन दाखल झाले.

या सुमारास पावसाळ्याचा जोर बहुतेक संपला असून, गारपिरापासून ते गुलटेकडी वानवडीवरून पर्वतीच्या पायथ्यापर्यंत पुण्याच्या दक्षिण बाजूचें प्रचंड मैदान नाना प्रकारच्या वृक्षांनीं सुशोभित झालें होतें. चोहोंकडे डबकीं, तलाव, नाले आणि ओढे भरून चालले असून गुलटेकडीवर महिना पंधरा दिवस मुक्काम करून नंतरच कर्नाटकांत जावयास निघण्याचा श्रीमंतांचा विचार होता. त्यांचे डेरे तेथें येऊन पडतांच त्यांच्या लष्कराचा तळ गारपिरापासून वानवडीपर्यंत पडून राहिला. जिकडे तिकडे उंट, घोडीं, गाडे, तोफा, राहुट्या आणि पालें दिसूं

लागलीं. कोठें सुतारांनीं गाड्यांची दुरुस्ती चालविली आहे, तर कोठें धिसाडी तरवारींना पाणी चढवीत आहेत; कोठें लोहार चाकांच्या धांवा तापवीत आहेत, तर कोठें शिंपी राहुट्यांची डागडुजी करीत आहेत; असे देखावे सर्वत्र दिसूं लागले. रिंगणावर धरलेलीं घोडीं, नाल मारण्याकरितां आडवे पाडलेले बैल, सामान लादण्याकरितां बसविलेले उंट आणि तोफा लादून तयार केलेले गाडे ह्या सर्वांची मैदानभर गर्दी दिसू लागली. श्रीमंत रोज स्वतः छावणीतून हिंडून अठरा कारखाने तपासूं लागले. त्यांनीं जागजागीं थांबावे, काय चाललें आहे त्याची विचारपूस करावी, चालू कामांतल्या गरजा समजावून घ्याव्या, त्या दूर करण्याची तत्काळ तजवीज करावी, आणि गोड शब्दांनीं आपल्या शिपाईप्याद्यांना उत्तेजन द्यावें, त्यामुळे त्यांचा उत्साह त्यांच्या शिपायांत पसरून गुलटेकडीचे मैदान ह्मणजे वीर रसाचे एक चालते बोलते प्रदर्शनच होऊन राहिलें!

श्रीमंतांची तयारी इतक्या पल्ल्याला गेलेली पाहून हैदरअल्ली खरोखरीच घाबरला. त्यातच श्रीमंतानी जानोजी भोसल्यास आणि निजामअल्लीस आपल्या कुमकेस बोलावलें आहे, आणि ते दोघे आपापल्या फौजा घेऊन श्रीमंताच्या मदतीस यावयास निघाले आहेत, ही बातमी त्याला लागल्यामुळे त्याची पाचावर धारण बसली आणि त्याने आपला विश्वासू वकील अप्पाजीराम यास श्रीमंत ह्मणतील त्या अटीवर तह करावयाची परवानगी देऊन पुण्यास पाठविले. पण अप्पाजीराम हैदरापेक्षाही महाबिलंदर होता. पहिल्याच भेटीत त्याने ज्या शर्तीवर आपण तह करावयास तयार आहों असे सांगितले त्या शर्ती गतवर्षींच्याच होत्या! श्रीमंतानीं अर्थातच त्या फेटाळून लावल्या व तुमचे आमचे जमणार नाहीं असे त्यास निक्षून सांगितलें. तथापि तो महाचिकट वकील अशाने थोडाच गप राहतो? तो तसाच डोंबी देऊन श्रीमंताच्या छावणीत राहिला आणि श्रीमंताची वरचेवर गांठ घेऊन आणि त्यांच्या हातापाया पडून त्याने त्याना अगदीं सतावून सोडलें! पण त्यानें आपल्या अटींत मात्र कांहीं सुद्धां बदल केला नाहीं. अखेर विजयादशमीच्या दिवशीं श्रीमंताचा तळ गुलटेंकडीवरून हलणार असें अप्पाजीरामास निश्चित कळल्यावर त्यानें पुन्हा एकदा श्रीमंताची गांठ घेतली आणि त्याची मनस्वी आर्जवें करून त्याने आणखी थोड्या सवलती द्यावयास काढल्या! हैदराचा आपण जिंकून घेतलेला सारा मुलूख आपणाकडे राहून वर जर हैदर पन्नास साठ लक्ष रुपये खंडणी देत असेल तरच त्याच्याशी तह करावयाचा असा श्रीमंतानीं पक्का निश्चय केला होता, ह्मणून ते अप्पाजीरामाच्या गोड बोलण्यास आणि थापाथापीस मुळींच भाळले नाहींत. मात्र त्यांना मनांतून अशी आशा वाटूं लागली कीं, आपण

पुण्याहून निघून दक्षिणच्या रोखानें कांहीं मुक्काम चालून गेलों कीं, अप्पाजीराम आपोआप कौलास येईल आणि आपल्या मनाप्रमाणें तह करून देईल. आणि इतक्यांतूनही तहाचें नच जमलें तर तेंही श्रीमंतांना पाहिजेच होतें. हैदरनाईक अत्यंत दगलबाज असल्यामुळें, तो अमळ स्वास्थ्य मिळाल्याबरोबर पुन्हा आपल्या मुलखास उपद्रव दिल्यावांचून राहणार नाहीं अशी श्रीमंतांची खात्री होती, आणि ह्मणूनच त्याचीं हाडें एकदां पुरती खिळखिळीं करून, त्याला पुनश्च वर डोकेंच करतां येऊं नये, अशी त्याची कंबख्ती करून टाकावी असें त्यानीं मनांतून योजलें होतें. त्यामुळें अप्पाजीरामाशीं झटून तहाचें बोलणें करावें असें अगत्य त्यानीं मुळींच दाखविलें नाहीं. अप्पाजीराम मात्र मुडदारपणानें तसाच त्याच्या स्वारी-बरोबर राहिला.

अखेर एकदाचा विजयादशमीचा दिवस उगवला. आज तिसरे प्रहरीं श्रीमंतांचा मुक्काम गुलटेकडीवरून वानवडीवर जाणार आणि तेथून ते मग झपा-ट्यानें दक्षिणेंत उतरणार असें जाहीर झालें होतें. गेल्या पांच सात दिवसांत हवा अगदीं उत्कृष्ट झाली होती, आणि लष्कराचीही तयारी आतां दरोबस्त पुरी झाली, त्यामुळें श्रीमंत अगदीं उमेदींत होते. त्यांची प्रकृतीही आतां उत्तम दिसत होती, निदान कर्निगहॅम काकानें आज त्यांना पाहून निरोप देतांना नेहमींइतकी तक्रार केली नाहीं. दसऱ्याचा दिवस असल्यामुळें, श्रीमंताना भेटून निरोप देण्यासाठीं सकाळपासूनच पुण्यांतून मंडळी येऊन जात होती. नाना फडणीस व नारायणराव पेशवे तर भल्या पहाटेपासूनच त्यांच्या बरोबर होते. खासगीवाले, जनार्दन हरि कोतवाल, सखारामबापू इत्यादि अधिकारी आणि ढमढेरे, रास्ते, पुरंदरे इत्यादि सरदार व त्यांच्या घरची मंडळीही फुरसत काढून श्रीमंतांना भेटून गेली. रामचंद्र नाईक परांजपे, नारोपंत आपटे ऊर्फ वाचकांचे “ पौर्णिमा ” कादंबरींतले परिचित दोस्त मिया दंताडभक्ष, इत्यादि गांवांतील पांढरपेशे, वैदिक, शास्त्री वगैरे शेंकडो मंडळीही त्यांना निरोप देऊन गेली. पण आजची विशेष गोष्ट ह्मणजे श्रीमंत दादासाहेबांनी त्यांच्या भेटीची इच्छा प्रदर्शित केली व त्या गोष्टीस श्रीमंतांचा मंजुरी मिळून दुपारी भोजनोत्तर दादासाहेब श्रीमंतांच्या भेटीस आले. पुण्यास आल्या-पासून श्रीमंतानीं दादासाहेबांची पांच चार वेळ गांठ घेतली होती. पण त्या प्रत्येक वेळीं त्यांच्या संभाषणाच्या ओघाला अनिष्ट वळण लागून श्रीमंताना नाराज होऊन परत यावें लागलें होतें. दादासाहेबांचें ह्मणणें एकच होतें कीं, आपणास सात लक्षांची नेमणूक तोडून द्यावी तरी एक, नाहींतर पांच लक्षांची नेमणूक आप-णास देऊन दत्तक मुलाला स्वतंत्र नेमणूक करून द्यावी. श्रीमंत रावसाहेब त्यापैकीं

कोणत्याच गोष्टीस कबूल नव्हते. फार तर पूर्ववत् पांच लक्ष त्रेसष्ट हजारांची नेमणूक दादासाहेबांकडे चालविण्याची त्यांची तयारी होती, पण दादासाहेबांना अमळ स्वातंत्र्य मिळालें कीं ते पुन्हा आपल्या स्वराज्यविघातक उलाढाली सुरूं करतील, आणि आपणांस संकटांत पाडतील अशी श्रीमंतांची खात्री असल्यामुळें ते चुलत्याला पुण्याबाहेर सोडावयास तयार नव्हते. या कामांत पुष्कळाच्या मध्यस्थ्या झाल्या होत्या व त्या सर्व फुकट गेल्या होत्या. आज दादासाहेब मुद्दाम होऊन भेटीस आले, ते कांहीं तरी विशिष्ट हेतू धरूनच आले असले पाहिजेत, हें श्रीमंतांनीं ओळखिलें, पण बाहेर तसें कांहीं न दिसूं देतां त्यांनीं त्यांचें मोठ्या मर्यादेनें स्वागत केलें, आणि त्यांच्या येण्याचें कारण विचारलें. दादासाहेब अमळ घुटमळले. आपला आशय श्रीमंतांजवळ बोलून दाखवावा कीं नाहीं, याचा त्यांना विचार पडला असावा असें दिसलें. त्यांची मुद्रा निराश व उदासीन दिसत होती, डोळ्यांत विखारी पाणी खेळत होतें आणि चेहऱ्यावर एक प्रकारची कठोर छटा पसरून राहिली होती, यावरून ते आज पुतण्याला प्रेमाचा निरोप द्यावयास आले नसून निर्वाणीचा संदेश कळवावयास आले होते. त्यांनीं आपल्या बोलण्याची सुरवातच अशी केली, " रावसाहेब, मला मोठी आशा होती कीं तूं कर्नाटकांत जाण्यापूर्वी माझा लढा एकदा कायमचा तोडून टाकशील. मातक्यान् तुझा तसा कांहीं विचार दिसत नाहीं. तेव्हां मी तुला मुद्दामच विचारावयास आलों आहे, माझा लढा तुझ्या मनांत मिटवून टाकावयाचा आहे कीं नाहीं ! "

दादासाहेबांचा आजचा नूर श्रीमंतांना कांहीं वेगळाच दिसला. हैदर किंवा इंग्रज यापैकीं कोणाची तरी त्यांना चिथावणी तर मिळाली नसेलना, असाही त्यांना क्षणमात्र संशय आला. दादासाहेबांना पुण्यांतून काढून कर्नाटकच्या मोहिमीवर आपल्या बरोबर न्यावें, असेंही क्षणभर त्यांच्या मनात आलें, पण पूर्ण विचाराअन्तीं ती कल्पना अव्यवहार्य ह्मणून त्यांनी सोडून दिली. त्यांनी थोडा वेळ थांबून उत्तर केलें, " काकासाहेब, आपला काहीं लढा आहे, हेंच मला मुळीं मान्य नाहीं. आपण जर सरळ चाललात, तर आहे हा सारा कारभर आपलाच आहे, आणि पूर्वीचाच क्रम पुढे चालवावयाचा असेल तर—" इतकें ह्मणून श्रीमंत अडखळले. चुलत्याला निरंतर बंदिवासांत टेवण्याची कल्पना त्याच्यानें बोलून दाखवेना.

" तर काय ? " दादासाहेब त्वेषानें ह्मणाले, " मातक्यान् मला तूं निरंतर कैदेंत ठेवणार असेंच ना ? "

" आपणांस मी बंदोबस्तांत ठेवलें आहे, कैदेंत नव्हे, " श्रीमंत ह्मणाले, " आपलें स्वातंत्र्य मी काढून घेतलें असलें तरी आपला वडीलकीचा मान व बरदास्त मी चांगली राखली आहे हें कोणीही कबूल करील. यापुढेंही आपली बरदास्त अशीच राहील. "

" काय, पुढेंही अशीच राहील ? " दादासाहेब बेभान होऊन उसळले, " ह्मणजे मला तूं असाच बंदिवासांत खितपत ठेवणार असेंच ना ? मातक्यान् हाच तुझा निश्चय कायम ठरला ना ? "

श्रीमंतांनीं उत्तर केलें नाहीं. त्यांचा खरोखरीच तसा निश्चय होता. दादासाहेबांना मोकळीक द्यावयाची त्यांची इच्छा होती, पण त्यांना खरोखरीच पश्चात्ताप होऊन त्यांचें वर्तन सुधारलें असतें तर ते त्याना ती देणार होते. आणि ह्मणूनच चुलत्याच्या तोंडून दिलगिरीचा शब्द आल्याशिवाय आपण सवलतीची भाषा मुळींच बोलावयाची नाही असा विचार ठरवून ते गप राहिले.

' ठीक आहे, ' दादासाहेब ह्मणाले, 'तुझ्या मर्जीप्रमाणेच होऊंदे. मातक्यान् आतां कांहीं विपरीत परिणाम झाला तर माझ्याकडे कांहीं दोष नाहीं ! ' दादासाहेबांचा संताप इतका अनावर झाला होता कीं, एवढे बोलून ते फणफणतच निघून गेले आणि पालखींत बसले.

चुलत्या पुतण्यांची भेट थोडावेळच झाली, पण तिच्या पर्यवसानानें श्रीमंतांच्या उमेदीवर बरेंच विरजण घातलें. आपणास निघतेवेळीं हा अपशकुनच झाला असें त्यांच्या मनांत आलें. ते विपरीत परिणाम होईल ह्मणाले तो कसला, इत्यादि गोष्टींचा ते विचार करीत होते. ते त्या तंद्रीत असताच श्रीमंत पार्वतीबाई भेटीस आल्याची त्यांना वर्दी आली. त्याबरोबर त्यांची सर्व नाउमेद मावळून त्यांच्या तोंडावर एकदम टवटवी आली, आणि ते मोठ्या प्रेमानें चुलतीस भेटले. मायलेकराच्या बराच वेळ गुजगोष्टी चालल्या होत्या. पार्वतीबाई निघून गेल्या, तोंच मुदपाकाच्या डेऱ्यांत श्रीमंत रमाबाई वाट पाहत आहेत अशी श्रीमंताना वर्दी मिळाली. मागील खेपेस रमाबाई श्रीमंतांच्या बरोबर स्वारींत होत्या, पण या खेपेस त्यांना पुण्यास ठेवून श्रीमंत मोहिमीवर निघाले होते. अर्थात् आजची नवराबायकोंची भेट ह्मणजे एका मोठ्या विरहाची प्रस्तावना होती। आणि ती विप्रलंभ शृंगाराला अनुरूप अशीच झाली. रमाबाईनी मोहिमींत प्रकृतीस वरचेवर जपावयास आणि खाण्यापिण्यांत खबरदारी घ्यावयास मोठ्या कळकळीनें सांगितलें, आणि श्रीमंतांनींही त्यांच्या प्रत्येक सूचनेस मनःपूर्वक मान्यता दिली. पण अखेर निरोपाचे शब्द बोलते वेळीं रमाबाईच्या डोळ्यांत जेव्हां अश्रु उभे राहिलेले श्रीमंतांनीं पाहिले,

तेव्हां त्यांना धीर निघेनासा होऊन ते पत्नीला बाहुपाशांत घेण्यासाठीं पुढें सरले. पण आज त्यांचा मोठाच विरस व्हावयाचा होता. " छे, शिवावयाचें नाहीं, " असें ह्मणत रमाबाई चार दोन पावलें मागें सरल्या व त्यांनीं पतीचें किरण चुकविलें ! आतां कोठें श्रीमंतांच्या लक्ष्यांत आलें कीं, पार्वतीबाईसाहेब नेहमीं प्रमाणें सुनेला आपल्या बरोबर घेऊन आल्या असाव्या, आणि त्या ज्या अर्थी तिला मागें ठेऊन गेल्या आहेत त्या अर्थी सूनबाई एकाएकीं अस्पर्श झाल्यामुळेंच त्यांनी तसें केलें असावें ! " होय कां ? तर मग आह्मांला तुह्मी चांगलाच गुंता आणलांत कीं सरकार ! " असें ह्मणत श्रीमंतांची स्वारी मागें हटली. आलेला गुंता श्रीमंतांना प्रिय वाटला कीं अप्रिय वाटला हें आह्मांस सांगता येत नाहीं, पण त्यांचें प्रस्थान मात्र आणखी पांच चार दिवस लांबलें एवढी गोष्ट खरी !

---

## प्रकरण २९ वें.

| खरे, ले. १०२५-१०३२-<br>१०२६-१०४७ इ. | **मामांची कर्तबगारी.** | कार्तिक शु. १ शके १६९२<br>२६-१०-७० |
|---|---|---|

श्रीमंतानीं कर्नाटकच्या मोहिमीची सूत्रें त्रिंबकराव मामा पेठ्यांच्या हातीं दिल्यामुळें गोपाळराव पटवर्धनांना मोठें शल्य वाटलें होतें, पण लवकरच त्यांना असें दिसून आलें की, मामाही आपल्या प्रमाणेंच पराक्रमी व धोरणी सरदार आहेत. मामांनींही गोपाळरावाची योग्यता ओळखली होती, त्यामुळें ते त्यांची सल्लामसलत घेण्यात मुळींच संकोच करीत नसत व त्यांच्याशीं मोठ्या आदरानें वागत. मामाच्या या धोरणाचा इष्ट तो परिणाम होऊन गोपाळरावांच्या मनांत त्याच्या विषयी बरेच दिवस धुमसणारी तेढ पार नाहींशी झाली. आणि प्रथम प्रथम ते मामाना उद्देशून केव्हां केव्हां घालून पाडून बोलत असत तसें पुढें बोलेनासे झाले. हैदरनाईक प्रस्तुत श्रीरंगपट्टणांत दडून बसला होता व बरसात संपेपर्यंत बाहेर न पडण्याचा त्याचा विचार दिसत होता. तेव्हां आपणही कोठें तरी छावणी करून बरसातींत विसावा घ्यावा असा मामाचा प्रथम विचार होता. पण मैदानांत जें उगीच बसावयाचें त्यापेक्षा आपल्या मुलखास लागून असलेला हैदरचा एखादा मजबूत किल्ला काबीज करून त्याच्या आश्रयानें रहावें असा विचार करून मामांनीं गुरमकोंड्याच्या किल्ल्यास वेढा दिला. गुरमकोंड्याच्या आसपासचा

मुलूख पूर्वी राघो बापूजी व आनंदराव गोपाळ या सरदारांनीं जिंकून घेतलाच होता, तेव्हां किल्ल्याच्या आसपास मराठी अंमल असल्यामुळें मामांना तो किल्ला घेणें सोईचें वाटलें. येऊन जाऊन भीती काय ती एकच, हैदरनाईक श्रीरंगपट्टणांतून किल्ल्याच्या मदतीला सैन्य पाठवील, ती मामांनीं गोपाळराव पटवर्धनांना सैन्यासह श्रीरंगपट्टण आणि गुरमकोंडा यांच्या वाटेवर ठेऊन दूर केली, व गुरमकोंड्याच्या वेढ्याचें काम झपाट्यानें सुरू केलें.

गुरमकोंड्याचा किल्ला श्रीरंगपट्टणच्या ईशान्येस असून आमच्या कथानकाच्या काळीं चांगल्या मजबूत स्थितींत होता. किल्ल्याला भक्कम तट असून त्या तटाला संरक्षक बुरूजही बरेच होते. किल्ल्याभोंवती खोल खंदक असून तो पाण्यानें तुडुंब भरलेला होता. हा किल्ला हैदराकडून मीर रेझा नांवाच्या सरदारास जहागीर मिळालेला होता. मीर रेझाची बहीण हैदरास दिलेली असल्यामुळें हैदराचा त्याच्यावर चांगलाच लोभ होता. श्रीरंगपट्टणच्या दुसऱ्या मोहिमीवर कांहीं दिवसांपूर्वीं पेशवे आले होते, त्या वेळीं हा मीर रेझा त्यांना फितूर झाला होता. पेशव्यांनीं त्याची गुरमकोंड्याची जहागीर त्याच्याकडे राखली इतकेंच नव्हे, पण तीं थोडी वाढवूनही दिली. कांहीं दिवसानी मीर रेझा पुन्हा हैदरास मिळाला, तो आतां हैदराच्या बाजूसच असून प्रस्तुत मोहिमीत त्याचे बाजूनेंच लढत होता. अर्थात् त्याची जहागीर जप्त करून त्याला शिक्षा करावी हाही गुरमकोंड्याला वेढा देण्यांत त्रिंबकराव मामांचा एक हेतु होताच. मीर रेझा या वेळीं श्रीरंगपट्टणास असून त्याचीं मुलें माणसें व चीजवस्त गुरमकोंड्यास अडकली होती. ह्मणून मराठ्याचे सैन्य गुरमकोंड्याकडे वळताच मीररेझानें पुण्यास श्रीमंतांकडे पत्र पाठवून बोलणें लावलें कीं, मला आश्रय देत असाल तर मी पुन्हां तुमच्याकडे येतों. पेशव्यांकडून त्यास जबाब आला कीं, तुला आह्मी आश्रय देतों इतकेंच नव्हे, तर तुला आणखीही जहागीर देऊन तुझा दर्जा वाढवितों. पण या पत्रव्यवहाराची कुणकूण हैदरला लागून त्याने मीर रेझास कैदेत ठेवलें. ह्याचा परिणाम असा झाला कीं मीर रेझा हैदरच्या कैदेंत अडकला, आणि त्याचीं मुलेंमाणसें व भाचा सैदुमिया ही मंडळी गुरमकोंड्यांत सांपडली !

भाद्रपद वद्य तृतीयेच्या दिवसापासून गुरमकोंड्याचा वेढा सुरू झाला. पण सैदुमियाजवळ तीन साडेतीन हजार उत्तम गारदी आणि धान्यधुन्य व दारूगोळा यांचा भरपूर पुरवठा असल्यामुळें त्यानें मराठ्यांच्या सैन्याचा प्रतिकार मोठ्या आवेशानें चालविला. त्यामुळें मराठ्यांचे मोर्चे खंदकापर्यंत जाण्यासच वीस दिवस लागले ! आश्विन शुद्ध अष्टमीपासून मात्र वेढ्याला खूप जोर चढला. आतांपर्यंत

हुजुरात, रास्ते, आनंदराव गोपाळ, मुरारराव घोरपडे, हरपनहळ्ळीकर संस्थानिक, कडपेकर संस्थानिक, आणि तोफखाना इतक्या पथकांचे मोर्चे तयार होऊन त्यांनी वेगवेगळ्या बुरजांना सुरुंग लावण्यास प्रारंभ केला. गुरमकोंड्याच्या किल्ल्यावर एक तळें असून त्याच्या पूर्वेकडील कोपऱ्यास एक बुरूज होता, त्याच्या खाली हुजुरातीतील पथकानें पहिला सुरुंग लाविला. त्याच्या धडाक्याने अर्धा बुरूज ढासळला व खंदकाची ती बाजू भरून निघाली! तेवढ्या संधीचा फायदा घेऊन हुजुरातीचे शिपाई भराभर बुरजावर चढले आणि त्यांनी त्या बुरजाचा कबजा घेतला. किल्लेकऱ्यांनी त्यांना तेथून हुसकून लावण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण त्याचा कांही उपयोग झाला नाही. हुजुरातीने आपले ठाणे कायम करून बुरजावर मोर्चा नेला. तोफखान्याच्या मोर्चाने तर आश्विन शुद्ध चतुर्थीपासूनच आपल्या मोर्चात धमधमा उभा करून त्याच्यावर दोन तोफा चढविल्या व किल्ल्यावर भडिमार सुरू केला. त्याचा मारा चांगला होऊ लागला, पण दारूचा तुटवडा पडल्यामुळे त्याचा व्हावा तसा उपयोग होईना. सारी पथके मनापासून मेहनत घेत होती. किल्ल्यातील लोकांचा तर मनस्वी कोंडमारा होऊन ते जनावरें कापून खाऊं लागले! पेशव्याच्या लष्करांत देखील महागाई पुष्कळच झाली. चाऱ्याचा तुडवडा पडू लागला. पण इतके हाल झाले तरी किल्ला सर केल्यावाचून [illegible]ही हा मामाचा निश्चय कायमच होता.

पेशव्याचा हुजुरातीचा मोर्चा बुरजावर कायम झालासे पाहून किल्ल्यातील लोकांनी बुरजाच्या आतल्या बाजूला नवी भिंत घाईघाईने घालून घेतली, आणि आपला मोर्चा कायम राखला. तोपर्यंत हुजुरातीने आपल्या मोर्चावर पांच सातशे माणूस आणून तो मोर्चा अभेद्य केला, आणि दुसरा सुरुंग खोदण्याचे काम चालू केले. किल्ल्यातील लोकांनीही बाहेरील हुजुरातीचा मोर्चा सफाई उडवून टाकावा म्हणून आतून सुरुंग खोदण्यास सुरवात केली! दोघांचेही काम एकमेकांस नकळत चाललें होते, व प्रत्येक जण आपण दुसऱ्या बाजूस चकविणार आहोत असे समजत होता. अखेर आश्विन शुद्ध दशमीच्या दिवशी हुजुरातीच्या सुरंगाची खणती चालू असतां त्याची पहार व आतून येणाऱ्या सुरुंगाची पहार यांच्या गांठी पडून दोनी सुरुंगांचे एकच टाळे झाले, आणि टाळ्यातून आरपार लख्ख उजेड पडला! त्याबरोबर आतले लोक हत्यारें टाकून पळून गेले. हुजुरातीच्या शिपायांच्या हातीं चार पांच तरवारी, खारीं, कुदळी व दारूचे बुधले सांपडले, ते ते घेऊन आले. ही बातमी आंत कळतांच चोहोंकडे मोठी गडबड होऊन तटावरचे लोक अस्ताव्यस्त पळूं लागले. तें पाहतांच हरपनहळ्ळीकरांच्या मोर्चावरून त्या लोकांवर

असा भडिमार करण्यांत आला कीं, त्यानें किल्लेकऱ्यांचे शेंकडों लोक जायबंदी झाले. एका शिपायानें तर तटावरून आंत उडी टाकून दोन चार असामींस कंठस्नान घातलें आणि फिरून भिंत चढून तो मोर्च्यांत आला! त्याच्या पराक्रमाची गोष्ट मामांच्या कानावर जातांच त्यांनी त्याची चांगली तारीफ करून त्याला एक कडें बक्षीस दिलें.

आश्विन शुद्ध चतुर्दशीपासून वेगवेगळ्या मोर्चांनीं आपले सुरुंग लावण्यास सुरवात केली. ती एका पत्रांत पुढील प्रमाणें वर्णिली आहे. "असे तीन सुरुंग तक्तपोशी मजबूत काम करून बातेरी सारी पोखरली होती! बुधले मात्र आंत घातले नव्हते. खंदकाच्या आंतील पाळीपासून आरंभ बातेरीच्या सुरुंगास केला. बाहेर न जाणों, कसें जाता कसें घडेल, ह्मणून या अंदेशाने तो बुरूज सोडून तें काम राहतें केले. यानी त्याच मार्गे शेवटवर जाऊन त्याचें द्वार होते तें बुजावून दुसरे जागाकडून सुरुंग बुरजास चालविला, तोही आठ दहा हातावर आहे. आनंदराव रास्ते व आनंदराव गोपाळ याच्या मेहनती बहुत. रास्त्यांचा सुरुंग आठ हातावर बुरूज टाकून आहे. तसाच आनंदराव गोपाळ याचा आहे. त्याही सुरुंगाची खोदणी भारी. खडक, हत्यार चालत नाही. काम भारी जातें. याप्रकारे सुरुंग व मोर्चांचे प्रकार. याशिवाय पाळेगार व कडपेकर हेही आपल्याला अनुकूलानुरूप मोर्चे बसवून आहेत. पाच सहा रोजात सारे सुरुंग तयार होतात, व दमदमा बातेरीमध्यें बांधविला, त्याचीही बिलंदी किल्ल्याचे कुसावर उचीस येत चालली. त्याजवर तोफा ठेवून मारागिरी करावी याजकरिता दमदम्याची तयारी योजिली आहे. आंतील लोकही मोठ्या इरेने प्रतिलढाई देतात. त्याची लढावयाची सीमा आहे. दीड महिना झाला. गावातील लोक फटकडीनें व तोफेनें फार मेले. गावांत पाणी आहे. सर्व जिन्नस मिळत नाहींसा झाला."

कार्तिक शुद्ध प्रतिपदेचे दिवशीं सकाळीं मुरारराव घोरपडे सेनापती यांचे डेऱ्यात त्रिंबकराव मामा पेठे, आनंदराव रास्ते, राघो बापूजी, आनंदराव गोपाळ वगैरे मंडळी फराळास आली होती. आज दिपवाळीचा पाडवा असल्यामुळें सर्व मंडळींचीं स्नानें पहाटेसच आटोपली होतीं, आणि विशेष गोष्ट म्हणजे गेले सात आठ दिवस ज्वरानें आजारी असलेल्या मुरारराव घोरपड्यानी देखील आज वर्षाचा दिवस म्हणून स्नान केले होतें. पण त्या स्नानाचा अनिष्ट परिणाम न होतां, त्याच्या मुळें त्यांना चागली हुषारीच वाटत होती. या वेळीं वातावरण स्वच्छ असून आकाश अगदीं निरभ्र होते. हवेंत थंडी होती, पण ती झोंबरी नव्हती. फराळास बरेंच जिन्नस केलेले असून गप्पागोष्टी आणि थट्टामस्करी करीत मंडळी त्यांच्यावर हात

मारीत होती. त्यांच्या संभाषणाचा विषय अर्थातच गुरमकोंड्याचा वेढा हाच होता. आपणांकडे असलेली बंदुकीच्या दारूची उणीव पुढें करून, तिजवर अद्याप किल्ला सर न झाल्यामुळें येऊं पाहणाऱ्या अपयशाचें खापर फोडणें, शत्रूंनीं आजवर टिकाव धरला याबद्दल त्यांची स्तुति करणें, मधून मधून आपल्या शिपायाची मर्दुमकी उठावदार रीतीनें वाखाणणें, किल्ल्यावरील लोकांच्या हलाखीचें चित्र भडक रंगविणें, इत्यादि प्रकार मनसोक्त चालले होते. फराळ आटोपल्यावरही मंडळीची त्याच विषयावर चर्चा चालली होती. होतां होतां प्रस्तुत मोहिमीची फलश्रुति काय होणार, यासंबंधीं गोष्ट निघाली. बहुतेक मंडळींचें मत असें पडलें कीं, श्रीमंत ज्या अर्थी कर्नाटकांत छावणी न करिता पुण्यास गेले, त्या अर्थी त्यांच्या मनांत ही मोहीम कडेपर्यंत लढवावयाची नसून शक्य तितक्या लवकर हैदराशीं तह करावा असें आहे. त्रिंबकराव मामांना सुद्धा हा अंदेशा होताच. हैदराचा वकील अप्पाजीराम हा पुण्यास गेला असून तो श्रीमंताच्या बरोबर छावणींत आहे, तो त्यांच्याशीं गोड बोलून व त्यांची आर्जवें करून आपणास हवा तसा तह करून घेईल अशी मामाना फार भीति होती, आणि ती त्यानीं मुराररावाजवळ बोलूनही दाखविली. यावर मुराररावांनी कांहीं उत्तर केलें नाही. मात्र " शिरमंत म्हंजी कसली कसली बिकट वस्तु हाय, तुम्हांला ठावं न्हाईरऽ बाबानु" असे म्हणत ते उठले आणि आपल्या अंगरख्याच्या खिशांतून एक पत्र काढून त्यानीं मामांपुढें टाकलें. मामांनीं तें पत्र घेऊन वाचले, त्यांत पुढील मजकूर होताः—

"राजश्री मुारराव हिंदुराव घोरपडे, मामलकत मदार सेनापती गोसांवी यांसी. सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद विनंति, उपरि. येथाल कुशल जाणून स्वकीय लिहीत असलें पाहिजे. विशेष, पत्र पाठविलें ते प्रविष्ट झाल. हैदर अल्लीखान याचा मजकूर विस्तारें लिहिला त्यात मुख्यार्थ हाच कीं, " हैदर नाइकाचें पुरतें पारिपत्य करावें ऐसा विचार होऊन इकडे फौजा छावणीस ठेविल्या. फौज छावणीस राहिली येणेंकरून शत्रूस जरब बसली, व पुढेंही जरब बसविल्यास कशी बसेल ह्या गोष्टीची मसलत येथें आह्मी चौघे मातबर आहों त्यास पुसोन राजश्री त्रिंबकराव याणी आपणास लिहावा या भावें आपलीं पत्रें त्यास आलीं. त्याजवरून त्यांनी आह्मा सर्वास पुसोन आपणांस लिहिणें तें लिहिलें असे. मुख्य गोष्टी हैदरखानास जरब बसली. मनुष्यमात्र त्यास राजी नाहीं. यास्तव तह करावयास वकील आपणाकडे पाठविले आहेत. तहही करणें तो जरबेनें करावा. नफा करून घ्यावा. मीरेजा

आदिकरून सर्व त्यास कंटाळले आहेत. हैदरखानाची प्रकृत अविवेकी, उद्दाम, घडीची गोष्ट, घडीस फेर! दाब मात्र आपले सेवकजनावर भारी. यास्तव लहानापासून मोठ्यापर्यंत त्यास बेजार. मात्र आपण जलद भारी सरंजामानें यावें. उपरातिक कर्तव्य तें करावें." ह्मणून कित्येक उल्लेख पुरःसर लिहिले त्यावरून कळलें. ऐशास आपण व त्रिंबकराव विश्वनाथ याणी लिहिला विचार यथार्थ आहे. व करण्याचाही क्रम आपणाशीं बोलोन आलो त्याप्रमाणे कर्तव्यात आणिला. मुहुर्तेकरून डेरेदाखल झालो. तोफा व गाडदी मातबर सामान व फौजही भारी, याप्रमाणें तरतूद केली. चारी विचार ध्यानात असावे यास्तव सहज प्रकारें सुचल्यावरून मशारनिल्हेस (मामास) लिहिले होते. केवळ तिकडे न यावे, पुण्यातच हैदरखानाचा तह करावा, या भावें लिहिलें नव्हतें. तात्पर्य यवनास जरबेत आणून पुरतें पारिपत्य करून देवब्राह्मणाची स्थापना करावी, संस्थानें मोडवावी हाच भाव आहे. दुसरा प्रकार सर्वथैव नाहीं. येविशीं त्रिंबकराव विश्वनाथ यास लिहिणें ते लिहिले आहे. मिराचा अर्थ लिहिला, तर त्याणी दोनचार वेळा करार केला असता आला नाही. त्याचे बोलण्याचे कारण काय? (आमचे) येणे न झाले तो गुरमकोड्याचे कार्य आपण उरकावे हे उत्तम असे. छ. १५ जमादिलाखर बहुत काय लिहिणे. स्वदस्तूर (येथून पुढे खुद्द श्रीमंत स्वहस्ते लिहितात असे वाचकांनी समजावे) हैदरखान प्रस्तुत कोठे आहे, त्याचे मानस प्रस्तुत काय आहे, बाहेर दाखविण्यात काय आहे, गुदस्ता फौजगाडदी होते त्याजहून जास्ती आहेत किंवा कमी आहेत, हे कळवावे. यंदा त्या प्रांती लौकर यावे यास्तव लौकर निघणे झाले. त्यास त्या प्रांतीं येताच आधी कोणते काम करावे, मग कोणते करावे, आपल्यास सोय आधी कोणत्या कामात, याचा प्रकार व माहितगारी सविस्तर त्या प्रांताची आपल्यास विशेष. यास्तव खोलून लिहावे, हे विनंती."

मामाचें हें पत्र वाचून होतें न होतें तोंच एका जासुदानें दुसरें एक पत्र आणून त्याच्या हातीं दिलें. वर श्रीमंताच्या पत्रात 'त्रिंबकराव विश्वनाथ यास जें लिहिणें ते लिहिलें आहे' ह्मणून श्रीमंतांनीं ज्या पत्राचा उल्लेख केला होता, तेच हें पत्र होतें. ते अमळ उशीरानें निघाल्यामुळे एक दिवस उशीरानें आलें होतें. मामानीं तेंही पत्र वाचलें, आणि प्रस्तुत मोहीम तडीस नेण्याविषयींच्या श्रीमंतांच्या निर्धाराबद्दल मामांची खात्री झाली. त्याना एक मोठा आधार वाटू लागला, आणि एकदम हुरूप आली. तिच्या भरातच 'आतां कांहीं हरकत

नाहीं. आतां हैदरनाइकाला होता कां नव्हतासा करून टाकतों ' असें ह्मणत मामा उठून उभे राहिले !

इतक्यात मामाच्या शब्दांनी ध्वनित केलेल्या धमकीला प्रत्युत्तर ह्मणूनच कीं काय, दोन इसम हात जोडून आत आले, आणि त्यांनी मुरारराव घोरपडे आणि त्रिंबकराव मामा यास उद्देशून साष्टांग नमस्कार घातला. त्या इसमापैकीं एक जण हिंदू रजपूत दिसत असून दुसरा मुसलमान होता. मामा व मुरारराव या दोघा-नांही त्यांची ओळख असावीसे दिसले. इतकेच नव्हे, पण ते का आले आहेत, हेही त्यांनी ताडलें असावे असे त्यांच्या चर्येवरून व त्यांनी एकमेकास स्मितपूर्वक केलेल्या नेत्रसंकेतावरून वाटले. ' उठा, रामबक्षी उठा, अब्दुल कादर, उठा, अहो हे काय ? दंडवत काय ह्मणून घालता ? दंडवत घालायला आह्मी देव का आहोत ? ' असे ह्मणत मामांनी त्या दोघा गृहस्थास हात धरून उठविले आणि आपल्या शेजारी बसवून घेतले.

' मामासाहेब, ' रामबक्षी ह्मणाला, ' किल्ल्यातील लोकांचे आपण सध्या देवच नाही का? त्यांचे प्राण आपल्याच हाती नाहीत का? '

' भलतेच काहीतरी ! ' मामा उपरोधिक स्वराने ह्मणाले, ' तसे तुह्मास स्वरोखरीच वाटले असते तर तुह्मी किल्ला केव्हाच आमचे स्वाधीन केला असता ! '

' मामासाहेब, कसूर माफ, ' अबदुल कादर मुसलमानीत ह्मणाला, 'उघड्या डोळ्यांनी प्राण जाईल का? सैदुमियाना फार उमेद होती की, आपण किल्ला झुंज-वीत राहिलो तर आपणास आज ना उद्या हैदरखानाकडून कुमक येईल, पण त्याची आशा खोटी ठरली. त्यांच्या मर्दुमकीचे काहीच चीज झाले नाही. सबब आज ते लाचार होउन आपणांस शरण आले आहेत. किल्ला खाली करून द्यावयाची त्यांची तयारी आहे. '

मामांनी मुाररावाकडे पाहिले. त्यांच्या चेहऱ्यावर आनंदाचा उन्माद स्पष्ट दिसत होता. किल्ला खाली करून घेण्याच्या बाबतीत काही शर्ती सैदुमियाने घातल्यास त्या ऐकावयाच्या की नाहीत, याबद्दल मुराररावाचा अभिप्राय विचार-ण्याचा त्यांचा आशय असावा. मुराररावांनी तो ओळखून रामबक्षीकडे पाहून ह्मटले, ' रामबक्षी, सैदुमिया किल्ला खाली करून देणार तो विनशर्त देणार की त्यांच्या काही अटी आहेत? '

' अटी लावण्याजोगी त्यांची स्थिति कोठे आहे? ' रामबक्षी ह्मणाला, ' त्यांची आपणास अशी विनंति आहे की, आह्मी किल्ला तुमचे स्वाधीन करतो, फक्त आमच्या लोकास वस्तभावासुद्धां आह्मी सांगू तेथे नेऊन सोडावे. '

‘ आणि ही अट आह्मी मान्य नाहीं केली तर ? ’ मामांनीं अमळ कुर्‍यानेंच प्रश्न केला.

‘ तर मग आह्मांस आमच्या इज्जतीकरितां लढून मरणें भाग आहे, ’ रामबक्षी नम्र पण खंबीर आवाजांत ह्मणाला, ‘ मामासाहेब, आपण जवांमर्दच आहांत, जवांमर्दाची इज्जत ह्मणजे काय चीज आहे, याची आपणांस कल्पना आहेच. ’

रामबक्षीच्या नम्र पण बाणेदार उत्तराचा मुराररावांच्या दिलदार मनावर तत्काळ परिणाम झाला. मुरारराव तर चटकन् बोलून गेले, ‘ ठीक आहे, रामबक्षी, तुमची विनंति आह्मांस मान्य आहे, असें सैदुमियांना सांगा. मात्र किल्ला आजच्या आज खालीं झाला पाहिजे. कां मामासाहेब, असेंच ना ? ’

‘ हो, असेंच ह्मणावयाचें ! ’ मामा आपल्या स्वराचा हेल लांबवून जणुं काय मुराररावांच्या भिडेखातरच आपण या सवलतीला संमति देत असल्याचा आविर्भाव करीत ह्मणाले. वास्तविक त्याच्याही उदार मनावर रामबक्षीच्या उत्तराचा परिणाम झाला होता.

रामबक्षी आणि अबदुल कादर मामांचा आणि मुराररावांचा निरोप घेऊन किल्ल्यावर गेले. तिसरा प्रहरचे सुमारास सैदुमिया, त्याचा कबिला, आणि शिबंदीपैकीं उरलेले लोक आपली चीजवस्त घेऊन मुराररावाच्या डेर्‍यास आले. गुरमकोंड्याच्या किल्ल्यावर मराठ्याचा भगवा झेंडा फडफडूं लागला !

---

## प्रकरण ३० वें.

खरे ले. १२२२] **दगलबाज चेला.** कार्तिक व. ३०

बन्सीधर महाराज आणि त्यांचा चेला शिवराम यांची गांठ घेऊन वाचकांस बरेच दिवस झाले आहेत, आणि त्यांच्या दर्शनाची उत्कंठा त्यांना लागली असण्याचा संभव आहे, सबब त्यांना आह्मी आज गरुडेश्वरी घेऊन जात आहोंत. मागील प्रकरणांत वर्णिलेल्या हकीकतीस आज जवळ जवळ महिना झाला असून, आज कार्तिक वद्य अमावस्या होती. मध्यरात्रीचा सुमार झाला असून थंडी मी ह्मणत होती, आणि नर्मदा तटाकावर तर ती विशेषच जाणवत होती. सारें आसमंत गारठून गेलें असून वन्य प्राण्यांपैकी ज्याला जशी सापडेल तशी त्यानें शीतनिवार-

णाची सोय केलेली दिसत होती. पक्षी आपल्या ऊबदार घरट्यांत गुडुप दडले होते, वन्य पशूंनीं जाळ्या, गवताचें रान इत्यादिकांचा आश्रय केला होता. फार काय पण हिंस्र श्वापदांना देखील आज आपल्या गुहांमधूनच गुपचूप पडून राहणें इष्ट वाटलें असावेंसें दिसतें, कारण गरुडेश्वराच्या आसपास त्यांची जाग आज कोठेंच ऐकूं येत नव्हती. सारी सृष्टी बधिर झाल्यासारखी दिसत असून एका रात-किड्याच्या किर्र आवाजाखेरीज दुसरा कसलाही ध्वनी ऐकूं येत नव्हता!

आपण जर या वेळीं बन्सीधर महाराजांच्या झोपडीत डोकावून पाहूं तर आपणांस असें दिसून येईल कीं, महाराजास गाढ झोप लागली असून ते शांत घोरत पडले आहेत. त्यांच्या धुमीतला लाकडाचा मोठा ओंडका जळून जाऊन आता हळू हळू विझूं लागला आहे. कोपऱ्यांत एक कंदील मिणमिण करीत असून तो अगदीं निमित्ताला टेकलेला दिसत आहे. महाराजांनी सर्वांगावर कांबळे लपेटून घेतले असून त्यांचे तेजःपुंज मुख मात्र उघडें आहे. त्यांनी आपले डोळे मिटले असून त्यांच्या नियमित व मंद घोरण्यावरून त्यांच्या निर्विकल्प मनाची साक्ष पटत आहे. त्यांच्याच शेजारीं झोपडीच्या तोंडाला शिवराम निजला असून, त्याच्याही अंगावर या खेपेस एक कांबळे दिसत आहे, यावरून त्याच्या निस्सीम गुरुभक्ती-वर संतुष्ट होऊन तें त्याला कोणातरी भाविकाने दिले असावे असे अनुमान करण्यास जागा आहे. महाराजांचा चिमटा झोपडीच्या एका पाक्याला खोवून ठेवलेला दिसत असून त्यांची लंगोटी, छाटी वगैरे वस्त्रे झोपडीच्या बाहेरच्या अंगाला दोरीवर लटकत आहेत. सारांश लहानशीच झोपडी खरी पण तिजमध्ये सर्वत्र स्वच्छता आणि टापटीप दिसून येत आहे!

पण वाचकहो, इतकी अपरात्र झाली असूनही शिवरामाचे डोळे उघडे का? त्याला अजून झोप कशी नाहीं? नर्मदेच्या पावन तटाकावर आणि बन्सीधर महाराजांसारख्या सत्पुरुषाच्या सानिध्यातही त्याच्या मनाला शांतता लाभली नसेल का? त्याच्या मनाला कसली बरे तळमळ लागली असावी? आपल्या जन्माचें सार्थक कसें होईल, महाराज आपल्यावर कधीं कृपा करतील, आपला उद्धार कसा होईल, याविषयींच का? कोणास ठाऊक, असेलही. एवढें मात्र खरें कीं, शिवराम रात्रीच्या रात्री जागून काढतो ही गोष्ट बन्सीधरबोवांना कळली होती, आणि 'तूं असा रात्रभर जागत जाऊं नको' असे त्यांनीं त्याला अनेक वेळा बजावलेही होतें. तरी देखील शिवरामानें आपला क्रम सोडला नव्हता, मग तो तसें का करीत होता नकळे! पण तो लुला पांगळा असूनही आपली जी यथाशक्ति सेवा करितो असें बोवांस वाटे, त्यातच या रात्रीच्या पहाऱ्याची भर

पडल्यामुळें शिवरामाच्या एकनिष्ठपणाबद्दल त्यांची खात्री झाली होती, आणि त्याला लवकरच मंत्रोपदेश करावा असा त्यानीं विचार ठरविला होता.

शिवराम डोळे उघडे ठेऊन पडला असतां त्याच्या मनात अनेक प्रकारचे विचार येत होते. मात्र ते कोणत्या प्रकारचे होते याच्याबद्दल आम्ही वाचकास निश्चित माहिती देऊं शकत नाहीं. एवढे मात्र निःसंशय सांगतो कीं, ते वन्सीधरबोवाच्या अपेक्षेप्रमाणे परमार्थविषयक नव्हते. शिवरामाच्या डोळयांतल्या पाण्याची विषारी चमक, मध्येंच त्याच्या कपाळावर पडणाऱ्या आठ्या, मधून तोंडावर चमकणारें विकट हास्य, क्षणात चर्येवर पसरणारी निराशेची छटा, व क्षणात खेळणारी आसुरी समाधानाची झाक, इत्यादि लक्षणावरून वाचक देखील हेंच अनुमान काढतील अशी आमची खात्री आहे. किंबहुना शिवरामाची जागृति हें त्याच्या मनःस्वास्थ्याचे द्योतक नसून ती त्याला एक भयंकर शिक्षाच झाली होती! तो एकसारखा तळमळत होता, वरचेवर या कुशीवरून त्या कुशीवर होत होता, मध्येच उठून महाराजाच्या चेहऱ्याकडे पाहत होता, आणि पुन्हा आडवा होत होता! वाचकहो, शिवरामाच्या मनात काहीही हेतू असो, आणि तो वन्सीधरबोवाच्या कृपेनें पूर्ण होईल अशी त्याची कितीही खात्री असो, तरी त्या हेतूच्या सिद्धीपासून होणाऱ्या समाधानाच्या मानाने प्रस्तुत त्याला होणारे शारीरिक क्लेश आणि मानसिक यातना ही दोन्ही अत्यंत दारुण नाहीत का? पण जाऊद्या, पापी मनाला आपल्या उद्दिष्ट कार्यसिद्धीपासून होणाऱ्या लाभापेक्षा ती कार्यसिद्धी होई पर्यंत आणि नंतरही सहन कराव्या लागणाऱ्या यातनात अधिक हानी आहे हें जर कळलें असतें, तर हे जग केव्हाच नंदनवन होऊन राहिलें असतें!

शिवराम अशा रीतीनें आपल्या विचाराच्या तंद्रीत गुंगला असता त्याला खोपीच्या आढ्यावरून काही तरी काळया रंगाचा पदार्थ हलल्याचा भास झाला, व तो एकदम चमकला. त्यानें अमळ निरखून पाहिलें, तों तो पदार्थ एखादा सरपटणारा प्राणी आहे आणि आढ्यावरून तो हळू हळू पुढें जात आहे असें त्याला वाटलें आणि त्याच्या पोटात एकदम धस्स झालें! तो तत्काळ गडबडून उठला, आणि हात लांब करून त्यानें कंदील घेण्याचा प्रयत्न केला, पण त्याच्या दुहेरी लुलेपणामुळें त्याचा तोल जाऊन तो आडवा पडला! पण त्याच्या तेवढ्या हालचालीची चाहूल त्या आढ्यावरच्या प्राण्याला लागूनच कीं काय, तो झपाट्यानें पुढें सरकूं लागला. शिवराम लगबगीनें उठला व कंदील उचलून बसल्या बसल्याच त्यानें वर नजर टाकली. त्याबरोबर त्याच्या तोंडून ‘ अरे बापरे! ’ असे शब्द बाहेर पडले आणि त्याचें सर्वांग एकदम बधिर झालें! कंदिलाच्या उजेडात त्याला

दिसून आलें कीं, आढ्यावरचा प्राणी ह्मणजे एक प्रचंड काळा साप असून तो आढ्याच्या टोंकावरून खालीं उतरूं लागला आहे आणि सध्यां आढ्यावर दिसणारा त्याच्या शरीराचा भाग हें त्याचें नुसतें शेपूट आहे!

शिवरामाचीं सारीं गात्रें एकदम थंड झाल्यासारखीं होऊन, आतां पुढें काय करावें हेंच त्यास सुचेना. बन्सीधर महाराजांना हांक मारून जागें करावें असें त्याच्या मनांत आलें, पण त्याची जीभच जड झाली होती, त्यामुळें त्याच्या तोंडून एकही शब्द फुटेना. आणखी कांहीं क्षण गेले. एवढया वेळांत तो साप आढयावरून खाली उतरला होता, ह्मणजे त्याचें तोंड जमिनीवर टेकलें होतें आणि शेपूट आढ्यावरच होतें! शिवरामाला आतां त्याचें सर्वांग स्पष्ट दिसूं लागलें, त्यावरून त्या सापाचा रंग उदी काळा असून त्याच्या अंगावर केस आले आहेत आणि तो निदान आठ दहा हात तरी लांब आहे, अशी त्याची खात्री झाली! शिवरामाची छाती दडपून जाऊन तो नुसता आ वासून त्या सापाकडे टकमक पहात राहिला! त्या सापास मात्र आपणावर मनुष्याची नजर गेल्याची जाणीव झाली होती यांत संशय नाही, कारण त्याचे तोंड जमिनीवर येतांच त्याने तें खोपींतून बाहेर खुसपण्याचा प्रयत्न चालविला. पण खोपीच्या पाक्याचा तळ जमिनीशीं चोहोंकडून तुस्त मिळवून सारवून सुरवून साफसुफ केला असल्यामुळे त्याला बाहेर पडावयास सांदर कोठेच सापडेना. त्याबरोबर तो मुरडला आणि खोपीच्या पाक्याच्या तळाला चिकटून बन्सीधरबोवाच्या उशाकडील बाजूनें सळसळ करीत निघाला!

आता मात्र बन्सीधर महाराजावर आलेल्या संकटाची जाणीव शिवरामाला झाली आणि त्याच्या अंगात एकदम विलक्षण चैतन्य संचरलें! त्याने इकडे तिकडे नजर टाकली, तों खोपीच्या पाक्यात खोवून ठेवलेला चिमटा त्यास दिसला. त्याने चटकन् पुढे होऊन तो चिमटा उपसून घेतला. इतक्यात बन्सीधरबोवाही झोपेंत चावळून या कुशीवरून त्या कुशीवर वळले. तोंपर्यंत सापही त्याच्या तोडाजवळ येऊन पोहोचला होता, त्याला बन्सीधरबोवाच्या कावळ्याच्या पदर लागून त्यानें एक फुसकारा टाकला! आणखी एक क्षण जाता, तर तो बोवांचा तोंडाला डसत होता; पण तितक्यांत शिवरामानें चपळाई करून चिमट्याचीं टोके मिळवून धरून त्याच्या तोंडावर इतक्या जोराने खुपसली की, ती त्याच्या तोडाचा वरचा भाग फोडून करकर आवाज करीतच आत शिरलीं! क्षणार्धांत शिवरामभटाच्या हाताला सापाच्या शेपटाचे दहा पाच विळखे पडले आणि त्यांनीं त्याच्या हाताला करकचून तणावे देण्यास सुरवात केली. पण शिवरामाच्या अंगांत आता हत्तीचें बळ संचरलें होतें. त्यांतच त्याला स्वतःच्या धोक्याची जाणीव होऊन दुप्पट अवसान

चढलें, आणि त्यानें जोरजोरानें सापाच्या तोंडाला चिमट्याच्या तराटण्या देऊन त्याच्या अगदीं चिंधड्या करून टाकल्या! इतक्यांत शेजारीं चाललेल्या या हाल-चालीमुळें बन्सीधर बोवाही जागे झाले आणि त्यांनीं डोळे उघडले. तोंच आपल्या उशाजवळ एक प्रचंड साप धडपड करीत असून त्याचे विळखे शिवरामाच्या हाताला पडले आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें! त्याबरोबर ते चटकन् उठले आणि त्यांनीं सभोंवतालच्या परिस्थितीकडे एकवार नजर टाकली. एका क्षणांत त्यांना आपल्यावर येऊन गेलेल्या संकटाची जाणीव झाली, आणि त्यांनीं स्मित करीत ' बेटा शिवराम, आज तूं आमचा प्राण वांचविलास. तुझे उपकार भग-वान् गरुडेश्वरजीवर झाले. तो सर्प आह्मांस झोपेंत चावला असता, तर आह्मी काय करणार होतों ? ' असे उद्गार काढले. इतक्यांत शिवरामाच्या हाताला सापाच्या विळख्यांचे तणावे लागले आहेत हें महाराजांच्या ध्यांनी येऊन त्यानी त्याला सोडाविण्याचा उपक्रम केला. त्यांनीं एका हातांत सापाच्या शेपटीचें टोंक धरून दुसऱ्या हाताच्या मदतीनें त्याला पीळ घालण्यास प्रारंभ केला. त्याबरोबर विळख्यांचे वेढे ढिले होऊन शिवरामाचा हात मोकळा झाला. नंतर महारा-जांनीं शिवरामास चिमटा उचलून घेण्यास सांगितले. शिवरामानें भीतभीतच चिमटा काढून घेतला. न जाणों चिडलेला साप आपल्या अंगावर उसळून येईल अशी त्याला भीती वाटत होती. पण त्याची ती भीती अस्थानीं होती. त्या सापाच्या तोंडाच्या चिंधड्या झाल्या असल्यामुळे आता नुसती वळवळ कर-ण्यापलीकडे त्याच्या हातून काही होण्याजोगें नव्हतें. बन्सीधरमहाराजानीं शेपटीला धरून साप उचलला आणि त्याला तसाच लोंबकळत घेऊन ते खोपीच्या बाहेर निघून गेले.

शिवरामभटाला आतां हायसें वाटलें, आणि खोपीच्या तोंडाशीं खरडत येऊन त्यानें आपल्या हातांतील चिमटा धुण्यासाठीं बाहेर ठेवून दिला. नतर बाहेरचें थोडें शेण घेऊन त्यानें सापाचें रक्त सांडलें होतें ते टिपून घेतलें व शेण गोळा फेकून दिला. नंतर चिमटा स्वच्छ धुऊन त्यानें पूर्ववत् पाक्यात खोवून ठेवला, व एकवार आपला हात स्वच्छ धुवून तो महाराजांच्या येण्याची वाट पहात राहिला. पण हें काय? बराच वेळ झाला तरी महाराज अद्याप कां येत नाहींत? चांगली एक घटका गेली. शिवरामाला महाराजाच्या सुरक्षितपणाबद्दल धास्ती वाटूं लागली. साप फेकून देऊन परत येण्यास महाराजांना इतका वेळ कां लागावा, अशी कल्पना मनांत येऊन तो अधीर झाला, आणि कदील उचलून घेऊन खरडत खरडत बाहेर निघाला. त्यानें एकवार देवळाच्या कट्ट्याकडे नजर टाकली, पण तेथें आज कोणीच भिल्ल वस्तीस आलेला नाही असें त्यास दिसून

आलें. तो तसाच पुढें सरला, पण बराच वेळ भोंवतालच्या गडद अंधारांत त्याला कांहीं दिसेना. पण लवकरच त्याची नजर दक्षिणेकडे जातांच बन्सीधर महाराज एकदांचे त्याच्या दृष्टीस पडले. पण ते आपल्या अटकळी प्रमाणें कोठें तरी विवळत पडलेले नसून आपणापासून थोड्याच अंतरावर शांत व निश्चल उभे आहेत असें त्यास दिसून आलें!

शिवरामभट चकित झाला. इतक्या अपरात्रीं, असल्या अंधेरांत आणि उघड्या जागेत महाराज काय करीत असावे याची त्याला कल्पना होईना. ते क्षेम कुशल आहेत याबद्दल तर त्याची खात्री झालीच, पण ते तेथे काय करीत असावे हें जाणण्याची त्याला प्रबळ जिज्ञासा उत्पन्न होऊन तो हळूं हळूं खरडत त्यांचे जवळ गेला. शिवरामाला आज एकामागून एक आश्चर्याचाच अनुभव येण्याचा योग असावा असे दिसलें. कारण महाराजाचे शेजारी गेल्यावर त्याला साप तर कोठे दिसला नाहींच, पण असे मात्र दिसून आलें कीं, महाराज नदीवर स्नान करून येऊन ओलेत्यानें उभे आहेत, त्यांच्या अंगावरून पाणी निथळतें आहे, त्यांनी आपल्या भोवती काटकुटीनें एक मंडळ काढले आहे, ते तोडानें कांहीं तरी पुटपुटत आहेत, आणि त्यांच्यापुढे एक लिंबू पडले असून त्याला सुया टोचल्या आहेत व त्याच्यावर कुकूं शिपडले आहे!

हें काय गौडबंगाल आहे हेंच शिवरामभटास समजेना. तो आश्चर्यानें अगदी मूढ होऊन गेला. महाराज येथे कसे आले, हे लिंबू कुठले, महाराज ओलेत्याने काय करीत आहेत, याची त्याला काहीच कल्पना होईना. तो महाराजाच्या तोंडाकडे पहात राहिला. पण त्याची कुचंबणा संपावयाची वेळ आली. महाराजानी आपले पुटपुटणें बंद केलें, आणि ते शिवरामभटाकडे वळून ह्मणाले, ' बेटा शिवराम, तूं माझ्या मागून येथें कशाला आलास? तुला माझ्याबद्दल काळजी वाटूनच तू आलास याबद्दल माझी खात्री आहे, पण वेड्या, आमच्यासारख्याचा इतका पाठलाग तुला उपयोगाचा नाहीं. एखादे वेळीं तुझ्या जिवावर बेतावयाचे!'

महाराजांच्या बोलण्याचा आशय शिवरामाला चांगलासा उमगला नाहींसें दिसले. तथापि त्यांच्या शेवटच्या शब्दांचा अर्थ त्याला कळला, व तो ह्मणाला, ' महाराज, आपण कर्तुमकर्तुं समर्थ आहांत. अर्थात् आपल्या संरक्षणाला दुसऱ्याची गरज नाहीं. तरी पण माझ्यासारख्या आपल्या अज्ञ भक्तांना आपल्या क्षेमकुशलाबद्दल हुरहूर वाटल्या वांचून कशी बरें राहील? आतां माझ्या जिवावर बेतण्यासंबंधी ह्मणाल, तर त्याची मला मुळींच काळजी नाहीं. ती करण्यास आपण समर्थ आहांत!'

शिवरामाच्या अनन्य निष्ठेचें महाराजांना कौतुक वाटलें. ते स्मित करून ह्मणाले, "शिवराम, बेटा तूं अज्ञ असशील, पण आज तुझ्या हातून दोन जीवांचें संरक्षण व्हावें असा ईश्वरी संकेत होता. एक तर सर्पाच्या तडाक्यांतून खुद्द माझें आणि दुसरें –" इतकें ह्मणून महाराज थांबले. पुढचा मजकूर शिवरामाला सांगूं नये असें त्यांना वाटलें असावें.

"आणि दुसरें कोणाचें महाराज?" शिवरामभटानें विस्मयानें विचारलें. शिवरामाच्या या प्रश्नाला उत्तर देऊं नये अशी महाराजांची इच्छा होती. पण आज ते त्याच्यावर इतके खुष झाले होते कीं, त्याच्या पासून कांहींही छपवून ठेऊं नये असें त्यांच्या मनांत आलें आणि ते ह्मणाले, "बेटा शिवराम, आज तुझ्या हातून नकळत दुसऱ्या एका जीवाचें रक्षण झालें आहे. हें लिंबूं पाहिलेंसना? ही मूठ आहे, आणि ती कोणा तरी दुष्टानें दुसऱ्या एका इसमावर मारली होती. मी सापाला टाकावयास ह्मणून बाहेर आलों तों ती वरून घुमत चाललेली मला कळली, आणि मी ती अडवून पाडली. मी जर जागा होऊन आलो नसतों, तर या मुठीनें त्या बिचाऱ्या अज्ञात इसमाचा प्राण घेतला असता. अर्थात् तूं मला जागें केलेंस ह्मणूनच तो मनुष्य वांचला आणि एवढ्याकरितांच त्याच्या बचावाचें श्रेय तुला देणें जरूर आहे.

"महाराज, हा थोरपणा या पामराला आपण उगाच देत आहांत," शिवराम ह्मणाला, 'आपल्या अंगीं मूठ अडविण्याचें अद्भुत सामर्थ्य नसतें, तर मी आपणांस जागें करून तरी काय उपयोग होणार होता!'

'तें कांहीं असो,' महाराज ह्मणाले, 'पण आज आह्मी तुजवर प्रसन्न झालों आहोंत एवढी गोष्ट खरी. बोल, बेटा तुला काय पाहिजे तें मागून घे. तूं आमच्या सेवेला जो राहिलास तो कांहीं तरी हेतूनेंच राहिला असशील. तो तुझा हेतु, मग तो कांहींही असो, तूं मला सांग. मी तो आतांच्या आतां पूर्ण करितों.'

शिवरामाच्या डोळ्यांत आनंदाची लकेर चमकून गेली. आपल्या सेवेचें सार्थक होण्याची वेळ आली हें त्यानें ओळखलें. पण वाचकहो, शिवराम भट असा बाचकतो कां बरें? आपलें मागणें महाराजांना आवडणार नाहीं अशी तर त्याला भीती वाटत नसेल ना?

'कां शिवराम, कां बोलत नाहींस?' महाराज ह्मणाले,' तूं संकोच करूं नको, तुझ्या इच्छेला येईल तें माग. बोल, काय तुझें अंग पूर्ववत् करून पाहिजे, कां तुला संपत्ति पाहिजे, कां राज्य पाहिजे, कां मोक्ष पाहिजे?'

‘ पण महाराज, ’ शिवराम ह्मणाला, ‘ मी मागेन तें आपण खरोखरीच द्याल ना ? ’

‘ अरे बेटा, तुला संशय कसला वाटतो ? ’ बन्सीधरबोवा ह्मणाले, ‘ तूं काय पाहिजे तें माग, मी तें या क्षणीं पूर्ण करीन असें तुला वचन देतों. ’

‘तर मग महाराज, ’ शिवराम जिवाचा धडा करून ह्मणाला, ‘ माझें आपणाजवळ असें मागणें आहे कीं, आपण ही मूठ अशीच पुढें पाठवावी, आणि ती पुण्याच्या माधवराव पेशव्यांवर लागू करावी ! माझी दुसरी कांहीं इच्छा नाहीं. ’

बन्सीधरबोवा स्तंभित झाले ! आपण ऐकलें हें शुद्धीवरच कां असा त्यांना क्षणमात्र संशय आला. काय ? इतके दिवस आपलें शिष्यत्व पतकरून राहिलेला, आपली इलाल सेवा करणारा, आणि आपल्या परमार्थाच्या गोष्टी भाविकपणानें ऐकणारा शिवराम असला हिडिस आशय पोटांत धरून राहिला असेल ? बन्सीधरबोवाचें डोकें भिराभिरूं लागलें. त्यांची वेड्यासारखी अवस्था झाली. ते आर्त होऊन ह्मणाले, ‘ शिवराम, बेटा तूं काय ह्मणालास ? काय शब्द उच्चारलेस ते ? छे, पण तूं तसें ह्मणाला नाहीस, मीच काही तरी भलतें ऐकलें खास ! ’

‘ नाहीं महाराज, ’ शिवराम आवेशानें ह्मणाला, ‘ आपण ऐकलें तेच खरें. माझा कट्टा दुष्मान् माधवराव पेशवा मेलाच पाहिजे. मी आपणांस एकदांच सांगतों की हा एकच हेतु पोटांत धरून मी आजपर्यंत आपली सेवा केली. मला आपण तिचे कांहीं फळ देणार असाल तर हे द्या. नाहीं तर आपले वचन खोटें करा आणि मला निरोप द्या. हे शब्द बोलत असतां शिवरामाच्या चर्येवर खुनी मनुष्याची धुंदी चढली होती.

‘ अरेरे चंडाळा, दुरात्म्या ! ’ बन्सीधर उसळले, ‘ काय बोललास हें ? मी केवळ तुझ्या वचनात गुंतलें, एवढ्या गोष्टीचा फायदा घेऊन मला नरकाचें साधन करावयास सांगतोस ? शिवराम, अरे लाखांचा पालनवाला, मनुष्यांचा मुकुटमणि माधवराव पेशवा, आणि त्याला मारावयास सांगतोस ? हरहर अधमा, तुझा सत्यनाश होईल, तुझ्या अंगांत महारोग भरेल ! तूं प्रळयकाळपर्यंत रौरव नरकांत पडशील हाच माझा तुला शाप आहे ! ’

‘ माझा सत्यनाश होऊं दे, मला नरकवास होऊंदे, काय पाहिजे तें होऊंदे, ’ शिवराम विकट हास्य करीत म्हणाला, ‘ पण माझा वैरी या जगातून नाहींसा होऊंदे.’

‘हाय हाय !’ बन्सीधर विव्हळ होऊन म्हणाले, ‘शिवराम दुसरें कांहींही माग. प्रत्यक्ष परमेश्वराला आणून तुझ्यापुढें उभा करावयास सांग, करितों; पण एवढे शब्द माघारे घे. माझ्या साऱ्या तपश्चर्येवर पाणी ओतून मला नरकांत लोटूं नको.

शिवराम इकडची सृष्टि इकडे करून टाकण्याचें सामर्थ्य असलेला हा बन्सीधर तुला शरण आला आहे. याला एवढी भीक घाल.' हे शब्द बोलत असतां बोवांचा कंठ दाटून येऊन त्यांच्या डोळ्यांतून टपटप् अश्रु पडत होते.

पण शिवरामभट या वेळीं राक्षस बनला होता. त्याला त्या सत्पुरुषाची यत्किंचित् दया आली नाहीं. त्यानें निष्ठुरपणानें उत्तर केलें 'महाराज, आपण कांहींही सांगितलें तरी त्याचा उपयोग होणार नाहीं. माझा निश्चय ठरला आहे. माझें मागणें आपणास पूर्ण करावयाचें नसलें तर आपणास वचनभंगच केला पाहिजे.'

'असेंच झालें ना अखेर !' बन्सीधर कपाळावर हात मारून घेऊन म्हणाले, 'बरें आहे, गरुडेश्वरच मला नरकांत लोटावयास तयार झाला म्हणावयाचा ?' असें म्हणून बोवांनीं आपली दृष्टि अर्धोन्मीलित करून लिंबावर रोखली आणि ते तोंडानें कांहीं मंत्र पुटपुटूं लागले. त्यांच्या डोळ्यातून अश्रूंचे लोट वाहत होते. शिवराम त्यांच्या कृतीकडे कौतुकाने पाहात होता. थोडा वेळ गेल्यावर तें लिंबू जमिनीपासून अमळ उचलल्याचा त्याला भास झाला. शिवरामाचा आनंद गगनांत मावेना. क्षणभरांत तें लिंबू चांगलें हातभर वर चढलें, आणि आपल्या भोंवतीं गिरक्या घेऊं लागलें. तेंही बिचारें आपणावर सोपविलेलें निंद्य कृत्य करण्यास नाराज असावें असें दिसलें! त्याची अडचण ओळखूनच कीं काय, बन्सीधरानीं आपल्या भोंवतालच्या मंडळाची दक्षिणेकडची एक हातभर रेषा पुसून टाकली. त्याबरोबर तें लिंबू एकदम दक्षिणेकडे सरलें आणि सूं सूं अवाज करीत पाखरासारखें भुर्रकन उडालें ! शिवरामभटाच्या डोळयात आसुरी आनंद चमकला, पण बन्सीधर बोवांनी मात्र 'हाय रे भगवान्' असें मोठ्यानें म्हणून एक किंकाळी फोडली व ते बेशुद्ध होऊन धाडकन् जमिनीवर कोसळले !

---

## प्रकरण ३१ वें

Warren Hastings p. 43, 48. ख. ले. १०५०, १०६१. } **अर्काटचें राजकारण.** { कार्तिक व. ३०.

त्याच ह्मणजे कार्तिक वद्य अमावास्येच्या दिवशी, अर्काट येथें इंग्रज कंपनीच्या वखारींत एका सुंदर बंगल्यांत वॉरन हेस्टिंग्स आणि चिकबाळाप्पा दलाल बोलत बसले होते. अर्काटचा नबाब महमदअल्ली याजवर प्रस्तुत इंग्रजांची छाप इतकी होती की, त्यानें त्यांना व्यापाराच्या बऱ्याच सवलती दिल्या होत्या, आणि

आपल्या राजकारणाचीही सूत्रें बहुतेक त्यांच्याच हातीं सुपूर्त केलीं होतीं. एका शब्दांत बोलावयाचें ह्मणजे तो त्यांच्या ताटाखालचें मांजर बनून सर्वस्वीं त्यांच्या तंत्रानें चालूं लागला होता. आणि त्यांच्यावर त्याचा इतका विश्वास बसण्यास तशींच बलवत्तर कारणेंही झालीं होतीं. एक तर त्याचा हाडवैरी जो हैदरअल्ली याजबरोबर नुकत्याच झालेल्या युद्धात इंग्रजांनीं त्याला मनापासून साह्य केलें होतें. शिवाय त्यानीं त्याच्याशीं कायम मैत्रीचा तह करून त्याच्या संरक्षणाची हमी पतकरली होती, आणि त्याच्या राज्यातल्या व्यापाराची घडी नीट बसवून दिली होती. या सर्व कारणामुळें महमदअल्लीला इंग्रज कंपनी अत्यंत प्रिय झाली होती यात नवल नाहीं. त्याच्या या मोहबतीचा फायदा घेऊन इंग्रजांनींही अर्काट येथें आपली एक वखार स्थापली असून दक्षिण कर्नाटकातल्या व्यापाराचें केंद्र तेथेंच केलें होतें. त्यानीं अर्काटच्या वखारींत काहीं बंगले बांधविले होते व आपली एक स्वतंत्र वसाहत केल्यासारखी करून तिजभोवती तटही उभारला होता. अर्थात् तो स्वतःच्या संरक्षणाकरितां नसून महमदअल्लीवर जर एखादें परचक्र आलें तर त्यालाच आश्रय घेण्यास उपयोगी पडावा ह्मणून होता, निदान महमदअल्लीची त्यानीं तशी खात्री करून दिली होती. या तटाच्या आतील बंगल्यापैकीं एकात प्रस्तुत आह्मी वाचकास घेऊन जात आहोत.

हा बंगला चांगला शृंगारलेला असून प्रशस्त व हवाशीर होता. कोचें, खुर्च्या, टेबलें, बैठकी, कुंड्या वगैरे इंग्रजी पद्धतीचें सामान सुमान त्यांत विपुल दिसत असून तें मोठ्या व्यवस्थित रीतीनें मांडलें होतें. हेस्टिंग्स अर्काट येथें असला ह्मणजे याच बंगल्यात राही, यावरून त्या बंगल्यास त्याचेंच नांव पडलें होतें. इतर बंगल्याच्या मानाने या बंगल्याचा शृंगार विशेष दिसत होता, याचें कारण खुद्द अर्काटचा नबाब महमदअल्ली तसेंच काहीं गुप्त आणि महत्वाचें खलबत करावयाचें असलें ह्मणजे याच बंगल्यांत येऊन हेस्टिंग्सला भेटत असे. या वेळीं अर्काटला मोठ्याच राजकारणाचा फड पडला होता. मद्रासचा गव्हर्नर ड्युप्री याच्या मनांतून महमदअल्लीनें प्रस्तुतच्या मराठे-हैदराच्या युद्धात हैदराला कुमक करावी असें होते, आणि त्या दिशेनें त्याचें मन वळविण्याची कामगिरी ड्युप्रीनें हेस्टिंग्सवर सोंपविली होती. इंग्लंडच्या राजाकडून स्वतंत्र रीतीनें वकील ह्मणून आलेला प्रतिनिधि सर जॉन लिंडसे हाही याच वेळीं अर्काट येथें असून, त्याचें इंग्रज कंपनीशीं जमत नसल्यामुळें महमदअल्लीनें त्याला आपल्या राजवाड्यांत जागा दिली होती. त्याची महमदअल्लीला अशी शिकवण होती की, त्यानें मद्रासकर इंग्रज कंपनीच्या तंत्रानें मुळींच न चालतां, आपली परिस्थिति पाहून तदनुसार

वर्तन करावें. याच वेळीं श्रीमंत पेशवे सरकारांकडून माधवराव सदाशिव नांवाचा एक वकील अर्काटला आला असून, त्यानें महमदअल्लीजवळ अशी विनंति चालविली होती कीं नबाबानें प्रस्तुतच्या युद्धांत मराठ्यांस साहाय्य करावें. तिघांच्या शिकवणीचे असे तीन प्रकार असून त्यांच्या पैकीं कोणाचें ऐकावें असा महमदअल्लीस मोठा पेच पडला होता.

खरें ह्मटलें तर हें राजकारण उपस्थित होऊन बरेच दिवस झाले होते, हें मागील एका प्रकरणांत वाचकांस ठाऊक झालेंच आहे. मराठ्यांची हैदरावर स्वारी झाली त्याच वेळीं हैदरानें आपल्या व इंग्रजांच्या दरम्यान् झालेल्या तहाअन्वयें त्यांचेपाशीं कुमक मागितली होती. इंग्रज कंपनीला तूर्त युद्धात प्रत्यक्ष भाग घेण्याची धमक नसल्यामुळें त्यांनीं तें काम महमदअल्लीकडून करविण्याचा घाट घातला होता. पण महमदअल्ली हैदराचा पक्का द्वेष्टा असल्यामुळें त्यानें त्यांची शिकवण धुडकावून लाविली होती. उलट लिंडसेच्या शिकवणीप्रमाणें हैदरविरुद्ध मराठ्यांनाच मदत करावी, असे महमदअल्लीच्या मनांत फार फार येत होतें. मद्रासकर कंपनीला ही गोष्ट अगदींच अप्रिय होती. कर्नाटकांत मराठ्यांचे पारडें जड झाले कीं, तें आपल्याला बाधक होईल ही गोष्ट ते जाणून होते, आणि म्हणूनच त्यानीं नाना प्रकारांनीं महमदअल्लीचें मन वळवून त्याला मराठ्यांना मिळण्याचे थोपवून धरलें होतें, इतकेंच नव्हे तर 'लिंडसे हा कंपनीच्या कारभारांत ढवळाढवळ करतो' अशी त्यानीं इंग्लंडच्या राजाकडे तकरारही नेली होती! त्यानंतर हे राजकारण कांहीं दिवस तसेंच भिजत पडलें होते. पण नुकताच पुण्याहून माधवराव सदाशिव नांवाचा एक वकील महमदअल्लीकडे आला, आणि त्यानें त्याच्याकडे पेशवे सरकार तर्फें मदतीची याचना केली. महमदअल्लीने त्याला जवळजवळ रुकार दिला, पण इतक्यांत महमदअल्लीच्या पाळतीवर असलेल्या इंग्रज मंडळींना त्याची बातमी लागून त्यानीं हेस्टिंग्सला लगबगीनें अर्काटला पाठविलें, आणि नबाबाचा हा बेत रहित करण्याची कामागिरी त्याच्याकडे सोंपाविली. हेस्टिंग्सवर नबाबाचा इतका विश्वास होता कीं, तो येतांच त्याने आपल्या मनांतील बेत त्याच्यापाशीं ताबडतोब बोलून दाखविला. हेस्टिंग्सनें प्रथम तो आपणांस फार फार पसंत पडला असें दाखविलें, पण पुढें एक एक शंका काढून व भोळ्या नबाबाला जागाजागीं अडवून त्यानें त्याचें मन इतकें फिरवून टाकलें कीं, माधवराव सदाशिवाशीं जवळ जवळ वचनबद्ध झालेल्या नबाबानें आपला नक्की निर्णय देण्यास दोन दिवसांची मुदत मागून घेतली, नंतर ती चार दिवसांची केली, नंतर त्यांत

आणखी दोन दिवसांची वाढ केली, आणि अखेर आज ह्मणजे कार्तिक वद्य आमावास्येच्या दिवशीं काय तें नक्की सांगतों, असें त्यास सांगितलें! आज संध्याकाळीं नबाबानें हेस्टिंग्सच्या बंगल्यावर यावयाचें, त्याची सल्लामसलत घ्यावयाची, आणि नंतर माधवराव सदाशिवाशीं अखेरचें बोलणें करावयाचें, असा नबाब आणि हेस्टिंग्स याच्या दरम्यान् संकेत ठरला होता. महमदअल्लीस यावयास अजून थोडा अवकाश होता, इतक्यात चिकबाळाप्पा भेटावयास आल्याची वर्दी हेस्टिंग्सला मिळाली आणि त्यानें त्याची गांठ घेतली. त्यांची भेट चालली असतांच आपण तेथें प्रविष्ट झालों आहोंत हे आतां वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल.

हेस्टिंग्सची स्वारी आज खूपच खुषींत दिसत होती. त्याचा प्रत्येक बेत त्याच्या मनाप्रमाणें सिद्धीस चालला होता. त्याचें व हेन्रिएटाचे प्रेमरहस्य तिच्या नवऱ्याला उमगल्यामुळें आपली काय अवस्था होईल अशी जी त्याला चिंता लागली होती ती आतां सर्वथा दूर झाली होती. इतकेंच नव्हे तर हेन्रिएटानें फ्राकोनियन कचेरींत आपणावर घटस्फोटाचा दावा करावा, त्याचा निकाल होईपर्यंत हेन्रिएटानें व आपण एकत्र रहावें, आणि तोंपर्यंत हेन्रिएटाच्या कोणत्याही व्यवहारात आपण मन घालणार नाहीं, असें बॅरन इम्हॉफनें नक्की ठरविलें असल्यामुळें हेस्टिंग्सची चागली सोय झाली होती! हेस्टिंग्सनें बॅरनच्या या स्तुत्य धोरणाची मोठी प्रशंसा करून त्यानें दिलेल्या सवलतीचा पूर्ण फायदा घेतला व हेन्रिएटाकडून त्याच्यावर फिर्याद देवविली! तिचा निकाल होण्यास जरी अद्याप अवकाश होता, तरी धीम्या स्वभावाचा हेस्टिंग्स त्याकरितां मुळींच उतावीळ झाला नव्हता! आमच्या वाचकांना हा सर्व व्यवहार पाहून मोठें आश्चर्य वाटेल, आणि त्यांच्या भावनांना मोठा धक्का बसेल हें आह्मी जाणून आहो, पण त्यांना आह्मी या बाबतींत तीन मोठ्या शिष्टाचे आधार देऊन गप करूं शकूं अशी आमची खात्री आहे. ग्लीग नावाचा धर्मोपदेशक यासंबंधी अशी ग्वाही देतो कीं, ‘ इम्हॉफ आणि त्याची बायको मद्रासच्या मुक्कामांत आणि पुढें कलकत्यांतही चागला लौकिक संभाळून राहिलीं! ’ मेकॉले हेस्टिंग्सला पुढील शब्दांत शिफारसपत्र देतो, ‘ हेस्टिंग्सच्या इतर मनोविकारांप्रमाणेंच त्याचे प्रेम देखील मोठें जोरकस होतें, आणि त्यामध्यें उतावीळपणा मुळीच नव्हता! ’ आणि हेस्टिंग्सचे चरित्रकार ट्राटर असा इत्यर्थ सागतात कीं, ‘ हेस्टिंग्सच्या वागणुकींत आत्मसंयमन आणि नाजूक स्त्रीदाक्षिण्य हे गुण विशेष उठावदार होते!! ’ आता याउपरही आमचे वाचक या प्रेमव्यवहाराला नाकें मुरडणार असतील तर आमचा नाइलाज आहे!

कपाशीच्या व्यापाराच्या बाबतीतही हेस्टिंग्सच्या योजनेला पूर्ण यश आलें होतें. गेल्या सालीं दक्षिण कर्नाटकांत तयार झालेला बहुतेक कपाशीचा माल इंग्रज कंपनीच्या वखारीत विकावयास आला होता, आणि चालू सालींही तो येईल अशी त्याला खात्री वाटत होती. किंबहुना चिकबाळाप्पाकडून आज त्या बाबतींत पुन्हा एकदा खातरजमा करून घ्यावयाची असें त्याला पाहतांच हेस्टिंग्सनें आपल्या मनाशीं ठरविलें होतें. चिकबाळाप्पा येऊन दिवाणखान्यात बसला आणि त्याचे व हेस्टिंग्सचे प्रास्ताविक कुशल प्रश्न झाले. नंतर हेस्टिंग्सनें बाळाप्पास प्रश्न केला, ' काय नाईक, तुमच्या मालाच्या विक्रीची सर्व रक्कम तुमच्या पदरांत पडली ना? '

' पडली, ' बाळाप्पा नाइकानें उत्तर केलें, ' पण शेतकऱ्यांची थोडीशी तक-रार राहिली आहे. त्याचें ह्मणणें असें आहे कीं, आमच्या मालाच्या गाड्या इकडे येत असतां पेशव्यांच्या सैन्यानें त्यांतल्या कांहीं गाड्या वाटेंत अडवून त्याच्या-कडून जबरीनें खंडणी घेतली. ती सर्व, निदान तिच्यातील कांहीं तरी हिस्सा कंपनीनें आपणांस भरून द्यावा. '

' काय संबंध? ' हेस्टिंग्स डोळे फिरवीत ह्मणाला, ' खंडणी घेणार पेशवे, आणि नुकसान भरून देणार आह्मी; हा खासा न्याय ह्मणावयाचा? '

' नाहीं, तशी नुकसानी मागण्याचा हक्क शेतकऱ्यांना कांहींच नाहीं, ' बाळाप्पा नाईक ह्मणतो, 'पण थोडकी बाब आहे, थोडी चिरीमिरी त्यांच्या तोंडावर टाकून दिली, ह्मणजे तितकीच त्यांच्यावर छाप बसणार आहे, इतकीच गोष्ट. '

' हे मराठे ह्मणजे कसे लुटारू लोक आहेत याबद्दल आता तरी तुह्मां कर्ना-टकी लोकांची खात्री झाली ना? ' हेस्टिंग्स ह्मणाला, ' तीच आमच्या कंपनीची शिस्तही तुह्मी पाहिलीतच. रोख आणि चोख व्यवहार, लोकाचा एक वावगा पैसा सुद्धां आह्मी घेणार नाहीं. बरें, तुमच्या किती गाड्यांकडून मराठे लोकांनीं खंडणी घेतली ह्मणता? '

' पाचशें गाड्याकडून, ' बाळाप्पानें उत्तर केलें.

' अरे बापरे! ' हेस्टिंग्स उद्गारला, ' मग खंडणीची रक्कमही अशीच बेसु-मार घेतली असेल? '

' फार नाहीं, ' बाळाप्पानें उत्तर केलें, ' गाडीमागें रुपायाप्रमाणें पाचशे रुपये घेतले. ते तरी काय, त्या फौजेंत खासा पेशवे होते ह्मणून इतक्या थोडक्या रकमेवर निभावलें, नाहीं तर त्या मराठे भुतानीं आह्मांला सफाई नागवलें असतें! '

'तें कांहीं असलें तरी एवढी मोठी नुकसानी कंपनी कधींच भरून देणार नाहीं' हेस्टिंग्स मान हलवीत ह्मणाला, ' अगोदर नुकसानी ह्मणून आह्मी कांहींच देणार नाहीं. शेतकऱ्यांना चिरीमिरी ह्मणून वाटल्यास पांच पंचवीस रुपये देऊं.'

पांच पंचवीस रुपये कोणाच्या नाकाला लावावयाचे याचें बाळाप्पाला मोठेंच कोडें पडलें. कंपनीनें निदान अडीचशें रुपये तरी भरून द्यावे असा त्यानें हेस्टिंग्सला पुष्कळ आग्रह केला, "शेतकऱ्यांच्या गाड्या कंपनीच्या वखारीकडे यावयास निघाल्या ह्मणून त्यांना ही ठोकर बसली, अर्थात् या नुकसानीबद्दल कंपनी थोडीबहुत जबाबदार आहे" इत्यादि युक्तिवाद करून पाहिला, पण व्यर्थ, अडीचशें रुपये भरून देण्याचें हेस्टिंग्सने साफ नाकारलें. शेवटीं होय नाही करितां करितां हेस्टिंग्सनें शेतकऱ्याना शंभर रुपये बक्षीस ह्मणून देण्याचें कबूल केलें, व बाळाप्पा नाइकाजवळ रुपये देण्याबद्दल मद्रास येथील कंपनीच्या मालावरील अधिकाऱ्यास एक पत्र लिहून दिलें. हेस्टिंग्स पत्र लिहीत असतां चपराशासारखा पोषाख केलेली एक व्यक्ति बागेंतून त्याच्या पडवीपर्यंत आली आणि दिवाणखान्याकडे एकवार लक्ष्य-पूर्वक पाहून झपाट्यानें निघून गेली. हें कृत्य त्या व्यक्तीनें इतक्या सफाईनें केलें कीं पडवींतच एका बाकावर बसलेल्या खुद्द हेस्टिंग्सच्या चपराशास तिच्या येण्याजाण्याचा मागमूस सुद्धा लागला नाहीं! शेतकरी लोकाना थोडक्याकरितां नाराज करू नये ही बाळाप्पाची सूचना हेस्टिंग्सला ग्राह्य वाटूनच त्यानें हें पत्र दिलें हें वाचकानीं ताडलेंच असेल. निदान हें पहिलेंच साल असल्यामुळें व या सालीं एकंदर दक्षिण कर्नाटकातून अडीच पावणेतीन हजार कपाशीची गाडी इंग्रज वखारीकडे माल घेऊन आली असल्यामुळे चालू सालीं तरी कर्नाटकाच्या शेतकऱ्याना राजी राखणें हेस्टिंग्सला इष्ट वाटलें आणि ह्मणूनच त्यानें शंभर रुपयाची खैरात करण्याचें कबूल केलें हें उघड आहे. नंतर काहीं वेळ इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर, गेल्या डोंगरच्या भाकणुकीच्या वेळीं आपण यल्लाप्पा धनगराजवळ बीरण्णाचें देऊळ दुरुस्त करण्यासंबंधीं दिलेल्या कबुलीची हेस्टिंग्सला आठवण झाली, आणि चालू सालच्या भाकणुकीच्या वेळीं पुन्हा हजर राहून आपला नवस पुरा करावयाचा, असा आपला निश्चय हेस्टिंग्सने चिकबाळप्पाजवळ बोलून दाखविला. नतर त्या दोघांनीं मिळून देवळाच्या जीर्णोद्धारास व भाकणुकीच्या जागीं एक छप्पर उतरावयास अंदाजी खर्च काय येईल याचा सुमार काढला आणि येत्या भाकणुकीच्या दिवशीं बीरण्णाच्या माळावर जाहीर रीतीनें तेवढी रक्कम हेस्टिंग्सनें चिकबाळप्पाच्या हवालीं करावयाची आणि चिकबाळाप्पानें तें काम स्वतःच्या देखरेखीखालीं पुरें करावयाचें असें ठरून, बाळप्पानें पुन्हा येत्या

सालीं कर्नाटकांतला सारा कपाशीच्या माल कंपनीच्या वखारींत विकावयास आण-ण्याची हमी हेस्टिंग्सला दिली व त्याचा निरोप घेतला.

चिकबाळाप्पाला जाऊन फार वेळ झाला नाही तोंच एका हुजऱ्यानें येऊन हेस्टिंग्सला मुजरा केला आणि डोळ्यांनीं कांहीं संकेत केला. त्याबरोबर "होय कां?" असें ह्मणत हेस्टिंग्स उठला आणि पडवींतून पुढें झाला. या वेळीं अगदीं करकरीत तिनीसाज झाली असून वखारीच्या आवारांत सर्वत्र गडद अंधकार पडला होता. वखारींतील बंगल्यातून लावलेले दिवे अंधाऱ्या रात्रींतल्या तारकांसारखे लुकलुक करीत होते. खुद्द हेस्टिंग्सच्या दिवाणखान्यांत एक शाम-दान आणि पडवींत एक कंदील एवढीच रोशनाई होती. हेस्टिंग्स व त्याचा चपराशी पडवीच्या पायऱ्या उतरून खालीं आले ही संधी साधून मघांची चप-राशासारखा पोषाख केलेली व्यक्ति पडवीच्या वाटेनें झपाट्यानें येऊन हेस्टिंग्सच्या दिवाणखान्यांत शिरली, व क्षणार्धांत अदृश्य झाली. हेस्टिंग्स पुढें झाला तोंच एक पन्नास पंचावन्न वर्षें वयाचा बहुमोल वस्त्रें पेहेरलेला मनुष्य बागेंतल्या वाटेनें पडवीकडे येत असलेला त्यास दिसला. हाच अर्काटचा नबाब महमदअली होय हें वाचकांनीं ताडलेंच असेल. महमदअलीबरोबर या वेळीं एका हुजऱ्या-वांचून दुसरा कोणी परिवार नव्हता. आज तो जो असा सडा आला होता, त्याचें कारण इतकेंच कीं, ही त्याची हेस्टिंग्सला खासगी भेट होती. हेस्टिंग्सनें नबाबाचें स्वागत करून त्याच्याशी अदबीनें हस्तादोलन केलें आणि तो त्यास दिवाण-खान्यात घेऊन गेला. नंतर ते दोघे स्थानापन्न झाल्यावर नबाबानें दगदगींतून सुटलेल्या एखाद्या मनुष्याप्रमाणें हश्श हुश्श व अंगविक्षेप केले आणि नंतर तो हेस्टिंग्सला ह्मणाला, "हेस्टिन् साहेब, आतां या माधवराव सदाशिवाला काय उत्तर द्यावें याचें मला कोडें पडलें आहे. हैदरला तर काही झालें तरी कुमक करावयाची नाहीं असा माझा पक्का निश्चय ठरला आहे. पण पेशव्याना सामील व्हावयाचें का नाहीं याविषयीं मात्र मनाचा काही निर्णय होईना, आणि ह्मणूनच तुमची बहुमोल सल्ला घ्यावी एवढ्याकरिताच मी तुमच्याकडे आलो आहे."

'नबाबसाहेब हा मला उगीच बहुमान देत आहेत,' हेस्टिंग्स ह्मणाला, 'आपल्यासारख्या हुषार व धोरणी मुत्सद्याला मी काय सल्लामसलत देणार ह्मणा, पण आपण विश्वासानें विचारीतच आहांत तर मलाही माझें प्रामाणिक मत असेल तेंच सांगणें भाग आहे. आपण आज मराठ्यांना कुमक केली आणि मराठ्यांचा जय झाला तर ते आपणास हैदराच्या मुलखांतला कांहीं मुलूख बक्षीस देतील हें

खरें, पण हैदराशीं तह करून ते देशीं निघून गेल्यावर आपणांस मात्र हैदराशीं कायमची गाठ आहे हें आपण ध्यानांत ठेवा. हैदरासारख्या प्रबळ व कावेबाज शत्रूशीं अशा रीतीनें कायमचें वैर जोडून ठेवणें कितपत इष्ट आहे याचा विचार करूनच आपण काय तें ठरवावें.'

'हैदराशीं वैर आमचें आज तरी कोठें नाहीं?' महमदअली उद्गारला, 'त्याचें आमचें कधींपासूनच जुंपलें आहे. आणि ह्मणूनच मनांत येतें कीं मराठ्याना सामील होऊन आपल्या या दुष्मानाची पुरती कंबख्ती करून टाकावी.'

'पण हा नबाबसाहेबांचा विचार कसासाच वाटतो,' हेस्टिंग्स ह्मणाला, 'कसें झालें तरी हैदर हा आपला धर्मबंधु आहे हें नबाबसाहेबांनीं विसरूं नये. त्याला बुडवून या लुटारू मराठ्याचें कर्नाटकात एकछत्री राज्य करून देणें ह्मणजे मागें पुढें आपल्या स्वतःच्या अस्तित्वासच धोका उत्पन्न करणें होय हें आपण पक्कें ध्यानात ठेवावे. खरें ह्मटलें तर नबाबसाहेबानीं या वेळीं हैदरालाच हात दिला पाहिजे. तसे करावयाचेंच नसेल तर निदान त्याचें आणि मराठ्यांचेंच परभारें काय होईल ते पहात बसावे हें बरें, पण मराठ्याना मदत करून दाक्षिण कर्नाटकांतून मुसलमानी सत्तेचा आणि परंपरेने धर्माचा नायनाट करणें मला तरी कोणत्याच दृष्टीने इष्ट वाटत नाही, मग यावर आपली मर्जी!'

महमदअली विचारांत पडला. धर्माभिमानाची कल्पना त्याला नवी असल्यामुळे तिनें त्याला क्षणभर गोंधळात पाडले. हेस्टिंग्सनें त्याच्यापुढें उभ्या केलेल्या शब्दचित्राची त्याला खरोखरीच भीति वाटूं लागली. हेस्टिंग्सच्या शहाणपणाबद्दल त्याला पूर्वीपासून वाटत असलेला आदर दुणावला आणि त्याच्या सल्याप्रमाणें वागावे असे त्याला वाटूं लागलें. मराठ्याना कुमक करण्याची त्याची इच्छा डळमळूं लागली. हेस्टिंग्स नबाबाच्या चर्येकडे बारकाईने पहात होता. नबाबाच्या चर्येवर झालेली चलबिचल त्याच्या लक्ष्यांत येताच तो ह्मणाला, 'नबाबसाहेबांना मी सुचवावयास पाहिजे असें नाही, पण आपणास या वेळी एक दुसरीच संधी आयती चालून आली आहे, तिचा आपण अवश्य उपयोग करावा. तंजावरच्या राजाकडून आपली बरेच दिवसांची खंडणी यावयाची आहे. मराठे हैदराशीं लढाई करण्यात गुंतले आहेत तोपर्यंत आपण तंजावरच्या राजावर स्वारी करून त्याच्याकडून आपल्या खंडणीची बाकी वसूल करून घ्यावी. जमल्यास त्याचा काही मुलूखही दंडादाखल काढून घ्यावा. या लढाईत हैदराचा पराभव होणार ह्मणून, आणि मराठ्यांना आपल्या देशी परत जाण्याची ओढ आहे ह्मणून, मिळून दोघांकडूनही सध्यां आपणास अडथळा होण्याजोगा नाहीं. आपली फौज तयार

आहेच, परिस्थितीही चांगली अनुकूल आहे. माझें ह्मणणें आपल्यास रुचत असेल तर मराठ्यांच्या वकिलास आपण निरोप द्यावा आणि तावडतोब तंजावरच्या स्वारीच्या उद्योगास लागावें.'

हेस्टिंग्सची कारवाई सफळ झाली. महमदअल्लीला त्याचा बुद्धिवाद पूर्णपणें रुचून त्याच्या तोंडा पाणी सुटलें. तंजावरच्या मराठी राजावर स्वारी करण्याची कल्पना त्याला इतकी पसंत पडली कीं, त्या आवेशाच्या भरांत 'शाबास हेस्टिन् साहेब, मी तुम्हांला आपला इमानी दोस्त समजतों तें उगीच नव्हे!' असें ह्मणून तो ताडकन् उठून उभा राहिला आणि त्यानें आनंदानें टाळी वाजविली. नंतरही कांहीं वेळ त्या दोघांचें खलबत चाललेंच होतें. अखेर बराच उशीर झाला असें पाहून महमदअल्ली उठला आणि हेस्टिंग्सही त्याला पोचवीत पडवीच्या पाहिऱ्या उतरून बागेंतील अंगणांत आला. हेस्टिंग्सचा चपराशी कंदील दाखवीत पुढें निघाला. इतक्यांत दिवाणखान्याच्या दारांतून पूर्वोक्त चपराशी बाहेर पडला आणि पडवीच्या वाटेनें वळून हां हा ह्मणता निघून गेला.

दुसरे दिवशीं सकाळीच 'आपणांस कुमक करण्याजोगी तूर्त आमची स्थिति नाहीं,' असें सांगून नबाबानें पेशव्याचा वकील माधवराव सदाशिव यास निरोप दिला. माधवराव सदाशिव त्रिंबकराव मामा पेठ्याकडे जाण्यास निघाला, पण जाण्यापूर्वी त्याने एका साडणीस्वाराबरोबर श्रीमंतांस पत्र पाठविलें, त्यात पुढील मजकूर होता, 'महमदअल्लीच्या मनाचा ओढा आमच्याकडे होता, पण तो इंग्रजांच्या कच्छपी पुरता लागला असल्याने आह्मास कुमक करावयास तयार नाही, तंजावरावर स्वारी करण्याचा त्याचा विचार ठरला आहे.' हेस्टिंग्सच्या आणि नबाबाच्या एकातातील मुलाखतीतला हा मजकूर माधवराव सदाशिवास कसा कळला असेल बरे? पूर्वोक्त चपराशी आणि माधवराव सदाशिव ह्या व्यक्ति एकच तर नसतील ना?

---

## प्रकरण ३२ वें

| खरे, ले. १०५९-१०६८-<br>-१०६९ १०८८ | **वर्मावर कुठार.** | कार्तिक व ३०<br>ता. ८-११-१७७० |
|---|---|---|

तीच ह्मणजे कार्तिक वद्य अमावास्येची रात्र होती, आणि वाईप्रांतांतील जळगांव नांवाच्या खेड्याजवळ पडलेल्या श्रीमंत पेशवे सरकारांच्या छावणींत सर्वत्र सामसूम झालेली दिसत होती. जळगांवच्या विस्तीर्ण माळावर शेंकडों राहुट्या,

डेरे, व पालें लागलीं असून रात्रीच्या गडद काळोखात तीं कापसाच्या ढिगांप्रमाणें दिसत होतीं. छावणी भोवतालच्या चौक्यांवरील पहारेवाले भीतीचे कसलेंच कारण नसल्यामुळें आपापल्या चौक्यावरून खुशाल झोपी गेले होते. मग खुद्द लष्करातले शिपाईप्यादे डारढूर घोरत पडले असल्यास नवल काय? डेऱ्यामधून जागजागी दिवे लागले असून ते रात्रीच्या अंधारात निष्प्रभ होऊन राहिले होते. पण या किरकोळ मजकुराशीं आपणास कांहींच कर्तव्य नसून, छावणीच्या मध्यभागीं असलेल्या एका भव्य डेऱ्यात आह्मी आज वाचकास घेऊन जात आहोंत. हा डेरा उत्कृष्ट शृंगारलेला असून त्याच्या प्रवेशद्वारावर तोरणें लावलेली होतीं. डेऱ्याच्या कनाती, आंतल्या बैठका, आणि वरचें आस्तरण हें सर्वच उंची कापडाचें असून डेऱ्याच्या आघाडीस दोन शिपायाचा टेलता पाहरा असून ते नागव्या तरवारीनिशीं आळीपाळीनें डेऱ्याभोवती हिंडून येत होते. डेऱ्याच्या मध्यभागीं एक तांबड्या रंगाचा पडदा असून त्याच्या दोनी बाजूला दोन पलंग टाकलेले होते आणि त्यांवर जाळीच्या मच्छरदान्या सोडलेल्या दिसत होत्या. डेऱ्याच्या पिछाडीस असलेल्या खोलींत दोन हुजरे एका लाकडी पेटीला टेकून पेंगत बसले होते, यावरून ते श्रीमंतांच्या नोकरीकरितां दक्ष राहिले असून केवळ निसर्गाच्या प्रभावामुळें निद्रावश झाले आहेत असें अनुमान होत होतें. डेऱ्याच्या दोन भागांत चांदीच्या ताटांतून दोनीकडे दोन समया तेवत होत्या. दोनी पलंगांपैकीं एका पलंगाच्या उशाजवळ एका लाकडी चौरंगावरील चांदीच्या तबकात काही चादीच्या वाट्या ठेवलेल्या असून, त्यांपैकीं एकींत साखर, दुसरींत खडीसाखर, इत्यादि जिन्नस दिसत होते. शिवाय एक मधाची कुपी आणि चांदीची एक डबीही त्या तबकांत दिसत होती. या सर्व लक्षणावरून ह्या पलंगावर श्रीमंत रावसाहेब पेशवे झोंपले असून, दुसऱ्यावर श्रीमंत नारायणराव पेशवे आराम करीत असावे असा तर्क होत होता.

पण वाचकहो, आपणास या बाबतीत तर्क करीत बसण्याचें कारण नाहीं. ती पहा, मच्छरदानीचे पदर वर टाकून श्रीमंताची स्वारी हळूंच बाहेर डोकावते आहे! वाचकहो असे चपापूं नका. हा चेहरा माधवराव पेशव्याचा नव्हे असें वाटून आपण चमकलात, पण आह्मी आपणास अशी हमी देतो कीं हेच श्रीमत माधवराव पेशवे होत. त्याचा तो पूर्वीचा सर्व नूर पालटला असून त्याच्या तोंडावर एखाद्या जुनाट रोग्याची कळा आली आहे. ही काळवंडलेली चर्या, ही काडीसारखीं कृश गात्रे, ते बाहेर पडलेलें नाक, ते निस्तेज डोळे, ही सर्व चेहरेपट्टी आपल्या राजबिंड्या रावसाहेबांची नव्हे असें पुन्हा आपल्या मनांत येईल, तर आपणांस आह्मी फिरून एकवार सांगतो की हेच ते आपले प्रिय रावसाहेब आहेत

आणि एका दुर्धर व्याधीनें त्यांची अशी दशा केली आहे! गेल्या पांच सहा महिन्यांत आणि विशेषतः गेल्या पंधरवड्यांत श्रीमंतांची प्रकृती इतकी खालावली कीं, त्यांच्या चेहरेपट्टींतच काय, पण स्वभावांत देखील मनस्वी फरक पडला. पुणें सोडल्यापासून श्रीमंतांना बरें वाटेनासें झालें. त्यांचें रोज अंग मोडून येऊं लागलें, हातापायांची आग होऊं लागली, अंगांत कणकण वाटूं लागली आणि त्यांना स्वस्थ झोप लागेनाशी झाली. तथापि ते तसेच पुढें निघाले, आणि वानवडीहून वळती, वळतीहून जेजुरी, जेजुरीहून पिंपरी, पिंपरीहून बावडें, बावड्यावरून पिंपोडें आणि पिंपोड्याहून जळगांव असे लहान लहान मुक्काम घेत आले. जेजुरीच्या मुक्कामीं त्यांना जानोजीराव भोसले पांच हजार फौजेनिशीं येऊन मिळाले. लष्करी तयारीच्या दृष्टीनें श्रीमंतांचा जम जरी आतां चागला बसला होता, तरी त्यांची प्रकृती क्रमाक्रमानें बिघडूंच लागली, आणि त्यांचा स्वभावही झपाट्यानें पालटला. त्यांचा पूर्वीचा विनोदीपणा आणि धिमेपणा पार नाहींसा होऊन त्याची जागा तिरसटपणानें आणि लहरीपणानें घेतली. यत्किंचित् कारणानें नोकरांचाकरांवर रागावून त्यांना शिवीगाळ किंवा प्रसंगीं हाणमार देखील करणें, मोठमोठ्या मुत्सद्दीमानकऱ्यांचा वेळीं अवेळीं उपमर्द करणें, त्रागा करून स्वतःच्या जिवाला त्रास करून घेणें, असले प्रकार अलीकडे त्यांच्या हातून वरचेवर होऊं लागले होते. आतां एक बेत करावा, त्याप्रमाणें हुकूम सोडावे, आणि त्यांची अमलबजावणी होऊं लागते इतक्यांत दुसराच बेत करावा, अशा गोष्टी त्यांचे हातून वरचेवर होऊं लागल्या होत्या. प्रथम त्यांचा विचार स्वारीवर एकट्यानेंच निघण्याचा होता, पण पुढें तो बदलून त्यांनीं नारायणरावांस बरोबर घेतलें. मुक्कामांचाही प्रकार असाच. उद्यांचा मुक्काम अमूक गांवीं करावयाचा अशी त्यांनीं आज्ञा करावी, स्वारीकारकून आपले लोक बरोबर घेऊन त्या गांवीं जाऊन मुक्कामाची तजवीज करतो, तो श्रीमंत दुसऱ्याच गांवीं मुक्कामास गेले असा त्यास निरोप यावा आणि नंतर त्यानें आपलें बाडबिछाड उचलून श्रीमंताच्या मागें जावें, असे मासले वारंवार होऊं लागले!

अशा स्थितींत श्रीमंताची नाजूक प्रकृती संभाळून त्यांना जिवापाड जपणारीं दोन माणसें स्वारीबरोबर होतीं, आणि ह्मणूनच श्रीमंतांच्या शुश्रूषेंत कांहीं कमी पडत नव्हतें. गोपाळराव पटवर्धनांचे चुलत बंधु मोरो बल्लाळ पटवर्धन आणि 'पौर्णिमा' कादंबरीच्या कथानकांत वाचकांस परिचित झालेला भिवा हुजऱ्या या दोघांनीं या प्रसंगीं श्रीमंतांची फार उत्कृष्ट परिचर्या केली. श्रीमंतांच्या खास तैनातीकडील कारकून व प्यादे श्रीमंतांची जी सेवा नोकरी ह्मणून

करीत, तीच ही दोघे खऱ्या प्रेमाच्या-मायेच्या कळकळीनें करीत. श्रीमंतांची प्रकृती खालावूं लागलेली पाहतांच मोरोबा पटवर्धनानें वांईचे प्रसिद्ध वैद्य राजेश्वरभट यांना जळगांवच्या मुक्कामीं बोलावून आणून त्यांना श्रीमंतांची प्रकृति दाखविली आणि त्यांना छावणींत ठेऊन घेऊन त्यांचें औषध श्रीमंतांस सुरूं केलें. मोरोबा इतकेंच करून थांबला नाहीं, तर त्यानें श्रीमंतांची परवानगी घेऊन पुण्यास डॉक्टर कनिंगहॅम याला पत्र पाठवून त्यास टाकोटाक जळगांवचे मुक्कामास बोलावलें. सकाळीं श्रीमंत उठल्यापासून तों तहत ते रात्रीं झोंपी जाईपर्यंत त्यांचें पथ्यपाणी, औषध, जेवणखाण, इत्यादि प्रत्येक गोष्टीवर मोरोबाची देखरेख असे, आणि श्रीमंतांचे हातपाय चेपणें, कपडे करणें इत्यादि बाबतींत भिवा पोवार एकसारखा दक्ष असे. हे दोघे इतके जपत, तरी श्रीमंतांची तब्बेतच प्रस्तुत अशी कांहीं तऱ्हेवाईक झाली होती कीं, अंमळ कोठें त्यांच्या मर्जीविरुद्ध झालें कीं, ते या दोघांवरही मनस्वी रागावत, आणि त्यांच्यावर वाटेल तसें तोंडसुख घेत. आजही असाच प्रकार झाला होता. तिनीसांजच्या सुमारास कर्नाटकांतून सांडणी स्वारांची एक जोडी कांहीं पत्रें घेऊन आली होती, त्यांतील एक पत्र त्रिंबकरावमामा पेठ्यानें श्रीमंतांस लिहिलें असून त्यांत गोपाळराव पटवर्धनांची मनस्वी नालस्ती केली होती. ‘ गोपाळराव माझें मुळींच ऐकत नाहींत, मन मानेल तसें वागतात, मी नको नको ह्मणत असतां ते अदवानीवर चाल करून गेले आहेत, त्यांच्या वागणुकीनें एखादे वेळीं कर्नाटकची मोहीम देखील बिघडण्याचा संभव आहे ’ इत्यादि नाना कागाळ्या त्रिंबकरावानें त्या पत्रांत केल्या होत्या. तें पत्र वाचतांच श्रीमंताच्या अंगाचा भडका उडला आणि त्यांनीं गोपाळरावावर आणि त्यांच्या निमित्तानें मोरोबावरही भडिमार केला! ‘ तुह्मी पटवर्धन ह्मणजे पहिल्यापासूनच निमकहराम, तुह्मी पूर्वी बखेडा करून मोंगलाला मिळाला होतां तें मी विसरलों नाही, तुमचे सरंजाम जप्त केले पाहिजेत ’ वगैरे बोलून श्रीमंतांनीं पटवर्धन मंडळीवर इतका गहजब उडविला की तो संपेपर्यंत बिचाऱ्या मोरोबाला जीव अगदीं नकोसा होऊन गेला! तो खालीं मान घालून निमूटपणें गंप बसला होता. आपले समर्थन करण्याची ही वेळ नव्हे असें समजून त्यानें काही प्रत्युत्तर केलें नाही. पुढें श्रीमंताची झोपावयाची वेळ झाली तेव्हां निजताना घ्यावयाचे औषध देखील त्यानीं मोरोबाच्या हातून न घेता श्रीमंत [illegible] हातून घेतलें! तें पाहून मोरोबास अत्यंत वाईट वाटले, पण श्रीमंतांचा हा राग क्षणिक आहे असा विचार करून तो श्रीमंतांची आज्ञा घेऊन आपल्या डेऱ्याकडे गेला. श्रीमंतही आपल्या पलंगावर लवंडले, पण आज त्याना काही केल्या झोप ह्मणून येईना. ते

बराच वेळ या कुशीवरून त्या कुशीवर, आणि त्या कुशीवरून या कुशीवर असें करीत होते. बाहेर इतकी थंडी पडली होती, तरी त्यांच्या अंगाची मनस्वी तलखी होत असून ते हश्श हुश्श करीत राहिले होते! त्यांच्या डोक्यांत नाना प्रकारांच्या विचारांचें असें काहूर माजलें होतें कीं, त्यांच्या प्रवाहांत त्याना क्षणभर डोळे मिटून स्वस्थ पडण्यास देखील फुरसत झाली नाहीं. अशांतच मध्यरात्र उलटून गेली आणि उत्तर रात्र सुरू होऊन बराच वेळ झाला, तरी देखील झोंप लागण्याचें जेव्हां त्यांना कांहींच चिन्ह दिसेना, तेव्हा ते उठले आणि त्यांनीं मच्छरदानीचे पदर वर टाकले. आपण त्याना पाहत आहोंत तें याच वेळीं होय हें आतां वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल.

श्रीमंतांनीं मच्छरदानीचे पदर वर टाकले ते अत्यंत हळू टाकले, पण तेवढी चाहूल पुरेशी होऊनच कीं काय, भिवानें डोळे उघडले, आणि तो श्रीमंताच्या हालचालीचा कानोसा घेऊं लागला. इतक्यांत श्रीमतानीं त्याला हाक मारली आणि मोरोबा पटवर्धनास बोलावून आणण्यास सागितले. मोरोबाचा डेरा श्रीमंतांच्या डेऱ्याला लागूनच होता. साऱ्या दिवसभर झालेल्या दगदगीने मोरोबास गाढ झोंप लागली होती. भिवानें हाक मारताच तो दचकून उठला, आणि लगबगीनें बाहेर येऊन श्रीमंताच्या प्रकृतीविषयी त्याजजवळ चोकशी करूं लागला. भिवानें त्याला श्रीमंतांची प्रकृती ठीक असल्याचे सागून दुसऱ्या काहीं तरी कामा करितां ते आपणास बोलावीत असावे असें सुचविलें, तेव्हा मोरोबाला अमळ धीर येऊन तो भिवाबरोबर श्रीमंताच्या राहुटींत गेला. आत जाताच श्रीमंतास अदबीने नमस्कार करून तो उभा राहिला. श्रीमंतानीं त्यास जवळ बसावयास सागितलें. श्रीमंतांच्या आज्ञेप्रमाणें मोरोबा पलंगाच्या जवळ जाऊन वसला, पण सध्याकाळच्या गहजबानंतर आणखी पुरवणीगहजब काय येतो, याची त्याला क्षणोक्षणीं भीती वाटत होती. तथापि प्रत्यक्ष अनुभव त्याला अगदींच वेगळा आला. श्रीमंत त्याच्याशीं अगदी ममतेनें बोलूं लागले. इतकेंच नव्हे तर त्यांच्या मुद्रेवर किंचित् पश्चात्तापाची छटा मारत असून त्यांचा कंठही दाटून आल्याचा मोरोबास भास झाला.

"मोरोबा," श्रीमंत ह्मणाले, "मी संध्याकाळीं तुह्मांला लागून बोललों तो रागाच्या आवेशांत बोललों; पण विचाराअन्तीं माझा राग निष्कारण होता असें मला वाटूं लागलें आहे. गोपाळरावांचें आणि त्रिंबकराव मामांचें मनोमन नीट नाहीं हें मला ठाऊक आहे, अर्थात् मामांनीं जरी गोपाळरावांच्या बद्दल कांहीं अधिक उणें लिहिलें तरी तिकडे मी दुर्लक्ष्यच करावयास पाहिजे होतें असें मला वाटतें."

' श्रीमंत आमचे अन्नदाते आहेत, मायपोट आहेत' मोरोबा म्हणाला, "तेव्हां आम्हांला एखादा अधिक उणा शब्द बोलण्याचा श्रीमंतांचा अधिकारच आहे. मला वाईट वाटलें तें एवढ्याच करितां की, मामानीं तीर्थरूप रावांसंबंधीं जें लिहिलें आहे, त्यातला बराचसा भाग खोटा, निव्वळ बालंट आहे."

' काय ? मामानीं खोटें लिहिलें आहे ? ' श्रीमंत चकित होऊन विचारतात, ' गोपाळराव अदवानीकडे गेले नाहीत ? '

' ते गेले हे खरे आहे, ' मोरोबानें उत्तर केलें, ' पण ते मामांची संमती घेऊनच गेले. अदवानीच्या नबावाचा तर खंडणी देण्याचा विचार दिसेना, आणि पैक्याच्या अभावीं फौजेची फारच कुचंबणा होऊ लागली ह्मणून ते नाइलाजानें अदवानीकडे गेले. '

' आणि आता कनकागिरीवर का मुक्काम करून राहिले आहेत ? ' श्रीमंतांनीं खोचून प्रश्न केला, ' अदवानीचा गुंता उरकल्यावर चटकन् परत कां गेले नाहीत ? '

' त्याची प्रकृति नीट नाहीं असा मला अंदेशा येतो, ' मोरोबा ह्मणाला, 'मला जी बाहेरून माहिती मिळाली आहे, तिजवरून त्याची प्रकृती फारच खालावली आहे असे मला वाटते, आणि त्याचा तर स्वभाव असा आहे की, अगदी देह अंथरुणास खिळेपर्यंत ते आपल्या प्रकृतीची गोष्ट कोणास कळवावयाचे नाहीत. ' हे शब्द बोलत असता मोरोबाचा आवाज किंचित् कापरा आल्याचा श्रीमंतास भास झाला.

' अरेरे, ही तर मोठी वाईट गोष्ट आहे ! ' श्रीमंत ह्मणाले, ' ही मोहीम आटोपल्याबरोबर घरीं राहून औषधोपाय करा, खडखडीत बरे होईपर्यंत सरकारी कामगिरीवर येऊं नका, असे त्यास लिहा. आताच घरीं जाण्यास देखील त्याना मी परवानगी दिली असती, पण त्याची जागा भरून काढण्याजोगा गोविंदपंत नानांच्या मुलात दुसरा कोणी नाहीं. त्यातून अगदींच जरूर पडली तर पाहूं.'

' श्रीमंताच्या आज्ञेप्रमाणे त्याना कळवितो, ' मोरोबा ह्मणाला.

' मोरोबा, ' श्रीमंत ह्मणाले, ' माझ्या प्रकृतीविषयी राजेश्वरभट तुमच्याजवळ काय ह्मणत होते ? खरे सांगा. '

' ते ह्मणत होते कीं, श्रीमंताची प्रकृति मोहिमीच्या दगदगीने बिघडली आहे' मोरोबानें उत्तर केलें, ' ती लवकरच सुधारेल अशी आपली खात्री आहे. '

श्रीमंत काहींच बोलले नाहींत. त्यानीं एक दीर्घ निश्वास मात्र सोडला. पण त्याच क्षणीं त्यांच्या कानाशीं ' सुईऽ ' असा आवाज होऊन आपल्या पाठींत कोणी तरी जोरानें रपका मारल्याचा त्यांना भास झाला, आणि त्यांनीं डोळे मिटले. तोंच

त्यांच्या तोंडांतून रक्ताची एक गुळणी येऊन ते कोलमडले आणि धाडकन् मोरोबाच्या अंगावर कोसळले! हा प्रकार इतक्या त्वरेनें झाला कीं, श्रीमंतांच्या तोंडांतून रक्ताची गुळणी आल्याची जाणीव मोरोबाला होण्यास आणि श्रीमंत कोसळून त्याच्या अंगावर पडण्यास जवळ जवळ एकच गांठ पडली! मोरोबास किंचित् हबका बसला, पण श्रीमंतांची मानच त्याच्या मांडीवर आल्यामुळें श्रीमंतांना मात्र वेगळी इजा कांहीं होऊं नये इतकी तजवीज त्याला करितां आली. त्याचें धोतर रक्तानें भरलें, श्रीमंतांना सावरून धरितां धरितां ‘ अरेरे हें काय? श्रीमंत, काय झालें?’ असे कांहीं तरी शब्द त्याच्या तोंडून घाबऱ्या घाबऱ्या बाहेर पडले. झालेला प्रकारच इतका आकस्मिक व भयंकर होता कीं, तो पाहून मोरोबाच्या अंगांत एकदम कांपरें भरलें आणि भीतीनें त्याची बोबडी वळली! त्यानें कसेबसें श्रीमंतांना आपल्या मांडीवर सावरून धरलें आणि भीत भीत त्यांच्या चेहऱ्याकडे एकवार नजर टाकली. तोंच श्रीमंतांच्या तोंडांतून हळूं हळूं रक्त येतें आहे आणि त्यांच्या चर्येवर प्रेतकळा आली आहे असा त्यास भास झाला आणि त्याचा धीर सुटून त्यानें किंचाळी फोडली!

मोरोबाची किंकाळी ऐकतांच भिवा पोवार धांवतच आला. क्षणार्धांत काय झालें याची त्याला कल्पना येऊन त्यानें श्रीमंताना मोरोबाच्या मांडीवरून उचलून घेऊन पलंगावर हळूंच ठेवलें आणि ‘ मी राजेश्वरभटजीस हाक मारतों तोंपर्यंत तुह्मी श्रीमंतांच्या तोंडावर पाणी शिंपडा ’ असें सांगून तो पळतच निघून गेला. दारावरच्या रखवालदारानी ‘ क्या है जमादार?’ ह्मणून त्याला अडविण्याचा प्रयत्न केला, पण त्यांना उत्तर देण्यास तो थांबला नाहीं. इतक्यात मोरोबाच्या किंकाळीनें खडबडून जागे झालेले नारायणराव आपल्या पलंगावरून उठून तेथें आले, आणि श्रीमंतांकडे त्यांची नजर जातांच ‘ दादा ऽ,’ असा त्यानी मोठ्यानें हंबरडा फोडला! मोरोबा बिचारा उठून उभा राहिला पण काय करावें हेंच त्याला सुचेनासें होऊन तो आ वासून श्रीमंतांकडे टकमक पहातच राहिला. नारायणराव रडूं लागतांच मग त्या डेऱ्यांत जो हलकल्लोळ उडाला तो सांगतां पुरवत नाहीं. क्षणार्धांत साऱ्या छावणीभर गलगा आणि धांवपळ सुरू झाली. श्रीमंतांचे सारे आश्रित आणि कारकून जागे होऊन धांवतच डेऱ्यांत आले. जानोजीराव भोसले, कृष्णराव मेहेंदळे, मल्हारराव पानशे वगैरे सरदार मंडळी गोळा झाली. छावणींतले सारे शिपाईप्यादे जागे होऊन खाशांच्या डेऱ्याकडे लोटूं लागले. प्रथम बराच वेळ काय झालें आहे याचाच कोणास पत्ता लागेना. खाशांच्या डेऱ्यांत कांहीं तरी गडबड आहे इतकीच बातमी पसरून राहिली. दिवट्या पेटल्या, मशाली लागल्या, आणि त्यांच्या उजे-

डांत लोकांच्या झुंडीच्या झुंडी श्रीमंतांच्या डेऱ्या बाहेर जमा होऊन श्रीमंतांच्या प्रकृतीची चौकशी करूं लागल्या !

तोंपर्यंत डेऱ्याच्या आंतही अशीच धांदल माजून राहिली होती. श्रीमंतांचे आश्रित आणि सरदार श्रीमंतांच्या पलंगाभोवतीं गोळा झाले होते, पण श्रीमंतांना काय झालें आहे आणि त्यावर काय करावयास पाहिजे हेंच कोणास सुचेना. श्रीमंत दगावले अशीच बहुतेकांची समजूत झालेली दिसली. आणि श्रीमंतांची चर्या खरोखरीच तशी दिसत होती. तोंड अर्धवट उघडें, आंतून रक्ताचा बारीकसा ओघळ ओठावर येऊन वाळून राहिलेला, काळा ठिक्कर पडलेला चेहरा, आणि डोळे खोल गेलेले, या साऱ्या लक्षणांवरून त्यांना पहाणाराच्या मनांत दुसरी कल्पना येणेंच शक्य नव्हते. अखेर ती अनिश्चित स्थिती असह्य होऊनच कीं काय, जानोजीराव भोसले पुढे झाले, आणि त्यांनीं श्रीमतांच्या आंगास हात लावून त्यांची नाडी पाहिली. तों त्यांच्या अंगांत उबारा असून त्यांची नाडीही मंद चाललीं आहे असें त्यास आढळून आलें. त्याबरोबर त्यांना धीर येऊन त्यांनी आपला शेला पाण्यांत भिजवून घेतला आणि त्यानें श्रीमंतांचे तोंड स्वच्छ पुसून काढलें. नंतर त्यांनीं त्यांच्या डोळयांस थोडें पाणी लावून थोडें त्यांच्या मस्तकावरही शिंपडलें. इतक्यात भिवा राजेश्वरभट वैद्याला घेऊन आला. राजेश्वरभटानें पुढें होऊन एकवार श्रीमंताची नाडी पाहिली, व ती ठीक असल्याबद्दल भोंवतालच्या मंडळीना सागून त्याने आपल्या बटवीतून एक मात्रा काढली आणि ती दुधात उगाळून तिची एक दोन बोटे श्रीमंताच्या जिभेवर चोळली. त्याबरोबर काय चमत्कार सागावा ? श्रीमंतांनी क्षणार्धात डोळे उघडले आणि जमलेल्या मंडळीकडे ते शून्य दृष्टीनें पाहूं लागले.

इतकें झाल्यावर श्रीमताच्या प्रकृतीची खरी हालहवाल लोकास कळली आणि तिची गुणगूण डेऱ्याबाहेरील मंडळांतही पसरली. त्याबरोबर बाहेरच्या गर्दीतला गलका वाढूं लागला. श्रीमंताना आपण एकवार डोळयांनीं पाहून जाणार असा पुष्कळाचा आग्रह दिसला. शेवटी जानोजीराव भोसल्यांनी बाहेर येऊन सर्वांची समजूत काढली आणि उडजाल्यानंतर सर्वांना श्रीमंतांच्या दर्शनास सोडण्याचे कबूल केले. नंतर कोठें लष्करच्या लोकाची समजूत पटली व त्याची पांगापाग होण्यास सुरवात झाली. इकडे राजेश्वरभटाची मात्रा पोचल्यानंतर श्रीमंतांना बरीच हुषारी वाटली आणि त्यांनी थोडें दूध पिण्यास मागितले. मोरोबालाही आतां चांगला धीर आला असल्यामुळें त्याने चटकन् पुढें होऊन दुधाची वाटी श्रीमंतांच्या तोंडाशीं धरून त्यांना चमच्यानें थोडें दूध पाजलें. नंतर श्रीमंतांना

आतां थोडा वेळ स्वस्थ पडून राहूंद्या. असें राजेश्वरभटानें सांगितल्यावरून बहुतेक मंडळी आपापल्या डेऱ्याकडे निघून गेली. मोरोबा, कृष्णराव मेहेंदळे, मल्हारराव पानशे, आणि भिवा पोवार इतके असामी मात्र श्रीमंताच्या आसपास पाहरा करीत बसले. थोडा वेळ गेल्यावर श्रीमंतांचा किंचित् डोळा लागला. इतक्यात पहाटेचा सुमार झाला असल्यामुळे मोरोबा वगैरे मंडळी प्रातर्विधि आटोपून येण्याच्या बेतानें निघून गेली, आणि श्रीमंताशेजारीं पहारा करण्याचें काम त्यांनीं श्रीमंत नारायणराव व भिवा याजवर सोपविलें.

श्रीमंतांना चांगली दोन तीन घटका निवांत झोप लागली होती. ते जागे झाले ते बरेच हुषार दिसले. मात्र त्याना अशक्तपणा बराच वाटूं लागला होता. सकाळीं आठ नऊ घटका दिवसाच्या सुमारास डाक्टर कनिंगहॅम साडीवरून आला आणि त्याने श्रीमंताची प्रकृति पाहिली. त्याने प्रकृति एरवी ठीक असल्याचे सांगितलें, पण आता पुढें न चलतां पुण्यास माघारी परतण्याविषयीं श्रीमताना फार आग्रह केला. सूक्ष्म दृष्टीने पाहणारास डाक्टर कर्णीघाम काकाच्या चेहऱ्यावर निराशेची अत्यंत चोरटी छटा मारून गेलेली दिसली असती, पण श्रीमंताचें तिकडे लक्ष्य न गेल्यामुळें ह्मणा किंवा त्यांना थोडी हुषारी वाटत होती ह्मणून ह्मणा, त्यांनीं पुढें जाण्याचें ठरविलें. मात्र डाक्टर कनिंगहॅम यास त्यांनीं बरोबर चलण्यास सांगितलें. त्याच दिवशी तिसरा प्रहरचे सुमारास श्रीमताचें लष्कर तादुळवाडीच्या रोखानें निघालें, पण लष्करावरोबर निघते वेळीं कर्णीघाम काकानें दीर्घ निश्वास कां बरें सोडला असावा? श्रीमंताच्या प्रकृतींतली हुषारी क्षणिक असून तिच्या वर्मावर कुठार पडला आहे असें तर त्याला वाटलें नसेलना?

---

## प्रकरण ३३ वें.

ख. ले. १०७२, १०७३, १०८० इ. २८० टीप. } **अपशकुन.** { पौं. शु. ८ शके १६९०.

सांगली संस्थानची राजधानी जें सांगली शहर त्याला सांगली हें नाव मिळण्याचें कारण पूर्वीं तें गांव सहाच गल्ल्यांत वसलेलें एक छोटेखानी खेडें होतें हें होय. आमच्या कथानकाच्या काळीं कऱ्हाडपासून खालीं बऱ्याच अंतरापर्यंत दक्षिणवाहिनी चाललेल्या कृष्णा नदीचे काठीं जीं काहीं अत्यंत रमणीय स्थळें होतीं, त्यांत सांगली व तिच्या जवळच दक्षिणेस एका कच्च्या कोसाच्या अंतरानें

असलेलें हरिपुर हीं दोन स्थळें प्रमुख होत. पैकीं हरिपुरास तर कृष्णा व वारणा या नद्यांचा संगम व हरिहरेश्वर ऊर्फ संगमेश्वर महादेवाचें पुरातन देवालय या दोन पावन वस्तु असल्यामुळें त्या स्थानाला क्षेत्रदृष्ट्याही महत्व आलें होतें. सांगलीची गणना क्षेत्रांत होण्याजोगी नव्हती, तथापि तिच्या पश्चिम बाजूनें नदीकाठालगत जी रम्य झाडी पसरली होती तिजमुळे तिजपाशीं वनश्रीचें ऐश्वर्य भरपूर जमलें होतें आणि तेच तिच्या आकर्षकपणाला कारण झाले होते. सांगलीपासून हरिपुरापर्यंत नदीच्या काठानें मळीरान लागलें असून त्याच्या वरच्या बाजूनें दाट झाडी पसरली होती आणि त्या झाडींत बाभळीचे व चिंचाचे मोठमोठे वृक्ष वाढले होते. ह्या वृक्षावरून माकडाची व वानराची गर्दी असे. दोनीही खेडीं अगदींच लहान, पाउणशे ऐशीं उंबरा देखील प्रत्येकात असेल नसेल इतक्या बेताची होती, आणि जवळपास ह्मणण्याजोगी बाधक अशी कोणतीही परचक्राची सत्ता नसल्यामुळें लुटालूट, जाळपोळ इत्यादि आपत्तींचा अनुभव या खेड्यांना आलेला नव्हता. कृष्णेसारख्या महानदीचें सानिध्य, उत्कृष्ट हवा, आणि निवात दिनचर्या अशीं सारीच साधने अनुकूल असल्यामुळे दोनी खेड्यांतले लोक साधारणपणें खाऊन पिऊन सुखी होते.

आमच्या कथानकाच्या काळीं ह्मणजे शके १६९२ च्या पौषात या दोन्ही खेड्यात दोन देवालयें बांधण्याचे काम सुरू झालें होतें. सांगली येथें महाविष्णूचें देऊळ बांधलें जात होतें आणि त्याचे प्रवर्तक महादेवभट पाटणकर नावाचे एक भिक्षुक होते. हरिपुरास जे देऊळ बांधले जात होते ते खुद्द हरिपुर गावात नसून गावच्या ईशान्येस असलेल्या कृष्णाकाठच्या एका बनात बांधलें जात होते. या देवळाचे प्रवर्तक हरिभट पटवर्धनाचे पुत्र गोविंद हरी पटवर्धन हे असून हे देऊळ ते आपल्या उपास्य देवतासाठी ह्मणजे गणपतीसाठी बांधवीत होते. ते एकदां मिरजेहून सहज या बनात आले असतां त्याना तेथें एका उंच चौथऱ्यावर मोडक्या तोडक्या घुमटीखाली हात दीडहात उंचीची श्रीगजाननाची सुंदर मूर्ति आढळली. आपल्या दैवताची ही हलाखी पाहून गोविंदपंतनानांस फार वाईट वाटलें आणि त्यांनीं त्या मूर्तीवर एक सुंदर देऊळ बांधून काढण्याचा निश्चय केला. गोविंद हरींचें वास्तव्य या वेळीं मिरजेस असून महादेवभट पाटणकर हें त्याचे मेहुणे सांगलीस रहात असत. गोविंद हरीचें कुटुंब सत्यभामाबाई उर्फ ताई ही महादेवभटजींची बहीण असून मेहुण्या मेहुण्यांचें फार प्रेम असे. गोविंद हरींनीं महादेवभटजींस त्यांचें मूळ कोंकण जें वेंगुर्लें तेथून मिरजेस बोलावून आणलें आणि सांगली हरिपुरच्या रानांत त्यांच्या वृत्तीसाठीं कांहीं जमिनीही इनाम

करून दिल्या. महादेवभटजींनीं नेहमीं आपल्या जवळ रहावें अशी गोविंदपंतनानांची फार इच्छा होती, पण महादेवभटजींना राजकारणापेक्षां स्नानसंध्याच विशेष प्रिय असल्यामुळें त्यांनीं कृष्णाकाठीं सांगलीसच राहण्याचें ठरविलें व ते सांगलीसच स्थाईक झाले. आह्मी आमच्या प्रिय वाचकास हेंही कळविण्याची परवानगी घेतों कीं सदर महादेव भटजी पाटणकर हे आमचे सख्खे तिप्पणजोबा अथवा पांचवे मूळपुरुष होत. मिरजेहून हरिपुर अमळ दूर पडत असल्यामुळें बनांतील देवळाच्या बांधकामाची देखरेख गोविंदपंत नानांनीं महादेव भटजींकडे सोंपविली होती. त्यांची स्वतःची प्रकृति दम्याच्या विकारानें बेजार असल्यामुळें ते मधून मधून मात्र देवळाकडे जात असत.

पौष शुद्ध अष्टमीच्या दिवशीं तिसरा प्रहरचे सुमारास हरिपुरच्या बनांतील देवालयाचे चौथऱ्यावर दोन वृद्ध गृहस्थ बोलत बसले होते. दोघांचींही वयें जवळ जवळ ऐशीं ब्यायशींच्या सुमाराचीं असून दोघांच्याही चर्येवर कृतांताचा ध्वज फडकत होता. दोघांचेही पोषाख जुन्या पद्धतीचे, अंगात एक बंडी व अंगरखा, डोकीस चक्री पागोटें व अंगावर दुहेरी धोतर अशा प्रकारचे होते. दोघांचाही वर्ण गोरा, बांधा उंच, आणि डोळे पाणीदार होते. पण एकाचें नाक सरळ व नीटस तर दुसऱ्याचें अमळ बोजड व ठसठशीत होतें. यांपैकीं सरळ नाकाचे गृहस्थ गोविंदपंत नाना पटवर्धन आणि ठसठशीत नाकाचे महादेवभट पाटणकर होते. दोघांनीही जेंठे मारले असून त्यांच्या स्वस्थपणें गप्पा चालल्या होत्या, यावरून आणखी बराच वेळ तेथें बोलत बसण्याचा त्यांचा विचार असावा असें दिसत होतें. आणि खरोखरीच त्याचा तसा विचार होताही. कारण आज गोविंदपंत नाना मिरजेहून एकटेच आले नसून बरोबर आपली पत्नी, सून ह्मणजे गोपाळरावांची पत्नी सरस्वतीबाई, आणि दोघे पुतणे इतका परिवार घेऊन आले होते. ते प्रथम मिरजेहून सांगलीस आले आणि तेथून महादेवभटजी व त्यांच्या पत्नी पार्वतीबाई यांना बरोबर घेऊन हरिपुरच्या बनांत आले होते. अर्थात् त्यांच्याबरोबर पांचसहा मेणे व त्या मानाने भोई, हुजरे वगैरे बराच लवाजमाही आला होता. मेणे येऊन बनात पोचताच गोविंदपंतनाना आणि महादेवभटजी उतरून बनातील गणपतीच्या देवळात गेले आणि बायकामंडळी व मुलें संगमेश्वराचें दर्शन घेऊन येण्याकरितां हरिपुरास गेलीं. अर्थात् ती मंडळी येईपर्यंत या दोघा मेहुण्यांना भरपूर फुरसत होती. त्यांनीं देवळात जाऊन झालेल्या बांधकामाची एक वेळ पाहणी केली आणि सुतार, गवंडी वगैरे मंडळींना जरूर त्या सूचना देऊन व देवदर्शन करून ते कट्ट्यावर येऊन बोलत

बसले. ते अशा प्रकारें बोलत बसले असतांनाच आपण देवळांत जात आहोंत हें वाचकांस सुचवावयास नकोच.

'मामा,' गोविंदपंत नाना ह्मणतात, 'गोपाळरावाची नालस्ती त्रिंबकराव मामानें श्रीमंतांपाशीं कशी केली, हें तुह्मांस कळलेंना?' महादेव भटजी हे गोविंद-पंतांच्या मुलांचे मामा असल्यामुळें सर्व मुलें त्यांना मामा ह्मणत, आणि ह्मणूनच गोविंद हरीही त्यांना त्याच टोपणनांवानें संबोधीत होते, हें वाचकानीं ताडलेंच असेल.

"कळलें," महादेवभट मामा उत्तर करितात, "पण त्याबरोबरच त्या नालस्तीचा काहीं एक उपयोग झाला नाहीं हेंही कळलें. श्रीमंतांची मर्जी गोपाळरावावर आहे तशीच प्रसन्न आहे, असें मोरोबानें मला आपल्या पत्रात लिहिलें आहे."

'तें झालें हो' नाना म्हणाले, 'पण एकंदरीत त्रिंबकराव कसा घातकी मनुष्य आहे हे लक्षांत घ्या. तो कोण्या वेळेला काय करील याचा नेम नाहीं. मी चिरंजीव गोपाळरावाला पत्र लिहिले आहे त्यात तूर्त त्रिंबकरावाचे धोरण संभाळूनच वागत जा असें लिहिले आहे, पण त्याचा स्वभाव तापट असल्यामुळे त्याला ते कितपत साधतें कोणास ठाऊक?'

'न साधायला काय झाले? आमचा गोपाळराव काही कमी धोरणी नाहीं,' मामा भाच्याचा अभिमान धरून ह्मणतात, 'पण नाना, त्याच्या प्रकृतीची काय हकीगत आहे? मला अदवानीहून त्याचे पत्र आले होतें, त्यांत त्यानें आपली प्रकृति फार बिघडली असल्याबद्दल लिहिलें होते.'

'उ: बिघडायला काय झालें?' नाना ह्मणाले, 'मोहिमीच्या दगदगीनें कंटाळून लिहितो आहे झाले. त्याच्या मनात वामनाने नाही तर पांडुतात्यानें तेथें जाऊन त्याची सोडवणक करावी असे आहे. पण मामा, तुह्मीच बघा, वामन तर बोलून चालून दमेकरी आहे, त्याला मोहिमीवर पाठवून न पाठवून सारखेच होणार आहे. राहता राहिला पंढरीनाथ, तोही लष्करच्या प्रकरणी तिळमात्र खबरदार नाहीं. मग त्याला सोडविण्यास येथून जाणार तरी कोण? आणि कदाचित् कोणी गेलेच, तरी श्रीमताची परवानगी झाल्यावाचून त्याला मोहिमीवरून घरी परत तरी कसे येता येईल?'

'तेही खरेंच,' मामा ह्मणाले, 'पण मला वाटते वामनाला त्याच्याकडे पाठवून द्यावा. त्याचा ह्मणजे विशेष उपयोग होणार आहे असे नाही. पण आपली तितकीच सोडवणूक व्हावयाची, दुसरे काय? निदान गोपाळरावाची प्रकृति खरो-खरीच फार बिघडली असेल तर त्याच्या औषधपाण्याची तरी तो व्यवस्था करील.'

'तुम्ही ह्मणतांच तर तूर्त वामनाला कांहीं दिवस पाठवूंया पाहिजे तर,' नाना ह्मणतात, 'पण खरा उपाय ह्मणजे श्रीमंताची परवानगी घेऊन त्याला परत बोलावणें हाच होय. आणि ती गोष्ट तर सध्यां अगदीं अवघड होऊन बसली आहे. तांदुळवाडीच्या मुक्कामाला श्रीमंतांचीच खुद्द प्रकृति अगदीं विकोपाला गेली होती. आतां ती अमळ बरी आहे ह्मणे, पण मर्जी अशी कांहीं नाजूक झाली आहे कीं, कसलीच गोष्ट त्यांच्यापुढें काढावयाची तूर्त सोय राहिलेली नाहीं!'

मामा यावर कांहीं तरी बोलणार होते, इतक्यांत त्यांच्या कानांवर घोड्यांच्या टापांचा आवाज येऊन ते थबकले व कानोसा घेऊं लागले. तों देवळाच्या दारासमोर दोन घोडेस्वार येऊन त्यांनीं आपले घोडे थांबविले आणि घोड्यांवरून उतरून ते आंत येत आहेत असें त्यांना दिसलें. घोडेस्वार आंत आले आणि त्यानीं गोविंदपंत नानांस व महादेवभटजींस मुजरा करून, बरोबर आणलेल्या थैल्या नानांच्या हातीं दिल्या आणि दुरूनच देवास नमस्कार करून ते बाहेर जाऊन उभे राहिले. नानांनी थैल्या सोडून पाहिल्या तों त्यांमध्यें एकंदर तीन लखोटे आहेत असें त्याना अढळून आलें. त्यांनीं ते तीनी लखोटे फोडले, व त्यातलीं तीनी पत्रे काढून पाहिलीं. त्यापैकी एक पत्र कमळापुरच्या मुक्कामाहून त्याचा पुतण्या मोरोबा यानें त्यांचा मुलगा पाडुरंगराव यास मिरजेस लिहिलेलें होतें. दुसरें पत्र त्याच ह्मणजे कमळापुरच्या मुक्कामाहून रामाजी गणेश नावाच्या मोरोबाच्या कारकुनाने पाडुरंगरावासच लिहिलेलें होतें. आणि तिसरें पत्र कनकगिरीच्या मुक्कामाहून गोपाळ रावानें खुद्द गोविंदपंत नानांसच लिहिलें होते. नाना आज लवकर जेवणे आटोपून सागलीस आल्यावर हीं सर्व पत्रें मिरजेस आलीं होतीं आणि पाडुरगरावानें स्वारांच्या तोंडून त्याच्या उत्तराची जरूर जाणून, नाना एव्हांना बनातल्या देवळांत असतील अशा कल्पनेनें तीं त्याच्याकडे पाठवून दिलीं होतीं. गोपाळरावाच्या पत्रात आपली प्रकृति फारच बिघडल्याचें लिहिलें असून आपल्या सोडवणुकीसाठीं कोणास तरी ताबडतोब पाठवून देण्याविषयीं वडिलास विनंती केली होती. नानांनीं तें पत्र वाचून "गोपाळ तर फारच जिकीरीस आलेला दिसतो" असें ह्मणत मामांच्या हातीं दिलें आणि त्यांनीं बाकीचीं दोनी पत्रें वाचावयास घेतलीं. तीं वेगवेगळया दृष्टींनीं महत्वाचीं असल्यामुळें आम्ही तशींच्या तशींच खालीं देतों.

श्रीगणराज.

"आशीर्वाद उपरि. श्रीमंतांस पथ्यास भाजी पाहिजे, त्यास तोंडलीं, व शेवग्याच्या शेंगा, व शेवग्याचीं फुलें, कोवळीं वांगीं व पुदिना कोंशिंबिरीस,

कढीलिंब व कोथिंबीर कोवळी, याप्रमाणें थोडे थोडे जिन्नस सारे एका पाटींत घालोन वर केळीचें पान घालोन बांधोन डांकेनें भाजी रोजचे रोज येऊन पावे याप्रमाणें पाठवीत जाणें. तशींच जिन्नसवार फुलें व केवड्याचीं कणसें व गुलाबाचीं फुलें व चाफ्याचीं व तुळशी व बेल येणेंप्रमाणें करंडीत घालोन भाजीबरोबर डांक चौक्या चहूं जागा चार ठेऊन दररोज ताजा जिन्नस येऊन पावे याप्रमाणें तरतूद करून पाठविणें. भाजी व फुलें पाठवाल तेव्हां वाटेस डाक व चौक्या आहेत त्यांणीं दर चौकीस पाणी शिंपडीत जावें याप्रमाणें ताकीद करून पाटींत घालून रवाना करणें. वरकड भाजीपाला पाठवाल तो बैलावरून पाठवीत जाणें. चार पांच खंडी लांकडांची तरतूद असों देणें. कोळसेही दहा बारा मण लागतील. सूचना लिहिली आहे. श्रीमंतांस बारीक जिरग्याचे तांदूळ पीठ घालून कांडवून बारीक सडवून तांदूळ मणभर पाठवून देणे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद."

नाना हें पत्र वाचून मामांच्या हातीं देत ह्मणाले, 'एकूण श्रीमंतांची स्वारी कमळापुरावरून मागें फिरली ह्मणावयाची! प्रकृति ढासळली ती ढासळलीच. गजाननाच्या मनांत काय आहे कळत नाहीं मामा.' असें ह्मणून त्यांनीं गजाननाची मर्जी त्याच्या चर्येवरून कांहीं ओळखतां आल्यास पहावी ह्मणूनच की काय, गाभाऱ्यांतील मंगलमूर्तीकडे एकवार आर्त नजरेनें पाहिलें! इतक्यांत त्यांचीं बायका-मुलें संगमेश्वराचें दर्शन करून आली आणि कट्ट्याच्या पाहिऱ्या चढून गणपतीच्या गाभाऱ्याकडे निघालीं. त्यांच्या पाठोपाठ देवाची गुरवीण पूजासाहित्य घेऊन गेली. नानांचें या मंडळीकडे लक्ष्य नव्हतें. ते राहिलेलें तिसरें पत्र वाचूं लागले होते. त्या पत्रांत पुढील मजकूर होता.

श्री

"सेवक रामाजी गणेश साष्टांग नमस्कार विज्ञापना. स्वामींचा निरोप घेऊन लष्करास आलों तो लष्करही रामापुरावर कमळापुरावर आलें. तों तिसरे दिवशीं श्रीमंत राजश्री अबाही आले. (लिहिणारा कारकून मोरोबांना अबा ह्मणत असून श्रीमंतांचें लष्कर तांदूळवाडीहून कऱ्हाड प्रांतांत आल्यावर मोरोबा चार दिवस सुटी घेऊन मिरजेस घरीं आला व कमळापूरच्या मुक्कामीं श्रीमंताच्या सेवेस रुजू झाला, त्या गोष्टीस अनुलक्षून त्यानें वरील उल्लेख केला आहे.) आबा न आल्याच्या पूर्वी दोन दिवस साहित्याचीं तरतूद दुमाल्यावर टाळाटाळ केली. श्रीमंतांची शरीरभावना चांगलीच आहे, मधीं समाधान

नव्हतें. मिरजेंत असतां ऐकत होतों ते लटकी बातमी. आंव झाली होती. उष्णाची बाधा शरीरीं होती. आतां शरीर चांगलेंच आहे. मर्जी बरीच आहे. मिरजेस यावें, चार दिवस रहावें, असें श्रीमंतांचें अंतःकरण आहे. त्याप्रमाणें अबांनीं विनंती केली आहे. यावें असें निम्में मानस झालें. अंतःकरणीं यावें असेंच आहे. बहुतकरून येतात. मर्जी फार चांगली आहे. राजश्री त्रिंबकराव मामांनी आपणाकडून लिहावयास आळस केला नाहीं. अदवानी-कडे आल्यामुळे श्रीमंताचे चित्तीं तो राग राहिला नाही. मर्जी चांगली आहे. तीर्थस्वरूप राजश्री नानासाहेबांची व सौभाग्यवती मातुश्री ताई यांची शरीर-भावना कशी आहे हेही पुसत होते. श्रीमंत सहा कोसी आल्यावर तुह्मी यावें लागेल. येविशीं आबा आपणांस लिहितील त्याअन्वयें यावे. वरकड आंतील अडचण जागाजुगा असेल ती नीट होईल. तरतुदेस गुंता नाहीं. राजश्री बाबुराव बाबास निरोप द्यावा असा आपला करार होता, त्यास श्रीमंत येणार हा निश्चय; त्यापक्षीं बाबास निरोप दिल्यास चिंता नाहीं. लष्करास आल्यास सर्वस्वदान केले. हे विज्ञापना. रागे भरतील यास्तव सविस्तर लिहिले आहे. हे विज्ञापना."

नाना हेंही पत्र वाचून महादेवभट मामाच्या हातात देत ह्मणाले, "मामा बघा आमच्या कारकून मंडळींची विद्वत्ता कशी आहे ती! श्रीमत धडधडीत प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें मोहीम टाकून परत फिरताहेत, आणि हा शाहणा लिहितो त्याची प्रकृती चागली आहे ह्मणून! तसेच मर्जी चागली आहे हें तरी एका पत्रात किती वेळ लिहावयाचे तें? अगदीं आचरट बोआ! बरे ते असो ह्मणा; पण मामा, आता तुह्माला चार दिवस सहकुटुंबच मिरजेस यावयास पाहिजे."

"का? मध्येच कशाला?" महादेव भटजींनी पत्रावरील दृष्टी वर उचलून नानाकडे पाहत पृच्छा केली.

"अहो मध्येच कसले?" नाना ह्मणतात, "श्रीमंत मिरजेस येताहेतना? त्याची नीट व्यवस्था राखावयाचें काम आह्मांला जमावयाचे नाही, आणि हल्लींच्या त्यांच्या नाजूक तब्येतींत तर मुळींच जमावयाचें नाहीं! ते आपलें तुमचें तुह्मीं सांभाळा!

'बरें चला' मामा ह्मणाले, 'तुमची मर्जीच असेल तर जाऊं या.'

'हो हो, मर्जी आहे तर,' नाना उद्गारले, 'आणि तीही आजच तुह्मांला आमच्या बरोबर घेऊन जाण्याची आहे.' इतकें बोलून त्यानीं गाभाऱ्याकडे दृष्टी वळविली आणि आपल्या कुटुंबास उद्देशून ते मोठ्यानें ह्मणाले, 'ऐकलेत कांहो,

श्रीमंतांची स्वारी एक दोन दिवसांत मिरजेस येणार आहे. आणि त्यांत ते आजारी असल्यामुळें तुमच्यावर अधिकच जबाबदारी येऊन पडली आहे!'

'अगोबाई, होय कां?' सत्यभामाताई गाभाऱ्यांतून बाहेर येत ह्मणाल्या, 'तर मग पार्वतीवहिनींना मला बरोबर घेतल्या पाहिजेत! आणि अण्णांना सुद्धां घेऊन चलायचें होतें.' ताई हे शद्ब आपल्या बंधूंना आणि भावजईला उद्देशून बोलल्या हे वाचकांनीं ओळखलेंच असेल.

'हो हो, त्यांना तर मी घेतोंच आहे.' नानांनीं उत्तर दिले, 'पण तुह्मांलाही आपली वर्दी देऊन ठेविली.'

ताई यावर काही तरी विचारणार होत्या, पण इतक्यात गाभाऱ्यात काहीतरी ताडकन् पडल्याचा आवाज आणि एक किंचाळी त्याना ऐकूं आली आणि त्या लगबगीनेच गाभाऱ्याकडे गेल्या. त्याच्या पाठोपाठ नाना व महादेवभटजीही उठून गाभाऱ्याकडे गेले. तों त्याना गाभाऱ्यात एक भयंकर दृश्य दिसले. देवाच्या पुढे एक नीराजन पडले असून त्यातील वात व तूप खाली सांडले आहे, आणि गोपाळरावाची पत्नी सरस्वतीबाई हिचा पदर पेटला असून गुरवीण व पार्वतीबाई या दोघीजणी मिळून तो विझवीत आहेत! तो प्रकार पहाताच नाना व मामा या दोघांच्याही काळजात चर्र झाले! ताईनी एक किंकाळी फोडली व त्या सुनेच्या बचावास धावल्या. मुलांनीं आरडा ओरड करून गाभाऱ्यात एकच कल्लोळ करून सोडला!

सरस्वतीबाईचा पदर लवकरच विझला, आणि त्याचा थोडा काठ जळण्यापलीकडे त्याना कांही विशेष इजा झाली नाही. पण या आकस्मिक दुश्चिन्हामुळें सर्वांच्या हौसेवर मोठेंच विरजण पडले. उद्याच या अरिष्टाची शांत करावयाची असे ठरवून सर्व मंडळी मिरजेस जाण्यास निघाली, पण त्यांच्या मनातली हुरहूर मात्र काही केल्या कमी झाली नाही!

---

## प्रकरण ३४ वें.

खरे, ले. १०८०–१०८९ इ० } **मोहरा हरपला!** { पौष व. १३ ते माघ शु. ७, १६९२

मागील प्रकरणी घडलेल्या हकीगतीस जवळ जवळ तीन आठवडे झाले होते, ह्मणजे आज पौष वद्य त्रयोदशी होती. आज आह्मी वाचकास कनकगिरी येथील

गोपाळराव पटवर्धनांच्या छावणींत घेऊन जात आहेत. गोपाळराव कनकगिरीस कां आले होते, हें वाचकांस मागील एक दोन प्रकरणांवरून कळलेंच आहे. गेल्या एक दोन वर्षांत गोपाळराव पटवर्धनांच्या पथकाकडे श्रीमंतांनी कर्नाटकांतील मोहि-मीचें काम सोंपविलें होतें आणि त्यानिमित्त जादा फौज ठेवण्यास परवानगी देऊन तिच्या खर्चाकरितां अदवानीच्या नबाबाकडे येणें असलेली खंडणी परभारें लावून दिली होती. गोपाळरावांनीं आपली कामागिरी तर पार पाडलीच, पण अदवानीचा नबाब बसालतजंग याचा मात्र त्यांना खंडणीची रक्कम देण्याचा विचार दिसेना. त्यामुळें ते खर्चाच्या मनस्वी पेंचांत आले. सावनूरच्या नबाबापासून घेतलेल्या खंड-णीची बहुतेक रक्कम त्यांनीं श्रीमंतांकडे रवाना केली होती, आणि ते स्वतः जवळ जवळ कफल्लकच राहिले होते. अशा स्थितींत बसालतजंगावर स्वारी करून त्याच्या-कडून जबरीनें खंडणी वसूल करण्यावांचून दुसरा मार्ग नाहीं हें जाणून त्यांनीं त्रिंबकरावमामांच्या संमतीनें अदवानीवर स्वारी केली आणि नबाबाला धाकदपटशा दाखवून आपली सर्व खंडणी त्याजपासून चोपून वसूल केली, खंडणी वसूल झाल्या वर ते कनकगिरीस आले, पण तेथें येईपर्यंत त्यांची प्रकृति अगदींच विकोपास गेल्यामुळें त्यांनीं नाइलाजानें तेथेंच मुक्काम केला, आणि आपल्या प्रकृतीची हकी-गत मिरजेस लिहून कळविली. त्रिंबकरावानें मात्र ‘मी नको नको ह्मणत असतां गोपाळराव अदवानीस गेले, आणि आतां अदवानीहून कनकगिरीस जाऊन स्वस्थ राहिले आहेत’ अशा आशयाच्या चुगल्यांचें एक पत्र श्रीमंतांस लिहून पाठविलें. तथापि पटवर्धन मंडळींची वेळ बरी असल्यामुळें त्या पत्राचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं, हें वाचकांस ठाऊक झालेंच आहे!

वर ह्मटल्याप्रमाणें आज पौष वद्य त्रयोदशी असून तिनिसाजची वेळ झाली होती. गोपाळराव पटवर्धन आपल्या राहुटींत एका गादीवर निजले असून त्यांचे धाकटे बंधु गंगाधरराव त्यांचे पाय चेपीत होते. त्यांच्या उशाशी परशुराम भाऊ बसले असून ते त्यांच्या कपाळावरून हात फिरतीत होते. त्याच्या मुद्रेवर निराशेची छाया पसरली असून ते अत्यंत कष्टी झाल्यासारखे दिसत होते. वाचकांनीं पूर्वीं गोपाळरावास पाहिलें त्याच वेळीं त्याची प्रकृती किंचित् खालावली असल्याचें त्यांना कळलें होतें. पण आज जी त्याची स्थिती दिसत आहे, तिच्या मानानें त्याची पूर्वींची स्थिति काहींच नव्हे असें वाचकाना वाटल्या-वांचून राहणार नाहीं. तो पहा त्याचा चेहरा कसा निस्तेज व काळवंडलेला दिसत आहे! त्यांच्या कपाळावरच्या शिरा चढून आल्या असून त्यांचे डोळे फिके फटफटीत दिसत आहेत! त्यांची दाढी वाढलेली असून त्याच्या तोंडावर प्रेतकळा आली आहे.

त्यांच्या अंगावर शाल टाकली आहे तरी तिच्या आंतून त्यांच्या हातापायांच्या झालेल्या काड्या आणि नगाऱ्यासारखें फुगलेलें पोट स्पष्टपणें जाणवत आहे! एका शद्वांत सांगावयाचें ह्मणजे गोपाळरावांना जलोदराची भावना झाली होती, आणि त्यांतही विशेष खेदाची गोष्ट ह्मणजे त्यांना योग्य औषधोपचार न झाल्यामुळें ती बळावली होती. त्यांनीं आपली प्रकृती बरीचशी बिघडेपर्यंत अगोदर तिची हकीगत कोणास फारशी कळूंच दिली नाहीं, आणि मग ती जेव्हां विकोपास गेली तेव्हा मिरजेस घरीं लिहून कळविलें! त्याचा स्वाभाविक परिणाम असा झाला कीं त्यांचे वडील गोविंदपंत नाना याना ते घरीं निघून येण्याकरितां आजाराचें निमित्त करीत आहेत असें वाटलें, आणि त्यांनीं त्यांना 'तुह्मी स्वशरीरविषयीं केवळ अवसान सोडून लिहिलें यावरून अपूर्व वाटले. ऐशास कोणी हरामजादेपणे घरीं राहिला असा अर्थ नाहीं,' इत्यादि काहीं उपहास, काहीं मर्मभेद करणारें पत्र लिहिलें. वडिलाचें हे पत्र वाचून गोपाळरावाना अत्यंत दुःख झालें. अगोदर त्रिंबकरावमामानें श्रीमंताकडे आपल्या चुगल्या केल्याचे ऐकून त्याना मनस्वी त्रास झाला होता. त्यांतच वडिलानी आपल्या प्रकृतीविषयी दाखविलेली ही बेपर्वाई पाहून त्यांना अतिशय विषाद वाटला. आपणास परत नेऊन आपल्या प्रकृतीवर औषधोपाय करावयाचें बाजूसच राहिलें, पण उलट वडिलानी आपले दुखणे खोटे ठरवून आपणास हिणवावें या गोष्टीची त्यांना मनस्वी खंत वाटून "जन हे सुखाचे, दिल्या घेतल्याचे, या अंतकाळीचें कोणी नाहीं" या संतवचनाची त्याना पूर्ण प्रचिती आली आणि ते आपल्या जिविताविषयीं बेफिकीर व उदास झाले! भाऊ व गंगाधरराव याना त्याची प्रकृती ढासळल्याचें समजले होते, पण त्यानी काही औषधोपाय करण्याची सूचना केली कीं, "वेड्यानो अरे मला होंत आहे काय? अमळ सरदी झाली आहे, होईल काहीं दिवसांनी दूर," असे ह्मणून त्याना गोपाळराव गप करीत. त्याचप्रमाणे "माझ्या प्रकृतीविषयीं घरीं काहीं लिहूं नका, घरची मंडळी उगाच भितील" असेही त्यानी त्या दोघास बजावण्यास कमी केले नाहीं. खाण्यापिण्याचा आणि पथ्याचा तर त्यानीं अगदीच धरबंध सोडला! आपण आता लौकरच मरणार हे त्याना निश्चित समजलेंच, मग उगीच पथ्य करून देहाचे हाल तरी का करा; अशा विचारानें त्यानीं मनाला येईल त्याप्रमाणें खाणेपिणें चालू ठेवले. याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. त्याची प्रकृति झपाट्यानें ढासळून हां हां ह्मणता त्यानी अथरूण धरलें.

आज तर साऱ्या दिवसांत त्यांनी अंथरूण सोडले नव्हतं. सकाळी लवकर मुखमार्जन करून ते जे एकदा अंथरुणावर येऊन पडले ते जेवावयास देखील उठले नाहीत. अन्न॰ ह्मणायेला दुपारच्या वेळी त्यानीं काय एक घोटभर दूध घेतलें

असेल तेवढेंच, बाकी सारा दिवस त्यांनीं नुसत्या पाण्यावर काढला. त्यांच्या पथकांतील कित्येक शिलेदार, बारगीर, कारकून वगैरे मंडळींना त्यांच्या प्रकृतीची हकीगत कळलेली होती. ते मधून मधून त्यांच्या प्रकृतीची विचारपूस करण्यासाठीं ह्मणून त्याच्या डेऱ्यांत येऊन जात होते. पण त्यांनाही त्यांनीं आपल्या खऱ्या स्थितीची दाद लागूं दिली नाहीं. तिनीसाज झाल्यावरही जेव्हां गोपाळराव संध्येस किंवा फराळास उठण्याचें चिन्ह दिसेना, तेव्हां मात्र परशुरामभाऊंचा धीर सुटला, आणि ते त्यांच्या उशाशीं बसून "दादा, आज तुह्मांला काय होतें आहे?" असें विचारीत त्यांच्या कपाळावरून ममतेनें हात फिरवूं लागले. आपण त्यांना पाहत आहोंत ते ह्याच स्थितींत होय.

भाऊंच्या प्रश्नाला गोपाळरावांनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं. मात्र त्यानी त्याच्या कडे आपली दृष्टि लावून एक दीर्घ निश्वास सोडला! त्या निश्वासात किती तरी अर्थ भरला होता! भाऊंना तो सगळाच समजला असावा असें जरी ह्मणवत नाहीं, तरी त्यांतला बराच भाग समजला असावा असें दिसलें. त्यांची मुद्रा अत्यंत खिन्न झाली, व ते अगदी काकुळतीस येऊन ह्मणाले, 'दादा, आपण आमच्या पासून कितीही लपविलेत, तरी आपल्या प्रकृतीचे लक्षण मला काही ठीक दिसत नाहीं. गेल्या आठवड्यात आपलें अन्न अजीबात सुटल्यासारखं झाले आहे. अंगात शक्तीही मुळींच राहिलेली दिसत नाही. आणि वैद्याला प्रकृति दाखवावयाची नाही असा तर आपण हट्ट धरला आहे. तेव्हा याचा अर्थ तरी आह्मी काय समजावयाचा?'

'अर्थ कसला घेऊन बसलास भाऊ?' गोपाळराव क्षीण स्वरात ह्मणाले, 'आणि वैद्याला दाखविण्याजोगे माझ्या प्रकृतीला झालें आहे तरी काय? अमळ जोराची सर्दी आणि अजीर्णांश झाला आहे, त्याने अन्नावरची वासना उडाली आहे झालें.'

'आपल्या ह्मणण्याप्रमाणें सर्दी आणि अजीर्णांशच का असेना?' भाऊ ह्मणाले, 'पण माझ्या समजुतीखातर आपण एकदा वद्याला प्रकृति दाखवा. मी मेणा पाठवून तेरदळच्या रणछोड वैद्याला बोलावून आणतो. पण हा पहा वामनराव आला; आतां ठीक झाले, आता तो आणि मी काय करावयाचे ते करितों.'

भाऊ ह्मणाले ते खरेंच होते. मिरजेहून वामनराव पटवर्धन आले होते आणि घोड्यावरून उतरून ते लगबगीने गोपाळरावांच्या डेऱ्यात येत होते. पण "वामनराव आला" हे शब्द कानीं पडताच त्याला आपली खरी स्थिति समजूं

देऊं नये असें गोपाळरावांच्या मनांत आलें आणि त्यांनीं उसनेंच अवसान आणून चटकन् उठून बसण्याचा प्रयत्न केला. आपलें होतें नव्हतें शक्ति-सर्वस्व वेंचून ते कसेबसे उठून बसले, पण तेवढे देखील कष्ट सहन करण्याची त्यांच्या प्रकृतींत ताकद राहिली नसल्यामुळें, त्यांच्या डोळ्यापुढें एकदम चक्कर आली, आणि झीट-आल्यासारखी होऊन ते अंथरुणावर मागच्या मागें कोलमडून पडले! पण झालेल्या प्रकारामुळें त्यांच्या अंगावरचा शेला बाजूला गेला, आणि त्यांचा देह सफाई उघडा पडला! वामनराव घाबऱ्या घाबऱ्या अंथरुणाजवळ येतो तो त्याला काय देखावा दिसला? गोपाळराव अंथरुणावर निश्चेष्ट पडले आहेत, त्यांना श्वास लागला आहे, त्यांचा चेहरा खप्पड झाला असून गालफडें बसली आहेत, आणि त्यांचें पोट घागरीसारखें मोठें झालें असून हातापायाच्या काटक्या झाल्या आहेत!

आपल्या वडील बंधूंची ती अवस्था पाहून वामनरावाच्या काळजांत चर्र झालें, आणि तो धावतच पुढें होऊन गोपाळरावांच्या उशाशीं बसला. तोंपर्यंत भाऊंनी गोपाळरावास आपल्या हातात सावरून धरून त्यांचे डोळ्यांस ते पाणी लावीत होते. गंगाधरराव तर बिचारा पोरवयीच होता. बाजूस पडलेला शेला गोपाळरावाच्या अंगावर घालून तो केविलवाण्या मुद्रेने वामनरावाच्या तोंडाकडे पाहूं लागला. थोड्या वेळानें गोपाळरावाला लागलेली धाप अमळ कमी झाली. तेव्हां वामनरावाला अमळ धीर येऊन 'अरेरे दादा, काय आपली अवस्था झाली ही?' असें ह्मणत त्यानें गोपाळरावाचा हात उचलून आपल्या हातात घेतला. पण गोपाळराव त्याच्याशीं बोलण्याच्या स्थितींत होते कोठे? ते अजून बेशुद्धच पडले होते. ते पाहून वामनरावाने परशुराम भाऊंकडून गोपाळरावाच्या प्रकृतीची सर्व हकीगत विचारून घेतली. ती ऐकून [illegible] आता धडगत नाहीं अशी वामनरावाची खात्री झाली. नंतर त्यानें व भाऊंनी बराच वेळ विचार करून असें ठरविलें कीं, उद्यां ह्मणजे चतुर्दशीच्या दिवशीच भल्या पहाटेस गोपाळरावांची मेण्यातून मिरजेस रवानगी करून द्यावी, त्यांच्या पथकाची जबाबदारी वामनरावानें आपणाकडे घ्यावी, आणि ती घेतल्याबद्दल श्रीमंतास व त्रिंबकराव मामांस कळवावें. श्रीमंतांची अगाऊ परवानगी घेतल्यावाचून अशा तऱ्हेनें पथकाच्या अधिकारांत ढवळाढवळ करणें रास्त नव्हते, पण वेळेचें महत्व जाणून वामनरावानें हा कर्तव्यातिक्रम करण्याचें पतकरलें. नंतर रात्रीच्या रात्रीं त्यानें मऊ गाद्या गिर्द्या घालून एक मेणा तयार करविला आणि पहाटेच्या वेळीं त्यांत गोपाळरावांना निजवून व बरोबर दहापांच विश्वासू शिलेदार, प्यादे आणि कारकून देऊन त्यानें त्यांची मिरजेस रवानगी करून दिली.

या वेळीं मिरजेस किल्ल्यांत पटवर्धनांच्या घरीं मंडळींची खूपच गर्दी जमली होती. गोविंदपंतनाना, त्याचें कुटुंब आणि तिघी सुना, त्यांचा मुलगा पांडुरंगराव तात्या, नानांचे धाकटे बंधु भास्करपंत आप्पा, नानांचे दोघे पुतणे हरि रामचंद्र आणि मेघश्याम कृष्ण इतकी पटवर्धन मंडळी आणि नानांचे मेहुणे महादेवभट पाटणकर आणि त्यांची पत्नी पार्वतीबाई, या सर्व परिवारानें पटवर्धनांचा वाडा गजबजून गेला होता. मागील प्रकरणांत नाना व महादेवभट मामा हे दोघे श्रीमंतांची स्वारी मिरजेस येणार अशा कल्पनेनें हरिपुराहून लगबगीनें मिरजेस गेल्याचें वाचकांना कळलेंच होतें. पण त्या बाबतींत त्यांची निराशा झाली. श्रीमंत कमळापुराहून जे माघारे फिरले, ते बेलवंडीवरून मिरज कर्यातींतील मंगरूळ गांवीं पौष शुद्ध नवमीस आले, आणि तेथून आपलें येणें मिरजेस होत नाहीं असा निरोप गोविंदपंतनानांस पाठवून लगेच निघाले, ते खानापूर, जांबुळणी, इंगोली, पळशी, शिंगापूर, निंबाळक, अशीं गांवें घेत पुण्याकडे गेले. श्रीमंतांनीं मिरजेस जाण्याचा बेत रद्द केल्यावर मोरोबा पटवर्धन त्याची परवानगी घेऊन थोडे दिवस कोंकणात गेला.

आज ह्मणजे पौष वद्य चतुर्दशीचे दिवशीं सकाळींच श्रीमंताच्या छावणींतून एका कारकुनाचें निंबाळकच्या मुक्कामाचें पत्र गोविंदपंतास आलें होते व त्यात त्यानें श्रीमंतांची प्रकृति साधारण बरी असल्याचें कळविलें होतें. श्रीमंतांचा पाहुणचार करण्याच्या बाबतीत जरी गोविंदपंतांचा अशा प्रकारें विरस झाला, तरी त्यांनीं त्या कामीं मनापासून दाखविलेलें अगत्य श्रीमंतांच्या लक्ष्यांत आल्यावाचून राहिलें नाहीं. श्रीमत येत नाहींत अशी खात्री झाल्यावर नानांनीं महादेवभट मामाच्या सूचनेप्रमाणें आपला मुलगा वामनराव याची रवानगी गोपाळरावाकडे करून दिली व त्याला चार आठ दिवस राहून परत येण्यास सांगितलें. गोपाळरावाची प्रकृति किती विकोपाला गेली होती याची ह्मातान्याला अद्यापही गंधवार्ता नव्हती!

चतुर्दशीच्या दुपारचीं जेवणें आटोपून मंडळी बसली होती. दुसरा कांहीं उद्योग नसल्यामुळें गोविंदपंत नाना आणि महादेवभट मामा हरिपुरच्या वनाकडे जावयास निघाले होते. पालख्या तयार होऊन राहिल्या होत्या. दोघांनीं आपले पोषाख केले आणि आतां ते सदरेवरून खालीं उतरणार, इतक्यांत एक घोडेस्वार दौडतच किल्ल्यांत आला, आणि त्यानें नानांस मुजरा करून एक लखोटा त्यांचे हातीं दिला. त्याच्या घोड्याच्या तोंडांतून तर फेस गळत होताच, पण त्याला स्वतःलाही धाप लागली होती यावरून तो फारच त्वरेनें आला असावा असें दिसत होतें. नानांनीं लखोटा फोडला आणि त्यांतील पत्र वाचावयास घेतलें. त्यांनीं

त्यांतील मजकुरावरून एकवार नजर फिरविली मात्र, तोंच त्यांच्या तोंडांतून 'गजानना, काय रे बाबा हें?' असे उद्गार निघून गेले आणि ते मटकन् खालीं बसले! महादेवभट मामांना हा काय प्रकार आहे तेंच समजेना. त्यांनीं घाबऱ्या घाबऱ्या नानांस प्रश्न केला, 'नाना, काय झालें हो?' गोविंदपंत नाना कंठ दाटून येऊन ह्मणाले, 'मामा, काय सांगूं? चिरंजीवाची प्रकृति खरोखरीच फार बिघडलेली दिसते! वामनानें मेण्यांतून त्याची रवानगी करून दिली आहे!'

'एवढेंच ना?' मामा नानांना धीर देत ह्मणाले, 'मग त्यांत एवढें घाबरायला काय झालें नाना? गोपाळराव आल्याबरोबर त्याची प्रकृती तासगांवच्या सांभारे वैद्यबुवाना दाखवून त्यांचे उपाय सुरूं करूं ह्मणजे झालें.' मामांनीं अवसान तर खूप आणलें होतें, पण ते स्वतः देखील घाबरले होते हें त्यांची चर्याच सांगत होती. 'बरें, त्या पत्रांत गोपाळरावाला काय होतें आहे, तें कांहीं लिहिलें आहे कां?' मामांनीं नानांचें लक्ष्य गुंतविण्याच्या हेतूनें प्रश्न केला.

'तें कांहीच लिहिलें नाहीं,' गोविंदपंत नाना त्रासिक स्वरानें ह्मणाले, 'फक्त त्याची प्रकृति फार बिघडली आहे इतकेंच लिहिलें आहे. हीं आजची पोरें अशीं व्यवहारशून्य असतात मामा, कीं काय सागूं? आपल्या मोघम लिहिण्यानें दुसऱ्यांचा जीव टांगणीला लागेल याची ह्यांना कल्पना देखील असत नाहीं!'

गोपाळरावाच्या प्रकृतीला अमुक होतें आहे, असें कळण्यांत नानांला असा कोणता मोठा लाभ होणार होता हें मामास समजेना, तथापि भाच्याचा कैवार घेऊन नानांच्या मनाविरुद्ध बोलण्याची ही वेळ नव्हे हे जाणून ते गप राहिले. हरिपुरास जाण्याचा बेत रद्द करून दोघे मेहुणे सदरेवरच बसून राहिले. पत्राची बातमी बायकामंडळींत हा हा ह्मणता पसरली आणि त्या साऱ्या जणी माजघरात गोळा होऊन चुळबूळ करूं लागल्या. मामानीं आत जाऊन त्याना धीर देण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण त्याचा काही विशेष उपयोग झाला नाही. आणखी एक प्रहर गेला. सर्व मंडळी काय बातमी येते याची आतुरतेने वाट पहात होती. इतक्यांत दुसरा एक घोडेस्वार पत्र घेऊन आलेला नानाना दिसला. तोही दौडतच आला होता. नानांनी त्याच्याजवळचें पत्र घेऊन वाचलें. ते गजेंद्रगडच्या मुक्कामाचें होते. गोपाळरावाचा मेणा झपाट्याने येत आहे, यावरून त्यांची प्रकृति फारच बिघडली असली पाहिजे अशी नानांची अधिकच खात्री झाली आणि त्यांची हुरहूर शतपट वाढली. महादेवभट मामांनीं त्याची मनःस्थिति ओळखली, आणि 'सांबाऱ्यांचें औषध चांगलें कीं तेरदळच्या रणछोड वैद्याचें चांगलें, पुण्यास हल्लीं कान्होबा शतघ्ने नावाचे नामांकित वैद्य असून ते कसलाही जबर व्याधी हां हां

ह्मणतां बरा करतात ' इत्यादि गोष्टी काढून त्यानीं त्यांना उमेद आणण्याचा प्रयत्न चालविला. पण नानांचें चित्त या वेळीं मुळींच ठिकाणावर नसून ते मामांच्या बोलण्याला नुसते हुं हुं करीत राहिले होते. होतां होतां चार घटका दिवस राहिला. इतक्यांत एक सांडणीस्वार यादवाडच्या मुक्कामाचें पत्र घेऊन आला. आणखी थोडा वेळ गेला. तिनीसांज झाली. तोंच आणखी एक सांडणीस्वार पत्र घेऊन आला. तें कुडचीच्या मुक्कामाचें होतें. पत्र वाचून महादेवभट मामा तें नानांच्या हातांत देत ह्मणाले, ' नाना, गोपाळराव आतां घरीं सुरक्षित आला ह्मणावयास कांहीं हरकत नाहीं. ' नानांनीं काहीं उत्तर केलें नाही, एक दीर्घ निश्वास मात्र सोडला! बहुतेक मंडळींनीं ती रात्र जागून काढली.

इकडे गोपाळरावाचा मेणा झपाट्यानें येत होता. भोयानी आपल्या शारिरिक श्रमांची शिकस्त चालविली होती. दहा घटका रात्रीचे सुमारास मेणा म्हैसाळास येऊन पोंचला. पण आता गोपाळरावांच्या लक्ष्यात आले की, येथून लवकरच अमावास्या लागणार, आणि तीही मंगळवारची आणि मासान्ताची! तव्हा असल्या कुयोगावर घरीं जाणें इष्ट नाही, असा विचार करून गोपाळरावांनीं म्हैसाळावरच मुक्काम केला, आणि हरिपूर मुक्कामीं आपल्या तुळेसाठी साहित्याची तयारी करण्याबद्दल मिरजेस निरोप पाठविला. अमावास्येचा सर्व दिवस त्यानी म्हैसाळासच काढला आणि प्रतिपदेच्या दिवशी दहा घटका दिवसास चांगल्या मुहुर्तावर तेथून निघण्याचें ठरविले. पण आपला मृत्युकाळ जवळ आला आहे हे समजल्यामुळेच कीं काय, ते मुहूर्त टाकून दोन घटका रात्र राहिली असताच म्हैसाळहून निघाले! ते सूर्योदयाच्या सुमारास वड्डीच्या ओढ्यावर आले, इतक्यात त्याना आणण्यासाठी मिरजेहून पांडुरंगराव तात्या निघाले होते त्याची व गोपाळरावाची वाटेत गाठ पडली. मग दोघे मिळून चार घटका दिवसास मिरजेस येऊन पोचले. गोपाळरावाचा मेणा वाड्यात आला, तो गोविंदपंत नाना व महादेवभट मामा सदरेवरच त्यांची वाट पहात होते. मेणा येऊन सदरेच्या पाहिऱ्यांशीं थांबला. भोयानी रावाना उचलून आंत आणलें आणि माजघरांत नेलें. गोविंदपंत नानांचे पंचप्राण कासावीस झाले होते, आणि साऱ्या इंद्रियांची शक्ति एकवटून डोळयात आली होती. त्यांनी आपल्या समोरून चाललेल्या गोपाळरावांच्या चेहऱ्याकडे एकवार नजर टाकली, आणि त्यांच्या मेंदूत ढवळल्यासारखें होऊन ' गोपाळा, कायरे बाबा तुझा अवस्था झाली ही ! ' असें ह्मणून हंबरडा फोडला ! त्याचाच पडसाद माजघरांत सत्यभामाताईच्या हुंदक्याच्या रूपानें उमटला !

पुढील मजकूर आह्मी वाचकांस संक्षेपानें कळवितों, आणि तोही एका अस्सल

पत्रावरून कळवितों. " इतकें दुखणें भारी, परंतु कोणास दर्शविलें नाहीं. आपला मृत्यु समीप आला, परंतु हिमतीच्या गोष्टी सांगाव्या. कोणी भेटावयासी आले तितक्यांशीं ओळखून भेटी घेतल्या. तदोत्तर संगमास तुळा करावयासी जात नाहीं ह्मणोन सांगितलें. तेथेंच साहित्याचें करावें ह्मणोन सांगितलें. त्यावरी तेथेंच सर्व साहित्य करोन तृतीया भृगुवारीं तुळा करावीसा करार झाला. वरकड दैवी औपधी उपाय करावयासी लागलों तों संध्याकाळ झाला. तेव्हा सर्व प्रायश्चित्त द्यावयाचा आग्रह करूं लागले. कोणी नाहीं ह्मणत होते, परतु फारच आग्रह पाहून द्वितीयेस करावेंसें करून साहित्य केले. सारी रात्र ( प्रतिपदेची ) चागले होते. दोन तास रात्र राहिली तेव्हा पथ्याचें घालून सूर्योदयास प्रायश्चित्तास प्रारंभ केला. लवकर करणें ह्मणून आपणच फार निकड करून आपल्या मुखें मंत्र ह्मणून ब्राह्मणांस दक्षिणा आपल्या हातें दिली! गोदानें होऊन गंगोदक व तीर्थ पोटात घेतांच प्राण व्याकूळ झाला. इतके सारे आपल्या धीरें केले, परंतु आपला अंतकाळ समीप आला असे कोणाजवळ बोलले नाहीत. वरकडही कोणती गोष्टी बोलले नाहीत. सहा घटका दिवस आला, तों काल झाला. त्यासमयीं ज्याप्रमाणें धरणीकंप होतो तो न्याय झाला!"

वाचकहो, वरील पत्रलेखकाने गोपाळराव पटवर्धनांच्या मृत्यूला धरणीकंपाची उपमा दिली आहे ती किती यथार्थ आहे बरें? त्यांच्या मृत्यूनें मराठेशाही तर हदरलीच, पण गोविंदपंत नानांनी तडातडा कपाळ इतक्या जोरानें जमिनीवर हपटून घेतले कीं त्यामुळे सदरेची सारी जमीन गदगदा हलल्याचा महादेवभट मामास क्षणभर भास झाला!

---

## प्रकरण ३६ वें.

### वैद्यराज कीं राजवैद्य? { फाल्गुन व. ७-१६९३

गोपाळराव पटवर्धनांच्या मृत्यूला दीड महिना होऊन गेला असून श्रीमंतांचा मुक्काम सांप्रत पुण्यासच होता. गोपाळरावांच्या मृत्यूनें झालेली मराठेशाहीची हानि श्रीमंतास फार जाणवली. त्यांना ती हकीगत कळताच त्यानीं आपला दरबार व चौघडा चार दिवस बंद ठेवला होता. त्रिंबकराव मामा मनांतून पटवर्धन मंडळींचा एवढा द्वेष्टा खरा, पण त्यानें सुद्धां गोपाळरावांच्या मृत्यूची हकीगत

ऐकतांच गोपाळराव ' आम्हां ब्राह्मणांमध्यें व सरदारांमध्यें मुकुटमणि होते, त्यांणीं तों आपला पहारा गाजवून वक्रांतच ( डौलांत ) गेले ' असे उद्गार काढले. गोपाळरावांच्या मृत्यूने श्रीमंतांस मानसिक दुःख जरी अतिशय झालें, तरी त्यांची प्रकृति एकंदरींत ठीक होती. त्यांच्या हातापायांची होणारी आग आणि डोळ्यांची जळजळ बरीच कमी झाली असून अंगांतील ज्वरही जवळ जवळ नाहींसा झाला होता. श्रीमंत प्रस्तुत राजेश्वरभटाचें औषध घेत असून, कणीघाम डाक्तर फक्त सांजसकाळ त्यांची प्रकृति पाहून जात असे. श्रीमंताच्या औषधावर आणि पथ्यापाण्यावर श्रीमंत सौभाग्यवती रमाबाई आणि श्रीमंत पार्वतीबाई यांची देखरेख असून नाना फडणीस व हरिपंत फडकेही त्या बाबतींत चागले लक्ष्य पुरवीत होते. मोरोबा पटवर्धन कोकणांतून मिरजेस आल्याचें श्रीमंतास कळलें होतें, पण गोपाळराव पटवर्धन नुकतेच वारले आहेत हें जाणून श्रीमंतानीं त्याना अद्याप पुण्यास बोलावून घेतलें नव्हतें. श्रीमंतानीं आणखी चार सहा महिने असेंच व्यवस्थेनें औषध घेतलें तर आपण त्यांची प्रकृति निकोप दुरुस्त करूं शकूं अशी राजेश्वरभटाने हमी घेतली होती, आणि त्याच्या हमीला किंमत येण्याजोगी परिस्थितिहि निर्माण झाली होती. श्रीमतांना अलीकडे बरीच हुषारी वाटूं लागली असून ते कचेरीलाही येऊन बसूं लागले होते. त्यांना थोडथोडी भूकही लागूं लागली होती व त्याच्या चेहऱ्यावर किंचित् तजेलाही पण आला होता. अशा स्थितीत राजेश्वरभटाच्या औषधावर व सागण्यावर सर्वांचीच श्रद्धा बसली यात नवल नाही. नाही ह्मणावयास एकटा कणीघाम काका मात्र श्रीमंताना " आपली टब्बेट बरी जाली असे न मानटा आपन बहुट खबरडारीने वागले पाहिजे " असें खिन्न मुद्रेने बजावीत असे, मग त्याच्या प्रकृतीत त्याला काय दोष दिसत होता, नकळे !

पण श्रीमंताची प्रकृति अद्याप विश्वसनीय मानण्याजोगी नाही, असें एकट्या कनिंगहॅम काकाचेंच तेवढें मत नसून, आमच्या वाचकाचे दोस्त कान्होबा शतघ्ने यांचेंही मत पण तसेंच होतें. फरक एवढाच होता कीं, कनिंगहॅम काका रोज दुवक्त श्रीमंताची प्रकृति पहात होता, आणि त्याच्या प्रकृतीत त्याला कांहीं तरी व्यंग दिसत होतें, ह्मणून तो श्रीमंताची प्रकृति अजून खात्रीने सुधारली असें ह्मणावयास तयार नव्हता; तर आमचे कान्होबा श्रीमंताची प्रकृति न पाहतांच, ऐकीव बातमीवरूनच केवळ तसें ह्मणत होते ! मात्र एवढ्यावरून कान्होबांची वैद्यकीय परीक्षणशक्ति विशेष वाढली होती, असा भलताच गैरसमज वाचकांनीं करून घेऊं नये, अशी त्यास आमची सूचना आहे. कान्होबांची विद्वत्ता पूर्वींइतकीच अगाध होती ! तर मग त्यांचा तर्क कनिंगहॅम डाक्तराच्या तर्काशीं

इतका जुळता कसा आला, याचें आमच्या वाचकांना कोडें पडेल, ह्मणून त्याचा थोडा खुलासा करणें भाग आहे. कान्होबांची मोठ्यांत मोठी महत्वाकांक्षा अशी होती कीं, श्रीमंतांना एकवार आपलें औषध सुरू व्हावें, आणि आपणांस 'राजवैद्य' ही पदवी एकदां मिळावी. इतकी मोठी महत्वाकांक्षा धारण करण्याजोगी परिस्थिति कान्होबांना सांप्रत सर्व प्रकारें लाभली होती हें कबूल करणें भाग आहे. प्रस्तुत त्यांच्याकडे मोठमोठे रोगी येऊं लागले होते, हें वाचकांना ठाऊकच आहे. मोरोबा-दादा फडणिसांचे पुत्र बाबूराव, श्रीमंत रघुनाथराव दादासाहेब, त्यांच्या परिवारांतली मंडळी, असल्या बड्या बड्या धेंडांचीं नावें त्यांच्या रोग्याच्या नोंदवहींत दाखल झालीं होतीं. अर्थात् कान्होबा प्रत्यक्ष राजवैद्यच जरी नाहींत तरी निदान वैद्यराज झाले होते असें ह्मणावयास हरकत नाहीं. पण कान्होबाचें समाधान एवढ्यावरच कोठें होणार होतें? त्यांना आतां राजवैद्य ह्मणवून घ्यावयाची हांव सुटली होती. श्रीमंताची प्रकृति बिघडून ते दक्षिण कर्नाटकातून परत फिरले, ही बातमी पुण्यास कळतांच सारें शहर हवाल दील होऊन गेलें खरें, पण आतां श्रीमंतांना औषधोपचार करण्याची संधी आपणास मिळेल, या कल्पनेनें कान्होबांस मनातून बरेंच वाटलें! वाचकहो, कान्होबाची ही वृत्ति पाहून आपण त्याना कृतघ्न, राक्षसी वृत्तीचे मानावयास तयार व्हाल, पण कान्होबांची तरफदारी करून आह्मी आपणास असें सुचवितों कीं, कान्होबाची ही वृत्ति आसुरी स्वार्थानें प्रेरित झालेली नसून व्यवहारशून्य ज्ञानाभिमानानें प्रेरित झालेली होती, हें जाणून आपण त्याना क्षमा करावी. कान्होबांनी आपला आनंद उघडपणें बोलून दाखविला नाहीं हें खरें, पण 'श्रीमंताची प्रकृति बिघडली, वाईट गोष्ट झाली' अशा अर्थाचे उद्गार कोणी काढले की कान्होबा लगेच त्यावर 'मग त्यात इतकें भिण्याजोगें काय आहे? योग्य औषध पोंचलें कीं त्याची प्रकृति तेव्हाच दुरुस्त होईल!' असें ह्मणून त्यास चूप करीत. अर्थात् 'योग्य औषध' या कान्होबाच्या शब्दात गर्भित होणारा अभिमानाचा किंवा भरवशाचा ध्वनि त्याच्या स्वतःच्याच औषधोपायाला अनुलक्षून असे, हें आमच्या चतुर वाचकाना सांगावयास नकोच!

होता होता श्रीमंताची स्वारी पुण्यास येऊन दाखल झाली. आता आपणास त्यांची प्रकृति पहावयास बोलावणें येणार, अशी कान्होबांची खात्री असल्यामुळें, त्यांनीं श्रीमंत पुण्यास आल्या दिवशीच आपले ठेवणींतले कपडे काढून तयार ठेवले. आपण रोगी पहावयास घराबाहेर गेलेले असावयास आणि आपणास वाड्यांतलें बोलावणें येण्यास चुकून एकच गांठ पडावयाची आणि आपण घरीं नाहीं असें पाहून बोलावणें परत जावयाचें, असा प्रसंग येऊं नये ह्मणून कान्होबा

रोगी पहाण्यासाठीं बाहेर जावयाचें टाळूं लागले! तरी देखील कान्होबांना वाड्यांतलें निमंत्रण येण्याचें कांहींच चिन्ह दिसेना. श्रीमंतांना पुण्यास येऊन एक दिवस झाला, दोन झाले, तीन झाले, आठ झाले, तरी कान्होबांची आशा सफल होईना! कान्होबा अधीर झाले. त्यांच्या मनांत आपले प्रतिस्पर्धी जे लागवणकर वैद्य त्यांचें तर औषध श्रीमंतांस सुरू झालें नसेलना, अशी शंका आली. त्यांनीं चौकशी केली, तिजवरून त्यांना असें समजलें कीं, श्रीमंत लागवणकराचें औषध घेत नसून वांईच्या राजेश्वरभट नांवाच्या वैद्याचें घेत आहेत. लागवणकराचें औषध श्रीमंतांना चाललेलें नाहीं हें ऐकून कान्होबाना त्यातल्या त्यांत बरें वाटलें, पण आपणासारखा धन्वंतरी पुण्यास मूर्तिमंत असतांना, त्यानीं राजेश्वरभटासारख्या भुरट्या वैद्याचें औषध घ्यावें, या गोष्टीची त्याना फार चीड आली, आणि ते ती आपल्या बोलण्यांतून प्रकट करू लागल. त्याच्या घरीं जमलेल्या मंडळीत श्रीमंताच्या प्रकृतीसंबंधी सहज गोष्टी निघून, राजेश्वरभटाच्या औषधानें श्रीमंतास हल्लीं बरें वाटत आहे असें कोणी ह्मटले की पुरे, कान्होबा लगेच पिसाळून जात व उसळत “काय बरें आहे? बरें वाटणें ह्मणजे काय, हें तुह्मांला कांहीं कळतें कांहो? त्या राजेश्वरानें कांहीं तरी रसायन दिलें असेल, त्यामुळे रोगाचा तात्पुरता उपशम झालासा वाटतो आहे, पण पुन्हा उलटेल तेव्हा समजेल! आपल्या बोलण्याचा श्रोते मंडळीच्या मनावर विपरीत परिणाम होऊन त्यानी त्याचा भलताच अर्थ करण्याचा संभव आहे, हें जाणून कान्होबा आपले बोलणें लगेच सावरून घेत, “श्रीमंताना बरें वाटलें तर ते आह्मांला तरी नको का आहे? पण भलत्या लुंग्या सुंग्या लोकाची औषधे घेण्यात कसा धोका असतो, ते आपलें तुह्मांला सांगितलें !”

पण घरच्या घरीं चडफडत बसूनच कान्होबा थांबले नाहींत. त्यांनी आपला फज्ज्या श्रीमंताच्या वाड्यापर्यंत पोचविण्याचे दीर्घ सूत्र आरंभिलें. श्रीमंताजवळ नेहमीं असणारी मंडळी कोण कोण याचा त्यांनी पत्ता काढला व त्याची मुद्दाम गाठ घेऊन त्याच्यापाशीं राजेश्वरभटाची निंदा करण्यास प्रारंभ केला. हरिपंत फडके, मोरोबा पटवर्धन, कृष्णराव काळे, इत्यादि कांहीं मंडळींची आणि कान्होबांची अलीकडे बरीच जानपछान झाली असून, त्यातील कोणी कोणी कान्होबांच्या घरीं क्वचित् जात येतही असत. त्या मंडळीबरोबर बोलताना कान्होबा कांहीं तरी निमित्तानें श्रीमंतांच्या दुखण्याचा विषय काढून सहज ह्मणत, ‘कायहो, तुह्मी श्रीमंतांच्या शेजारीं नेहमीं असणारे, आणि तुमच्या हातून एवढाही बंदोबस्त होऊं नये? तो वांईचा कुठला भुरटा राजेश्वर कां फाजेश्वर आणून त्याचें

औषध श्रीमंतांना सुरू केलें आहे ह्मणून ऐकतों. पण बघाहो बुवा, त्याच्या कच्या रसायनांनीं श्रीमंतांना चार दिवस गुण आलासा वाटेल, पण तो कांहीं खरा गुण नव्हे. आपलें तुह्मांस बजावून ठेवतों. हो, आह्मांला निमंत्रण नाहीं तर आह्मी तरी ही उठाठेव कां करावी ह्मणा; पण श्रीमंतांची प्रकृति अजून हातांत आहे असें आह्मांस वाटतें, ह्मणून आपले तुह्मांस सुचविलें !' कान्होबांच्या या बोलण्याचा अर्थ त्या मंडळींना समजत नव्हता असें नाहीं, पण ते तरी बिचारे काय करणार? श्रीमंतांना चाललेलें राजेश्वराचें औषध बंद करून कान्होबांचें सुरू करणें त्यांच्या हातीं थोडेंच होतें? असो, श्रीमंतांच्या प्रकृतीस वाटणार गुण हा खरा गुण नव्हे असें कान्होबा कां ह्मणत असत, हें आतां वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल.

जसजसे अधिकाधिक दिवस जात चालले, तसतशी कान्होबांची निराशा होऊं लागली. त्यांचा निर्वाणींचा एक बाण अद्याप शिल्लक होता, तो उपयोगांत आणण्याचें त्यांनीं ठरविलें. सदाशिव दीक्षित दाते हे वाड्यांत मृत्युंजयाच्या अनुष्ठानाला लावलेल्या ब्राह्मणांत होते, हें वाचकाना ठाऊकच आहे. कान्होबांनीं जरी एकदा त्यांची कुचेष्टा केली होती तरी कान्होबांवरील त्याचा लोभ रेसभरही कमी झाला नव्हता. सदाशिव दीक्षिताना श्रीमंत फार मानतात हें कान्होबांना ठाऊक होतें. ह्मणून कान्होबांनी त्याच्या मार्फत आपला मतलब साधण्याचा बेत केला. एक दिवस सदाशिव दीक्षित कान्होबाचे घरीं आले असता, कान्होबानी आपल्या औषधाची श्रीमतांजवळ शिफारस करण्याबद्दल त्याचेपाशीं गोष्ट काढली. सदाशिव दीक्षित कान्होबाचे धारिष्ट पाहून चकित झाले. "कान्होबा, तूं वेडा तर नाहींसना? अरे, असल्या थोरामोठ्याच्या भानगडीत कशाला पडतोस? अरे, या श्रीमंत मंडळीच्या भानगडींत पडणें ह्मणजे जळत घर भाड्यानें घेण्यासारखें आहे. तुला काय करावयाची ही नसती उठाठेव? त्यातून त्याचें होऊन बोलावणे आलें तर ती गोष्ट वेगळी. तुझें नांव त्याच्या कानावर गेलें आहे. दादासाहेबाना तुझें औषध चालले होतें हे श्रीमंतांना कळलें आहे. त्याना वाटलें तर ते तुला बोलावतील, आणि तशा रीतीनें जाण्यातच मौज आहे." इत्यादि नाना प्रकारे युक्ति-वाद करून सदाशिव दीक्षितानीं कान्होबाना आपल्या हेतूपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. पण कान्होबा काहीं केल्या ऐकेनात. "दीक्षित, गंगा विष्णूंच्या जागी मला येथें तुह्मीच आहांत. माझा अभिमान तुह्मी जर नाहीं धरायचा, तर कोणी धरावयाचा!" इत्यादि बोलून त्यानी सदाशिव दीक्षितांना अशी कांहीं गळ घातली कीं, दीक्षितांचा अखेर नाइलाज होऊन त्यांनीं कान्होबांकरितां

प्रयत्न करण्याचें कबूल केलें. ‘मी आजच शद्व टाकून पाहतों, माझा शद्ब रुचला तर तुला श्रीमंतांकडून आजच्या आज बोलावणें येईल, तें आलें नाहीं तर माझ्या खटपटीला यश आलें नाहीं असें समज, ’ असा संकेत ठरवून दीक्षितांनीं कान्होबांचा निरोप घेतला. तो सारा दिवस कान्होबा श्रीमंतांच्या बोलावण्याची वाट पाहत होते. पण संध्याकाळ झाली तरी जेव्हां वाड्यांतलें बोलावणें येण्याचें कांहींच चिन्ह दिसेना, तेव्हां त्यांची फार निराशा झाली. दुसऱ्या दिवशीं सदाशिव दीक्षित स्वतःच कान्होबांकडे आले व “ कान्होबा, मी श्रीमंतांजवळ गोष्ट काढली होती, श्रीमंतांनीं माझें सर्व बोलणें ऐकून घेतलें, तुझ्याबद्दल चौकशी केली, तुझा गुरु गंगा विष्णु याच्याबद्दल बरीच माहिती विचारली, पण मी तुझें औषध घेण्याची गोष्ट काढतांच प्रस्तुत मला बरें वाटतें आहे, जरूरच वाटली तर त्यांना बोलवूं असें ते ह्मणाले” असें कान्होबांना सांगून ते निघून गेले. आतां मात्र कान्होबांची पुरती निराशा झाली. राजवैद्य ह्मणवून घेण्याचें भाग्य आपल्या नाशिबीं नाहीं असें त्यांच्या मनांत येऊन ते फार कष्टी झाले.

आतां कान्होबांच्या मतें एकच उपाय राहिला होता, आणि तो ह्मणजे नाना फडणिसांची गांठ घेऊन, आपलें औषध श्रीमंतांना चालू करण्याविषयीं त्यांना भीड घालणें हा होय. पण तो उपाय अमलांत आणावयाचा कीं नाहीं, याचा कान्होबांना मोठाच विचार पडला. नानांना आपली ऐकून माहिती आहे, ही कान्होबांची खात्री होती. दादासाहेब पेशव्यांची आणि त्यांच्या परिवारांतल्या मंडळीची प्रकृति पहावयास कान्होबा जेव्हां जेव्हां वाड्यात जात, तेव्हां प्रत्येक वेळीं कान्होबाच्या नांवची परवानगीची चिठीच मुळीं नानांच्या हातची येत असे, तेव्हां त्या बाबतींत शंका घेण्याचें कारणच नव्हतें. पण एवढ्याशा थोड्या माहितीच्या आधारावर नानांची भेट घेऊन त्यांना भीड घालावयाची कां, हा कान्होबाना प्रश्न येऊन पडला. तथापि श्रीमंताना औषधोपचार करण्याची जी आपण इच्छा धरली आहे, ती स्वतःच्या लाभाकरितां नसून त्यांच्या कल्याणाकरिता आहे असा पोक्त विचार करून कान्होबांनीं अखेर नानाची गाठ घेण्याचें ठरविलें. फाल्गुन वद्य सप्तमीच्या दिवशी सकाळीं कान्होबांनीं नाना फडणिसांची देवपूजा आटोपण्याच्या सुमारास त्याच्या घरीं प्रवेश केला, आणि आपण आल्याची वर्दी पोंचविली. नाना पूजा आटोपून वाड्यांत जाण्यासाठीं पोषाख करावयास दिवाणखान्यांत आले होते. कान्होबाचें नांव आणि कदाचित् ज्ञानही त्याना ऐकून ठाऊक होतें असें त्यांच्या चर्येवरून दिसलें. त्यांनीं कान्होबांना आंत येण्याविषयी निरोप पाठविला. कान्होबा दिवाणखान्यात जाऊन नानांस नमस्कार करून उभे राहिले.

त्यांना पाहतांच नाना स्मित करून ह्मणाले, ' या बसा वैद्यराज, आज कोणी-कडे आले होतेत ? '

कान्होबा खालीं बसले ते नानांनीं आपणास वैद्यराज ह्मणून संबोधिलेलें ऐकून उत्पन्न झालेल्या आनंदाच्या सिंहासनावरच बसले. त्यांनीं उत्तर केलें ' आपणा-कडेच सहज आलों होतों. श्रीमंतांची स्वारी मोहिमीवरून आजारी पडून आल्याचें कळलें, तेव्हा ह्मटलें आपणांस भेटून त्यांच्या प्रकृतीची अमळ चौकशी करावी. '

' असें का ' नाना ह्मणाले, ' आनंदाची गोष्ट आहे. तुह्मी स्वतः निष्णात वैद्य असल्यामुळें, श्रीमंतांच्या प्रकृतीची चौकशी करण्याचा तुह्मांला अधिकारच आहे. बाकी त्यांची प्रकृति आतां बरी आहे; काळजीचें कारण बहुतेक उरलें नाहीं असें राजेश्वरभट वैद्यांचें ह्मणणें आहे. '

कान्होबांचा आनंद गगनांत मावेना ! नाना फडणिसांनी त्याना ' निष्णात' ह्मटले, आता आणखी काय पाहिजे ? राजवैद्यत्व आपणाकडे येऊं लागलें अशी कान्होबाची खात्री झाली आणि ते ह्मणाले, " काळजीचें कारण उरलें नाहीं असेंच केवळ ह्मणता यावयाचे नाहीं. निदान एखाद्या चागल्या वैद्याला दाखवून त्याच्याकडून विकाराची परीक्षा करून घ्यावी, आणि त्यान प्रकृती बरी आहे असें सागितले ह्मणजे मग निष्काळजी रहावे हे ठीक, असें मला वाटतें. आपणास ह्मणजे सुचवावयास पाहिजे असें नाही. आपण सुज्ञच आहात. "

कान्होबाच्या बोलण्याचा रोख नानाच्या तेव्हाच ध्यानात आला. राजेश्वर-भटासारख्या ढुस्स वैद्याच्या सागण्यावर व औषधावर विसंबून न राहता आपणांस एकदा श्रीमताची प्रकृति दाखवावी, असे कान्होबांच्या मनांत आहे, हें नानांनीं ओळखले, आणि कान्होबाच्या आचरटपणाबद्दल त्यांना मनांतल्या मनांत हसूं आलें. कान्होबांची चागली पूजा करून त्याना निरोप द्यावा, असेंही क्षणभर त्यांना वाटलें, पण तितक्यांत त्याच्या मनांत कांहीं विचार येऊन त्यानीं आपला बेत एकदम पालटला ! ते गंभीर मुद्रा करून कान्होबांना ह्मणाले, ' वैद्यराज, तुमचा आशय माझ्या लक्ष्यांत आला, पण प्रस्तुत राजेश्वरांचें औषध श्रीमंतांना बरेच दिवस चालू असून, त्यापासून त्यांना दिखाऊ कां होईना, पण अमळ गुण वाटतो आहे. तेव्हां अशा स्थितींत त्यांचें औषध बंद करून तुमचें सुरूं करणें हें प्रशस्त दिसणार नाहीं. तेव्हां मला वाटतें श्रीमंतांना तूर्त राजेश्वरभटांचें औषध चाललें आहे तेंच ठीक आहे. पुढें मागें श्रीमंतांच्या प्रकृतीनें जर दुर्दैवानें उलट खाल्लीच, तर तुमचें औषध चालू करतां येईल. कां, हीच योजना सरळ कीं नाहीं ?'

' योजना ठीक आहे, ' कान्होबा गुळमुळत ह्मणाले, ' पण— '

'समजलों, समजलों,' नाना मध्येंच ह्मणाले, 'तुमचें औषध सुरूं व्हावयास उशीर लागल्यामुळें श्रीमंतांच्या विकारास बळावावयास अधिक संधी मिळेल त्याची तुह्मांला भीती वाटते, हेंच ना ? अहो त्यांत कसली एवढी भीति ? श्रीमंतांची प्रकृति कितीही खालावलेल्या स्थितींत तुमच्या हातीं आली, तरी तुह्मी हां हां ह्मणतां तिला ताळ्यावर आणाल, अशी माझी खात्री आहे. कां खरें ना ?'

'कशाचें ! कशाचें !' नानांच्या प्रशंसेनें फुगलेले कान्होबा ह्मणतात, 'त्यांत माझा कसला मोठेपणा आहे ? प्राचीन ऋषींच्या विद्येचा प्रभाव आहे झालें !' कान्होबांना आपल्या प्रशंसेनें आनंद झाला खरा, पण त्यांत त्यांचा हेतू सिद्ध होण्याचा मुळींच रंग दिसेना. श्रीमंतांची प्रकृति उलटली तर त्यांना पाहण्याची संधी आपणांस मिळेल असें नानांनीं जाणवलें खरें, पण ती बिघडलीच नाहीं तर ? तर काय, तर आपण राजवैद्य होणार नाहीं असें उघडच झालें. कान्होबांच्या मनांत तर आपणांस राजवैद्यत्वाचा मान आतांच मिळावा असें होतें. पण नानांचा कोटिक्रमच असा पेचाचा होता कीं त्यावर कान्होबांना कांहीं बोलतां येईना. ते जागच्या जागीं चुळबूळ करीत राहिले !

कान्होबांच्या मनांत काय आहे हें नानांनीं ओळखलें आणि त्यांची मानसिक कुचंबणा पाहून त्यांना मोठी मौज वाटली. पण कान्होबांचा आजच विरस करणें त्यांना सोईचें नसल्यामुळें त्यांनीं कान्होबांस खुष करून पाठविण्याचा विचार केला. ते ह्मणाले, 'कायहो वैद्यराज, तुह्मी नाशिकचे प्रसिद्ध वैद्य गंगा विष्णु महीधर यांचेकडे अध्ययन केलें आहे नाहीं बरें ?'

"होय," कान्होबा ह्मणाले, "त्यांचेकडे एक तप काढलें आहे ?"

"तर मग श्रीमंतांना एकदम तुमचेंच औषध द्यावयास पाहिजे होतें," नाना ह्मणतात, "पण आतां बोलून कांहीं फळ नाहीं. असो, कोणाच्या कां औषधानें होईना, श्रीमंतांस गुण आल्याशीं कारण, कां खरें कीं नाहीं ?"

'हो तर,' आपल्या स्तुतीच्या प्रवाहांत वाहत चाललेले कान्होबा ह्मणतात, 'माझी झाली तरी तीच इच्छा आहे.'

'कान्होबा,' नाना ह्मणाले, 'तुह्मांला खरोखरीच राजवैद्य करणें रास्त आहे, आणि मागेंपुढें तो योग जमून येईल असा मला भरवसा वाटतो. बाकी एका अर्थी तुह्मी आजही राजवैद्यच आहां ह्मणावयाचे ! कारण आमचे थोरले श्रीमंत हल्लीं तुमच्यावांचून दुसऱ्या कोणाच्या औषधास स्पर्श देखील करीत नाहींत ह्मणे ?'

"हो," कान्होबा विनय प्रदर्शवीत ह्मणाले, "त्यांची मजवर श्रद्धा जडली आहे खरी."

"अहो, कां नाहीं जडणार?" नाना उद्गारले, "तुमच्या औषधांचा प्रतापच आहे तसा. बाकी वैद्यराज, तुह्मांला एक गोष्ट सांगून ठेवतों, ती तुह्मांला ठाऊक कीं मला ठाऊक! आमचे दादासाहेब आहेत भारी भिडस्त. ते आपल्या प्रकृतीची हकीगत नेहमीं आमच्यापासून चोरून ठेवावयास पहात असतात. तेव्हां तुह्मी त्यांना ह्मणा, किंवा त्यांच्या परिवारांतल्या आणखी कोणाला ह्मणा, पहावयाला गेलांत ह्मणजे पाहून आल्यानंतर त्यांच्या प्रकृतीची खरी हकीकत गुपचूप येऊन मला कळवावयाची बरें ना? मी हें कां सांगतों आलें ना ध्यानांत? अहो आह्मी त्यांना जरी बंदोबस्तांत ठेवलें आहे, तरी त्यांच्या प्रकृतीची काळजी—"

'आपणांस वाटल्यावांचून कशी राहील?' कान्होबा नानांचें वाक्य पुरें करीत ह्मणाले 'उघडच आहे, जसे श्रीमंत तसेच ते! बरें आहे, मी आपणांस त्यासंबंधी खरी बातमी मुकाट्यानें येऊन देत जाईन. येतों मी आतां; श्रीमंतांच्या प्रकृतीसंबंधानें मात्र मी सुचविलेलें ध्यानांत असूं दे' असें ह्मणत कान्होबा नानांना नमस्कार करून उठले.

'तें माझ्या ध्यानांत आहे,' नाना ह्मणाले, 'श्रीमंतांच्या प्रकृतींत अमळ चलबिचल दिसली कीं तुह्मांस बोलावणें आलेंच ह्मणून समजा!'

नानांचा निरोप घेऊन कान्होबा बाहेर पडले. त्यांना राजवैद्यत्व आजच जरी मिळालें नाहीं तरी नानांचा विश्वास संपादन करतां आला, या गोष्टीपासूनच कांहीं कमी आनंद झाला नाहीं!

---

## प्रकरण ३६ वें.

| खरे, ले. १०६९-११००-११०१-११०२ इ. | **मोतीतलावचा संग्राम** | फाल्गुन व. ७ ते १० शके १६९२ |
|---|---|---|

श्रीमंत पेशवे पुण्यास परत गेले आणि गोपाळराव पटवर्धन वारले, या दोन बातम्या ऐकून हैदरास इतका आनंद झाला कीं, त्याच्या भरांत आपलें अर्धें अधिक


हैदरनाईक.

राज्य जिंकलें गेलें आहे या गोष्टीचें दुःखही तो विसरला झटलें तरी चालेल! आतां त्यानें तहाचें बोलणें बंद केलें व श्रीरंगपट्टणाच्या आसपासचीं ठाणीं जिंकून घेण्याचा पुनः उपक्रम चालू केला. श्रीमंतांना झालेला व्याधी दुर्धर असून त्यांतून ते बहुधा निभावणार नाहींत, निभावले तरी तूर्त पुन्हा दक्षिण कर्नाटकांत येणार नाहींत, अर्थात् मोहिमेचा भार आतां त्यांच्या सरदारावर पडणार आणि त्यांना आपण सहज गुंडाळूं शकूं, अशी हैदराची विचारपरंपरा होती. उलटपक्षीं त्रिंबकराव मामा पेठ्याच्या मदतीला श्रीमंतांनीं कृष्णराव बळवंत मेहेंदळे या सरदाराच्या नेतृत्वाखालीं गारदी व तोफा असा सरंजाम पाठविला, आणि मामाला निरोप पाठविला कीं, ' हैदरखान सरळ माणूस नव्हे. तेव्हा काय चिंता! चहूं महिन्यांनीं मसलत शेवटास जाणें ते आठ महिन्यांनीं जाईल, आठा महिन्यानीं जाणें ते दीड वर्षांनीं जाईल! त्यास हैदरखानाची मसलत दीर्घसूत्रानें केल्यास उत्तम परिणाम होणार.' एका शद्बांत सांगावयाचें ह्मणजे श्रीमंतानीं त्रिंबकराव मामास कर्नाटकात लागतील तितके दिवस, महिने, किंबहुना वर्षें सुद्धां छावणी करून राहण्याची परवानगी दिली, आणि हैदराचा पुरता निःपात करावयास लागेल तितक्या मनुष्यबळाचा व द्रव्यबळाचा पुरवठा आपण करण्याचा निश्चय केला होता!

## शेवटचें रणक्षेत्र.




श्रीमंतांची सूचना अक्षरशः अमलांत आणून हैदराचें सारें राज्य उजाड करून टाकण्याचा त्रिंबकराव मामानें खरोखरीच विचार केला! हैदराच्या राज्या-

पैकीं शाबूत असा काय तो एक बिदनूरचा प्रांत राहिला होता. हा प्रांत चांगला संपन्न असून तो युद्धभूमीपासून एका बाजूस बराच दूर होता. मामानें आपली नजर आतां या प्रांताकडे वळविली. तो या वेळीं आपल्या फौजेसह उत्तरदुर्गाच्या आसपास होता. तेथून तुमकुरापर्यंत जावें, तेथें कृष्णराव मेहेंदळ्याबरोबर येणारी फौज मिळवून घ्यावी आणि नंतर पश्चिमेकडे वळून बिदनुरावर जावें असा मामाचा विचार होता. हैदरानें तो ओळखला आणि पेशव्यांचें लष्कर मामास येऊन मिळण्यापूर्वींच त्याच्यावर छापा घालावा अशा विचारानें तो मागडीच्या झाडींत येऊन राहिला. पण मामाचें सैन्य सावध व जबर असल्यामुळें त्याच्यावर हल्ला करण्याची हैदरखानाची छाती झाली नाहीं. मामाच्या अंदाजाप्रमाणें तुमकूरला दोनी मराठी फौजा एकत्र झाल्या आणि नंतर तें सारें लष्कर झपाट्यानें बिदनूरकडे निघालें. जातां जातां वाटेंत मामानें गर्दनगडचा किल्ला घेतला. येथें पटवर्धनांचीं तीनी पथकें मामास येऊन मिळालीं आणि नंतर हा एकवटलेला सेनासागर बिदनूराकडे वळला.

मराठे आतां खास बिदनुरावर चालले हें पाहतांच हैदरला मुंगळे लागले. आतां त्याच्यानें स्वस्थ बसवेना. मराठ्यांच्या स्वभावधर्माप्रमाणें बिदनूरच्या हद्दींत ते लूटालूट करण्यासाठीं टोळयाटोळयांनीं पसरतील अशी हैदराची अटकळ होती, आणि तसे ते पसरले ह्मणजे आपण त्यांच्या वेगवेगळ्या टोळ्यांवर छापे घालून त्यांचा फन्ना उडवावा असा त्यानें मनांत डाव योजला, आणि तो श्रीरंगपट्टणांतून बाहेर पडला. आपल्या बरोबर पंचवीस हजार गारदी, आठ हजार स्वार, पंचेचाळीस तोफा, जेजाला आणि बाणांचे उंट, असा करोल सरंजाम घेऊन तो निघाला आणि मेलकोट्यास त्यानें आपली छावणी केली. त्याच्या अदमासाप्रमाणे मराठ्यांची फौज तरीकिरें, चेनागिरी वगैरे ठिकाणीं पसरली होती, पण ती बेसावध मात्र मुळींच नव्हती. किंबहुना त्रिंबकराव मामा, वामनराव पटवर्धन, परशुरामभाऊ, नरसिंगराव धायगुडे वगैरे सरदारानीं हैदरावरच उलट एक डाव करण्याचें ठरविलें होतें ! आपला पाठलाग करीत हैदरला पुढें ओढून मैदानांत आणावयाचा, आणि त्याला एकदम चोहोंकडून घेरून त्याचा फडशा पाडावयाचा, असा हा मराठे सरदारांचा दीर्घसूत्री कावा होता. हैदरला पुढे घुलवीत आणण्याची कामगिरी मामानें सखाराम हरी गुप्त्यावर सोपविली. सखाराम हरी ह्मणजे कसली बिकट वस्तु, हें आमच्या वाचकाना "पौर्णिमे"च्या कथानकात ठाऊक झालेंच आहे. पुण्यास बरेच दिवस स्वस्थ बसल्यावर ही स्वारी त्रिंबकराव मामांच्या

पथका बरोबर दक्षिण कर्नाटकाच्या मोहिमींत आली होती. सखाराम हरीनें आपणाकडे सोपविलेली कामगिरी फारच उत्तम रीतीनें पार पाडली. तो आपल्या बरोबर दोन हजार लोक घेऊन निघाला होता, पण त्यापैकीं फक्त तीनशें लोक घेऊन, तो हैदराच्या सैन्याच्या अगदीं जवळ गेला आणि त्यानें हैदराच्या लष्कराची कही भरून चालली होती, तिच्यावर अकस्मात् हल्ला करून तिजपैकीं कांहीं हत्ती, उंट व पांच सात हजार बकरीं लांबविलीं ! येथून तो जो गडप झाला तो तीन कोसांवर नागमंगलचें ठाणें आहे तेथें उमटला. हैदराचें जंगी लष्कर इतकें शेजारी आहे याची मुळींच पर्वा न करितां तें शहर त्यानें स्वस्थपणें लुटून फस्त केलें. प्रथम कही लुटण्याची ओरड हैदराचे कानांवर गेली होतीच. तशांत नागमंगलाचें ठाणेंही लुटलें गेलें ही बातमी कळतांच हैदर-अल्ली मेलकोट्याहून बाहेर पडला, आणि सखाराम हरीवर चालून गेला. त्याब-रोबर सखाराम हरि त्याला झुकांडी देऊन बेलूरास गेला, आणि तेथेंच मुक्काम करून त्यानें त्रिंबकराव मामास हैदरअल्ली मेलकोट्याहून बाहेर पडल्याची खबर दिली.

तें पत्र फाल्गुन वद्य द्वितीयेच्या दिवशीं सायंकाळीं त्रिंबकराव मामास पोंचलें. लागलीच कूच करून जाण्याची तयारी होऊं लागली. मध्यरात्रीस पटवर्धनाचीं तीनी पथकें, नरसिंगराव घायगुडे, आनंदराव गोपाळ, गायकवाडाचे पथक, आणि पाच सात हजार हुजरातीसह कृष्णरावअप्पा मेहेंदळे मिळून एकंदर वीस पंचवीस हजार फौज निघाली, ती वीस कोसांची मजल मारून दुसऱ्या दिवशी तिसऱ्या प्रहरच्या सुमारास हैदरखानाच्या गोटाजवळ पोंचली. तोपर्यंत हैदराला मराठ्याच्या डावपेचाची बरोबर कल्पना येऊन तो मागे हटला आणि मेलकोट्याच्या झाडीत पुन्हा शिरला. त्यानें श्रीरंगपट्टणास पळून जाण्याचाच घाट घातला होता, पण तितक्यांत मराठे येऊन त्याला भिडले आणि तो मेलकोट्यासच अडकून पड-ल्यासारखा झाला. मराठ्यांनीं सपाट्यासरशी हैदराच्या गोटावर हल्ला केला. कसेंही करून हैदरला मेलकोट्यासच गुंतवून पाडावे असा त्याचा डाव होता. ते आपणा-वर चालून आले असें पाहताच तोही आपले स्वार, पायदळ, तोफा व जेजाला घेऊन तयार झाला व त्याने शत्रूंस तोंड दिले. चार घटका तुंबळ युद्ध होऊन त्यात मरा-ठ्याचे जरी पुष्कळ लोक पडले, तरी त्यानीं हैदरच्या फौजेत शिरून व कत्तल करून दोन तीनशें घोडे पाडाव करून आणले ! अखेर अस्तमान झाला हें पाहून आणि हैदर बिकट आसऱ्याच्या जागी आहे हें ध्यानांत आणून मराठे मागें सरले. इकडे तोफखान्यास आपल्या मागून जलदीनें यावयास सांगून त्रिंबकराव मामा बाकीच्या

सैन्यासह चतुर्थीच्या पहाटेस जो निघाला तो संध्याकाळच्या सुमारास मेलकोट्याच्या पूर्वेस येऊन धडकला! हैदर आतां निराशेनें बेफाम झाला होता. झाडी सोडून बाहेर पडण्याची तर त्याची छाती होईना. बरें स्वस्थ बसावें तर मराठ्यांचें सेना-बळ आतां फारच वाढलेलें असल्यामुळें, ते आपणावर हल्ला केल्यावांचून रहा-वयाचे नाहींत हेंही त्यास दिसत होतें. अशा स्थितींत मामाची फौज दमून आली आहे तोंच आपण तिजवर हल्ला करावा असा विचार करून तो पंधरा तोफा घेऊन गोटाबाहेर आला, आणि या नवीन आलेल्या फौजेवर मारा करूं ला-गला. त्याबरोबर मामाची फौजही हल्ला न करतां मागें सरून राहिली. पटवर्ध-नांचीं पथकें आणि आपली फौज पश्चिम व पूर्व दिशांना मागें सरून उभीं आहेत ही संधी साधून हैदर रातोरात श्रीरंगपट्टणाकडे पळून जाण्याचा प्रयत्न करील हे जाणून त्रिंबकराव मामानें त्या ह्मणजे दक्षिणेच्या मार्गावर पटवर्धन आणि धायगुडे यांस पाठविलें. उत्तरेच्या बाजूला त्यानें हुजुरातीच्या फौजेसह कृष्णराव मेहेंदळ्याची योजना केली. याप्रमाणें तीन बाजूंनीं तर हैदर पुरता घेरला गेला. नाहीं ह्मणावयास एक पश्चिमेची वाट तेवढी आतां हैदराला खुली राहिली होती. पण ती असून नसल्यासारखीच होती, कारण त्या वाटेनें बाहेर पडणें ह्मणजे मोकळ्या मैदानांत जाऊन मराठ्यांच्या आयतेंच तावडींत सांपडण्यासारखें होणार होतें.

## मोतीतलावेच्या लढाईचा नकाशा.




र = हैदराच्या रसदीचा मार्ग
क = कृष्णराव मेहेंदळ्याची हुजुरात
ग = हैदराचा गोट
त = त्रिंबकराव मामाचें पथक
ब = मेलकोट्याची बारी
पध = पटवर्धन धायगुड्यांचीं पथकें
म = मोती तलाव
ड = डोंगर
—> हैदर पळून गेलेला रस्ता.

हैदरअल्लीजवळ आगीचें बळ मोठें असल्यामुळें मराठ्यांनीं त्याला जरी कोंडून धरलें होतें, तरी दोन दिवसपर्यंत त्याच्यावर हल्ला करण्याची त्यांची छाती

झाली नाहीं. उलटपक्षीं त्यांच्या भीतीनें तोही गोटाबाहेर पडला नाहीं. त्याला पश्चिमेकडून बाहेर पडावयाजोगी जी खुली वाट होती, त्या वाटेनें त्याला रसद पोंचत होती. ती गोष्ट मराठ्यांस समजतांच, पटवर्धन भायगुड्यांनीं हैदराच्या दक्षिण तोंडावर आपल्या सैन्यांतल्या पांचशें स्वारांची एक टोळी ठेवली आणि ते स्वत: पश्चिमेच्या बाजूला गेले. नित्याप्रमाणें पश्चिमेकडून हैदराची रसद आली, ती पटवर्धन धायगुड्यांनीं वाटेंतच लुटून फस्त केली! रसदीच्या लुटीबरोबरच त्यांना कांहीं हत्ती, घोडे व उंटही सांपडले. रसद बंद झाल्या-बरोबर हैदराच्या छावणींत नाचणीचें पीठ रुपयास शेरप्रमाणें विकूं लागलें! त्याच ह्मणजे पष्ठीच्या दिवशीं मराठ्यांचा तोफखाना मागें राहिला होता तोही येऊन पोंचला. तो येतांच त्रिंबकरावानें एका टेकडीवर तोफा चढवून हैदरा-च्या लष्करावर असा जबरदस्त भडिमार केला कीं, त्याला अगदीं दे माय धरणी ठाय होऊन गेलें! आतां मात्र हैदराला त्या अडचणीच्या छावणींत धीर निघेनासा होऊन त्यानें कसेंही करून श्रीरंगपट्टणास पळून जाण्याचा निश्चय केला. श्रीरंगपट्टण जवळ जवळ ह्मटलें तरी हैदराच्या छावणीपासून चांगलें पांच कोस होतें. हैदर आज रात्रीं बहुधा पळून जाण्याचा प्रयत्न करील असा मराठ्यांनीं तर्क केलाच होता, व ते त्याच्या सक्त पाळतीवर होते.

फाल्गुन वद्य सप्तमीच्या दिवशीं अवशीची सहा घटका रात्र होतांच हैदरानें मेलकोटे सोडलें आणि त्याच्या दक्षिण तोंडाला जी वारी होती तिज-मध्यें शिरून मुकट्यानें श्रीरंगपट्टणचा रस्ता धरला. त्या बाजूला मरा-ठ्याची पाचशे स्वारांची जी चौकी होती, तिला तो निघाल्याची चाहूल लागतांच त्या टोळीनें सांडणस्वार पिटून ती वातमी पश्चिमेच्या बाजूस पटवर्धनांस आणि पूर्वेच्या बाजूस त्रिंबकराव मामास कळविली, व स्वतः ती टोळी हैदराच्या बिनीवर तुटून पडली. आपल्या समोर मराठ्यांचे मोठें सैन्य आलें आहे अशा समजुतीनें हैदरानें त्या टोळीवर तोफा डागण्यास सुरवात केली. त्याच्या भडिमारानें मराठ्यांची हानी तर कांहीं झाली नाहींच; पण हैदराच्या सैन्याची नक्की जागा, चालण्याची दिशा इत्यादि गोष्टींचा त्याना बरोबर पत्ता लागून त्याचें पूर्वेकडचें व पश्चिमेकडचें लष्कर दौडीनें चालून आलें, आणि त्याच्या सैन्यावर तुटून पडलें. असा प्रकार होताच हैदराला क्षणाक्षणाला आपल्या लष्कराचें कूच थांबवून मराठ्यांना तोफांचा व बंदुकींचा मारा करून रोखावें लाग-ण्याचा प्रसंग येऊं लागला. त्यानें तोफांची मारगिरी चालू केली कीं ते मागें सरकत आणि तो तोफा बंद ठेवून चालूं लागला कीं ते त्याच्या लष्कराशीं लगट

करून कापाकापी सुरू करीत ! अखेर मेलकोट्याची बारी ओलांडून हैदर बाहेर येईतों उजाडावयास झालें. ह्मणजे दोन कोस चालून यावयास त्याला नऊ तास लागले ! पण बारींतून बाहेर येतांच त्याचा होता तोही आसरा नाहींसा होऊन तो मराठ्यांच्या पुरता तावडींत सांपडला.

आतां लढाईचें स्वरूप पालटलें. इतका वेळ मराठ्यांचें धोरण केवळ हैदराला अडाविण्याचें होतें, पण आतां त्यांनीं चढाईचें धोरण स्वीकारलें. प्रथम उजव्या बगलेनें पटवर्धन व धायगुडे यांच्या पथकांनीं हल्यांवर हल्ले करून हैदराच्या सैन्याची फळी फोडण्याचा यत्न केला, पण हैदरानें गारद्यांचे बुरूज बांधून तोफांच्या व बंदुकांच्या गोळ्यांचा असा पाऊस पाडला कीं, पटवर्धन धायगुड्यांना मागें हटणेंच भाग पडलें. या युद्धांत हजर असणाऱ्या एका गृहस्थानें असें लिहिलें आहे कीं, ' पंचवीस हजार गारद्याची एकदाच शिलक होई तेव्हा गगन गर्जत असे ! ' डाव्या बगलेवर त्रिंबकराव मामानेंही हल्ले चढवून पाहिले, पण हैदराच्या गारद्याचे बुरूज त्याच्यानेंही मोडवले नाहीत. मराठ्यांचीं पथकें या प्रमाणें हल्ले करीत असता हैदरअल्ली अशा रीतीनें त्यांच्याशीं निकरानें लढून त्याचे हल्ले मोडून काढीत होता व पावला पावलानें पुढें सरकत होता ! आजच्या युद्धात वामनराव, परशुरामभाऊ आणि नीळकंठराव या तिघांही पटवर्धनानी जवामर्दीची शर्थ केली. हैदरही त्याच्याशी पराक्रमानें तोंड देत मुंगीच्या पावलांनी श्रीरंगपट्टण जवळ करीत होता. होतां होतां प्रहर दिवस येईपर्यंत तो आणखी एक कोस पुढें सरला !

आतां श्रीरंगपट्टण अवघें दोन कोस राहिलें. हैदराला धीर वाटूं लागला. आपल्या गारद्यानीं आज मोठीच वेळ संभाळली असें ह्मणून तो त्यांना धन्यवाद देऊं लागला. आणखी प्रहर दीड प्रहर त्यांनीं अशीच बाजू राखली कीं आपण श्रीरंगपट्टण गाठूं शकूं अशी त्याला उमेद वाटूं लागली. उलट पक्षीं मराठे सरदाराचीही मोठी निराशा होऊन आपल्या फजितीबद्दल त्याना मोठी शरम वाटूं लागली. तोफखाना, स्वार, पायदळ ह्या सर्वच बाबतीत आपले सैन्य हैदराच्या सैन्यापेक्षा वरचढ, आणि शिवाय त्याचें सैन्य भरमैदानात चोहोंकडून आपल्या कैचींत सांपडलें असून, आपणास इतक्या वेळांत त्याचा मोड करिता येऊं नये, या कल्पनेचे त्याना परमावधीचें शल्य वाटलें. वामनरावादि तिघा पटवर्धन बंधूंना ही गोष्ट इतकी झोंबली कीं, त्यांनीं असल्या जगण्यापेक्षां मरण बरें असें ठरवून आपलीं तीनी पथकें हैदराच्या तोंडावर थेट दक्षिणेकडे नेलीं आणि जिवावर उदार होऊन आपल्या पथकासह ते हैदराच्या

गारद्यांवर तुटून पडले ! त्या ठिकाणीं हैदराच्या गारद्यांचीं उत्तम शेलकीं पलटणें होतीं, त्यांची आणि मराठ्यांच्या स्वारांची धडक होऊन अत्यंत निकराचें युद्ध झालें. गोपाळराव पटवर्धन गेले तरी त्यांचा नांवलौकिक राखण्याची हिंमत पुढच्या पिढींत आहे हें वामनराव, भाऊ आणि निळकंठराव या तिघांनींही आज बिनतोड सिद्ध करून दाखविलें. ते त्रिवर्ग बंधु गारद्यांच्या बंदुकांच्या मारांत आपले घोडे नाचवीत होते, आणि आपल्या पथकांना उत्तेजन देत होते. तिघांच्याही तरवारी रक्तानें थबथबलेल्या होत्या, आणि तिघाच्याही अंगांतून घामाच्या धारा वाहत होत्या. इतक्यांत गारद्यांच्या बुरजांतून एक गोळी सूं सूं करीत येऊन नीळकंठरावाच्या छातींत घुसली आणि तो धाडकन् घोड्यावरून कोसळला, तो तत्काळ गतप्राण झाला ! वामनराव आणि भाऊ यांना नीळकंठराव पडल्याची हकीगत कळतांच ते रागानें बेहोष झाले आणि त्यांनीं गारद्यांच्या बुरजांवर एकच हुल्लड केली. नीळकंठरावाच्या पथकातले लोकही आपला पुढारी पडला असें पाहून अत्यंत त्वेषानें गारद्यांवर तुटून पडले. तीनी पथकानी या वेळी राक्षसांचा अवतार धारण करून हजारों गारदी कापून काढले ! हा हा ह्मणतां गारद्यांची फळी फुटली आणि त्यांचा मोहरा परतला. इतके झाल्यावर मग काय विचारावें ? त्रिंबकरावानें हैदरच्या पिछाडीवर आणि बाकीच्या मराठे सरदारांनीं त्याच्या दोनी बगलांवर असा जोरानें हल्ला चढविला कीं, हैदराच्या सैन्याची सगळी शिस्त मोडून ते सैरावैरा पळूं लागलें ! मराठ्याच्या सैन्यातून एकसारखे ' हर हर महादेव ' चे जयघोष ऐकूं येऊं लागले आणि शहाजणें झडूं लागली !

यानंतरची लढाई ह्मणजे ती लढाई नसून एकतर्फी लांडगेतोडच होती. नीळकंठरावाच्या मृत्यूनें चिडलेल्या पटवर्धनाच्या पथकानीं काही वेळ काडीमात्र दयामाया न दाखविता हैदराचें सैन्य भाजीसारखे खुरपून काढले. स्वतः हैदर मोठ्या शर्थीनें जीव बचावून उजव्या बाजूकडच्या एका टेकडीकडे पळाला आणि तिजवरील झाडींतून निसटून श्रीरंगपट्टणास गेला. टिपू सुलतान, मीर फैजुल्ला व हैदराचे आणखी एक दोन सरदार फकिराचा वेष घेऊन मराठ्यांच्या लष्करांतून कसेबसे निसटले. ही इतकी मंडळी खेरीज करून हैदराच्या बाकीच्या सैन्याची निखालस लांडगेतोड झाली. त्याचे दहा हजार स्वार, पंधरा हजार गारदी, आणि पांच सात हजार कर्नाटकी प्यादे ठार होऊन तीन चार हजार लोक पाडाव झाले. पंचेचाळीस तोफा, आठ हजार घोडे, पंचवीस हजार बंदुका तमाम दारूगोळा, इतर नाना प्रकारचीं हत्यारें पात्यारें, पालख्या, हत्ती, उंट, जामदारखाना, सर्व कांहीं मराठ्यांच्या हातीं लागलें. लढाईच्या जाग्यापासून जवळच

नकाशांत जो तलाव दाखविला आहे, त्यावरून या लढाईला मोतीतलावची लढाई हें नांव मिळालें आहे.

संध्याकाळच्या मुमारास समरांगणाचा देखावा फारच भीषण दिसत होता. जागजागीं प्रेतांचे ढीग पडलेले असून फुटकळ प्रेतेंही पुष्कळच ठिकाणीं पडलीं होतीं. रक्ताचे पाट आणि मांसाचा सडा यांचा एकत्र गोमकाला होऊन ठिकठिकाणीं निसरडी झाल्या होत्या. जखमी झालेल्या घोड्यांचें खिंकाळणें, जायबंदी होऊन पडलेल्यांचें विवळणें, जखमी झालेल्यांचें कण्हणें, मुमूर्षु लोकांनी पाण्याकरितां मारलेल्या हांका, इत्यादि अनेक प्रकारच्या हृदयद्रावक ध्वनींनीं सारा आसमंत भरून गेला होता. तिनीसांजच्या सुमारास सर्व मराठे सरदार एके जागीं गोळा होऊन नीळकंठरावांच्या प्रेतास अग्निसंस्कार करण्यांत आला. आजची पटवर्धन मंडळींची कर्तबगारी त्रिंबकराव मामाच्या नजरे समोर झाली असल्यामुळें मामा मनातून खजील झाले होते. त्यानी पटवर्धन मंडळीची मुक्त कंठाने स्तुती केली आणि नीळकंठरावाच्या मृत्यूकरितां फार खेद प्रदर्शित केला. आजचा विजय मराठ्यानाही बराच महाग लागला. त्याचेही दीड दोन हजार वीर रणांगणावर पतन पावले.

मोतीतलावची लढाई मराठेशाहीच्या इतिहासांत चिरस्मरणीय होऊन राहिली आहे. मैदानावरील डावपेचाच्या युद्धातही मराठे सरदार प्रसंगी केवढी कर्तबगारी करून दाखवीत असत हें या लढाईने बिनतोड सिद्ध केले आहे. हैदराला मेलकोट्यापासून घुलवीत पुढे नेणे, आणि एका दिवसात वीस कोसाची मजल मारून त्याच्या पिछाडीवर येणें, इत्यादि जे डावपेच या युद्धात मराठे सरदारानी करून दाखविले आहेत, ते पाहिले ह्मणजे नेपोलियन आणि त्याचे सेनापति ह्याची आठवण झाल्यावाचून राहत नाही. हैदराचा मात्र या लढाईत सत्यनाश झाला. त्याची सर्व शेलकी फौज कापून निघाली, आणि तो सर्वस्वी निराधार झाला. आता हें खरें कीं त्यानें नाना प्रकारच्या लटपटी करून ही मोहीम आणखी एक वर्ष लढवीत ठेवली, पण ती त्याची कर्तबगारी जिवंत चळवळीची द्योतक नसून मरते वेळच्या आळोख्यापिळोख्यांसारखी निर्जीव होती. पटवर्धनाचा पराक्रम आणि त्याची स्वामिनिष्ठा मात्र या मोहिमींत पुरती कसास लागली. माधवराव, गोपाळराव आणि त्यांच्या पाठोपाठ नीळकंठराव असे तीन बळी देऊन, त्यांनीं हैदरअलीवरील ही तिसरी मोहीम जयाला नेली आणि मराठेशाहीच्या तख्तापुढें आपली हलाल नोकरी कायमची रुजू केली !

---

## प्रकरण ३७ वें.

खरे ले, १०९४ १०९५ मा. पे. रोज. ४४१-४२ पान } दादासाहेबांची समजाविशी { पौष व. ७ शके १६९३,

आतां आमच्या कथानकांत आह्मी एकदम दहा महिन्यांची उडी घेऊन वाचकांस शके १६९३ च्या पौष महिन्यापर्यंत आणून सोडीत आहोंत. ह्याचें कारण दुसरें तिसरें कांहीं नसून, एवढ्या मुदतींत वाचकांस तपशिलानें कळविण्याजोगी गोष्ट कांहीं झालीच नाहीं हें होय. कर्नाटकांतील रणक्षेत्रावरही सांगण्याजोगें नवल विशेष कांहीं झालें नाहीं, आणि इतरत्रही पण कांहीं झालें नाहीं. मोतीतलावची लढाई झाल्याबरोबर त्रिंबकराव मामांनी लगेच जाऊन श्रीरंगपट्टणास वेढा दिला व तो वैशाख महिन्यापर्यंत चालू ठेवला. पण त्याचा कांहीं विशेष उपयोग होत नाहींसें पाहून त्यानें आपला पूर्वींचा ह्मणजे हैदराच्या अवशिष्ट राज्याचा विध्वंस करण्याचा क्रम सुरू केला. त्याच्या फौजेनें चंद्रायपट्टण, चेन्नापट्टण, नरसीपूर, शिदगट्टे, चेनराजपट्टण इत्यादि पुष्कळच ठाणीं क्रमाक्रमानें घेतली. नंतर मामानें कुर्ग व ऐगूर येथील संस्थानिकास हैदराविरुद्ध सामील करून घेण्याचा प्रयत्न केला. त्यांपैकीं ऐगूरकर मराठ्यांस मिळाला, पण कुर्गकर मात्र मराठ्यास भेटावयास आलेला एकाएकीं मागें वळून चालता झाला, मग त्यास कोणाकडून कानमंत्र मिळाला देव जाणे ! तोंपर्यंत पावसाळा सुरू झाल्यामुळे मामानें आश्विन महिन्यापर्यंत बेळूर येथें आपली छावणी केली. मराठे देशीं न जातां छावणी करूनच चिकाटीनें राहिले असें पाहून हैदरानें लाचार होऊन मामांशीं तहाची भाषा सुरू केली, पण अजून तो तहाच्या समाधानकारक अटी बोलतच नव्हता, अर्थात् तह होणें शक्य नव्हतें. इतक्यांत मागील एका प्रकरणांत वाचकास कळल्याप्रमाणें अर्काटचा नबाब महमदअल्ली यानें तंजावरच्या राजावर स्वारी केली. तंजावर हें मराठ्याचें स्वराज्य असल्यामुळें त्रिंबकरावमामा त्या राजाच्या मदतीस धाऊन गेला. मामा येताच महमदअल्ली आपलें सैन्य घेऊन पळून गेला. मामांनी तंजावरच्या राजाकडून चार लक्ष रुपये स्वारीखर्चाकरितां घेतले. महमदअल्लीकडूनही त्यानें कांहीं दंड घेतला असावा असा पटवर्धन मंडळीस संशय होता. त्रिंबकराव मामानें या स्वारीतही तंजावरच्या वाटेंतला हैदराचा मुलूख लुटून फस्त केला हें सांगावयास नकोच. नंतर मामा हैदराच्या बारामहाल प्रांताकडे वळला आणि तो प्रांत यथास्थित लुटून त्यानें कडप्याच्या नबाबाच्या ताब्यांत दिला. दक्षिणच्या बाजूची अशाप्रकारें व्यवस्था लावल्यावर मामानें पाइनघाटांवर स्वारी करून बिदनूरचा रोख धरला !

श्रीमंतांच्या प्रकृतींत ह्या अवधींत ह्मणण्याजोगा कांहीं फरक पडला नव्हता. कर्णाघाम काकाच्या सल्लयावरून ते त्याला बरोबर घेऊन हवापालट करीत फिरत होते आणि राज्यकारभाराच्या दगदगींत मुळींच मन घालीत नव्हते. कर्नाटकांतून परत आल्यावर ते थोडे दिवस पुण्यास राहिले, आणि शके १६९३ च्या ज्येष्ठ महिन्यांतच त्यांनीं पुणें सोडलें. प्रथम थेऊरास जाऊन तेथें त्यानीं दहा दिवस मुक्काम केला. नंतर ते तेथून निघून कोरेगांव, गणेगाव, गुणोरें, गांजीभोयरें, जांबगांव, घुमटापिंपरी, राहुरी, हणमंतगांव, लोहारें, मीठसागर, वडांगळी, आणि करंजगांव अशी गांवें घेत चांदवड परगण्यांतील कटोरें ह्या गावीं मुक्कामास आले, आणि तेथील हवा त्यांना बरीशी वाटल्यावरून त्यांनीं तेथें दोन महिने वास्तव्य केलें. नंतर तेथून तळ हलवून वोढें, गंगापूर, सुरेगांव ही गांवें घेत ते कुंभारी परगण्यांत कोकमटाण येथें आले आणि तेथें एक महिनाभर राहिले. नंतर तेथून निघून पुणतांबे, ब्राह्मणगांव, राहुरी, यळद, दरेवाडी, हीं गांवें करीत ते मार्गशीर्ष महिन्याच्या प्रारंभीं नगरहवेलीस आले. तेथें त्यांना अमळ बरें वाटल्यावरून त्यांनीं दरेवाडी आणि नगरहवेली या दोन गावांतच आलटून पालटून मुक्काम करून तीन आठवडे काढले. नंतर फिरून ते तेथून निघाले, ते दहींगांव, हातवळण, सांगवी, सेडगाव ही गावें घेत पौषारंभाला पेडगांव परगण्यांत सिद्धटेंकच्या मुक्कामास आले. सिद्धटेंकला त्याचा तळ बरेच दिवस ह्मणजे चांगला दीड महिना पडला होता. त्याची प्रकृतीही साधारण ठीक होती. परंतु या 'ठीक' शद्बाचा अर्थ वाचकानी इतकाच समजावयाचा कीं ती अधिक न खालावता कशीबशी तगून होती. तिजमध्ये सुधारणेचा काटा लवमात्र दिसत नव्हता. श्रीमंताच्या खुद्द शद्बांत सागावयाचे ह्मणजे, 'प्रस्तुत माझी शरीरप्रकृती बरी आहे. उरांत दुखत होतें तें बरें झाले आहे. परंतु जागा वळकट व्हावयास्तव औषध करीत असतों. पोटांतही फिरण्याचेच औषध घेतो.' यावरून प्रस्तुत श्रीमंतानीं राजेश्वरभटाचें औषध तहकूब करून कर्णाघाम काकाचेंच औषध घ्यावयास प्रारंभ केला होता हें वाचकांच्या लक्ष्यात आलेंच असेल.

श्रीमंतांची प्रकृति जरी अशा रीतीनें कशीबशी तग धरून होती तरी त्यांच्या स्वभावात मात्र मनस्वी फरक पडला होता. ते अत्यंत लहरी व तापट झाले होते. प्रस्तुत त्यांच्याबरोबर गोविंद शिवराम खासगीवाले, हरिपंत फडके, नाशिकचे शेषाद्रिशास्त्री नांवाचे एक सच्छील शास्त्री, डाक्टर कनिंगहॅम, जानोजीराव भोसले, आणि कांहीं शागीर्दपेशा व शिपाईप्यादे इतका परिवार होता. श्रीमंतांचा तापट स्वभाव या सर्वांनाच कमी अधिक प्रमाणात जाणवत

होता. अगदीं क्षुल्लक कारणावरून सुद्धा नोकरचाकरांना शिवीगाळ किंवा ह्मणामार देखील करणें, रात्रीं अपरात्रींच एका गांवाहून दुसऱ्या गांवास मुक्काम हलविण्याचा हुकूम करणें, लगेच तो फिरविणें, बोलतां बोलतां वर्दळीवर येणें, असे प्रकार श्रीमंतांच्या हातून हमेष होऊं लागले होते. जानोजीराव भोसले कर्नाटकांतून आल्यापासून अद्याप श्रीमंतांच्या बरोबरच होते, पण त्यांची देखील श्रीमंतांशीं बोलतांना तिरपीट उठत असे! श्रीमंतांचा तो पूर्वींचा कांहींसा कडक पण विनोदी आणि गोड स्वभाव पालटून सांप्रत अत्यंत त्रासिक बनला होता. त्यांचा तो केवड्यासारखा गोरा वर्ण पालटून काळाठिक्कर पडला होता. त्यांच्या चेहऱ्यावरचा तो दिलदार रुबाब कोणीकडच्या कोणीकडे पार नाहींसा झाला होता. त्यांच्या डोळ्यांतलें तें प्रखर पाणी मात्र अद्याप शाबूत होतें, पण पूर्वीं त्याच्याकडे पाहणारास जें एक स्नेहमय आश्वासन मिळत असे, तें आता मिळत नसून त्याच्या ऐवजीं भीति उत्पन्न होत असे. नाहीं ह्मणावयास एकटा कनिंगहॅम काका मात्र श्रीमंतांबरोबर निर्भीडपणानें बोलत चालत असे. हरिपंत फडकेही श्रीमंतांच्या बराच लोभांत असून त्यांचें औषधपाणी, पथ्याची देखरेख वगैरे सर्व उस्तवारी प्रस्तुत तोच करीत असे. शेषाद्रिशास्त्री हा श्रीमंतांच्या आरोग्याकरितां कांहीं अनुष्ठान, जपजाप्य करण्यासाठीं मुद्दाम नाशिकाहून आला होता. इतके हवापालट, औषधोपचार व मंत्रतंत्र करूनही आपल्या प्रकृतींत लवमात्र सुधारणा होत नाहीं, असें पाहून तिच्या मुळाशींच कीड लागली असली पाहिजे असें श्रीमंतांनीं ठरविलें, आणि आपल्या प्रकृतीचा यापुढें भरंवसा धरण्यांत अर्थ नाहीं असें समजून ते पुढची निरवानिरव करण्याच्या उद्योगास हळूं हळूं लागले. सिद्धटेंकास आल्यानंतर थोड्याच दिवसांत त्यांनीं सखाराम बापू, कृष्णराव बल्लाळ काळे इत्यादि मंडळींना सिद्धटेंकच्या मुक्कामीं बोलवून घेतलें आणि त्यांच्याशीं विचारविनिमय करून आपल्यापुढचे राजकारणाचे बिकट प्रश्न सोडविण्याचा उपक्रम केला.

आपल्या पश्चात् मराठी साम्राज्याला धोका उत्पन्न करण्याजोगीं प्रस्तुत तरी श्रीमंतांच्या नजरे पुढें चार प्रकरणें दिसत होतीं, आणि तीं ह्मणजे हैदर अल्ली, दादासाहेब पेशवे, सखारामबापू आणि इंग्रज हीं होतीं. पैकीं हैदराचा तूर्त तरी पक्का बंदोबस्त झाला असून, आणखी बरींच वर्षें तो वर मान करील असा संभव राहिला नव्हता. आणि यदाकदाचित् तो पुढें मागें फिरून बळावलाच तर त्याच्या तोंडावरच असलेले पटवर्धन सरदार त्याला पुरून उरण्याजोगे सामर्थ्यवान् आहेत अशी या मोहिमींत श्रीमंतांची

खात्री झाली होती. सखारामबापूंची भीती श्रीमंतांना त्यांच्या उलाढाली स्वभावामुळेंच वाटत होती. पण आपला पट्टशिष्य नाना फडणीस हा सखाराम-बापूंच्या साऱ्या मुत्सद्दीगिरीला भारी आहे हें श्रीमंत जाणून असल्यामुळें, तूर्त सखारामबापूला जरा गोंजारून घेतले ह्मणजे पुरेसें आहे असें श्रीमंतांनीं ठरविलें. सखारामबापूचें मुख्य वर्म ह्मणजे स्वतःचा बडेजाव हेंच असल्यामुळें, तेवढा संभा-ळल्यानें काम भागेल असा श्रीमंतानीं अंदाज केला होता. राहता राहिले दादा-साहेब, व त्यांचे कैवारी इंग्रज. ह्या दुकलीची मात्र श्रीमंतांना मनस्वी धास्ती वाटत होती. निदान एकटे दादासाहेब जरी खंबीर राहिले, आणि आपल्या मागें नारायणरावाशीं एक जुटीने वागले, तरी मराठेशाहीच्या एकवटलेल्या सामर्थ्यापुढें इंग्रजाचे राजकारण काही एक लटपट करूं शकणार नाहीं अशी श्रीमंताची बालं-बाल खात्री होती. पण ते जमावे कसे, हाच तर मोठा प्रश्न होता. श्रीमंतानीं दादासाहेबाच्या स्वभावाची जी परीक्षा केली होती, तिजवरून ते पहिल्या प्रतीचे अक्कलशून्य, हलक्या कानाचे व मनाचे, लहरी आणि अविचारी आहेत अशी त्याची खात्री झाली होती, आणि त्याना निरंतर डाबून ठेवणे हाच त्याच्या बंदो-बस्ताचा योग्य उपाय असें त्याना मनापासून वाटत होते. पण आपल्या पश्चात् दादासाहेब, त्याचे आश्रित आणि त्याचे पक्षपाती जर राज्यात नसती कुलंगडीं उपस्थित करू लागले तर ती आवरण्याचे सामर्थ्य व वकूब नारायणरावामध्यें नाही हेंही श्रीमंत तितकेंच जाणून होते. तेव्हा अशा स्थितीत दादासाहेबाच्या मना-प्रमाणे त्याना जहागीर तोडून देऊन त्याना एकदम कायम संतुष्ट करणेच बरें असें श्रीमताना वाटूं लागले. जानोजीराव भोसल्याचाही तसाच आग्रह होता. बापू वगैरे मुत्सद्यानीही तसेच मत दिले. तेव्हा श्रीमतानी अखेर तोच बेत कायम केला, आणि बापूना पुण्यास पाठवून दादासाहेबाना त्याच्यामार्फत सिद्धटेकच्या मुक्कामीं बोलावून घेतले. पौष वद्य षष्ठीच्या दिवशी तिनिसाजच्या सुमारास दादासाहेबाची स्वारी सिद्धटेकास येऊन पोंचली. चुलत्यापुतण्याच्या औपचारिक भेटी व कुशल प्रश्न होऊन, बोलणे दुसऱ्या दिवशी व्हावयाचे ठरले, आणि त्याच दिवशी आह्मी वाचकाना सिद्धटेकास घेऊन जात आहोत.

सप्तमीच्या दिवशी सकाळीं सात आठ घटका दिवस आला असेल अशा सुमारास श्रीमंतांच्या खास डेऱ्यात उभयता श्रीमंत, जानोजीराव भोसले आणि सखारामबापू इतक्याच वेंचक मंडळींची बैठक चालू झाली. उभयता चुलते पुतणे एका लोडाला टेकून बसले असून जानोजीराव भोसले आणि सखारामबापू दुसऱ्या एका लोडाच्या दोनी टोकांना सोडून थोड्या अंतरावर बसले होते. दोघां

श्रीमंतांच्या मनांत दोन अगदीं निरनिराळ्या प्रकारचे विचार घोळत होते. आपला पुतण्या आतां फार दिवस जगणार नाहीं अशी दादासाहेबांची खात्री झाली होती, आणि तो मजकूर आपल्या पुतण्यासही कळला असल्यामुळेंच तो आपणाशीं तोडीला आला आहे, असें त्यांना वाटून ते हुरळले होते. आजच्या बैठकींत आपण शक्य तितकें ओढून धरून आपली व्यवस्था आपल्या मनाजोगी करून घ्यावयाची असें त्यांनीं ठरविलें होतें. उलटपक्षीं आपण आजपर्यंत मराठेशाहीच्या अभिवृद्धीकरितां केवढ्या योजना केल्या होत्या, त्यांतल्या कित्येक यशस्वी होऊन बाकीच्याही सिद्धीस जाण्याचा कसा रंग आला होता, आणि अखेर ऐन वेळीं आपल्या असाध्य दुखण्यामुळें त्या सर्वांवर विरजण पडण्याची वेळ कशी आली आहे हें मनांत येऊन श्रीमंत कष्टी झाले होते. वाचकहो, श्रीमंतांच्या छोट्या कारकीर्दीचें आपण एकदा सिंहावलोकन करा बरें! त्यांच्या हातीं पेशवाईचीं सूत्रें आलीं त्यावेळीं पानिपतच्या पराजयानें सारी मराठेशाही खिळखिळी होऊन गेली होती. भोसले फुटून स्वतंत्र व्हावयास पाहत होते, दादासाहेब बखेडा करून इंग्रजांच्या कच्छपीं लागून राज्याचीं शकलें करावयास सजले होते, आणि दक्षिण कर्नाटकांत हैदरअल्लीसारखा प्रबल रिपु मराठी साम्राज्याचे लचके तोडावयास टपला होता! बरें, घरच्या सरदार मुत्सद्दीमंडळींत तरी काहीं शहाणपण व जूट असेल ह्मणावें तर तसेंही नव्हतें. सखारामबापू, देवाजीपंत वगैरे शहाणे दीड शहाणे आपापसांत कुलंगडीं उपस्थित करून आपल्या गादीच्या धन्याला स्वतःच्या मुठींत ठेवण्यांत धन्यता मानीत होते! सरदार सरंजामदार आपापल्या सुभ्याचीं स्वतंत्र राज्यें करावयाच्या नादांत होते. असल्या फाटक्या तुटक्या परिस्थितींत ज्या तरुण पेशव्यानें कारभाराची सूत्रें हातीं घेतल्यापासून अवघ्या तीनच वर्षांत बहुतेक अनिष्टें पार रसातळास मिळविलीं, भोसल्यांना वठणीस आणलें, दादासाहेबांना बंदिवासांत डांबून टाकलें, सखारामबापूंच्या उत्पाती मुत्सद्दीगिरीला पायबंद घालून त्यांना निर्माल्यवत् करून सोडलें, सर्व सरदार सरंजामदारांवर जरब बसवून त्यांना मध्यवर्ती सत्तेच्या धाकांत आणलें, आणि हैदरासारख्या हिकमती शत्रूचा धुव्वा उडवून टाकला, त्या पेशव्याची कर्तबगारी काय सांगावी?

वाचकहो, श्रीमंतांची थोरवी एवढ्यानेंच संपली असें आपण समजूं नका. त्यांची विशाल बुद्धिमत्ता वेगळ्याच घटना योजीत होती. तिनें सरंजामी पद्धत अजीबात बंद करण्याचा घाट घातला होता, आणि त्याचा उपक्रम ह्मणून एकाचा सरंजाम काढून दुसऱ्यास देण्याचा पायंडा पाडला होता, हें आपणांस धुळपांच्या उदाहरणावरून कळलेंच आहे. तिनें आपल्या मांडलिकांच्या

राज्यांतला वाटेल तेवढा हिस्सा काढून घेण्याचा हक्क मध्यवर्ती सत्तेस आहे हें तत्व कृतींत उतरविण्यास प्रारंभ केला होता, हें आपणास भोसल्यांच्या उदाहरणावरून समजलेंच आहे. तिनें सरंजामाची नेमणूक रुपयांत देणें किंवा होनांत देणें हें आपल्या मर्जीवर ठेऊन अर्थशास्त्राच्या दृष्टीनें लाभ-हानीचा सूक्ष्म फरक देखील जाणला होता, हें आपणांस पटवर्धनांच्या उदाहरणावरून उमगलेंच आहे. तिनें राष्ट्रीय व्यापाराचीं सूक्ष्म तत्वें हेरलीं होतीं हें आपणास दक्षिण कर्नाटकांतील कपाशीच्या गाड्या इंग्रजकंपनीकडे विकावयास चाललेल्या पाहून श्रीमंतांच्या मनाच्या झालेल्या तळमळीवरून माहीत झालेंच आहे. तिनें हिंदुस्थानांतल्या ठाण्यांतून पाय रुजवून बसलेल्या इंग्रज कंपनीचे बळ लष्करी सामुग्रींत आहे हें अचूक ओळखलें होतें हें आपणास त्यांनीं ठिकठिकाणीं तोफांचे व दारूगोळ्यांचे कारखाने काढले यावरून विदित झालेंच आहे. तिनें अडाणी सामाजिक रूढींत हळूहळूं क्रांति घडवून आणण्याचा उपक्रम केला होता, हें आप-णांस कणीधाम काकाचा वाड्यात अनिरुद्ध संचार, रमाबाईचें संगीत शिक्षण, पार्वतीबाईचें वपनावांचून राहणें, इत्यादि बारीक सारीक गोष्टींवरून दिसून आलेंच आहे. फार काय सागावें ? पण साऱ्या मराठेशाहीला एका सूत्रांत आणून एकराष्ट्रीयत्वाची जिवंत ज्योत तिजमध्यें उत्पन्न करावी असाही या पेशवेमुकुट-मणीचा विचार होता हें त्याच्या एकंदर धोरणावरून मनांत आल्यांवाचून रहात नाहीं. त्यानें मराठी साम्राज्यावर पडलेल्या गडद काळोखाची पौर्णिमा करून दाखविली, आणि बेबंदशाहीच्या नरकाचें सुराज्यरूप नंदनवन बनविलें ! वाचकहो, नंदनवनांत निरंतर चांदणें असतें ह्मणतात, तसें मराठेशाहीच्या नंदनवनांतही झालें असतें. पण मराठेशाहीच्या आधारभूत चंद्रालाच खुद्द राजयक्ष्मा लागावा असा ईश्वरी नेमानेम असल्यामुळें तिच्या पौर्णिमेची एक कला झुरणीस लागली आणि तिचा कांटा वद्य पक्षाकडे झुकला याला कोण काय करणार ?

पण हे शोकप्रद विचार मनांत आणून आतां कांहीं उपयोग नसल्यामुळें आपण आपल्या कथानकाकडे वळूं. उभयतां श्रीमंत बराच वेळ आळीपाळीनें एकमेकाच्या तोंडाकडे आणि जानोजीराव भोसल्याकडे पाहत होते. बराच वेळ कोणी कांहीं बोललें नाहीं. आजचा प्रसंगच चमत्कारिक असल्यामुळें प्रथम बोलण्यास सुरवात कोणी व कशी करावी, याचेंच सर्वांस कोडें पडलें असावें असें दिसलें. अखेर जानोजीराव भोसल्यानीं भाषणास तोंड पाडलें. श्रीमंत रावसाहेब पेशव्यांना उद्देशून ते ह्मणाले, ' श्रीमंत, मला वाटतें आतां उगीच वेळ न घालवितां दादासाहेबांचा गुंता एकदा उरकून टाकावा हें बरें. ते समक्षच अस-

त्यामुळें त्यांचें ह्मणणें काय आहे हेंही कळणारच आहे. '

'माझें ह्मणणें मी पूर्वींच कळविलें आहे,' दादासाहेब ह्मणतात, 'आणि परवां बापूंच्या पाशींही तेंच बोललों आहे. मातक्यान् सात लक्षांची जहागीर आणि पूर्वींचे किल्ले इतकी तरी नेमणूक मला मिळाली पाहिजे.'

दादासाहेबांच्या मनांत काय विचार चालले आहेत हें श्रीमंतांनीं ओळखिलें होतें, आणि त्यांच्या मूर्खपणाच्या वृत्तीबद्दल त्यांचा त्यांना मनस्वी तिटकाराही वाटत होता. पण प्रस्तुत त्यांना दुखविण्यापेक्षा चुचकारून घेणेंच अधिक सोईचें आहे असें श्रीमंतांस वाटत असल्यामुळें त्यानीं सामाचें धोरण स्वीकारलें. ते ह्मणाले, "काकासाहेब, आपणास जहागीरच द्यावयाची ह्मटल्यावर लाख दोन लाखांचा कांहीं मोठासा प्रश्न नाहीं. पण खरें ह्मटले ह्मणजे आपणच मुखत्यारीने कारभार करावा आणि आह्मी मुलानीं आपल्या आज्ञेत चालावें हेच रास्त नव्हे का ?"

"खरेंच श्रीमंत," जानोजीराव दादासाहेबांस उद्देशून ह्मणाले, आपण धाकट्या श्रीमंताच्या ह्मणण्याप्रमाणे पुण्यास राहून कारभार करणेंच ठीक. दोघा-च्याही इभ्रतीस ती साजेशीच गोष्ट आहे.'

दादासाहेबाना ही योजना पसंत पडणेंच शक्य नव्हते. त्यांना अनागोंदी कारभार पुण्यास याउपर चालण्याचा संभव नव्हता. 'त्यानीं उत्तर केलें, छे छे, तें मला जमावयाचें नाहीं. मी आपला स्नानसंध्या करून दुसरीकडे स्वस्थ राहीन. मातक्यान् ही उपाधि कोणी पतकरावी ?'

"राहिले," श्रीमंत ह्मणतात, "आपण स्नानसंध्या करून स्वस्थ रहा. पण मग आपणांस किल्ले कशास पाहिजेत ? आणि पूर्वींचा आश्रितपरिवार तरी कशास पाहिजे ?"

श्रीमंताच्या प्रश्नाचा रोख दादासाहेबानी ओळखला, पण त्यावर काय उत्तर द्यावें हें त्यांना सुचेना. ते अडखळत ह्मणाले, 'कशास पाहिजे म्हणजे ? मातक्यान् हा काय तुझा प्रश्न ?'

'प्रश्न रीतीचाच आहे,' जानोजीराव ह्मणाले, 'आपला खर्च चालला पाहिजे हें ठीक, पण किल्यांची आपणास काय जरूर आहे ? स्नानसंध्येचा आणि किल्याचा काय संबंध ?'

'खरेंच आहे,' सखारामबापू जानोजीरावाना टेकू देत ह्मणाले, 'श्रीमंतांनीं किल्ल्याचा आग्रह धरूं नये. त्या योगानें कारणाशिवाय संशयाला जागा रहते.'

'बरें,' दादासाहेब ह्मणतात, 'तुमचा सर्वांचाच आग्रह आहे, तर त्र्यंबकचा एक किल्ला रावसाहेबानें मला द्यावा. ह्मणजे बाकीच्या किल्ल्यांची मागणी मी

सोडतो. पण माझे आश्रित माझ्या बरोबर असूं नयेत हा आग्रह यानें कां धरावा? मातक्यान् ती गोष्ट मी साफ कबूल करणार नाहीं.'

'तर मग मीही आपणांस बंदोबस्तातून सोडणार नाही,' श्रीमंत उसळले, 'आपणांस आश्रित नकोत असें माझें ह्मणण नाहीं. फक्त खंडो दीक्षित, त्रिमंगलाचार्य, कुटुंबशास्त्री, भैरवभट, आणि देव्या हे आश्रित आपणांजवळ ठेवण्यास मी तयार नाही!'

"श्रीमंत," जानोजीराव दादासाहेबांना उद्देशून ह्मणाले, "या बाबतीतही मला धाकट्या श्रीमंताचेच ह्मणणे रास्त दिसतें. आपले हल्लीचे आश्रित वाईट आहेत असा जर धाकट्या श्रीमंताचा ग्रह आहे, तर त्याच्या समजुती खातर आपणही त्याचा नाद सोडावा हेच ठीक नाही का? आपणांस काय, एक सोडून दुसरे दहा आश्रित आपण ठेवाल."

दादासाहेब विचारात पडले. खंडो दीक्षितादि मंडळींना रजा देण्याचें त्यांच्या जिवावर आलें. पण नाहीं ह्मणण्याची त्यांना सोयच नव्हती. आपला पुतण्या त्या बाबतींत अगदी निकरावर आला आहे हें त्यांनी ओळखलें. तेव्हां आता अधिक ताणण्यांत अर्थ नाही असें मनात आणून ते ह्मणाले, "बरें बरें, तुमचे तसेंच ह्मणणे आहे तर तोही आग्रह मी सोडून देतों. मातक्यान् रावसाहेब, आता तरी तुझें समाधान झालें ना?"

"माझें समाधान काकासाहेब, सर्वस्वी आपल्या हातीं आहे," रावसाहेब गंभीर आवाजात ह्मणाले, "आपण खरोखरीच स्नानसंध्या करून राहिलांत तर आपली तपश्चर्या आणि आपले कृपाछत्र हीं साऱ्या मराठेशाहीला संरक्षक देवतेसारखीं तारक होणार आहेत, तेच आपण आपल्या आश्रितांच्या नादानें बखेडे करूं लागलात की आपले उद्योगच मराठेशाहीला मारक रिपु होणार आहेत. काकासाहेब, मी आपणास पुन्हा एकदा सांगतों कीं, आपणांस खरोखरीच राज्य पाहिजे असेल तर तसें स्पष्ट सांगा, मी आणि नारायण बाहेर निघतो. मग आपण आपल्या आश्रितांना घेऊन—"

'पण मी त्यांना तुझ्या स्वाधीन केले ह्मणतों ना?' दादासाहेब गडबडीनें ह्मणाले, 'मातक्यान् आता तुझें काय ह्मणणें आहे?'

'आता माझें ह्मणणें एवढेंच आहे कीं, या लेकराला क्षमा करावी,' श्रीमंत दादासाहेबांच्या पायाला हात लावून ह्मणाले, 'आणि मनात काहीं किल्मिष राहिलें असलें तर तें घालवून द्यावें.'

श्रीमंतांच्या दिलदार आविर्भावानें दादासाहेब खरोखरीच विरघळले. त्यांच्या पोटांतला दंश निघाला. याउपर तरी पुतण्यानें देऊं केलेली सात लक्षांची नेमणूक आणि त्रिंबकचा किल्ला घेऊन स्वस्थ रहावयाचें असा त्यांनीं मनाचा पक्का निश्चय केलेला दिसला.

---

## प्रकरण ३८ वें.

खरे, ले ११६४-११६५,-
११६६, ११५७ इ. } **मोहिमेचा उपसंहार** { फा. शु. ६ शके १६९३
१२-३-१७७२.

मागील प्रकरणांत सांगितलेली हकीगत होऊन दीड महिना झाला होता. आज फाल्गुन शुद्ध षष्ठी असून वाचकांस आह्मी काकोल तालुक्यातील बाळापूर गांवीं परशुरामभाऊ पटवर्धनांचा तळ पडला होता, तेथें त्यांच्या छावणींत घेऊन जात आहोंत या छावणींत आज वामनरावांचें, परशरामभाऊंचें, आणि नीळकंठ-रावांच्या जागीं आलेले त्यांचे धाकटे बंधु कोन्हेरराव यांचें, अशीं तीनी पथकें गोळा झालीं होतीं. त्रिंबकराव मामा पेठे पाईनघांटावर स्वारी करून, तिकडील मुलूख उध्वस्त करून, बेंगरूळापलीकडे तीन कोसांवर येऊन राहिले होते. मोती तलावच्या लढाईंत हैदराचा पुरता नाश झाला असून त्याचा वकील आपाजीराम त्रिंबकरावमामा-कडे वरचेवर येऊन तहाच्या गोष्टी बोलत होता. पण त्याच्या बोलण्यांत धरबंध असा कांहींच नव्हता. तो एकदां एक बोले, पुन्हा तें बोलणें फिरवून दुसरेंच बोले, कधीं खंडणीची रकमच कमी करा ह्मणे, तर कधीं जिंकलेला सारा मुलुखच परत द्या ह्मणे! अखेर त्रिंबकराव मामानें त्रासून त्याला एकदांच सांगून टाकलें कीं, 'तुह्मी साठ लक्ष रुपये खंडणी द्यावी, आह्मी घाटाखालीं उतरून अर्काटवर मोहीम केली तर आह्मांस कुमक करण्याचें कबूल करावें, तुह्मी निजामाची अठ्ठावीस लक्ष रुपये खंडणी देणें आहे ती देऊन टाकावी, आणि त्याची पावती आह्मांस आणून दाखवावी; इतकें होत असेल तर श्रीरंगपट्टण व त्याच्या भोंवतालचा थोडा मुलूख एवढें राज्य आह्मी तुह्मांस राखूं व यापुढें तुह्मी आमच्या बरोबर सुधेपणानें वागतां असे दिसून आलें तर चिकबाळापूर आणि नंदी-गड हे तालुके तुह्मांस परत देण्याची आह्मी शिफारस करूं. तुह्मांला आठ दिवसांची मुदत दिली आहे, तेवढ्यांत या अटींवर तह करावयाचा असल्यास करा, नाहीं तर तहाचें बोलणें बोलावयास पुन्हा येऊं नका!' मामांनीं हैदरास घातलेल्या या अटी

ह्मणजे हैदराचा शुद्ध सूड होता. हैदरानें मामांना मनस्वी दमविलें होतें, त्यानें मराठ्यांची निष्कारण कुरापत काढून त्यांना या मोहिमेच्या खर्चांत आणि हाल-अपेष्टांत पाडलें होतें, मराठी प्रजेवर अनन्वित अत्याचार केले होते, हें सर्व खरें; पण प्रस्तुत मोहीम चालू असतां मराठ्यांनीं हैदराच्या आगळिकीचा सव्याज वचपा काढला होता हेंही तितकेंच खरें आहे! हैदराला आतांपर्यंत झालेली शिक्षाच इतकी भरपूर होती कीं आतां आणखी तहाच्या निर्दय अटी त्याला घालून सतावणें ह्मणजे क्रूरपणाची कमालच होणार होती.

तर मग त्रिंबकराव मामानें हैदराला इतक्या कडक अटी कां घातल्या असतील बरें? हैदराबद्दल त्याला वाटत असलेल्या खुनसामुळेंच कां? कां त्याच्या मनांत हैदराशीं मुळीं तहच करूं नये असें असावें? पण तसें असण्याचें कारण तरी काय? वाचकहो, मामाच्या मनांत काय असेल तें असो, पण पटवर्धन मंडळींची तरी निदान अशी समजूत झाली होती कीं, त्रिंबकराव मामाच्या मनांत हैदराशीं तह न करितां किंवा मोहीमही विशेष जोरानें न चालवितां, आणखी एखादें साल कर्नाटकांत उगाच गमतीखातर छावणी करून काढावयाचें आहे! त्याच्या मतें या मोहिमीत मामाला प्रवासापलीकडे कसलेच कष्ट झाले नसून सुख मात्र विपुल लाभलें होतें. त्याच्या हातीं श्रीमंतांनीं सेनापतीचे सर्व अधिकार सोपविले असल्यामुळे त्याची सत्ता सर्व सरदारशिलेदारांवरच काय, पण सावनूरकर, चित्रदुर्गकर अशा संस्थानिकांवर देखील अप्रतिहत चालत होती. कर्नाटकातील दरोबस्त खंडण्याचा ऐवज त्याचे हातांत जात होता. सरदारांच्या व शिपायांच्या पराक्रमामुळें शत्रूचा एकसारखा पराभव होत जाऊन त्याच्यापासून अपकार होण्याची लवमात्र भीती आता राहिली नव्हती. बरें, घराच्या ओढीनें लढाई संपवून मामाला परत जावेंसें वाटेल ह्मणावे, तर परशुरामभाऊंच्या भाषेंत बोलावयाचें ह्मणजे "त्याना नीट घरच नाहीं" अशी स्थिती होती! अशा स्थितींत मामाला मोहीम आवरती घेण्याचें कांहींच कारण नव्हतें. फार काय, पण ऐन श्रीरंगपट्टणचा वेढा चालू असता त्रिंबकरावमामाच्या डेऱ्यांत "नित्य राग, रंग, नाच हाच प्रकार चालला होता" असा परशुरामभाऊंचा आरोप होता. मग त्या आरोपाचा ध्वनि सामान्य खालीखुशाली पुरताच मर्यादित होता, का त्यांत आणखी कांही खोल अर्थ होता, नकळे!

हैदरअली तर बिचारा सांप्रत अगदीं गोगलगाय झाला होता. त्याचें निम्याहून अधिक राज्य मराठ्यांच्या हातीं गेलें होतें. त्यांतली सर्व प्रजा लुटली जाऊन अन्नाला मोताद झाली होती. हजारों लोक मरून गेले होते, हजारों परा-

गेदा झाले होते. कैक खेड्यांतून खरोखरीच दिवा लागत नव्हता, इतकीं तीं उध्वस्त झालीं होतीं! नाहीं ह्मणावयास एक बिदनूर प्रांत मात्र शाबूद राहिला होता, पण त्यावरही त्रिंबकराव मामाची संक्रांत केव्हां वळेल याचा नेम राहिला नव्हता. त्याचें बहुतेक निवडक सैन्य मरून गेलें होतें आणि तोफा पाडाव झाल्या होत्या. त्याचे एकापेक्षां एक अभेद्य किल्ले झाडून सारे मराठ्यांच्या हातीं आले होते. अशा स्थितींत, हैदरअली मोठा वाकब मुत्सद्दी आणि कर्तबगार रणगाजी होता तरी, त्याची काहीं मात्रा चालेनाशी होऊन तो लाचार बनला असल्यास नवल काय? त्याची मोठ्यांत मोठी आशा ह्मणजे पेशव्यांचें दुखणें वाढल्यामुळें मराठे सरदार देशास परत जातील, ही होती. पण तसें कांहीं न होता मराठ्यांनीं गेल्या बरसातींत दक्षिणेंत छावणी केलीच, आणि येत्या बरसातीतही पुन्हा छावणी करण्याचा त्यांचा विचार आहे असें त्यास दिसूं लागले, तेव्हां मात्र तो खरोखरीच घाबरला, आणि त्यानें लक्ष्मणराव रास्त्याच्या विद्यमानें तहाचें बोलणें सुरूं केलें. त्रिंबकरावाशी त्याच्या वकीलाची वाटाघाट होता होतां मामानें अखेर त्यास काय उत्तर दिलें हे वर आलेंच आहे.

पण हैदराला एका कारणास्तव तह पाहिजे होता, तर मराठ्याच्या इतर सरदारसरंजामदारांना तो दुसऱ्या कारणाकरिता पाहिजे होता. ते सारे गेलीं दोन अडीच वर्षे मोहिमीच्या निमित्तानें दक्षिण कर्नाटकात अडकून पडले असून त्यांना आपापल्या मुलांमाणसात जाण्याची प्रबळ इच्छा होऊं लागली होती. मोहिमीच्या हालअपेष्टाना ते कंटाळले होते. विशेषतः पटवर्धन मंडळी अगदीं जिकीराला आली होती. या मोहिमीचा सारा भार त्याच्यावरच पडला होता. मोहीम सुरूं झाल्यापासून त्यांनीं माधवराव कृष्ण, गोपाळराव गोविंद, आणि नीळकंठराव त्रिंबक असे तीन बळी समरदेवतेस दिले होते, आणि हालही परमावधीचे सोसले होते. पटवर्धनाच्या अरिष्टांचें वर्णन कै. खरे शास्त्री पुढील प्रमाणें करितात. 'स्वारीच्या खर्चामुळें त्यांना दहा बारा लक्ष रुपये कर्ज झालें व संसारांचीही वाताहत होऊन गेली. गोविंद हरि, त्रिंबक हरि व कृष्णंभट हरि हे तिघे वार्धक्यानें जर्जर झालेले व पुत्रविरहानें पोळलेले बंधु आशा करीत होते कीं, लवकर तह होऊन स्वारींतून आपलीं मुले घरीं परत येतील व त्यांस आपण डोळे भरून पाहूं. पण ती त्याची आशा सफळ झाली नाहीं. चातकाप्रमाणें वाट पाहता पाहता त्यास मृत्यु आला. वामनराव प्रकृतीनें अशक्त असतांही वाडवडिलांच्या लौकिकाचा अभिमान धरून रात्रंदिवस मेहनत करून, या स्वारींत पडेल ती कामगिरी रगडून नेत

होता. या स्वारींत परशुरामभाऊ दोनदा आजारी पडला होता. त्यांत गेल्या महिन्यांत त्यास झालेला वाखा तर इतका भयंकर होता कीं, त्यांतून तो वांचेल ही आशा कोणासच नव्हती." खुद्द परशरामभाऊंनींच आपल्या वाख्याचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे. "या नंतर इकडील वर्तमान तरी माघ शुद्ध प्रतिपदेस मजला ज्वर येऊं लागला, मस्तकावर फारच भार होऊन पांच सात दिवस हैराण झालों. तों तोंडास कांहीं उपद्रव होऊन गळा सुजला. वाचा बंद व्हावयाचा प्रकार झाला. तों श्रीकृपेंकरून एक वैद्य चांगला मिळाला. त्यांणीं औषधोपाय करून कांहीं गोदानें, ह्मैसदान, जप ब्राह्मणाकडून करविलीं त्यानें आरोग्य झालें. पंधरा वीस दिवस स्नान अगदीं राहिलें होतें. चोरेपाणी घेतलें. शिवरात्रीचे दिवशीं पंचगव्य घेतलेचा दिवस समाधान होतें. तों मागती दुखणें फिरलें. आंव पडूं लागली. तीन चार दिवस फारच वेग. नित्य पंचवीस तीस वेळां, याप्रमाणें होऊन शरीर फारच क्षीण झालें. उपरांतिक उतार पडला." पटवर्धन मंडळी प्रमाणेंच इतर सरदारांचीही हलाखीची स्थिति होती. शिलेदार लोकांचे तर हाल पुसूंच नये. पहिल्या वर्षींच्या छावणीस ते आपखुषीनें राहिले नव्हतेच. त्याची सारी ओढ घराकडे होती तथापि तसेच दिवस ढकलीत असतां दुसरा पावसाळा येऊन पुन्हा छावणीचा प्रसंग आला, तेव्हां सरदारांनीं त्याच्या हातापाया पडून त्यांस मोठ्या मिनतवारीनें राहविलें. पुन्हा तें वर्ष लोटून तिसरा पावसाळा आला तरी तह होत नाहीं असे कळल्यावर मात्र त्यांनीं अगदीं ताळ टाकला. सांगितलेलें काम ऐकूं नये, नेहमीं गवगवा करावा, विचारल्याशिवाय शेंपन्नास स्वारीनीं एकदम लष्करातून उठून देशीं यावें, असें होऊ लागल्यामुळें सरदार लोक अगदीं मेटाकुटीस आले होते. कसेंही करून तह करावा ह्मणून त्रिंबकरावाच्या ते नेहमी विनवण्या करीत होते, व आपणांस देशीं परत बोलवावें ह्मणून पेशव्याच्या दरबारीं वशिले बांधीत होते. परशरामभाऊंनीं तर आपल्या चुलत्यास व आईस साफ लिहून पाठविले कीं, यंदा तह होवो अगर न होवो, आपण कांहीं छावणीस राहणार नाहीं. आपण घरीं येणार, मग त्याकरिता आपली जहागीर श्रीमंतांनीं जप्त केली तरी बेहत्तर!

पटवर्धनांच्या छावणींत आपण प्रवेश करीत आहोंत त्यावेळीं दक्षिण कर्नाटकांतील मोहिमीची आणि मोहिमींत भाग घेणाऱ्या घटकांची परिस्थिति एकंदरींत कशी काय होती याची वाचकांना आतां बरीच कल्पना आली असेल, असें समजून आह्मी कथानकाचा धागा पुढें चालवितों. प्रकरणाच्या आरंभीं ह्मटल्याप्र-

माणें आज फाल्गुन शुद्ध षष्ठी असून दुपारची वेळ होती. गोविंदपंत नाना नुक-तेच वारल्याची आणि सत्यभामाताई सती गेल्याची बातमी आली होती व मंडळी त्यांच्या अशौचांतून नुकतीच मोकळी झाली होती. नाना उतार वयांतच गेले असल्यामुळें त्यांच्या मृत्यूनें मोठासा घातपात झाला होता असें नाहीं, तरी पण त्यांच्या आठवणीमुळें पटवर्धन मंडळी अमळ रंजीसच होती. वामनराव, परशु-रामभाऊ, लक्ष्मणराव रास्ते, कोन्हेरराव, असे जेवणेंखाणें आटोपून वामनरावांच्या डेऱ्यांत बसले होते. त्यांच्यापुढें पानसुपारीचें एक तबक असून त्यांत चांदीच्या वाट्या व पानपुडे ठेवलेले होते. पानसुपारी खातां खातां प्रथम गोविंदपंत नानां-च्या कांहीं आठवणी काढून झाल्यावर चालू परिस्थितीसंबंधी त्यांच्या गप्पागोष्टी चालू झाल्या होत्या. हैदरानें तहाच्या अटी कोणत्या सुचविल्या आहेत, त्या साधा-रण मानानें कशा समंजसपणाच्या आहेत, मामांनीं कडक अटी घालून कसें मोडतें घातलें आहे, इत्यादि गोष्टी त्यांच्या चर्चेचा विषय होत्या. बोलतां बोलतां परशु-रामभाऊ लक्ष्मणराव रास्त्यांना उद्देशून ह्मणाले, ‘ अण्णा, त्रिंबकराव मामा आता तह करूं देत अथवा न करूं देत, आह्मी तिथे हे आपले देशीं जाणार ! ’

‘आणि आह्मी कोठें राहणार आहोंत ?’ लक्ष्मणराव ह्मणतात, ‘आह्मी देखील तुमच्या पाठोपाठ निघणार. त्रिंबकराव मामांचे काय ठीकच आहे. तह न झाला तरी त्यांच्या चैनीत कमी पडणार आहे थोडेंच ! ’

‘ पण अण्णा, ’ वामनराव ह्मणाले, ‘ आतां तहाचें नडेंल आहे तरी कोठें ? हैदराचें ह्मणणें तरी काय आहे ? ’

‘ तो पंचेचाळीस लक्ष रुपये खंडणी देण्यास तयार आहे, ’ लक्ष्मणराव ह्मणाला, ‘ पण मामा साठ लक्षाखालीं उतरतच नाहींत ना ? ’

‘ आणि मुलखाचे काय ? ’ कोन्हेररावानी प्रश्न केला.

‘ जिंकलेला मुलूख तेवढा सगळा सोडावा असें त्याचें म्हणणें आहे, ’ लक्ष्मण-राव म्हणाले, ‘ तथापि त्या बाबतीत तो आपला आग्रह सोडील–’

‘ नव्हे सोडलाच पाहिजे,’ भाऊ म्हणतात, ‘सगळा मुलुख कोण परत देईल?’

‘ नाहीं, तें होईल हो, ’ लक्ष्मणराव ह्मणाले, “ तो अगदीं आमच्या ह्मणण्या-प्रमाणें तोडीला येईल, पण मामांना तें पटलें पाहिजे ना ! ”

‘ चट सारें पटेल, ’ वामनराव म्हणाले, ‘ पटण्याचें औषध केलें म्हणजे पटतें. अर्काटकर महमदअल्लीनें औषध दिल्याबरोबर त्याला नाहीं कां मामांनीं तसाच सोडून दिला ? ’ वामनरावाच्या शब्दांतलि खोंच वाचकांच्या लक्षांत आली नसेल, म्हणून त्यांना आह्मी हें कळवितों कीं, अर्काटच्या नबाबानें तंजावरवर स्वारी केली

होती आणि त्याच्यावर मामांची इतराजी झाली होती, पण महमदअलीनें दहा लक्ष रुपये 'दरबार खर्च' उर्फ लांच मुकाट्यानें भरून मामांस शांत केलें होतें. या गोष्टीस अनुलक्षून वामनरावानें वरील शब्द उच्चारले होते.

'नाहीं हो, हें प्रकरण तसें भागण्यासारखें नाहीं,' लक्ष्मणराव ह्मणाला, त्याच्या बुडाशीं दुसरेंच कारस्थान आहे, आणि तें जरा नाजूक पैकींच आहे.'

'काय, काय तें?' परशुरामभाऊ अगत्यानें विचारतात, 'अण्णा, तसें कांहीं असेल, तर तें आह्मांला जरूर सांगा. आह्मांला तें अवश्य कळलें पाहिजे.'

लक्ष्मणराव यावर कांहीं बोलणार होता, इतक्यांत एक हुजऱ्या आंत आला, आणि वामनरावांना मुजरा करून ह्मणाला, 'मामासाब प्यटेऽ येत्याती.'

'काय मामासाहेब आले?' वामनराव उठत उठत ह्मणाले, 'आणि वर्दी न देतांच?' असें ह्मणून ते तंबूच्या दाराकडे लगबगीनें निघाले. त्यांच्या पाठोपाठ लक्ष्मणराव रास्ते, भाऊ व कोन्हेरराव हेही मामांचें स्वागत करण्याकरितां पुढें झाले. इतक्यांत मामासाहेबही घोडा उडवीत येऊन तंबूच्या दारापाशीं पोंचले आणि घोडा थांबवून खालीं उतरले. नंतर ते नमस्कारांचें देवाण घेवाण करीत आंत आले, आणि वामनरावांनीं दाखविलेल्या लोडास टेकून बसले. इतर मंडळीही खालीं बसली. प्रास्ताविक कुशल प्रश्न झाल्यावर, वामनराव विड्यांच्या पानांचें तबक त्रिंबकराव मामांपुढें सारीत ह्मणाले, 'मामासाहेब, आज स्वारी भर उन्हाचीशी आली?'

"आज मुद्दामच तुमच्या समाचाराकरितां आलों होतों," मामा उत्तर करितात, "गोविंदपंत नाना गेल्याचें आणि ताई सती गेल्याचें कळलें, तेव्हां ह्मटलें एकदा तुह्मांस भेटून जावें."

"प्रस्तुत गजाननच आमच्यावर कोपला आहे," कोन्हेरराव ह्मणतो, "त्या शिवाय आमची तीर्थरूप मंडळी अशी एका पाठीमागून एक आम्हांला सोडून गेली नसती!"

"तें तर खरेंच," मामा ह्मणतात, "पण कोन्हेरराव, तुम्हांला सांगूं कां, नानांचें कांहीं वाईट झालें नाहीं. त्याचें सोने झाले. आणि ताईनी तर सहगमन करून आपलें नांव अजरामर करूनच ठेवलें. अहो तीं दोघेही नवराबायको भाग्यवान्, ह्मणून तुमच्यासारख्या कर्तृत्ववान् मुलांचे पराक्रम ऐकत त्यांनीं समाधानानें डोळे मिटले!"

'ते भाग्यवान् असतील,' परशुरामभाऊ अमळ खोचदार स्वरांत ह्मणाले, 'पण आह्मी मात्र खरे अभागी आहोंत, कारण मरते वेळींसुद्धा त्याच्या भेटीला आह्मांस जातां आलें नाहीं!'

'भाऊ, तुमची खोंच माझ्या लक्ष्यांत आली,' त्रिंबकरावमामा ह्मणतो, 'तुह्मांला येथें निष्कारण डांबून पडावें लागलें आहे हें मला सुद्धां कळतें; पण करावयाचें काय ? तहाच्या अटी तरी जमल्या पाहिजेत ना ?'

'जमविल्या ह्मणजे जमतात,' वामनराव ह्मणाले, 'थोडें देवाण घेवाण केलें ह्मणजे वाटेल तें होतें.'

'हा आतां तुह्मी मलाच टोमणा देत आहांत !' मामा चिडून ह्मणाले, ह्मणजे तह होत असतां मीच तो मुद्दाम होऊं देत नाहीं असें तुमचें ह्मणणें दिसतें. मी काय अटी घातल्या आहेत, त्या ह्या लक्ष्मणराव रास्त्यांना माहीतच आहेत. बरें, हैदर कशी उडवाउडवी करितो आहे हेंही त्यांना ठाऊक आहे. मग आतां त्यांत देवाण कोठें आणि कसें करावयाचें तें तुह्मीच सांगा !'

"हो, आह्मी सांगतों," परशुरामभाऊ आवेशानें ह्मणतात, "हैदर पंचेचाळीस लक्ष रुपये देण्यास कबूल आहे, तुह्मी साठ लक्ष मागत आहांत. पन्नास पंचावन लक्षांवर तोडा. तोच प्रकार मुलखाचा. थोडें अरतें परतें केल्याशिवाय कसें होईल ?"

"ह्मणजे आह्मालाच कांहीं समजेनासें झालें आहे," मामा उपरोधिक स्वरानें ह्मणतात, "आतां तुह्मीच कसें तें आरते परते करून तह ठरवा. हो, आता असेच्च ह्मटलें पाहिजे, दुसरें काय ? मी ह्मणतों, न कां होईना तो तह ? जिंकलेल्या शत्रू बरोबर आरतें परतें काय म्हणून करायचें हो ?"

"जिंकलेल्या शत्रूंत आणि जिंकणाऱ्या आह्मांत काहींच फरक राहिला नाही ह्मणून करावयाचें !" वामनराव ह्मणाले, "मामासाहेब आमची काय हलाखी चालली आहे, हें तुह्मास दिसत नाही का ? आह्माला काहीं घरेंदारें आहेत की नाहींत ? का आह्मी प्रळयकाळपर्यंत येथेंच छावणी करून रहावे असेंच तुमचें ह्मणणें आहे ?"

"हे आतां तुह्मी अगदीच वर्दळीवर आलांत !" मामा अमळ नवारून ह्मणतात, "अहो मला तरी इथल्या हालअपेष्टांत रहावयाची हौस का आली आहे ? पण करणार कसें ? या मगरूर हैदराचा एकदा पुरता रेंच तरी मोडला पाहिजेना ?"

"तर मग त्याचा रेंच मोडला आहे," कोन्हेरराव ह्मणाला, "आता दहा पांच वर्षें तरी हैदर पुन्हा डोकें वर काढील ही भीती उरली नाहीं."

"आणि त्याचा रेंच मोडता मोडतां आमचा मोडावयाची वेळ आली आहे," भाऊंनीं कोन्हेररावास पुस्ती जोडली, "आमची वडील धाकटी एकेक मंडळी चालली, आह्मीही जवळ जवळ त्याच पंथाला लागलों आहों. तिकडे श्रीमंतही आजारी

आहेत, आणि तह करून देशास निघून या ह्मणून तुह्मांस पत्रें पाठवीतच आहेत.'

'आणि तह न करण्याचा हेका आमचाच तेवढा आहे, असेंच ना तुह्मां सर्वांचें ह्मणणें?' मामांनीं खोंचून प्रश्न केला, 'ठीक आहे, हा आह्मी आपला हेका बाजूस ठेवला! लक्ष्मणराव, तुमच्याच मार्फत हैदराशीं बोलणें चालू आहे. तुह्मीच कसा तो तह ठरवा ह्मणजे झालें. तुह्मी ठरवाल त्या अटी आह्मांस मंजूर. आतां तरी झालें ना?'

'पण आह्मी हें खरें धरून चालावयाचें ना?' वामनरावांनीं साशंक मुद्रेनें पृच्छा केली, 'हो, त्यांनीं ठरविलें, आणि आपणांस तें मागाहून पसंत पडलें नाहीं, ह्मणजे त्यांची उगाच तोंडफोड व्हावयाची!'

'ह्मणजे तुह्मी सर्वांनीं मिळून मला एक पशूच ठरविला आहेत कीं काय?' मामा निकराला येऊन उद्गारले, 'बस्स, एकदांच सांगतों, लक्ष्मणराव अण्णा ठरवितील तो तह आह्मांस मान्य आहे. लक्ष्मणराव, चला, तुह्मांस आमची सदर परवानगी आहे. मात्र आपल्या इभ्रतीला न साजेसे कांही ठरवूं नका ह्मणजे झालें. बाकी तुह्मी सुज्ञच आहांत ह्मणा, तुह्मांस कांहीं सांगावयास पाहिजे असें नाहीं.'

"त्याची आपण अगदीं काळजी करूं नका," लक्ष्मणराव रास्ते ह्मणाला, "मी आपल्या विश्वासाचा अगदी दुरुपयोग करणार नाहीं."

मामा पटवर्धन मंडळींचा निरोप घेऊन निघाले. सर्व मंडळी त्यांना पोंचवावयास बाहेर आली. मामा घोड्यावर स्वार झाले, आणि त्यांनीं घोड्यास टाच दिली. त्यांची पाठ वळली मात्र, तोंच भाऊंच्या एका हुजऱ्यानें त्यांच्यापाशीं एक पत्र दिलें व लालामियाच्या लष्करातून एका सांडणीस्वारानें ते आणून दिलें आहे, असें सांगितलें. भाऊंनी तें पत्र फोडून वांचलें. ते मुसलमानींत लिहिलेलें असून त्यात पुढील मजकूर होता. 'दादा, आपले सेनापती मामासाहेब एरडकिरें गांवच्या एका नायकिणीवर फिदा झाले आहेत. ही त्यांची खासगी बाब आहे, पण तिजमुळें आपल्या राजकारणात कांहीं व्यत्यय येऊं नये ह्मणून आपणास कळविली आहे. मी आहे त्यांत सुखी आहे. पण आमच्या धन्यांचें हंसाबाई विषयींचे वेड अजून गेलेलें दिसत नाही. त्यांनीं माजी दर्यासारंग मोत्याजीराव विचारे यांच्या पदरचा कोणी नरसाप्पा नांवाचा नोकर फितूर करून घेतला असून त्याच्या मार्फत विजयदुर्गच्या किल्ल्याखालीं जें भुयार आहे, त्या भुयाराच्या वाटेनें हंसाबाईला पळवून आणण्याचा त्यांचा विचार आहे. जरूर ती तजवीज तुह्मी करालच. आपली बहीण, मुमताज.' पत्र वाचतांच भाऊंच्या कपाळाला आठ्या चढल्या

## प्रकरण ३९ वें.

खरे, ले. १०६५ ] **अत्याचाराचा प्रयत्न.** [ वै. शु. ८ शके १६९४

आज आह्मी वाचकांस पुन्हा एकदा विजयदुर्गास घेऊन जाणार आहोंत. मात्र त्यांना आज बंदरावर न नेतां किल्लयामध्यें असलेल्या धुळपांच्या वाड्यांत नेत आहोंत. आमच्या वाचकांपैकीं ज्या कोणी विजयदुर्गचा किल्ला पाहिला असेल, त्यांना ठाऊकच असेल कीं, ह्या किल्लयाच्या बाजूला चिकटून समुद्राची खाडी आली आहे, आणि ती बरीच लांबरुंद पसरली आहे. खाडीला लागूनच किल्लयाचा प्रचंड तट आहे, आणि तटाच्या आंत धुळपांचा प्रशस्त वाडा, पागा वगैरे अवशिष्ट इमारती आहेत. आमच्या कथानकाच्या काळीं हा वाडा आपल्या ऐन वैभवांत असून संपत्ति आणि मुलेंमाणसें यांनीं गजबजून राहिला होता. तो पश्चिमाभिमुख असून त्याचे सोपे व दालनें दक्षिणोत्तर ऐसपैस पसरलीं होतीं. वाड्याच्या दक्षिण बाजूला समुद्राची खाडी होती. धुळपांकडे श्रीमंतांनीं आरमाराचा सुभा वंशपरंपरा सुपूर्त केला असल्यामुळें ते पेशव्यांचे एक सरंजामदार असल्यासारखेच होते. अर्थात् त्यांच्या हाताखालीं बरेंचसें सैन्य, व पांचचारशें घोडेस्वारही होते. आसपासच्या बऱ्याच प्रांतावर त्यांची अप्रतिहत सत्ता असून बहुतेक पश्चिम किनाऱ्यावर त्यांच्या सामर्थ्याचा जबर दरारा होता. एका शब्दांत सांगावयाचें ह्मणजे हंसाबाईनें ह्मटलेल्या चकव्यांत धुळपांना पेशव्यांचे 'पाणगारदी' हें जें नांव दिलें आहे, तें त्यांना यथार्थ शोभत होतें.

आज ह्मणजे वैशाख शुद्ध अष्टमीच्या दिवशीं धुळपांच्या वाड्यांत एक गोड समारंभ चालला होता. सुमारें सात आठ घटका रात्र झाली असून किल्यावर अष्टमीचें रम्य चांदणें पसरलें होतें. वारा मोठा बहारीचा सुटला असून आपल्या शीतल लहरींनीं उन्हाळ्याच्या तीव्र उकाड्याचें परिमार्जन करीत होता. धुळपांच्या वाड्यांत सदरेवरच एक प्रशस्त बैठक टाकली असून तिजवर बऱ्याच स्त्रिया जमल्या होत्या. शिवाजीराव सुर्व्यांची बायको गंगाबाई, हंसाची मावशी येसाबाई, धुळपांच्या घरच्या बायका, आणि गांवातल्या कांहीं परीचीत स्त्रिया या जमावांत दिसत होत्या. एका लोडाला टेकून तरुण जानराव धुळप बसला असून, त्याच्या समोरच हंसाला बसविण्यांत आलें होतें. दोघांच्याही डोक्यावर मोगरीच्या फुलांच्या जाळ्या घालण्यांत आल्या होत्या. जानबा या वेळीं तारुण्याच्या ऐन उमेदींत असून, आपल्या सरदारी

पोषाखांत फारच खुलून दिसत होता. हंसा एक जरतारी पांढरें पातळ नेसली असून तें तिच्या सुवर्णगौर अंगकांतीला खूपच उठाव देत होतें. आमच्या चतुर वाचकांनीं ताडलेंच असेल कीं, आज हंसाच्या ओटभरणाचा मुहूर्त असून तन्निमित्तच हा समारंभ चालला होता. लालामियाच्या बंदींतून हंसाची सुटका झाल्यास आज जवळ जवळ पावणेदोन वर्षे झालीं हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. त्यानंतर गेल्या वर्षाच्या मार्गशीर्षांत तिचें जानबा धुळपाशीं लग्न झालें. हंसा उफाड्याची मुलगी असल्यामुळें लग्न झाल्यापासून सव्वा वर्षांत ह्मणजे गेल्या चैत्र वद्यांतच तिला मुका मुलगा झाला, आणि आज तिच्या ओटभरणाचा समारंभ होता.

मात्र आजच्या समारंभाला आनंदराव, हरबाजीराव व भगवंतराव हे तिघेही धुळप हजर नव्हते. ते आरमार घेऊन बिदनूर प्रांताकडे गेले होते. जानबाचें लग्न करून धुळप मंडळी मोकळी होतात तोंच त्यांना श्रीमंतांचा हुकूम येऊन पोचला कीं, "तुह्मी आपलें आरमार घेऊन बिदनूर प्रांताकडे जावें, तेथील किनाऱ्यावरील हैदराची सर्व बंदरें जिंकून घेऊन खुष्कीवरही फौज उतरवावी, आणि तो प्रांत जिंकावयास वाडीचे सावंत येतील त्यांस मदत करावी." असा हुकूम येतांच आनंदराव वगैरे उपरोक्त धुळप मंडळी आपले आरमार घेऊन तावडतोब बिदनुराकडे गेली, ती अजून आली नव्हती. मात्र घरीं राहिलेल्या ह्मातार्‍या जानरावाला त्याचें नुकतेंच एक पत्र आले असून त्यांत पुढील मजकूर होता, "श्रीमंतांच्या आज्ञेप्रमाणे बिदनूर प्रांताकडे आलों. शिरूर, नागूर, कोंडापूर इत्यादि बंदरें घेतली. खुष्कीवरही सैन्य उतरविले होते, पण हैदराशीं सलोख्याचें बोलणे चालले आहे, असा त्रिंबकराव मामा सेनापतींचा निरोप आल्यामुळे मोहीम तहकूब ठेवली आहे. तह लवकरच होण्याचा सुमार आहे, तो झाल्याबरोबर येत आहोंत." हंसा ऋतुमती झाली होती, तथापि तिचे ओटभरण करण्याचा समारंभ आनंदराव वगैरे मंडळी घराकडे आल्यावाचून करावयाचा नाहीं असा जो ह्मातार्‍याचा बेत होता, तो त्यानें हें पत्र येतांच बदलला आणि आपल्या नातसुनेच्या ऋतुशांतीला आज अष्टमीचा मुहूर्त ठरविला. आज चाललेला समारंभ तन्निमित्त होता, हें आतां वाचकांच्या लक्ष्यात आलेंच असेल.

आजच्या समारंभाचे सोहाळे रात्रीं बराच वेळपर्यंत चालले होते. ओटभरणाचा समारंभ हा स्त्रियांच्या विशेष हौसेचा प्रसंग असल्यामुळें, धुळपांच्या वाड्यात जमलेल्या बायकामंडळींत आज आनंद, उल्हास आणि विनोद यांना ऊत आला होता. जानबाला आणि हंसाला एकमेकांचीं नांवें घ्यावयास लावणें,

त्यांच्या हातांत सुपारी देऊन ती परस्परांकडून सोडवावयास लावणें, नारळाला कुंची घालून त्याचें भावी अपत्य कल्पून तें त्या तरुण दंपत्याच्या हातीं खेळवावयास देणें, त्या दंपत्यांतला एक घटक 'मी जाते देवदर्शनाला, तुह्मी घ्या मुलाला' असें ह्मणत तें अपत्य दुसऱ्या घटकाच्या हातीं देऊन देवदर्शनाला जाण्यास निघाला असतां, दुसऱ्या घटकानें "मी जातों मोहिमीला, आपणच घ्या मुलाला" असें सांगून तें अपत्य परत करणें आणि त्या योगानें देवदर्शनाहूनही मोहिमीच्या कामाचें अगत्य त्या वेळच्या मराठ्यांना अधिक वाटत होतें असें जणुं काय दाखविणें, इत्यादि हौसेचे प्रकार मनमुराद चालले होते. हंसाच्या समवयस्क मैत्रिणी तिच्या कानाशीं लागून "आज आपलीं अंथरुणें माजघरांत घालावयाचीं आणि तूं उजाडेपर्यंत आह्मांस कर्नाटकांतील मोहिमीच्या गोष्टी सांगावयाच्यास बरें कां," असें कांहीं तरी ह्मणत होत्या आणि त्यांना या साखर थट्टेबद्दल उघडपणें शिक्षा करावयाची चोरी झाल्यामुळेंच कीं काय, हंसा त्या मैत्रिणींना हळूंच चोरून चिमटे घेत होती! रात्र फार झाली असून आपणास झोंप येऊं लागली आहे, असें भासविण्याकरितां जानराव मधून डोळे चोळीत होता, जांभया देत होता, आणि अंगाला आळोखे पिळोखेही देत होता, पण उशीराचें त्याचें प्रमाण जमलेल्या स्त्रियांना मान्य नसल्यामुळें असो, किंवा कधीं कधी दहा बारा घटका रात्रीपर्यंत कसरतींत व मर्दानी खेळांत जागणाऱ्या त्याचें आज मध्यरात्रीसच जांभया देऊं लागणें ढोंगीपणाचें वाटल्यामुळे असो, धुळपांच्या वाड्यांत जमलेल्या स्त्रियांनीं आजचा समारंभ लवकर आटोपता घेण्याचें मनात आणलें नाहीं.

पण या मंडळींना असेच थट्टामस्करींत सोडून आपण मधल्या माडींत असलेल्या ह्मातान्या जानरावाकडे जाऊं. तो पहा जानराव आपल्या अंथरुणावर बसला आहे. आजच्या समारंभात त्या ह्मातान्याला काहींच काम नसल्यामुळें तो एकदां नातवाला व नातसुनेला डोळे भरून पाहून जो वर गेला, तो बसूनच राहिला होता. तो अंथरुणावर आडवा देखील झाला नाहीं! पण हा काय चमत्कार असावा बरें? त्याला अजून जी झोंप आली नाहीं ती एक ह्मातारपणामुळें किंवा सदरेवर चाललेल्या बायकांच्या गलग्यामुळे नसेल, पण त्याची चर्या अशी चिंतातुर कां दिसते आहे बरें? विशेषतः आजच्या सारख्या समारंभाच्या दिवशीं त्याच्या मनाला काळजी लागलेली असावी हें मोठेंच आश्चर्य नव्हे कां? पण वाचकहो, जानरावाच्या मनाला हुरहुर लागण्याजोगें तसेंच कारण झालें होतें. आठ दहा दिवसापूर्वी त्याला परशुरामभाऊंकडून एक पत्र आलें असून त्यांत

'मोत्याजीराव विचाऱ्यांच्या पदरचा नरसाप्पा नांवाचा कोणी नोकर लालामियाला फितूर झाला असून आपल्या वाड्याखालच्या भुयाराच्या वाटेनें कांहीं तरी अत्याचार करण्याचा त्यांचा बेत आहे. सावध असावें.' असा इषारा दिला होता. हें पत्र वाचल्यापासून झातारा जानराव फारच हवालदील झाला. अत्याचाराची त्याला मोठीशी भीति वाटली असें नाहीं, त्याचें निवारण करण्यास आपण पूर्ण समर्थ आहों अशी झाताऱ्याची खात्री होती. पण आज पिढ्यान् पिढ्या आपण गुप्त राखलेली भुयाराची बातमी एका घरभेद्यानें फोडली या गोष्टीचा त्याला मनस्वी खेद झाला, आणि संतापही आला. झाताऱ्याला मुळींच चैन पडेनासें झालें. नरसाप्पा हा मोत्याजीरावाच्या घरांतला एक नोकर असून, आरमारचा सुभा मोत्याजीरावांच्या हातीं कांहीं दिवस गेला असतां, त्यानें आपला वाडा धुंडाळला असला पाहिजे, आणि त्याला वाड्याखालच्या भुयाराची बातमी लागली असली पाहिजे, असें जानरावानें ताडलें आणि असलें नीच कृत्य करणाऱ्या नरसाप्पाचा भयंकर सूड घेण्याचा त्यानें मनांत निश्चय केला, व तशी संधी येण्याची तो वाट पहात राहिला. परशुरामभाऊंकडून अत्याचारासंबंधीं इशारत मिळतांच त्याच्या निवारणाची त्यानें जरूर ती तजवीज गुपचूप करून ठेवली आणि रोज रात्री एक दोनदां जाऊन भुयाराच्या तोंडाशीं आपण ठेवलेला बंदोबस्त नीट आहे की नाहीं हें तो पाहूं लागला. मात्र त्याचा बेचैनपणा कायम राहिला, तोच आजच्या त्याच्या मनस्थितींत दिसत होता. नित्याप्रमाणें आजही मध्यरात्र होतांच तो उठला आणि कंदील घेऊन आंतल्या माडींत जातांच तो उजवीकडे वळला आणि एका खोलीचें दार उघडून आत गेला.

* * * * *

त्याच रात्रीं चंद्र अस्तास जाण्याचे सुमारास एक पडाव खाडीचें पाणी कातगीत किल्ल्याच्या पश्चिमांगचे तटाकडे चालला होता. या पडावावर एकंदर सात इसम असून त्यांपैकीं दोघांच्या हातीं वल्हीं होतीं. सर्वांनीं तोंडावरून बुरखे घेतले होते, यावरून ते काही तरी दग्याचें कृत्य करण्यास निघाले असावे असें सहजच अनुमान होत होतें. खाडीच्या या बाजूला कसलीच जाग नसल्यामुळें पडाव सुरक्षितपणें किल्ल्याच्या पायथ्यापर्यंत येऊन पोहोंचला. खिडकीजवळ येतांच तो उभा करून त्यावरचे पांच असामी खालीं उतरले, आणि वल्हीवाले तेवढे पडावांत बसून राहिले. उतरलेले लोक खडकाच्या आश्रयानें हळूंच पाण्यांत शिरले, आणि पाण्याच्या चोळींतून तसेंच पुढें चालत निघाले. ही चोळ खडकाखालून किल्ल्याच्या तटाखालीं पांच सहा हात गेली होती. तिजमधून आंत गेल्यावर ते एका जागीं थांबले

आणि त्यांतील एका इसमानें तेथें अमळ चाचपल्यासारखें करून एक मोठा दगड बाजूस केला. त्याबरोबर त्यांना एक गुहेच्या तोंडासारखी मोकळी जागा लागली. नंतर ते पाण्यांतून खडकावर चढून त्या जागेंत शिरले, आणि दगड बाजूस करणाऱ्या इसमाच्या मागून निघाले. आतां त्याना कांहींच दिसेनासें होऊन एकेक पाऊल सावकाश व जपून टाकत चालणें भाग पडलें. थोडें चालून गेल्यावर त्यांच्या म्होरक्यानें त्या गुहेच्या भिंतींतला एक दगड दूर केला, आणि एका मोठ्याश्या कोनाड्यासारख्या वाटेनें तो आंत शिरला. त्याचे सोबतीही त्याच्या मागून गेले. आत गेल्यावर त्यांना एक जिना लागला. तो खडक पोखरून तयार केल्याप्रमाणें दिसत होता व त्याच्या पाहिऱ्याही अगदीं ओबड धोबड होत्या. सुमारें आठ दहा पाहिऱ्या चढून गेल्यावर ते पुन्हा एका मोकळ्या जागेंत आले. तिजमधून चाचपडत पुढें गेल्यावर त्यांच्या म्होरक्यानें आणखी एक दगड दूर केला व त्याच्या आंत त्याना आणखी एक जिना लागला. हा दुसरा जिना फारच मोठा, चांगला शंभर सव्वाशें पाहिऱ्यांचा आणि बरींच वळणें घेत गेला असावा असा त्यांस भास झाला. तो चढून गेल्यावर ते एका दालनात आले आणि विश्रांति घेण्यासाठी थोडा वेळ थाबले. ह्या दालनातील जमिनीवरून ते धुळपाच्या वाड्यातील तळघर असावें असे त्यानी ताडलें. क्षणभर विसावा घेतल्यावर त्यांचा म्होरक्या उठला आणि आपल्या मागून चालण्याविषयीं त्याने हळूच आपल्या अनुयायांस सांगितलें. त्यावर त्याच्या अनुयायापैकीं एकानें त्यास मुसलमानीत प्रश्न केला, “ कसें काय नरसाप्पा, एथपर्यंत तर ठीक जमलें, पण आता पुढे कसें? ”

“ पुढची सुध्दां मी सारी तजवीज करून ठेवली आहे ” नरसाप्पा म्हणाला, “ मी कच्या गुरूचा चेला नाहीं बदूरूद्दीन साहेब. शिवाय आज संधीही मनाजोगी मिळाली. आज हंसाचें ओटभरण असून त्याचा समारंभ बायकामंडळींत चालला आहे. मी धुळपाच्या एका नोकराला फितूर करून घेतले असून त्यानेंच मला ही सारी बातमी दिली आहे. आता इतक्यात तो आपणास बोलावण्यास येईल. ”

“ क्या बात है नरसाप्पा, ” बदूरूद्दीन साहेब खुष होऊन म्हणाले, ‘ आपण त्या इसमालाही चांगलें इनाम देऊं. बरें पण आपण पुढची योजना कशी काय ठरविली आहे? ”

‘ अगदीं बरोबर ठरविली आहे,’ नरसाप्पा उत्तर करतो, ‘आपण [illegible] महालात लपून बसायाचें, आणि जानराव आत आला कीं प्रथम त्याच्या तोंडात बोळा देऊन त्याला पाडून ठेवावयाचें ! नंतर आमच्या लोकातील रिवाजाप्रमाणें बायका हसाला आणून खोलींत सोडतील. त्यानीं तिला खोलींत लोटली कीं आपण

खोलीचें दार बंद करून तिच्याहि तोंडांत एकदम बोळा देऊं. काय सांगू बद्रुद्दीनसाहेब, आजची संधीच अशी बहारीची आहे कीं, हंसा जरी एखादे वेळीं किंचाळली, तरी ती लाजेनें किंचाळली असेंच बाहेरच्या बायकांना वाटेल. आणि त्या मुकाट्यानें परत जातील. नंतर आपण हंसाला घेऊन सावकास निघून जाऊं. '

' तोबा तोबा, नरसाप्पा ! ' बद्रुद्दीन आनंदानें उद्गारला, ' तुमची तरकीब कांहीं और आहे. आजची तुमची कर्तबगारी मी सरदार लाला मियासाहेबांच्या जरूर कानावर घालून त्याच्याकडून तुम्हांला कबूल केल्याप्रमाणें सुभेदारी द्यायला लावीन. "

" झालें, तेवढीच माझी इच्छा आहे," नरसाप्पा आनंदानें हुरळून म्हणाला " आणि ती पूर्ण करणे सर्वस्वी तुमच्या हातीं आहे. "

" त्याची तुम्ही अगदीं काळजी करूं नका, " बद्रुद्दीन गंभीर चेहरा करून म्हणाला, ' आमचे लाला मियासाहेब इमानाचे मोठे चहाते आहेत. '

नरसाप्पाच्या इमानाची बद्रुद्दीन आणखीही वाखाणणी करीत होता, पण इतक्यात त्या दालनाचें एक चोर दार उघडलें आणि एक इसम हातांत मिणमिण करणारा एक कंदील घेऊन आत आला. आत येताच त्यानें नरसाप्पास व त्याच्या साथीदारास पाहून समाधान व्यक्त केलें, आणि तो अगदीं हलक्या आवाजांत नरसाप्पास म्हणाला, ' नरसाप्पा, तुम्हीं अगदीं वेळेवर आलांत. बरें, चला आता, खालीं स्त्रियांचा समारंभ आटपत आला आहे. आता तुम्हास झटपट जाऊन जानरावाच्या महालात बसलें पाहिजे. '

सर्व मंडळी उठली. उठता उठता नरसाप्पानें त्या कंदीलवाल्या व्यक्तीस विचारलें, ' पण येसबा, आपल्या कारस्थानाचा कांहीं बोभाटा झाला नाहींना ?'

' छे, त्याची तुह्मी मुळींच काळजी करूं नका, ' येसबा ह्मणाला, 'आपल्या आजच्या बेताची कोणाला, गंधवार्तासुद्धा लागूं नये अशी मी तजवीज ठेवली आहे'. इतकें ह्मणून येसबा त्या चोरदारानें बाहेर पडला. त्याच्या मागून नरसाप्पा, बद्रुद्दीन व त्याचे इतर साथीदार निघाले. नंतर एक जिना आणि एक दोन माड्या अशीं वळाडून नेत नेत येसबानें त्याना अखेर तरुण जानरावाच्या शयनगृहात नेऊन सोडलें व 'मी घरातील इतर मंडळीच्या पाळतीवर राहतो आणि तुह्मी हंसाबाईला घेऊन आलांत की तुह्मास येऊन मिळतो ' असे सागून तो बाहेर पडला.

पण वाचकांस खरें सागावयाचें ह्मणजे येसबा घरांतील माणसाच्या पाळतीवर न राहतां तडक ह्मातान्या जानरावाकडे गेला, आणि त्यानें त्याला नरसाप्पा व त्याचे साथीदार आल्याची बातमी कळविली. वाचकांच्या आतां लक्ष्यांत आलेंच असेल

कीं, नरसाप्पाच्या फितुरीची हकीगत परशुरामभाऊंच्या पत्रावरून ज्ञाताग्या ज्ञान-रावास कळतांच त्यानें आपला विश्वासू सेवक येसबा याला एकीकडे नेऊन ती सर्व कळविली आणि नरसाप्पास त्याच्या साथीदारांसह पकडून देण्याची कामगिरी त्याच्यावर सोंपविली. येसबाचा व नरसाप्पाच्या फारा दिवसांचा स्नेहसंबंध असल्यामुळें नरसाप्पानें त्याला आपल्या विश्वासांत घेतलें आणि त्याला आपला सारा बेत कळविला. येसबानेंही त्याच्या बेतांत सामील झालोसें दाखवून त्याचा सर्व डाव आपल्या धन्यास सांगितला आणि आज त्या सर्व दगलबाजांना ऐन जिनसीं ताब्यांत पकडण्याचें योजिलें.

सुमारें एक घटका गेली असेल. भावी सौख्याचे घुटके घेत तरुण जानराव आपल्या शयनगृहाच्या दाराशीं आला, तों तें ओढून घेतलेलें आहे असें त्यांस दिसून आलें. तें लोटून त्यानें आंत पाऊल टाकलें, तोंच त्याच्या अंगावर दोन्ही बाजूंकडून एकदम सात आठ हात तुटून पडले ! त्याला घट्ट धरण्यांत येऊन सपा-ट्यासरशीं त्याच्या तोंडांत एक बोळा घाईघाईनें कोंबण्यांत आला. नंतर त्याला पलंगावर नेऊन त्याचे हातपाय पलंगाशीं जखडून बांधण्यांत आले. हा सर्व प्रकार इतक्या त्वरेनें व सफाईनें उरकण्यांत आला कीं, जानराव एवढा तरुण व पराक्रमी असूनही त्याला लवमात्र प्रतिकार करितां आला नाहीं. अशरण स्थितीत त्याचा सारा पराक्रम डोळ्यांतील ठिणग्यांच्या आणि निःश्वासांतील उष्णतेच्या वाटेनें प्रगट होत राहिला !

आणखी थोडा वेळ गेला, आणि हंसाच्या मैत्रिणी तिला जिन्याच्या वाटेनें ढकलीत घेऊन आल्या. हंसा आपल्याकडून त्यांचा प्रतिकार करीत होती, पण तो प्रतिकारच खोटा होता ह्मणून असो, किंवा तिच्या मैत्रणींचें संख्याबल अधिक होतें ह्मणून असो, तिची कांहीं मात्रा न चालतां, मैत्रिणींनीं तिला दारापर्यंत खेचून आणलें. दाराशीं आल्यावर तर तिनें पराकाष्ठेची धडपड केली, पण तिचाहि कांहीं उपयोग न होऊन मैत्रिणींनीं तिला दारांतून आंत ढकलिलें आणि चटकन् दार ओढून घेऊन त्याला बाहेरून कडी लावली ! हंसा आंत गेली मात्र, तोंच तिच्या अंगावर दोनीकडून दोन जबरदस्त हात पडले, आणि तिच्या तोंडात चटकन् एक बोळा देण्यांत आला! महालांतील परिस्थितीची जाणीव होऊन तिच्या तोंडांतून एक अस्पष्ट किंकाळी बाहेर पडली, पण इतक्यात तिच्या तोंडात बोळा शिरला देखील ! दाराच्या बाहेर असलेल्या हंसाच्या मैत्रिणींना तिची ती अस्पष्ट किंकाळी आणि धडपड ऐकूं गेली, पण तिचा त्यांनीं आपल्या मनाशी अगदीच वेगळा अर्थ केला. थोडा वेळ वाट पाहून महालांत सामसूम झालेली पाहताच त्या दाराची कडी काढून निघून गेल्या.

आणखी एक घटका गेली. जानरावाच्या रंगमहालाचें दार हळूंच उघडलें, आणि नरसाप्पा, बद्रुद्दीन आणि त्यांचे इतर साथीदार चोरपावलांनीं बाहेर पडले. बद्रुद्दीननें आपल्या खांद्यावर भीतीनें बेशुद्ध झालेल्या हंसाची अचेतन मूर्ति घेतली होती. ते खोलींतून बाहेर येतात तोंच येसबा त्यांस सामोरा आला, व चूप राहण्याविषयीं बोटानें त्यांस खूण करून रस्ता दाखवीत निघाला. ते आल्या वाटेनें जात जात जिना उतरून तळघरांत गेले मात्र, तोंच त्यांच्या भोंवतीं हातांत नागव्या तरवारी घेतलेल्या पंधरा वीस इशमांचा गराडा पडला. येसबानें बद्रुद्दीनच्या खांद्यावरून चटकन् हंसास ओढून घेतलें, आणि इशमांनीं एकदम हल्ला करुन नरसाप्पास व त्याच्या साथीदारांस गिरफदार केलें! येसबानें आपणास दगा दिला याची जाणीव नरसाप्पास होते न होते इतक्यांत त्याच्या तोंडांत एक बोळा देण्यांत येऊन त्याचे हातपाय करकचून बांधण्यांत आले. त्याच्या इतर साथीदारांचीही तीच गत करण्यांत आली. नंतर त्या सर्वांना पोत्यांत घालून मशालींच्या उजेडांत खालीं नेण्यांत आलें. पुढें त्यांची काय व्यवस्था करण्यांत आली हें नक्की कळण्यास मार्ग नाहीं, पण नरसाप्पा, बद्रुद्दीन, त्यांचे साथीदार आणि वल्हींवाले यांच्यापैकीं कोणीच इसम कधीं कोठें हिंडतां फिरतांना दिसला नाहीं, एवढें मात्र खरें!

घटकाभरानें हंसा दचकून सावध झाली, तेव्हां आपण रंगमहालांत नवऱ्याशेजारीं झोंपलों असल्याचें तिला आढळून आलें आणि ती चकित झाली. आपण रात्रीं पाहिलेलें भयंकर दृश्य स्वप्न तर नसेल ना अशी तिला क्षणमात्र शंका आली. पण तिच्या शंकेचें निराकरण कोण करणार? ती तर लाजेमुळें नवऱ्याशी बोलणार नाहीं हें उघड आहे. तो पहा वाचकहो, जानराव कसा स्निग्ध दृष्टीने तिजकडे पाहतो आहे? तेव्हा आपण त्याच्याकडेच ही शंकानिरासाची कामगिरी सोपवूं झाले!

---

प्रकरण ४० वें.

खरे, ले. ११७७ } **दादासाहेबांचा बुद्धिभेद** { वै शु १४ शके १६९४, १५ मे १७७२

आमच्या वाचकांस आनंदवल्लीस जाण्याचा प्रसंग अलीकडे बरेच दिवसात आला नव्हता, पण आज विशेष कारणाने त्याना आम्ही फिरून एकदा आनंदवल्लीपर्यंत चलण्याची तसदी देत आहोत. याचें कारण इतकेच कीं आमच्या कथानकाचें रंगदैवत जे श्रीमंत दादासाहेब ते साम्प्रत येथें आले आहेत, आणि

" यत्र यत्र दादासाहेबस्तत्र तत्र राजकारणम् " असा आजपर्यंतचा आपला अनुभव असल्यामुळें, आपणही जर सहज त्यांच्यामागून तेथपर्यंत गेलों तर आपणांस त्यांची कांहींतरी विशेष लीला दिसल्यावांचून राहणार नाहीं, अशा भरंवशानेंच आम्ही वाचकांना हा दूरचा प्रवास घडवीत आहोंत.

आज वैशाख शुध्द चतुर्दशी असून आनंदघाटावर रम्य चांदणें पडलें होतें. दहा घटका रात्र झाली असून घांटावर आणि घांटाच्या आसमंतांतील नदीच्या किनाऱ्यावर चोहोंकडे स्तब्ध शांतता पसरली होती. उकाड्याचे दिवस आणि सुगीसराईचाही काळ नव्हे, म्हणून आनंदवल्लीचे हौशी लोक यावेळीं खरें म्हटलें असतां घांटावर येऊन गप्पागोष्टी करीत बसलेले असावयाचे, परंतु श्रीमंत दादासाहेब आनंदवल्लीस आल्यापासून तो घांट रात्रींच्या रहदारीला बंद केला आहे अशी गांवांत द्वाही फिरली होती, आणि म्हणूनच गावांतले कोणी मनुष्य यावेळीं इकडे आलेलें दिसत नव्हतें. उन्हाळयामुळे नदीचें पात्र बरेंचसें आकुंचित झालें असून, तिच्या कांठानी दुतर्फा वाळवंट मोकळें पडलें होतें. आकाश अगदीं निरभ्र असून घाटावरून मंदशीतल वायूच्या लहरी वाहत होत्या. नदीकाठीं असलेल्या मळीरानातून दूर कोठें तरी क्वचित् एकतारीवर चाललेल्या भजनाचे, तर कोठें डफ तुणतुण्यावर चाललेल्या भेदिक लावण्याचे, आणि कोठें संबळीवर चाललेल्या पोवाड्याचे अस्पष्ट ध्वनी ऐकूं येत होते. पावसाळयात घो घो करीत दुतर्फा अडी दरडी तुडवीत जाणारी गोदावरी विपरीत काळाच्या तडाक्यात सांपडल्यामुळेच की काय, आज निमूटपणे व चोरट्या पावलानी चाललेली दिसत होती.

अशा शांत वेळी आनदघाटाच्या मधल्या पटांगणावर एक प्रशस्त बैठक टाकण्यांत आली असून तिजवर दोन व्यक्ति बोलत बसल्या होत्या. त्यांतील एक व्यक्ति लोडाला टेकून बसलेली असून दुसरी तिजपासून थोड्या अंतरावर बसली होती. लोडाला टेकून बसलेली व्यक्ति म्हणजे आमचे दादासाहेबच असावे हें वाचकानी तर्कानें ओळखले असेल, पण दुसरी व्यक्ति कोण हे मात्र त्याच्या ध्यानीं येण्याचा संभव नसल्यामुळें, आम्हीं त्यांना कळवितों की ही व्यक्ति म्हणजे दुसरें तिसरें कोणी नसून वाचकांचे जुने दोस्त शिवरामभट केतीचोर ऊर्फ बंन्सीधर महाराजांचे चेले 'बेटा शिवराम' हे होत. दादासाहेबाना स्वातंत्र्य मिळाल्याबरोबर ते पुण्यास गेले. तेथें जातांच त्यांना असें कळलें कीं, त्याच्या आश्रितपरिवारांपैकीं खंडो दीक्षित, त्रिमंगलाचार्य, कुटुंबशास्त्री, भैरवभट, आणि देव्या इतक्या असामींना कडक बंदोबस्तांत ठेऊन दादासाहेब आणि त्यांचा बाकीचा

परिवार यांच्यावरची बंदी उठविण्याबद्दल श्रीमंतांचा नाना फडणिसांस हुकूम झाला आहे. हें असें होणार हें दादासाहेबांना अगाऊच कळलें असल्यामुळें त्यांना या गोष्टीचें विशेष आश्चर्य वाटलें नाहीं, पण आपणांशीं वागण्याच्या नानांच्या व वाडयांतील इतर मंडळींच्या वृत्तींत मात्र मनस्वी फरक पडल्याचें त्यांना दिसून येऊन आचंबा वाटला. जे नाना आपणांस पूर्वी एखाद्या गुन्हेगाराप्रमाणें वागवीत होते, तेच आज आपला शब्द वेदवाक्यासारखा झेलूं लागले, साऱ्या वाड्यांत आपली हुकमत चालूं लागली, आणि जो तो प्रत्येक लहानथोर बाबतींत आपली परवानगी विचारूं लागला, असें दादासाहेबाच्या अनुभवास येऊन ते अगदीं गार होऊन गेले! आपण जर आपला मान संभाळून गोडीगुलाबीनें राहिलों तर राज्याचा धनीपणा आपल्या हातीं अप्रत्यक्ष रीतीनें देण्याइतका आपला पुतण्या दिलदार आहे, याची सत्यता दादासाहेबांना पटली आणि त्यांच्या वृत्तींत एकाएकी पालट पडला. पुतण्याविषयीं त्यांना मनस्वी आपुलेपणा वाटूं लागला आणि त्याच्या आरोग्याकरितां त्यांनीं अनुष्ठान करण्याचें ठरविलें! त्यातच पुतण्याची प्रकृति अमळ बरी असल्याचीही वार्ता त्यांना कळली आणि औषधी उपायाबरोबरच दैवी उपायांची जोडगोळी चालू करावी अशा सदिच्छेनें दादासाहेबांनी आनंदवल्लीचा रस्ता धरला. पुतण्यास अप्रिय असलेली गोष्ट करावयाची नाही, असें दादासाहेबानी आपल्या मनाशीं पक्के ठरविलें असल्यामुळें त्यांनीं जातांना खंडो दीक्षितादि मंडळींची भेट घेण्याची इच्छा सुद्धा दर्शविली नाहीं!

आनंदवल्लीस आल्यापासून दादासाहेबानीं अगदी नियमित कार्यक्रम चालू केला. सकाळचे आन्हिक व देवपूजा आटोपल्यावर ते पुतण्याच्या आरोग्याकरिता अनुष्ठान करीत आणि रात्रौ घाटावर बसून स्तोत्रपाठ करीत. घाटावरील राबता बंद केल्याचें त्यानीं कां जाहीर केले होते हे आता वाचकाच्या लक्ष्यात आलेच असेल. दोन चार दिवसातच ही वृत्ति दादाहेबाच्या अंगवळणी पडून त्याना हा एकांतवासच बरा वाटू लागला. आपली पत्नी, दत्तक मुलगा वगैरे परिवार देखील आनंदवल्लीस आणविण्याचा बेत त्यानी तहकूब केला. सुमारे एक आठवडा अशा निर्विकल्प स्थितीत गेला असेल, इतक्यात वैशाख शुद्ध दशमीचे दिवशी एक परदेशी मनुष्य येऊन त्याना एक चिठी देऊन गेला. ही चिठी शिवरामभटाकडून आली असून ' मी येत्या चतुर्दशीच्या दिवशीं रात्री आनंदवल्लीस येऊन आपणास भेटत आहे, विशेष खुलासा भेटीअंती ' इतकाच मजकूर तिजमध्यें लिहिलेला होता.

शिवरामभटाची चिठी वाचून दादासाहेबाच्या मनात प्रथम विचार आला तो आपण त्याची गांठ घेऊ नये असाच होता. शिवरामभटाचें पूर्वी त्यांना पुण्यास

जें पत्र आलें होतें त्यांत त्यानें आपण नर्मदातटाकीं मन्सीधर अवधूत नांवाच्या महंताजवळ राहून त्यांजकडून रावसाहेब पेशव्यावर मूठ मारविण्याच्या खटपटींत असल्याचें लिहिलें होतें. पण त्यानंतर त्याजकडून बरेच दिवसांत कांहीं वर्तमान कळलें नसल्यामुळें, त्याचा तो उद्योग सिद्धीस गेला नसावा, असा दादासाहेबांनीं तर्क केला होता. आतां त्याची फिरून चिठी येतांच दादासाहेबांना शिवरामभटाच्या भयंकर बेताची आठवण झाली आणि त्यांच्या अंगावर एकदम शहारे आले. पण थोडा वेळ जातांच त्यांच्या दुबळया मनाला असें वाटूं लागलें कीं, शिवरामभट मुठीचा प्रयोग करवीत होता म्हणजे काय करीत होता तें तरी एकदां ऐकावें. बाकी तो उद्योग सिद्धीस गेला नाहीं असेंच शिवरामभटाच्या तोंडून आपणांस ऐकावयास मिळावें,अशीच अद्याप दादासाहेबांची इच्छा होती. शिवरामभटाची आपण गांठ घेतल्यास तो आपणास कांहीं तरी दुर्बुद्धि शिकवील अशीही एक शंका क्षणमात्र दादासाहेबांच्या मनांत आली, पण आपण त्याचें कांहींही वाईट ऐकावयाचें नाहीं असें म्हणून त्यांनीं आपल्या मनाची समजूत घातली. वाचकहो, दुबळया मनाचा दृढनिश्चय मोहाच्या तडाक्यांत टिकत नाहीं हें जितकें खरें आहे, तितकेंच हेंही खरें आहे कीं, तो एकदम भंग न पावतां हळ्या हळ्यानें भंग पावत जातो. याच न्यायास अनुसरून आमचे भोळे दादासाहेब हळूं हळूं घसरत चालले होते,पण मनांतून मात्र आपण खंबीर आहों असेंच समजत होते ! ठरल्याप्रमाणें चतुर्दशीच्या रात्रीं दादा-साहेब घाटावर जाऊन पोंचतात तोंच शिवरामभटाची स्वारी एका तट्टावर बसून त्यांचा माग काढीत तेथें आली. दादासाहेबांनीं त्याला आपल्या हुजऱ्या कडून उतरवून घेतलें. नंतर ते दोघे घांटावर बोलत बसले आणि हुजऱ्या दूर जाऊन उभा राहिला. या संधीसच आपण दादासाहेबांच्या भेटीस जात आहोंत हें वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल.

'कसें काय शिवराम भटजी ?' दादासाहेब शिवरामभटाचें स्वागत करीत म्हणाले, 'बरें आहे ना ? मातक्यान् आज किती दिवसांनीं आपली भेट होते आहे ही ?'

'भेट कशी होणार श्रीमंत'? शिवरामभटजी जळजळणाऱ्या स्वरात म्हणतात, 'आपल्या पुतण्यानें जर आम्हांला देशोधडीलाच लावलें आहे, तर मी आपल्या हद्दींत येणार कसा, आणि आपली गांठ पडणार तरी कशी ?'

'शिवरामभटजी,' दादासाहेब म्हणाले, 'मला तुमच्याकरितां किती वाईट वाटतें म्हणून सांगूं ? तुमची ही अवस्था झाली, आणि ती माझ्या पायींच झाली हें मनांत आलें म्हणजे माझें मलाच वाईट वाटूं लागतें. मातक्यान् तुम्ही माझ्याकरितां

इतके झटलेत आणि तुमच्यावर प्रसंग आला तेव्हां माझ्याहातून तुमचें संरक्षण झालें नाहीं, या पेक्षां दुसरी लाजिरवाणी गोष्ट ती कोणती ?

'श्रीमंतांनीं या क्षुद्र सेवकाकरितां इतकें वाईट वाटून घ्यायला नको,' शिवरामभट म्हणाला, 'जेथें श्रीमंतांनाच खुद्द बंदिवासाचे कष्ट भोगावे लागले, तेथें माझ्यासारख्या सामान्य मनुष्याची कथा काय ?'

'माझा बंदिवास आता सरला आहे,' दादासाहेब आनंदानें म्हणाले, 'व मी सात लक्षांची जहागीर आणि त्रिंबकचा किल्ला घेऊन वाटेल तेथें रहावयास मोकळा झालों आहे. माझ्या हानीची भरपाई झाली आहे, मातक्यान् तुमच्याही हानीची मी रावसाहेबाकडून—'

'काय, श्रीमंतांच्या हानीची भरपाई झाली आहे ?' शिवरामभट मध्येंच उसळून म्हणतो, 'श्रीमंतांनीं आपल्या हानीची कल्पना तरी केली आहे कां ? साऱ्या राज्याचे सरळ सरळ श्रीमंत धनी असतां, सात लक्षाचा एक तुकडा घेतल्यानें त्याची भरपाई कशी होईल ? तेहि एक असो, पण श्रीमंतांना लोकांच्या दारोदार भटकण्याची आलेली वेळ, ज्यांची श्रीमंतांच्या पायपोसाजवळ सुद्धां उभें राहण्याची योग्यता नाहीं अशांच्याकडून मानहानी करून घेण्याचा आलेला प्रसंग, आणि बंदिवासांत खितपत पडल्यावर झालेले शारीरिक आणि मानसिक क्लेश, यांची भरपाई कशानें होणार ?'

दादासाहेबांच्या हृदयांतली मत्सराची तार कंप पावूं लागली. शिवरामभटाच्या पत्राला उत्तर पाठविते वेळीं नाना फडणिसांनीं केलेला अपमान त्यांस आठवला, आणि ते एक दीर्घ निश्वास टाकून म्हणाले, 'होय शिवरामभटजी, तुम्ही म्हणतां तें सारें खरें, पण काय करावयाचें ? आपणास काळच जर अनुकूल नाहीं, तर आपण तरी काय करणार ?'

'हें बोलणें श्रीमंतांना शोभत नाहीं,' शिवरामभट तिरस्कारपूर्ण आवाजांत म्हणाला, 'अटकेपार झेंडे नाचविणारानीं असे दुबळे उद्‌गार काढूं नयेत. काळ अनुकूल नाहीं म्हणजे काय ? त्याला जबरीने अनुकूल करून घेतला पाहिजे. राजा कालस्य कारणम्.'

'तोही प्रयत्न करून झाला नाहीं कां ?' दादासाहेब म्हणाले, 'पण त्याचा परिणाम काय झाला, हें तुम्ही पाहिलेंतच. तेव्हा मातक्यान् तोच प्रसंग पुन्हा ओढवून घेण्यापेक्षां सुखानें स्नानसंध्या करून राहिलेलें काय वाईट ?'

'दैव देतें आणि कर्म नेतें, अशांतली श्रीमंतांची गत झालेली मला दिसते,' शिवरामभट फूत्कार टाकून म्हणाला, 'श्रीमंतांचा कट्टा दुष्मन् मरणाच्या दारीं

बसला आहे, त्याचें बहुतेक सैन्य कर्नाटकांत गुंतलें आहे, त्याचे सारे कारभारी त्याच्या प्रकृतीच्या विवंचनेंत चूर आहेत, अशी सगळीकडून सोन्यासारखी संधि आली असतां, श्रीमंतांना जेव्हां अशी विपरीत बुद्धि होते आहे, तेव्हां आतां खरोखरीच श्रीमंतांच्या दैवीं राज्य नाहीं असें ह्मटलें पाहिजे, दुसरें काय? '

' नाहीं हो शिवरामभटजी, ' दादासाहेब आपल्या दुष्प्रवृत्तीशीं जिवापाड झगडत म्हणाले, ' रावसाहेबाला कांहीं तरी जबर दुखणें झालें असून त्यांतून तो आतां जगत नाहीं, अशी माझी सुद्धां थोड्या दिवसापूर्वीं कल्पना झाली होती, पण ती खोटी ठरली असून प्रकृति हळूं हळूं सुधारत आहे—'

' सुधारत आहे? ' शिवरामभट उसळला, ' काय बिशाद आहे प्रकृति सुधारण्याची? आणखी एक महिन्यांत आपण पहाल काय चमत्कार होईल तो! ह्मटलें बन्सीधर महाराजांची मूठ आहे ती! '

' काय म्हणतां, बन्सीधरमहाराजांनीं रावसाहेबावर मूठ मारली आहे? ' दादासाहेब उत्सुकतेनें विचारतात, ' शिवरामटजी, मातक्यान् खरें सांगा. ' वाचकहो, दादासाहेबाच्या उत्सुकतेंत किंचित् समाधानाची छटा होती, हें आह्मास प्रांजलपणे कबूल करणें भाग आहे

" मी श्रीमंतांपाशीं कधीही खोटें बोलावयाचा नाहीं, " शिवरामभट म्हणाला, " बन्सीधर महाराजांनी आपल्या दायादावर मूठ मारली आहे, आणि त्याकरिता म्हणजे श्रीमंत, आपल्या कल्याणाकरिता मी महाराजांचा दुर्धर शाप स्वतःवर ओढवून घेतला आहे. "

" पण मूठ मारली कीं तो मनुष्य लगेच दगावतो म्हणतात नाहीं का? " दादासाहेब शंकित मुद्रेने विचारतात, " मग हें कसें काय? रावसाहेब अजून- " रावसाहेबाच्या मृत्यूची कल्पना दादासाहेबांच्या पापी हृदयाला आनंद देऊं लागली होती, पण त्याचे ओठ ती उच्चारून दाखविण्यास अजून धजेनात.

" श्रीमंतांची शंका रास्त आहे, " शिवरामभट म्हणाले, " मूठ लागू झाल्याबरोबर उद्दिष्ट इसम तत्काळ मेला पाहिजे हे खरें, पण रावसाहेबावर मारलेली मूठ ही मूळ त्यांची नसून ती दुसऱ्याच एका व्यक्तीला उद्देशून सोडलेली होती. ती महाराजांनीं वाटेंत अडविली आणि फिरवून रावसाहेबावर सोडली, आणि म्हणूनच रावसाहेब एकदम न मरतां झुरून मरणार आहेत. मी महाराजांकडून सगळा खुलासा करून घेतला आहे, "

पण अजून दादासाहेबांची खात्री होईना. शिवरामभटाच्या सांगण्यांत कांहीं तरी अतिशयोक्ति किंवा काल्पनिक भाग असावा, असा त्यांना अजून संशय

वाटत होता. बराच वेळ विचार केल्यावर त्यांच्या मनांत कांहीं कल्पना आली व त्यांनीं शिवरामभटास प्रश्न केला. " बरें शिवरामभटजी, बन्सीधरबुवांनीं राव-साहेबावर जी मूठ मारली म्हणतां, ही कधींची गोष्ट बरें ? "

" दीड वर्षांखालच्या कार्तिक वद्य अमावास्येची गोष्ट, " शिवरामभटानें उत्तर केले, " त्या रात्रीं रावसाहेबाना काहीं तरी भयंकर वाखा होऊन ते मरता मरता वाचले असले पाहिजेत. श्रीमंतानी आठवण करून पहावी. "

" होय होय !" दादासाहेब एकदम आठवल्यासारखे करून उद्गारलें, " त्या रात्री जळगाच्या मुक्कामाला रावसाहेब मरता मरता वाचला खरा. मातक्यान ही हकीगत पुण्यास मला मागाहून समजली. "

" मग सांगतो काय श्रीमंताना ? " शिवरामभट जय-मुद्रनें म्हणतो, "एकवेळ इकडचा सूर्य तिकडे उगवेल, पण बन्सीधर महाराजाचा प्रयोग कधींही फुकट जाव-याचा नाहीं, हे श्रीमंतानी पक्के लक्ष्यात ठेवावे. "

" बरें तुम्ही गरुडेश्वरी राहून काय काय केलेत, महाराजाकडून कसा प्रयोग करविलात, ती सारी हकीकत तरी एकदा सागा पाहू, " दादासाहेब अधिकाधिक उत्सुक होत म्हणाले, " तुमचे गरुडेश्वराच्या मुक्कामाचे पत्र मला मिळाले होतें, आणि त्याचे उत्तरही मी लिहून दिले होतें, पण नानाफडणिसानीं दगलबाजी करून ते घरले आणि गोपाळभटाला बदींत टाकलें. त्यामुळे माझे उत्तर तुम्हाला मिळाले नाही ! " हे शेवटचे शद्ब बोलत असता दादासाहेबाना वाटणारा विषाद त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता.

" नाही मिळाले तर नाही मिळाले, " शिवरामभट बेफिकीर स्वराने म्हणतो, " मी उत्तराची अपेक्षा न बाळगताच कामास लागलो होतो, मला माझा स्वतःचा सूड उगवावयाचा होताच · की नाही ? " असे म्हणून त्याने आपण बन्सीधर महाराजाच्या सेवेस कसे राहिलों, त्याचा विश्वास कसा संपादन केला, त्याचा जीव धोक्यातून कसा वांचविला, आणि त्याना शब्दात पकडून त्याच्या-कडून कशी मूठ मारविली, इत्यादि सर्व हकीकत दादासाहेबास तपशिवार सांगितली, ती ऐकत असता दादासाहेबाची वृत्ति अगदी तल्लीन झाली होती, ते मधून मधून शिवरामभटास शाबासकी देत होते. विशेषत: कार्तिक वद्य अमावास्येच्या रात्रीची शिवरामभटाची कारवाई ऐकून तर ते त्याच्यावर मनापासून खूप झाले, आणि त्यांनीं त्याची मुक्तकंठानें स्तुति केली.

वाचकहो, दुर्जनाचा संग वाईट तर खराच, पण तो खंबीर प्रकृतीच्या माण-साला जितका घातक होतो, त्याच्यापेक्षा शतपट चंचल प्रकृतीच्या माणसाला घातक

होतो. कारण खंबीर मनाचा माणूस दुष्ट संगतीनें बिघडला आणि दुष्कृत्यास प्रवृत्त झाला, तरी त्याच्या मनाचा खंबीरपणा हाच त्याला संकटप्रसंगीं एखाद्या संरक्षक शक्तीसारखा उपयोगीं पडतो, पण बिचाऱ्या चंचलवृत्तीच्या माणसाला तीहि अनुकूलता नसल्यामुळें त्याची फारच दुरवस्था होते. औरंगजेबासारख्यांना चिरकाल वैभव लाभलें आणि दादासाहेब पेशवे अपयशाचे धनी राहिले यांतील मर्म हेंच होय. त्यांचें मन इतकें दुर्बल होतें कीं, त्यांचा भला बुरा कोणताच निश्चय महिना पंधरा दिवस सुद्धां त्यांच्यानें टिकवला नाहीं ! आज देखील शिवरामभटाचा युक्तिवाद ऐकतां ऐकतां त्यांची बुद्धी अखेर पालटली, आणि इतउत्तर स्नान करून गुण्यागोविंदानें राहण्याचा त्यांचा निश्चय पार लोवून गेला. शिवरामभटाची सर्व हकीगत ऐकल्यावर ते थोडावेळ विचार करीत राहिले, आणि ह्मणाले, 'मग एकंदरींत काय भटजी, रावसाहेब कांहीं आतां फार दिवस जगत नाहीं ह्मणतां ?'

'ती अगदीं शंकाच नको,' शिवरामभट उद्गारला, 'श्रीमंताना प्रस्तुत चोहोंकडून अनुकूळ वेळ आली आहे. जानोजीबावा भोसले वारले आहेत, आणि त्यांचे पुत्र मुधोजीबावा श्रीमंतांचे पक्षपाती आहेत. त्यांना पत्र पाठवून फौजेसह तयार राहण्यास सांगावें. चिंतो विठ्ठल मला वाटतें सांप्रत रायरीस जाऊन राहिले आहेत, त्यांनाही फौजफाटा जमविण्यास सांगावें. आणि रावसाहेब आसन्नमरण होऊन पडले, कीं फौज घेऊन एकदम पुण्यावर चालून जावें, आणि कारभार हातीं घ्यावा. मात्र ही कारवाई अगदी गुपचूप झाली पाहिजे. माझी आपली भिक्षुकी मसलत.'

'तें का ?' दादासाहेब ह्मणतात, 'तुह्मी योग्य तीच सल्ला दिलीत. मी सर्व व्यवस्था अगदी बिनबोभाट कशी करितों पहा तर खरी ! मातक्यान् माझी सुटका अगोदर झाली आहे, हाच आपल्या कार्यास शुभ शकुन आहे.'

'आणि दुसरा शकुन बन्सीधर महाराजांच्या आशीर्वादाचा !' शिवरामभट ह्मणाला, 'त्यांनीं आपणास लवकरच राज्यपद मिळेल असें सांगितलें आहे !'

"काय म्हणतां ?" दादासाहेब जागच्याजागीं आनंदोद्गार करून म्हणाले, 'घेऊं या तर देवाचें नांव, आणि लागूं या उद्योगाला.' शिवरामटानें उभें केलेलें भविष्यचित्र त्यांच्या मनांत पुरतें भरलें. नंतर त्या दोघांचें आणखी थोडावेळ भाषण होऊन दादासाहेबांनीं शिवरामभटाला कांहीं सूचना दिल्या. नंतर त्यांनीं आपल्या हुजऱ्याकडून शिवरामभटास घोड्यावर चढवून त्याची रवानगी केली, आणि ते आपल्या वाड्याकडे परतले. पण त्यांच्या आजच्या स्तोत्रपाठाची वाट काय ? स्तोत्र झालेंच होतें आणि पाठही लवकरच फिरणार होती !

---

## प्रकरण ४१ वें.

[. ले. ११७१–११७४ इ. ] **मोहिमीची फलश्रुति.** [ ज्ये. शु. ८ शके १६९४

मागील प्रकरणांत वर्णन केलेल्या हकीगतीस आज जवळ जवळ पाऊण महिना होऊन गेला होता, व ज्येष्ठ शुद्ध अष्टमीच्या दिवशीं सुमारें नऊ घटका रात्र झाली होती. अशा वेळीं आम्ही वाचकांस बाळापुर परगण्यांतील बेत या गांवीं घेऊन जात आहोंत. मात्र त्या खेड्याशीं आपणास कांहीं कर्तव्य नसून तेथून जवळच चाळीस हजार लष्करानिशीं पडलेल्या त्रिंबकराव मामा पेठ्याच्या छावणींत आपणास जावयाचे आहे. तो पहा मामांचा डेरा कसा अंतर्बाह्य श्रृंगारला आहे! मऊ रुजामे, उंची कनाथा, आणि चिकाचे पडदे याची डेऱ्यांत गर्दी असून एका पडद्याच्या आड जाळीदार मच्छरदाणीखाली झाकलेला मामांचा प्रशस्त पलंग चमकतो आहे. पडद्याच्या बाहेरच्या बाजूस एका मऊ व उंची गालिचावर त्रिंबकराव मामाची स्वारी लोडाला टेकून बसली आहे. मामाच्या समोर थोड्याच अंतरावर एक खुपसुरत कर्नाटकी स्त्री बसली असून तिच्या पेहेरावावरून व एकंदर चालचर्येवरून ती कलावंतीण असावी हें उघड दिसत आहे. बैठक अगदीं खासगी स्वरूपाची असून, परवानगीवांचून डेऱ्यांत कोणालाही सोडावयाचे नाही, अशी पहारेवाल्यास सक्त ताकीद झाली आहे. ही कलावंतीण कोण, हे वाचकांनीं हेरलेंच असेल. होय, वाचकहो, मुमताजने परशुराम भाऊंना लिहिलेल्या चिठीत ज्या कलावंतिणीचा उल्लेख केला होता, तीच ही कलावंतीण होय. हिचें नांव शेषम्मा असे असून मामा पेठे हिच्या गाण्यावर आणि हावभावांवर गेल्या दोन तीन महिन्यात इतके फिदा झाले होते कीं, त्यांना तिच्या गाण्यावांचून दुसरें काहींही सुचेनासें झालें. ते अहोरात्र तिचें गाणें ऐकत बसूं लागले व तिच्याशीं गप्पागोष्टी करण्यांत कालक्षेप करूं लागले. प्रथम काहीं दिवस तिच्या गाण्याच्या ते जाहीर बैठकी करीत असत. नंतर त्यांच्याकडे तिच्या खाजगी बैठकी होऊं लागल्या! आजही ती त्यांच्या निरोपावरून खासगी बैठकीसाठींच आली होती.

त्रिंबकराव मामांना कलावंतिणीच्या गाण्याचा एकंदरींत फार शोक होता, हें वाचकांना पूर्वीच कळलें आहे, पण शेषम्माच्या गाण्याला ते जितके लाचावले होते तितके पूर्वी कोणाच्याच गाण्याला लाचावले नव्हते. बेत गांवीं मुक्कामाला येण्याचा त्यांचा खरा हेतु तहनाम्यावर सही करण्याचा होता.

मामांची परवानगी मिळाल्या नंतर लक्ष्मणराव रास्त्यानें अपाजीरामाच्या विद्यमानें तहाच्या अटी हैदराशीं मुकरर ठरविल्या होत्या, आणि त्या मामाच्या मंजुरीकरितां सादर केल्या होत्या. लक्ष्मणराव तेवढ्याकरितां आपाजीरामाच्या आग्रहावरून श्रीरंगपट्टणास गेला होता. त्यानें तेथील परिस्थिति प्रत्यक्ष पाहून मामास निरोप पाठविला कीं, हैदरअल्ली सांप्रत अगदीं लाचार झाला असून तहासाठीं अत्यंत उत्सुक झाला आहे. तो खंडणीबद्दल पन्नास लक्ष रुपये देण्यास तयार आहे. त्यांपैकीं सत्तावीस लक्ष रुपये तो रोख देत असून, पांच लक्षाचे जिन्नस देत आहे आणि राहिलेल्या अठरा लक्षाची सावकारी निशा पटवून देत आहे. शिरें, होसकोटे, थोरले बाळापूर व कोल्हार हे आमचे परगणे आमच्या ताब्यांत ठेवण्यास तो तयार आहे आणि वर गुरमकोंड्याचा प्रांत व मदागिरी परगणा देण्यास तयार आहे. बाकीचा त्याचा जिंकून घेतलेला मुलूख त्याला परत द्यावयाचा असें ठरलें आहे. या अटी ठीक असून मी त्याना मान्यता दिली आहे. पटवर्धनाच्या छावणींत झालेल्या कराराप्रमाणें आपण आतां त्या मंजूर करावयास पाहिजेत.' लक्ष्मणरावाचा असा निरोप आल्यावर मामानें खरें ह्मटलें तर त्या अटीस मान्यता द्यावयास पाहिजे होती. लक्ष्मणराव रास्त्याला त्यानें तसा अधिकार दिला होता हें वाचकास ठाऊकच आहे. पण काय असेल तें असो, शेषप्पाची गांठ पडल्यापासून मामाला तह होऊं नये असेंच वाटूं लागलें होतें. आणि याचें कारण अगदीं उघड आहे. तहावर एकदां सह्या झाल्या कीं, मामाला आपल्या छावण्या उठवून पुण्यास परत जाणें भाग होतें, आणि शेषप्पाला उघडपणें पुण्यास घेऊन जाण्याची तर त्याची छाती नव्हती! अशा स्थितींत तहाचें बोलणेंच दिरंगाईवर टाकून छावणींत जितके अधिक दिवस काढतां येतील तितके काढावे असा मामाचा डाव होता! ह्मणून मामानें लक्ष्मण-रावांच्या योजनेस आपली संमती देण्यास टाळाटाळ चालविली होती. लक्ष्मण-रावाचा निरोप येऊन आज तीन चार दिवस झाले होते, तरी मामाकडून त्याला कांहींच जबाब गेला नव्हता. सप्तमीच्या दिवशीं अखेर आपाजीराम खुद्द त्र्यंबक-राव मामाकडे आला व त्यास ह्मणाला कीं, 'लक्ष्मणराव रास्त्यांनीं तहाच्या अटींबद्दल हमी भरली असल्यामुळें आपण त्या मंजूर करणेंच रास्त आहे. नाहीं तर त्याना तोंडघशीं पाडल्यासारखें होणार आहे, आणि त्याचा वचनभंग ह्मणजे तो आपला असल्यासारखाच आहे तरी आपण ठरलेल्या अटींना संमति द्या.' पण मामाला इतक्यांत तह करावयाचा नसल्यामुळें त्यानें आपाजीरामाला उडवाउडवीचें उत्तर दिलें, आणि 'लक्ष्मणरावांनाच इकडे पाठवून द्या ह्मणजे पाहूं' असें सांगून वाटेस लावलें.

पण त्रिंबकराव मामासारखा जबाबदार सेनानायक एका यःकश्चित् कलावंतिणीच्या नादीं लागून आपला शब्द मोडावयास तयार झाला हें पाहून वाचकांस जर एकपट आश्चर्य वाटणार असेल, तर त्याच्या किती तरी पट अधिक आश्चर्य वाटण्याजोगी दुसरी एक गोष्ट त्यांना आह्मी कळविणार आहोंत. तिजवरून त्यांना असें कळून येणार आहे कीं, मामांची आणि शेषम्माची जी गांठ पडली होती ती केवळ यदृच्छेनें नसून तिच्या बुडाशीं एक खोल राजकारण होतें. रायदुर्गचा संस्थानिक कृष्णप्पा नाईक आणि चित्रदुर्गचा संस्थानिक कस्तुरीरंगय्या नाईक हे दोघेही या मोहिमेंत हैदर विरुद्ध पेशव्यांस सामील झाले होते. त्यांतल्या त्यांत चित्रदुर्गकरानें या युद्धांत द्रव्यबळ आणि मनुष्यबळ या दोनी दृष्टींनीं मराठ्यांस मदत करण्याची पराकाष्ठा केली होती. ह्या चित्रदुर्गकराचें एरडकिरें नांवाचें मजबूत ठाणें रायदुर्गकराने बरेच दिवसापूर्वी बळकावले होतें. पण चित्रदुर्गकराचा जीव लहान असल्यामुळें त्याच्यानें तें परत घेववले नव्हते. हैदरावरची मोहीम संपत येताच चित्रदुर्गकरानें पटवर्धन मंडळींच्या मार्फत मामाला भीड घातली कीं, ' आमचे एरडकिऱ्याचें ठाणें रायदुर्गकराकडून आह्मास परत द्यावयास लावा. ' मामानें ती गोष्ट कबूल केली होती. पण रायदुर्गकरास ही हकीगत समजताच त्याने आपल्या संस्थानातील नायकीण शेषम्मा हिला बोलावून आणलें आणि तिचे गाणे त्रिंबकरावमामास ऐकविण्याची व्यवस्था केली. या गोष्टीस आठ पंधरा दिवस होताच मामाचा रंग पालटला. त्याची आणि रायदुर्गकर कृष्णप्पा नाइकाची चोरटी खलबतें होऊं लागली. आतापर्यंत ' रायदुर्गकरानीं सोईनें नाहीं ऐकलें तर एरडकिरें जिंकून घेऊन चित्रदुर्गकरांस देईन ' अशी मामाच्या तोंडून जी जरबीची भाषा येत होती, ती बंद पडून ' रायदुर्गकर मोठा हट्टी माणूस आहे बोवा? एरडकिरें साफ देणार नाहीं ह्मणतो. बाकी त्याच्या कडून तें मी युक्तीनें सोडविल्यावाचून रहात नाहीं ह्मणा, ' असली मऊ भाषा येऊं लागली! वाचकाच्या आतां लक्ष्यांत आलेंच असेल कीं, शेषम्मा कलावंतीण ही रायदुर्गकरानें स्वतःच्या बचावाकरिता मामावर सोडलेली एक शक्ति असून ती तहाच्या वाटाघाटीला आणि कदाचित् मराठेशाहीच्या हितसंबंधालाही बाधक होण्याचा योग आला होता!

राजकारणी पुरुषानीं स्त्रियांच्या नादी लागूं नये, निदान राजकारणात तरी त्यांचा संबंध येऊं देऊं नये, हें त्रिंबकराव मामास कळत नव्हतें असें नाहीं. पण त्याचें मनच दुर्बळ असल्यामुळें त्याचा विवेक सुटून तो शेषम्माचे पाशात सांपडला. तिच्या मोहजालांतून सुटण्याकरितां त्याने पुष्कळ धडपड केली, पण तिचा कांहीं

एक उपयोग न होतां तो तिच्या पाशांत अधिकाधिकच गुरफटत चालला! मात्र तिचा संबंध उघडपणें मिरविण्याइतकें त्याचें मन अजून निढावलें नसल्यामुळें, आणि श्रीमंतांच्या कानावर आपल्या या प्रेमसंबंधाची वार्ता गेली तर त्यांना ती मुळींच खपणार नाहीं, अशी त्याला भीती वाटत असल्यामुळें तो आपला हा प्रणयव्यवहार शक्य तितका गुप्त राखण्याची खबरदारी घेत होता. तथापि त्याची थोडथोडी गुणगुण बाहेर फुटली आहे असा त्याला संशय आला होता. आपाजी-रामाला उडवाउडवीचें उत्तर देऊन वाटेला लावल्यावर मामाला क्षणभर मोठा पश्चाताप झाला. आपली ही वागणूक पाहून सरदार लोक, विशेषतः पटवर्धन मंडळी आपणास काय ह्मणतील, आपण तहाच्या आड कां येत आहों याचें खरें कारण त्यांना कळलें नसेलना, ही शंका मनांत येऊन मामाला धास्ती वाटूं लागली. इतक्यांत शेषम्मा आल्यामुळें त्याचे विचार तसेच राहिले. शेषम्माचा मुखचंद्र पाहतांच मामाला प्रेमाचें भरतें आलें आणि त्यानें तिला जवळ बसवून घेतलें. इतकी प्रस्तावना केल्यावर आतां कथानकाचा धागा पुढें चालविण्यास हरकत नाहीं.

"कलावंतीण," त्रिंबकराव मामा शेषम्माकडे एक स्निग्ध नेत्रकटाक्ष फेकून कानडींत ह्मणतो, "गेले दोन तीन महिने तुह्मी आमची नोकरी करून आह्मांस खुष केलेंत. पण तुह्मी आज अशा दूर कां बसलांत? इकडे या अशा!"

"आहे कीं, जवळच आहे" शेषम्मा अस्सल कानडींत ह्मणाली, "आमच्या सारख्यांनीं आपली पाहिरी ओळखूनच वागलें पाहिजे." हे शब्द बोलत असतां शेषम्मानें जे अंगविक्षेप केले, आणि मामावर जे सालगीचे नेत्रकटाक्ष फेकले त्यांवरून ती आपली पाहिरी ओळखून कितपत वागत होती याची कोणासही शंका आली असती!

'भलतेंच कांहीं तरी!' मामा पागल होऊन ह्मणतात, 'तुह्मी आपली पाहिरी इतकी कमी कां समजतां? अहो जगांत जर कशाला मोठेपणा असेल तर तो गुणाला आहे, आणि तुमचा गुण तर इतका मोठा आहे की, त्याचें जेवढें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे!'

'इश्श! सेनापतीसाहेब माझी आपली उगीच स्तुती करीत आहेत झालें,' शेष-म्मा पन्नास ठिकाणीं मुरडत ह्मणाली, 'पुरुषांना बायकांचा एवढासा गुण दिसला कीं तो मोठा करून दाखविण्याची संवयच असते, आणि त्यांतून सेनापतिसाहेब तर काय, बोलून चालून रसिकच आहेत. मग काय विचारावें? त्याना मी गुणवान् दिसायचीच!'

'शेषा,' मामा देहभान विसरून ह्मणाले, 'तूं खरोखरीच गुणांची खाण आहेस! तुझे गुण इतके मोठे आहेत कीं त्यांना आणखी मोठे करून दाखविणें शक्यच नाहीं. चल ये, तुझ्या माझ्यामध्यें इतकें सुद्धां अंतर असलेलें मला सहन होत नाहीं.' असें ह्मणत मामा पुढें सरले आणि त्यांनीं शेषम्माचा हात धरला!

'इश्श, हें काय! कोणी पाहिलें तर काय ह्मणतील?' असें ह्मणत शेषम्मा मागें ओढ घेऊं लागली. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, मामाच्या हातां-तून तिचा हात सुटला नाहीं, आणि ती प्रतिक्षणाला पुढेंच सरकत राहिली!

आणखी एक क्षण जाता तर आह्मांला लेखनाची औचित्यमर्यादा ओलांड-ण्याचा अनवस्था-प्रसंग आला असता! पण इतक्यांत तंबूच्या दारावर कोणाची तरी मोठ्यानें बाचाबाची झाल्याचा त्रिंबकरावमामास भास झाला आणि त्यांचा हात आपोआप ढिला पडून डोळे दाराकडे वळले. तोंच दरवाज्यावरचा हुजऱ्या आंत येऊन मामास मुजरा करून ह्मणाला, 'लक्ष्मणराव रास्ते आले आहेत व आतांच्या आतां आपली भेट पाहिजे ह्मणतात. मी त्यांना आतां भेट होणार नाहीं ह्मणून सांगितलें, पण ते ऐकत नाहींत!'

हुजऱ्यास पाहतांच मामा शेषम्माचा हात सोडून मागें सरले होते, पण लक्ष्मण राव रास्ते आले आहेत हें ऐकतांच तर ते चटकन् उठून उभे राहिले आणि त्यांनीं शेषम्मास पडद्याच्या आड जाण्याची खूण केली. या आकस्मिक रंगभंगानें त्यांचा इतका विरस झाला कीं, त्यांनीं लक्ष्मणराव रास्ते आणि त्याचा निरोप आणणारा आपला हुजऱ्या यांचे बेचाळीस पूर्वज मनांतल्या मनात उद्धरले! या वेळीं लक्ष्मणरावाचीच काय पण आपले कैलासवासी वडील विश्वनाथराव यांची सुद्धा मामानीं भेट घेतली नसती! 'लक्ष्मणरावाला बाहेरच्या बाहेर घालवून दे' असे शब्द त्यांच्या ओठावर आले होते. पण तो कां आला असावा, याची त्यांना पूर्ण कल्पना असल्यामुळें, आपल्या निरोपानें तो परत जाणार नाहीं, उलट कांहीं तरी अधिक प्रसंग करील आणि मग आपलेंच बिंग बाहेर फुटेल, अशा भीतीनें मामानीं आपली जीभ आवरली आणि 'त्यांना पाठवून दे' असे हुजऱ्यास सांगितलें. शेषम्मा पडद्याच्या आड घाईघाईनें जाऊन बसली असेल नसेल, इतक्यांत लक्ष्मणराव रास्ते आंत आला. मामाच्या अंदाजा-प्रमाणे तो रागानें बेफामच होऊन आला होता.

'काय मामासाहेब, आरग आह्मांला अखेर तोंडघशीं पाडलेंतच!' लक्ष्मणराव तावांतच उद्गारला, 'तुह्मांला आमच्या अटी जर मजूर करावयाच्या

नव्हत्या तर आधीं तोंड पसरून माझ्याकडे तो अधिकार सोंपविलात कशाला ?'

'लक्ष्मणराव, तोंड आवरून बोला,' आपली शोभा शेषम्माच्या कानावर जाते आहे आणि तिचें तात्पर्य कळण्याइतपत मोडकें तोडकें मराठी तिला येतें आहे, या जाणिवेनें चिडलेला मामा म्हणाला, 'तुमच्याकडे तहाच्या अटी ठरविण्याचा अधिकार सोंपविला म्हणजे आम्ही कांहीं गुन्हा केला नाहीं. आम्हांस तरी काय ठाऊक, तुम्ही असले दिवटे आहांत, आणि असल्या मलमलत्या अटींवर तह ठरवाल म्हणून ?'

'मग तुम्ही विझवटे आहांत, तर तुम्हीच त्या अटी ठरवावयाच्या होत्यात,' लक्ष्मणराव तार स्वरानें उद्गारला, 'मला मध्यें पाडून माझी कशाला तोंडफोड केलीत ?'

'झक मारली, गाढवपणा केला, समजलांत!' मामाही लक्ष्मणरावाच्या स्वराशीं स्वर चढवून म्हणाले, 'आणि म्हणूनच आतां तो निस्तरीत आहोंत!'

'ही माणुसकी नव्हे मामा!' लक्ष्मणराव रास्ते बेफाम होऊन म्हणाला, 'तुम्ही आज एक सेनापति झालात म्हणून इतर सरदारांना असे कस्पटासमान लेखूं नका, तुम्हांला बजावून ठेवतों.'

'पाजी मनुष्या!' मामाही बेफाम होऊन उसळले, 'कोणाची माणुसकी काढतोस ? होय होय, मी सेनापती आहे, म्हणूनच तुझ्या शद्बाला आणि तुला सुद्धां पायाखालीं तुडविणार समजलास ?'

लक्ष्मणरावाच्या तळव्याची आग मस्तकाला गेली. त्याचा हात तरवारीकडे वळला आणि त्याच्या ओठावर कांहीं तरी दुरुत्तर आलें. इतक्यांत तंबूच्या दारा कडून कोणी तरी पुढील शब्द उच्चारलेले त्याच्या कानी आले. 'पण सेनापतीचा पाय सरदारांना तुडवूं लागला कीं तो कलम होईल मामा!'

मामानें हे शद्ब ऐकून तंबूच्या दाराकडे नजर टाकली, तों परशुरामभाऊ पटवर्धन वरील शद्ब उच्चारीत आंत येताहेत असें त्यास दिसून आलें!

भाऊंना पाहतांच मामाच्या काळजांत चर्र झालें! काय असेल तें असो, मोतीतलावच्या लढाईपासून मामानें पटवर्धन मंडळींची हबकच खाल्ली होती. आपण त्यांच्या विरुद्ध श्रीमंतांकडे खोट्यानाट्या कागाळया केल्याचें त्यांना कळलें आहे हें मामाला ठाऊक होतें, आणि त्यांनीं आपल्या पराक्रमानें त्या खोट्या असल्याचें सिद्ध करून दिलें आहे, हेंही पण त्याला स्पष्ट दिसत होतें. अशा स्थितींत त्याच्या पापी मनाचा त्यांच्या सांनिध्यांत थरकांप व्हावा यांत नवल नाहीं.

आपले आतांचे शब्द भाऊंच्या कानावर गेले हें तर मामानें ओळखलेंच, पण आतां पुढें कसें वागावें, हें त्याला सुचेना. अधिकच हट्टाला पेटून भाऊंच्या बरोबरीशी उद्धटपणानें वागण्याची त्याची छाती होईना, आणि आपली चूक एकदम कबूल करून तिचें परिमार्जन करावें, अशीही त्याच्या मानी मनाची प्रवृत्ति होईना. तो भाऊंच्या तोंडाकडे टकमक पाहत राहिला.

'मामा, आह्मी सरदार लोक ह्मणजे आपणांस काय वाटलों?' परशुराम-भाऊंनीं दरडावून प्रश्न केला, 'तुह्मी सरकारचे सेवक आणि आह्मी सारे काय चोर कीं काय?'

'तसें नव्हे भाऊ,' मामा एकदम नवारून ह्मणाला, 'अहो, लक्ष्मणरावांना मी तहाच्या अटी ठरविण्याची परवानगी दिली, ह्मणजे तिचा त्यांनीं असा दुरुप-योग करावयाचा कां, तुह्मीच सांगा.'

'काय दुरुपयोग केला?' भाऊंनीं प्रश्न केला, 'त्यांनीं ठरविलेल्या अटी काय गैर आहेत? आणि क्षणभर असें धरून चालूं कीं त्या गैर आहेत. तरी आपल्या सरदाराची इज्जत संभाळण्याकरिता तुह्मी त्यांना मंजुरी द्यावयाची, कीं त्यांची अशी तोडफोड करावयाची? मामा, तुह्मांला एक मतलबाची गोष्ट सांगून ठेवतों, श्रीमंतांनीं या मोहिमेंत तुम्हांस सेनापति केलें एवढ्यावरून तुह्मी स्वतःला कोणी स्वर्गांतून पडलेले यक्षगंधर्व समजूं नका. आह्मीही तुमच्या इतकेच नेकजात सरदार आहोंत. उलट आह्मी कलावंतिणीची गाणीं करून मोहिमी चालविल्या नाहींत, आणि आपल्या लेकीबहिणी पेशव्यांना देऊन सरदारीही मिळविली नाहीं. तर आपल्या अंगचें रक्त शिंपडून मोहिमी केल्या आहेत, आणि मुडदे देऊन सरदारी राखली आहे, हें तुम्ही पक्कें ध्यानांत ठेवा!'

हैदराच्या तोफखान्याच्या भडिमारालाहि दाद न देणारा त्रिंबकराव मामा भाऊंच्या भडिमारानें चीत झाला! आपलें बिंग भाऊंना कळलें आहे हें समजून तो वरमला, आणि त्याला आपल्या मूर्खपणाची लाज वाटूं लागली. तो लाचार होऊन ह्मणाला, 'भाऊ, माझी चूक झाली. मी लखुअण्णांच्या अटींना संमति देतों, तुम्ही सांगाल तें करतों, पण मला हे पायपोस एवढे मारूं नका!'

* * *

दुसऱ्याच दिवशीं तहावर सह्या झाल्या. शिरें, होसकोटें, दोड्ड बाळापूर, हे शिवछत्रपतींचें स्वराज्य मराठ्यांकडे परत येऊन शिवाय मधगिरी आणि गुरमकोंडा हे दोन प्रांत त्यांना मिळाले. हैदरानें पेशव्यांना खंडणी दाखल पन्नास लक्ष

आणि त्रिंबकराव मामाला दरबार खर्चा दाखल दहा लक्ष रुपये दिले. त्यापैकीं चार लक्षांचें जवाहीर, एक लक्षाचे वीस हत्ती, आणि सत्तावीस लक्ष रुपये रोख असा बत्तीस लक्षांचा भरणा करण्यांत आला, आणि राहिलेल्या अठरा लक्षांची सावकारी निशा पटविण्यांत आली. ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमेस मराठ्यांचीं पथकें देशी जाण्यासाठीं परत फिरलीं. तीं तुमकुराहून शिऱ्यापर्यंत मिळूनच आलीं आणि मग वेगवेगळ्या दिशांनीं पसरलीं. वाटेनें येतांना एरडकिऱ्याचें ठाणें रायदुर्गकरांकडून काढून चित्रदुर्गकरांना देण्याबद्दल, आणि लक्ष्मणराव रास्त्याची क्षमा मागून त्याची समजूत काढण्याबद्दल पटवर्धन मंडळींनीं मामाला सारखा तगादा लावला होता पण मामानें दोन्हीही गोष्टी केल्या नाहींत. मात्र एरडकिरें प्रकरणाचा बोभाटा श्रीमंतांच्या कानावर जाऊन त्यांचा आपल्यावर रोष होऊं नये ह्मणून त्यानें एरडकिऱ्याचें ठाणें रायदुर्गकरांकडून काढून घेऊन सरकारी मुलखांत सामील केलें ! चित्रदुर्गकर नाराज झाला, पण 'तुम्ही पुण्यास श्रीमंतांकडे आपलें ह्मणणें वकिलामार्फत मांडा' असें सांगून पटवर्धन मंडळींनीं त्याची समजूत काढली !

एरडकिऱ्यास येईपर्यंत मामाच्या छावणीबरोबर एक झाकलेला मेणा असे, आणि मामा अहोरात्र त्या मेण्यांतील व्यक्तीच्या उस्तवारींत निमग्न असे, मग त्या मेण्यांत त्याच्या जिव्हाळ्याचें असें कोण माणूस होतें नकळे ! पटवर्धन मंडळी इटग्यावरून तुंगभद्रा उतरून मिरजेस आली. त्रिंबकरावमामा नरसोबाचे वाडीस गेला. मोहीम यशस्वी होऊन श्रीमंतांची इच्छा सफळ झाली. हैदराचा पुरता 'रेंच मोडला'.

---

## प्रकरण ४२ वें.

खरे ले ११७६ ते ११८० इ. } "चंद्रासि लागति कला !" { ज्येष्ठ वद्यपक्ष श. १६९४

आमचें प्रस्तुत कथानक खरें म्हटलें असतां श्रीरंगपट्टणच्या तहाबरोबरच संपावयाचें, पण ह्या कथानकाचें अधिदैवत जे श्रीमंत रावसाहेब पेशवे त्यांचा शोकजनक अंतकाळ आतां जवळच आल्यामुळें, त्याची हृदयद्रावक काहाणी वाचकांस निवेदन केल्यावांचून आमच्यानें कलम खालीं ठेववत नाहीं. त्यांतूनही या पुण्यप्रताप पेशव्याच्या आकस्मिक मृत्यूनें खरोखरी मराठेशाहीच्या

मुळावरच कुठार पडला अशी आमची प्रामाणिक समजूत असल्यामुळें, त्यांच्या अंतकाळीं त्यांची आपल्या हातून होईल तेवढी परिचर्या करणें हें आम्ही आमचें पवित्र कर्तव्य समजतों, आणि आमच्या सहृदय वाचकांसही त्यांच्या परामर्षाचे कामीं आमचे सहकारी होण्याकरितां निमंत्रण देतों. वाचक हो, आमच्या निमंत्रणास आपण मान द्याल अशी आमची खात्री आहे. आतां हें खरें कीं, श्रीमंतांची यापुढील करुणावस्था पाहून आपल्या हृदयांत दुःखाची खाई भडकेल, आणि आपल्या नेत्रांतून अश्रूंचा प्रवाह सुरू होईल; पण तसें झाल्यास आपण आपल्या शोकाग्नीच्या प्रखर आगीचा उपयोग आपल्या राष्ट्रीयत्वाच्या नंदनवनांत छपून असलेलीं दुहीचीं तणें जाळण्याकडे करूं, आणि आपल्या अश्रूंची माळ गुंफून श्रीमंतांच्या स्वर्गस्थ आत्म्याला अर्पण करूं म्हणजे झालें !

सिद्धटेकच्या मुक्कामीं श्रीमंत माघ वद्य दशमीपर्यंत म्हणजे चांगले पावणे दोन महिने राहिले होते. कणीग्राम काकाचें औषध चालूंच होतें, तथापि त्यांच्या प्रकृतींत म्हणण्याजोगी सुधारणा कांहींच दिसेना. नंतर श्रीमंतांच्या मनांत पुण्यास परत जावेंसें येऊन ते सिद्धटेकाहून निघाले, आणि कानगांव, नांदगांव बेलवंडी अशीं गांवें वाटेनें घेत फाल्गुन शुद्ध सप्तमीच्या दिवशीं थेऊरास आले. थेऊरास सुमारें तीन आठवडे काढून ते फाल्गुन वद्य तृतीयेला पुण्यास आले. प्रकृती अजून साधारण तग धरूनच होती. फाल्गुनाचा वद्य पक्ष, शके १६९४ चा चैत्र आणि वैशाख हे महिने कसे बसे पार पडले. पण वैशाखाच्या अखेरीस ग्रीष्मऋतूची छाया पडल्याबरोबर त्यांच्या प्रकृतीनें एकदम उलट खाल्ली. त्यांना फिरून ताप येऊं लागला, छातींत दुखूं लागलें, आणि अशक्तता वाढूं लागली. येथून त्यांच्या खऱ्या कुचंबणेस सुरवात झाली. त्यांची शुश्रूषा सर्वथा परावलंबी झाली. हजार मंडळींनीं त्यांच्या प्रकृतीचें निदान हजार प्रकारांनीं करण्यास प्रारंभ केला. कोणी म्हणावें श्रीमंतांना बाधा झाली आहे, कोणी म्हणावें ही ग्रहांची पीडा आहे, कोणी म्हणावें नवस चुकला आहे, कोणी म्हणावें हा व्याधी आहे, असें ज्याला जें सुचेल तें तो सुचवूं लागला आणि श्रीमंतांवर तीर्थ, अंगारे, ताईत, मंत्र, यंत्र, इत्यादि इत्यादि उपचारांचा वर्षाव सुरू झाला ! कशी असेल ती असो, पण 'दादासाहेबांच्या नर्मदातटाकीं असलेल्या कोणा गौड गुरूनें श्रीमंतांना मूठ मारल्याची' ही बातमी पुण्यास पसरली ! श्रीमंत पार्वतीबाईसाहेब, रमाबाईसाहेब, आणि सगुणाबाईसाहेब यांचीं अंधश्रद्ध अनुष्ठानें, दादासाहेबांचे मतलबी प्रयोग,

कर्निंगहॅम काकांची तर्कप्रधान चिकित्सा, आणि अगल्याबगल्यांचे अर्धभट्ट व चंचल उपाय यांच्या ओढाताणींत श्रीमंतांची अवस्था फार बिकट होऊन, नाना फडणीस आणि सखारामबापू यांच्यासारख्या मुत्सद्यांची मति किंकर्तव्यतामूढ होऊन राहिली ! श्रीमंत तर दिवसेंदिवस इतके लहरी, तापट आणि उतावीळ बनले कीं, मर्जीस येईल तेथें रहावें, मन मानेल तें खावें आणि वाटेल तसें वागावें असा प्रकार त्यांनीं सुरू केला. त्यांच्या यापुढील चरित्रांत नियमित वागणुकीचा कांहींच धरबंध राहिला नसल्यामुळें त्यांच्या रुग्णावस्थेचें तपशीलवार वर्णन देण्याच्या भरीस न पडतां आम्ही तत्कालीन अस्सल कागदपत्रांतले तारीखवार उतारेच वाचकांना सादर करितों. त्यांवरून वाचकांना श्रीमंतांच्या ढासळलेल्या प्रकृतीची आणि त्यांच्या हालअपेष्टांची बरीचशी कल्पना येणार आहे. जरूर तेथें आम्ही पत्रातील मजकुराचें स्पष्टीकरण करीत आहों. पत्रें लिहिणारी मंडळी वेगवेगळी आहेत, आणि खालीं दिलेल्या तारखा पत्रें लिहिलेल्या दिवसांच्या आहेत, हें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें.

ज्येष्ठ शु. ६ रविवार

" श्रीमंत राजेश्री दादासाहेब ( आनंदवल्लीहून ) शुद्ध त्रयोदशीच्या मुहूर्ते पुण्यास येणार. श्रीमंतांची शरीरप्रकृति आहे तशीच आहे. हैदरखानाकडील सल्ला झाला. फोजा तुंगभद्रेवरी आल्या म्हणून बाजारी वर्तमान आलें '.

*　　*　　*　　*

ज्येष्ठ व. ५

" श्रीमंताची शरीरप्रकृति आज दोन चार दिवस तों बरीच आहे. थेऊरास जावयाचा मनसबा होता. राजश्री सखारामबापूंनीं जाऊं नये म्हणून विनंति केली, त्याजवरून जावयाची गडबड दिसत नाहीं. तूर्त राहणें झालें असें दिसतें ... श्रीमंत राजश्री दादासाहेब आनंदवल्लीहून निघून त्रयोदशी शनिवारीं तिसरे प्रहरीं पुण्यास येऊन दाखल झाले. "

दादासाहेब आनंदवल्लीला कां गेले होते हें वाचकांस ठाऊकच आहे !

*　　*　　*　　*

ज्येष्ठ व. ६

" श्रीमंतांची शरीरप्रकृति आहे तशीच आहे. तेही प्रस्तुत बागेंतून वाड्यांत आले ... श्रीमंतास आरोग्य होणेविषयीं दादासाहेब अनुष्ठान करितात, व औषधही प्रस्तुत तेच देत असतात ! "

" श्रीमंत कांहीं दिवस बाबूराव फडणिसांच्या बागेंत राहिले होते, ते वाड्यांत

रहावयास आले, असा वरील लिहिण्याचा आशय आहे. श्रीमंतांना आपल्या प्रकृतीची आशा राहिली नसल्यामुळें दादासाहेबांवर पूर्ण विश्वास टाकावयास ते तयार झाले हें आमच्या चतुर वाचकांनीं ओळखलेंच असेल !

*　　*　　*　　*

ज्येष्ठ व. ७ — “ आज सप्तमी इंदुवारीं राजश्री सखारामपंतास कारभार सांगितला. धाकट्या रायाजवळ ( नारायणराव पेशव्यांजवळ ) बसून कारभार करीत जावा याप्रमाणें श्रीमंतांची आज्ञा झाली. श्रीमंतांची शरीर प्रकृति तर ठीक नाहीं. ईश्वरी कृपेनें घडेल तें खरें ! ”

*　　*　　*　　*

ज्येष्ठ व. ९ मंगळवार — “ काल अष्टमी ( सप्तमीयुक्त अष्टमी असल्यामुळें मागील पत्रांत सप्तमी लागली असावी ) इंदुवारीं राजश्री सखारामबापू यांस दिवाणगिरी झाली. श्रीमंत राजश्री नारायणराव यांजवळ बसून कारभार करावा याप्रमाणें झालें. “ घ्यावें ”, “ देणें ” सर्व धाकट्या रायांकडे आहे. श्रीमंत थेऊरास जाणार. शरीरप्रकृत फारच कठिण झाली आहे. त्याचे शरीराचा भरंवसा दिसत नाही. राजश्री मोरोबादादा स्वस्थ आपले घरीं बसून आहेत. ”

मोरोबादादा हे नाना फडणिसाचे चुलत बंधू कांहीं दिवस कारभार करीत होते, त्याच्या हातून कारभार काढून श्रीमंतानीं बापूंकडे दिला. आपल्या अंतकाळीं बापूंना वळवून घेण्याकरितां श्रीमंतानीं हा डाव टाकला होता हें वाचकांनीं ओळखलेच असेल !

*　　*　　*　　*

आषाढ शु. १० — ‘श्रीमंताची शरीरभावना आहे तशीच आहे. अलीकडे ब्राह्मणच वैद्य औषध देतात म्हणून बोलतात. सर्व मुत्सद्दी यांणीं सरकारचे वाड्यांत कचेरीस जावें, कोणी आपले घरीं सरकारी काम करूं नये, याप्रमाणें ताकीद आहे. थोरले ( दादासाहेब ) फारकरून स्नानसंध्याच करतात. दरबार कचेरीस जात नाहीत. श्रीमंत राजश्री नारायणराव दोन वेळां नेहमीं कचेरीस बसतात बापू जवळ असतात. राजश्री मोरोबादादा बाहेर निघत नाहींत. कार्याकारण एखादे दिवशीं श्रीमंत पंतप्रधान यांजकडे मात्र जातात. श्रीमंत राजश्री मोरोबा अबा ( पटवर्धन ) आज दोन रोज श्रीमंत राजश्री नारायणराव यांजकडे जातात. नित्य येत जावें म्हणून सांगितलें म्हणून ऐकतों.’

कनिंगहॅम काका फिरंगी असल्यामुळें त्याचें औषध घेण्यांत अनाचार होतो व त्यानेंच श्रीमंतांस गुण येत नाहीं, अशी कांहीं मंडळींनीं तकरार केल्यामुळें श्रीमंतांनीं कणीघाम काकाचें औषध पोटांत घ्यावयाचें बंद केलें आणि ब्राम्हण वैद्यांचें औषध सुरू केलें असें लेखकाचें म्हणणें.

*  *  *  *

आषाढ व. १

" श्रीमंतांची शरीरप्रकृती आहे तशीच आहे. धोमास जावें असाही मनसवा आहे. राजश्री अप्पाजीराव गाडगीळ [वांईचा राहणारा, अक्कलकोटकरांचा कारभारी] व कृष्णराव बल्लाळ (काळे) असें पुढें धोमास पाठविले आहेत, कीं देवास चिठ्ठ्या घालाव्या कीं यावें कीं न यावें? यास्तव उभयता गेले आहेत. धाकटे श्रीमंतांस जवळ बसवून घेऊन बापू सर्व कारभार करितात. मखलाशा कांहीं धाकटे श्रीमंतांकडून करवितात. वरकड मलबा पानशे व गुरुजी यांजकडून करवितात. महालच्या रसदा घेऊन बंदोवस्त करणें हें देखील कारभारी यांजकडेसच झालें. काम कारभार तडका चालतो. "

मामलेदारांनीं सरकारांतून मामलती पतकरण्यापूर्वीं मामलतीच्या वसुलाची निमी रक्कम अगाऊ सरकारांत भरावी लागे, त्या रकमेस 'रसद' म्हणत. रसदेच्या रकमा श्रीमंतांच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं घेतल्या जात, पण तें काम आतां बापूंकडे आलें असा लेखकाचा आशय.

*  *  *

आषाढ व. ५ 'श्रीमंत राजश्री रावसाहेब यांची प्रकृति आठ दिवस उत्तम आहे. श्रीमंत राजश्री नारायणराव धोम येथें गेले आहेत. तेथें कोणाच्या अंगीं भुतें ग्रह वाढत असतात, त्यांनीं कांहीं बाधा आहे म्हणून सांगितलें. त्यावरून धाकटे श्रीमंत गेले. तेथे भुतें वाढतात (अंगांत येऊन बोलतात), त्यांस पुसावें (म्हणून गेले आहेत). ते आलियानंतर येथून द्वादशीस श्रीमंत निघून वाईस कृष्णातीरीं जाणार. सर्व कारभारी मुत्सद्दी समागमें जातात. श्रीमंत राजश्री दादासाहेब समागमें जाणार म्हणून वर्तमान आहे...... '

*  *  *

आषाढ व. ८ 'श्रीमंत राजश्री नारायणराव धोमास गेले ते काल आले, ते पर्वतीस राहिले. मृत्युयोग होता म्हणोन काल वाड्यात आले नाहींत.

आज नववा दिवस म्हणून येत नाहींत. भृगुवारीं येणार. श्रीमंत ( धौमास ) द्वादशीस जाणार. डेरे पंचमीस बाहेर झाले आहेतच. समागमें मुत्सदी कोण जातील नकळे. धाकटे श्रीमंत नागपंचमीच्या उत्साहाकरितां त्वरेनें आले आहेत. ”

आषाढ व० ३० ‘ श्रीमंत राजश्री पंतप्रधान धौमास जावयास निघून गेले. सांप्रत आठ दहा रोज शरीरप्रकृती बरीच आहे. श्रावणमासाची दक्षिणा झाल्यावर श्रीमंत नारायणराव जाणार आहेत. ’

श्रावण शु० २ “ श्रीमंत भवानीपेठेंत द्वादशीस मुहूर्तेकरून जाऊन राहिले होते. दुसरे दिवशीं मुक्काम होता. तिसरे दिवशीं रात्रौ सर्वास लोकास ताकीद केली की, उदईक रात्रौ कूच करणार. कोणी गावात न जाणें, येथें निजणें. म्हणून बेलदार, कामाठी, व फरास खिजमतगार ढालाईत वगैरे लोकास ताकीद करविली असता पीठकुटाकरिता कोणी कोणी गावात आले होते. इतक्यात तोफ झाली, याजमुळे जागचे जागा माणसे अडकली श्रीमंतांनीं दोन प्रहर रात्रीस कूच केलें! डेरे पाडा म्हणतात तो माणसें कोणी नाहीत! तेव्हा रागें भरले. खास बिछान्याचा मात्र एक उंट लादविला आणि पालखींत बसून निघाले, ते थेऊरास जाऊन, देवदर्शन घेऊन, एक प्रदक्षिणा करून पथ्य घेतले ! दुसरे दिवशी सारीं माणसे मागाहून गेलीं. मग ( श्रीमंतानी ) कारकून ( आदिकरून लोकास ) मारहाण केली ! शरीरप्रकृति बरी आहे. देवाचें दर्शन नित्य घेतात. एक दुसरी प्रदक्षिणाही नित्य करितात. परंतु शरीरात ज्वराश आहे म्हणतात. पाहिल्याने ( बाबूराव फडणिसांच्या ) बागेत होते, तेव्हा तेज बरे होते. आता म्लानवदन आहे. मर्जी दिवसेंदिवस कठिण. पथ्य करीत नाहींत. वैद्यानें जो पदार्थ खाऊं नका म्हणावें, तो अगत्य खावा, ज्योने आणून न घातल्यास शिवीगाळ करावी, असा प्रकार आहे ! दुसरा मजकूर भवानी पेठेंतील म्हणतात, परवा बुधवारीं डोला दोन घटका डोलत होता !! साऱ्या शहरानें पाहिला. हें एक विपरीतच झालें. हे काय आहे नकळे. मध्यें आठ चार दिवस श्रीमंत राजश्री आबास ( मोरोबा पटवर्धनास ) आव पडत होती, याजमुळें दरबारास जात नव्हते. आज गेले

होते. हिशेबाचा प्रकार कारभारी यांनींही निकड थोडीशी दाखविली आहे. तयार होतात. राजश्री गुरुजी घरास आले होते.. हिशेब पाहिले. तारीफ तों फारच केली. असे हिशेब कोणत्याही सरंजाम्याचे अगर कमावीस महालाचे नाहींत, म्हणत होते. मागें राजश्री नाना फडणिसानींही शिफारस केली होती. हिशेब फारच चागले आकारले आहेत ( असें म्हणत होते ). कारभारी यानी हिशेब पाहिल्यानंतर त्यांसही समजेल. अद्याप पाहिले नाहींत तो आज अभाव दिसतो."

* * *

वरील पत्रातील उताऱ्यावरून वाचकाना ज्येष्ठ आणि आषाढ या दोन महिन्यांतील श्रीमंताच्या हालचालीची आणि प्रकृतिमानाची साधारण कल्पना आलीच असेल. पण शेवटच्या पत्रातील उताऱ्यापैकी काही मजकुराचा थोडासा खुलासा करणें अवश्य आहे. पुण्यातील भवानी पेठेत "घोडे पीर" म्हणून एक प्रसिद्ध डोला आहे, तो आमच्या वाचकापैकी पुष्कळाच्या पाहाण्यात असेलच. या पिरावर श्रीमंतांची फार भक्ति असून, ते त्यास वरचेवर नवसही करीत असत. आमच्या कथानकाच्या काळी हा पीर फार जागृत असल्याबद्दल प्रख्याति होती. श्रीमंत धौमास जाण्यासाठीं म्हणून जे आषाढ वद्य द्वादशीस शनिवार वाड्यातून बाहेर पडले ते भवानी पेठेत येऊन राहिले. भवानी पेठेंतला डोला डोलत होता असें जें वर पत्रात म्हटले आहे, ती बुधवारची म्हणजे आषाढ वद्य दशमीची गोष्ट. हा डोला एकाएकी डोलूं लागलेला पाहून सारे पुणे शहर तो चमत्कार पाहाण्यास लोटलें ! श्रीमंताच्या कानावर ती हकीगत जाताच त्यानाही त्या गोष्टीचा मोठा चटका लागला, आणि त्यांनी त्या पिरासमोरच एक दोन दिवस मुक्काम केला, पण डोला पुन्हा काही डोलला नाही. त्रयोदशीच्या रात्री त्याच्या मनात एकाएकीं काय आलें कोणास ठाऊक, धोमास जाण्याचा बेत रद्द करून त्यांनी अपरात्रीसच डेरे उठविण्याचा हुकूम केला ! कारकूनकामाठ्यास या गोष्टीची काहीच कल्पना नसल्यामुळे ते बिचारे गावात गेले होते. ते तळावर हजर व्हावयाचे, पण इतक्यात राबताबंदीची तोफ झाल्यामुळे त्याना जागच्या जागी अडकून पडावें लागलें ! ही राबताबंदीची तोफ श्रीमंतांनीं अलीकडेसच सुरूं केली होती. श्रीमंतावर प्रजेची मनस्वी भक्ति असल्यामुळें त्यांचें दर्शन घेण्यासाठीं लोक नाना प्रकारांनीं धडपड करीत. उलटपक्षीं आपल्या प्रस्तुतच्या विपन्न शरीरावस्थेंत

लोकांना दिसूं नये अशी श्रीमंतांची इच्छा असे. दिवसा तर श्रीमंतांभोंवतालच्या पाहऱ्यांतून त्यांना पहावयास जाणें शक्यच नव्हतें. पण रात्रीं मात्र खिजमतगार कामाठ्यांचे वगैरे वशिले करून गांवांतले लोक श्रीमंतांचें दर्शन घेण्यासाठीं खटपट करीत. हें जाणून मनाईची तोफ झाल्यावर शहरांतील राबता बंद करण्याचा श्रीमंतांनीं हुकूम केला होता. शिवाय आपण या दुखण्यांतून वांचत नाहीं हें ओळखून हैदर किंवा कदाचित् दादासाहेबही कांहीं फंद फितूर करताल असा संभव होता. तो होऊं नये असाहि या हुकमाच्या बुडाशीं एक हेतु होता. असो, कारकून कामाठी अशा रीतीनें घरोघर अडकून पडल्यामुळें श्रीमंतांच्या प्रस्थानाची खोटी झाली. तथापि तळावर होती तेवढीच मंडळी घेऊन श्रीमंत रातोरात थेऊरास गेले, आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यांचा माग काढीत ही शहरांत अडकलेली मंडळी थेऊरास येऊन पोचली. तेथें गेल्यावर त्याना कसा प्रसाद मिळाला हें वर पत्रांत आलेंच आहे!

पत्रलेखक कारकुनानें शेवटच्या एक दोन वाक्यांत ज्या बाबीचा उल्लेख केला आहे ती बाब त्याच्या धन्याच्या ह्मणजे पटवर्धनाच्या सरंजामाच्या हिशेबाची होय. सरंजामाच्या हिशेबाची सरकारात सुनावणी करताना महादजीपंत गुरूजी, नाना वगैरे कारभारी मंडळी आपले हिशेब पाहून खुप झाली, याबद्दल लेखकानें संतोष प्रगट केला आहे. आणि खरे ह्मटलें तर त्याकाळीं सरंजामाचे हिशेब दाखवून नानासारख्याना खुप करणे हे हलीच्या काळीं एखाद्या दुराराध्य प्रोफेसराकडून पुरेपूर गुण मिळाविण्याइतकेच अवघड नव्हतें असें कोण म्हणेल?

---

## प्रकरण ४३ वें.

खरे ले. १२९४ } **कान्होबांचा शेवटचा प्रताप** { श्रावण शु. ५, १६९४<br>३-८-१७७२

आज बरेच दिवसानी वाचकांस आह्मी कान्होबाच्या घरीं घेऊन जात आहोंत. कारण कान्होबा आज नेहमीपेक्षा खुषींत असून, आपल्या राजवैद्यत्वाच्या संपादनांत त्यांनी आणखी एक पाऊल पुढे टाकलें आहे. तें हेंच कीं, आज म्हणजे श्रावण शुद्ध पंचमीच्या दिवशी उजाडल्याबरोबर श्रीमंत दादासाहेबांची स्वारी स्वतः त्यांचे घरीं आली, आणि त्यांनीं कान्होबांस आपली प्रकृति दाखविली.

कान्होबांनीं ती पाहून किंचित् पित्तशेषाखेरीज बहुतेक निर्दोष असल्या-बद्दल आपलें मत दिलें, आणि पित्तशमनाकरितां एक मात्रा काढून दादा-साहेबांस दिली. दादासाहेब कान्होबांस प्रकृति दाखविण्याकरितां थेऊराहून मुद्दाम पुण्यास आले होते हें ऐकून तर कान्होबा खुष झालेच, पण त्यांची आजपर्यंतची कामगिरी लक्ष्यांत घेऊन दादासाहेबांनीं जेव्हां त्यांस रोख पांचशें रुपये आणि एक शालजोडी बक्षीस दिली, तेव्हां कान्होबा आनंदानें वेडे झाले! कान्होबांचें भाग्य एवढ्यानेंच संपलें नाहीं. ' इतउत्तर वाड्यांत कोणास पाहावयास जाणें झाल्यास तुह्मास नेण्याकरितां पालखी येत जाईल ' असें अश्वासन देऊन दादासाहेबांनीं कान्होबाचा निरोप घेतला.

कान्होबांना आपण जागे आहोंत का स्वप्नांत आहोंत हेंच समजेना. आज आपल्या जन्माचें सार्थक झाले असे वाटून ते आनंदानें बेहोष झाले. नाना फडणि-सानीं त्याना श्रीमंतांची प्रकृति पाहण्यास नेण्याचे अर्धवट आश्वासन दिल्यास आज बरेंच दिवस झाले होते. त्यानंतर श्रीमंताची प्रकृति पार ढासळून ते थेउरास जाऊन राहिले, तरी देखील त्याना पहावयास आपणास अद्याप कसे बोलावणे येत नाहीं ह्मणून कान्होबा विस्मय करीत होते, तोंच हा आकल्पित योग आज आल्याबरोबर आता मात्र आपण लवकरच राजवैद्य होणार अशी कान्होबानी मनाशी खूणगाठ बांधिली. आपले सुभाग्य कोणास सागू आणि कोणास न सागूं, असे त्यास होऊन गेले. ते काहीं तरी निमित्त काढून आपले शेजारी मोरूकाका आणि अन्तुमामा याचे घरी गेले, आणि त्यानीं त्याना आज आपणाकडे दादासाहेब आल्याची व आपणास पालखीपदाचा मान मिळाल्याची गोष्ट सांगितली. तेवढ्याने तृप्ति न होऊनच की काय, ते वाटेने जाणारा येणाराशी काही तरी निमित्ताने बोलणे काढून आपल्या आजच्या ऐश्वर्याची त्याना जाणीव देऊ लागले. आज सकाळी रोग्यास पाहताना व त्याची औषधे देतांना देखील आपल्या आजच्या भाग्यानुभवाची त्यांना कल्पना आणून देणे हाच कान्होबाचा मुख्य व्यवसाय होता. भोज नोत्तरही कान्होबाना आपला मोठेपणा श्रवण करण्यास कोणी तरी भाविक श्रोता हवासा वाटून त्यांनी मोरूकाकास मुद्दाम बोलावून आणले आणि झोपाळ्यावर बसून ते त्याच्याशी गप्पागोष्टी करू लागले. आपणाकडे सकाळींच दादासाहेब कसे आले, त्यांनी पोषाख कसा केला होता, ते काय काय बोलले, त्यानी आपणास इनाम कसें दिलें, इत्यादि मजकूर कान्होबा साठाव्या वेळा मोरूकाकाना सागत आहेत, आणि मोरूकाका दुपारच्या सुरसुरींत पेंगत असता तो श्रवण (?) करीत आहेत, अशा संधीसच आपण कान्होबांच्या घरीं जात आहोंत.

‘ कां मोरूकाका,’ कान्होबा मागील संभाषणाचा–किंवा आत्मगत भाषणाचाच ह्मणणें अधिक शोभेल–धागा पुढें चालवीत ह्मणाले, ‘ दादासाहेबांच्या आजच्या एकंदर धोरणावरून ते श्रीमंतांना पाहण्यासाठीं मला लवकरच बोलावणें पाठविणार, असें तुह्माला नाहीं वाटत ? ’

‘ दादासाहेबाना मोरावळा कुठें आवडतो ? ’ मोरूकाका पेंगतां पेंगतां व स्वप्नसृष्टींत मोरावळा खाण्याचें सुख भोगतां भोगता गुणगुणले, ‘ त्यात बिया असतात ते त्याना खपत नाहीं. ’

‘ भले मोरूकाका ! ’ कान्होबा आंबट तोंड करून उद्‌गारले, ‘ मी तुह्माला काय सांगतो आहे, आणि तुम्ही काय बोलत आहात ? तुम्हांस झोप येते आहे वाटतें.’

‘ छे छे, झोप नाहीं,’ मोरूकाका डोळे उघडून जांभई देत म्हणतात, ‘ माझें तुमच्या बोलण्यावर चांगले लक्ष्य आहे. बरें मग काय म्हणालात ? श्रीमंत भाऊसाहेब तुमच्याकडे आले होते म्हणता ? ’

कान्होबाचा विरस झाला. असल्या अरसिक श्रोत्यापुढे आपले वैभव निवेदन करण्याचा प्रसंग आपण कशाला मुद्दाम ओढवून आणला, असा त्याना पश्चाताप होऊं लागला. मोरूकाकाना ‘ आपल्या घरीं जाऊन वामकुक्षी करा ’ असें सांगावयाचें त्याच्या मनात आलें. इतक्यांत त्याचे लक्ष्य दरवाजाकडे गेलें, तों आपल्या घरासमोर एक पालखी येऊन थाबली असून, बाबूराव फडणिसाचा कारकून दरवाजातून आत येत आहे, असे त्याच्या दृष्टीस पडले. त्यास पाहताच कान्होबा तत्काळ आरामखुर्चीवरून उठले आणि तोंडातील तंबाकूचा चोथा तस्तात साडून चटकन् सदरेच्या पाहिरीपाशीं येऊन त्या कारकुनास उद्देशून म्हणाले, ‘ काहो केसोपंत, कोणीकडे आले होतेत ? दादासाहेबाकडे की काय ? ते तर सकाळींच मला भेटून परत गेले.’

‘ आपणासच बोलावावयास आलो होतो,’ केसोपत म्हणाला, ‘ राजश्री बाबूराव दादाची प्रकृती बिघडली आहे, म्हणून त्याना पाहाण्यासाठीं आपणास सत्वर बोलावलें आहे.’

मागील एका प्रकरणात बाबूराव फडणिसाचा पोटशूळ उठला असता कान्होबानीं त्याना पुलिन वालुकेश्वर दिला होता, आणि त्याने गुण न आल्याचे कळताच तडागमृत्तिकेश्वराची योजना केली होती, हें वाचकाना आठवत असेलच. हे बाबूराव फडणीस ह्मणजे मोरोबा दादा फडणिसाचे वडील आणि नाना फड-

णिसांचे चुलते होत. योगायोगाची गोष्ट अशी कीं, कान्होबांचा तडागमृत्तिकेश्वर पोंचल्याबरोबर बाबूरावांना आराम वाटला होता, आणि त्यांची कान्होबांवरची श्रद्धा अधिकच दृढ झाली होती. बाबूरावांचें बोलावणें आपणांस आलें आहे हें पाहून कान्होबांना अत्यानंद झाला, आणि केसोपंताला आपल्या आजच्या भाग्याची जाणीव देण्याच्या उद्देशानें त्यांनीं आपल्या बोलण्यास वळण दिलें. ते ह्मणाले, ‘ केसोपंत, काल संध्याकाळपर्यंत तर बाबूरावांची प्रकृती बरी होती. आज सकाळीं—मला वाटतें--हो--आज सकाळींच श्रीमंत दादासाहेब मजकडे येऊन गेले—तोंपर्यंत फडणिसांच्या वरचा कांहीं निरोप नव्हता. आणि आतांच एकाएकीं बाबुरावांना काय झालें बोवा ? ’

बिचाऱ्या केसोपंताला कान्होबांचें धोरण नीटसें समजलें नाहीं, असें दिसलें. बाबूरावाना काय झालें आहे, हें ठरविण्याकरितां तर कान्होबांना आपण नेण्यास आलों आहोंत, आणि तेच आपणास जर ‘ बाबूरावांना काय झालें ? ’ ह्मणून विचारूं लागले, तर आपण त्यांना काय उत्तर द्यावयाचें, याचें त्याला कोंठ पडलें. तो अमळ घुटमळल्यासारखें करून ह्मणाला, ‘ होय वैद्यराज, आपण ह्मणता त्याप्रमाणें आज सकाळपर्यंत बाबूराव दादांची प्रकृति चागली होती. आज ते थेऊरास कांही दिवस श्रीमंतांपाशीं राहण्यासाठीं ह्मणून जाणार होते. प्रस्थानाची तयारी झाली होती. इतक्यांत एक प्रहरापूर्वी त्याचे मस्तक जड झाल्यासारखें होऊन त्याना चक्कर येऊं लागली. ह्मणून थेउरास जाण्याचा बेत तहकूब करून ते अंथरुणावर जाऊन पडले, आणि मला आपणांकडे पाठविले आहे. ’

पण कान्होबांना या तपशिलाची खरोखरी गरज नव्हती. त्याना दादासाहेब आपणाकडे आले होते ही गोष्ट केसोपंतांच्या कानावर घालावयाची होती. ती तर त्यांनीं घातलीच, आतां फक्त आपणास वाड्यांतून पालखी मिळण्याचा मान लाभला एवढेंच केसोपंताला कळवावयाचें काम शिल्लक राहिलें होतें. तें करण्यासाठीं ते ह्मणाले, ‘ ह: एवढेंचना ? मग तेवढ्याकारिता बाबूरावानीं थेउरास जाण्याचा बेत कशाला तहकूब केला ? मी त्याची प्रकृति थेऊरासच पाहिली असती. मीही श्रीमंतांची प्रकृति पाहण्याकरितां पालखींतून आज थेऊरासच जावयाचा होतों. बरें असो, चला बाबूरावांना एकदा पाहून येऊन मगच थेऊरास जाऊं.’ असें ह्मणून कान्होबांनीं खुंटीवरचीं किरीट कुंडलें चढविलीं, आणि ते केसोपंताबरोबर जाण्यासाठीं सिद्ध झाले. पण इतक्यांत त्यांच्या मनांत कांहीं कल्पना येऊन ते

तक्क्याशीं आडव्या झालेल्या मोरूकाकांस हांक मारून ह्मणाले, 'मोरूकाका, मी फडणिसांचे घराकडून जाऊन येतों. तोंवर तुह्मी येथेंच वामकुक्षी करा. मला कोणी बोलवावयास आल्यास मी घटकाभरांत येत आहे ह्मणून सांगा.'

'हूं' एवढें एकच अक्षर मोरूकाकांच्या तोंडून बाहेर आलें. मग तें कान्होबांच्या सूचनेला उत्तरात्मक होतें, कीं मोरावळयाच्या गोड स्वादावर अभिप्रायात्मक होतें नकळे! पण कान्होबाना त्याच्याकडे अधिक लक्ष्य देण्यास फुरसत नसल्यामुळें ते झपाझप सोप्याच्या पाहिऱ्या उतरून गेले आणि पालखीत जाऊन बसले. आपला औषधाचा बहुमोल बटवाही त्यांनीं आपल्याबरोबर पालखीतच घेतला. त्यांची पालखी फडणिसाच्या घराच्या रोखानें चालू झाली.

चला वाचकहो, कान्होबा पालखींतून बाबूरावाच्या घराकडे येताहेत, तोपर्यंत आपण अगोदरच तेथे जाऊं आणि तेथील हालहवाल काय आहे ती पाहूं. ते पहा, सदरेवरच एका प्रशस्त बैठकीवर तक्क्याला टेकून बाबूराव फडणीस आडवे झाले आहेत, आणि मोरोबा फडणीस त्याचे कपाळ चेपीत बसले आहेत. थेऊरास जाण्यासाठी बांधलेले सर्व सामानसुमान जागच्याजागी राहिलें असून गाड्याही दाराबाहेर तशाच ताटकळत उभ्या आहेत. वर नमूद केलेल्या केसोपताच्या उत्तरावरून वाचकास बाबूरावाच्या विकृतीची थोडीबहुत कल्पना आलीच असेल. बाबूरावाचे वय या वेळी पाउणेंशच्या सुमाराचे असूनही म्हातारा चांगला निरोगी आणि धट्टाकट्टा होता. म्हाताऱ्याचें नाना फडणिसावर चांगले प्रेम होतें. पण बाबूरावाचा मुलगा मोरोबा नानाचा मनांतून फार मत्सर करीत असल्यामुळे, त्याने बापाच्या मनात असें भरवून दिले की, नाना जर थेउरास श्रीमंताच्या जवळ एकटेच राहिले, तर आपली फडणिसी ते एकटेच बळकाऊन बसतील, सबब त्याना तशी सधी मिळूं न देण्याकरिता आपण थेऊरास जाणे जरूर आहे. भोळ्या बाबूरावाला मुलाचें बोलणें पटलें आणि त्याने थेऊरास जाण्याची तयारी केली. पण आज ऐन निघण्याचे वेळीं डोकें एकदम जड झाल्यासारखे होऊन त्याला भोंवळ येऊं लागली. त्याबरोबर त्याने कान्होबास बोलावून आणण्याकरिता केसोपंत कारकुनास पाठविले आणि आपण आल्याच्या रसातून थोडी खडीसाखर घेऊन तो अमळ विसावा घेण्यासाठी ह्मणून सदरेवर पडून राहिला. इतकी प्रस्तावना केल्यावर आतां कथासूत्र पुढें चालवूं.

'दादा,' मोरोबा फडणीस कपाळ चेपता चेपता वडिलास विचारतो, 'आतां आपणास अमळ बरें वाटलें का?'

'नाहीं रे मोरू,' बाबूराव कण्हत ह्मणाला, 'मला फारच कासावीस होतें आहे, आणि कपाळ अगदीं जड झालें आहे. पण कान्होबा नाहीं कां अजून आले?'

'नाहीं आले, पण इतक्यांत येतील,' मोरोबा ह्मणाला, 'पण दादा, खरें सांगूं कां, आपणास जर इतकें कासावीस होतें आहे, तर कान्होबासारख्या नवशिक्याला प्रकृति दाखविण्यापेक्षां लागवणकर वैद्यांना दाखविलेली बरी नव्हे का?'

'भलतेंच कांहीं तरी!' बाबूराव अभिमानपूर्वक ह्मणतो, 'कान्होबांना तूं हवे तर नवशिके ह्मण, पण मी ह्मणावयाचा नाहीं. त्यांनीं गंगा विष्णूजवळ एक तप काढलें आहे ह्मणून सदाशिव दीक्षित दाते सांगत होते. मागें माझा पोटशूळ त्यांनीं कसा हा हां ह्मणता थांबवला, तुला नाहीं का आठवत?'

मोरोबा यावर कांहीं तरी बोलणार होता, पण त्याला बोलावयास फुरसत झाली नाहीं. कारण तितक्यात कान्होबाची स्वारी पालखींतून उतरून आली व सदरेच्या पायऱ्या चढूं लागली. कान्होबांना पाहताच मोरोबानें आपल्या ओठावरचे शब्द तसेच दाबले, आणि स्मित करीत तो कान्होबांना ह्मणाला, 'या वैद्यराज, अगदीं वेळेवर आलात. दादा आपलीच वाट पाहत होते-'

'आपलें बोलावणेंही अगदीं वेळेवरच आलें,' कान्होबांनीं उत्तर केलें, 'कारण आणखी एक घटकाभर जाता, तर मी थेऊरास जात होतों.'

'थेऊरास का?' मोरोबानें सकौतुक पृच्छा केली, 'श्रीमंतांची प्रकृति पहावयास वाटतें? बाकी, आतां आपली तेवढी भावभगत राहिली आहे. बाकीच्या वैद्यांनीं श्रीमंतांच्या प्रकृतीपुढे केव्हांच हात टेकले आहेत.'

'चालावयाचेंच' कान्होबा विनय दर्शवीत ह्मणाले, 'मी तरी त्यांच्यापेक्षा काय असा लागून गेलों आहे ह्मणा, पण श्रीमंतांची पुण्याई आणि गंगा विष्णूंची कृपा यांच्या जोरावर यश मिळवीन ह्मणतों.'

बोलतां बोलतां कान्होबा बाबूरावाच्या जवळ गेले, आणि खालीं बसून त्यांनीं बाबूरावाचा हात उचलला व त्याची नाडी पाहिली. नंतर तोंडानें कांहीं श्लोक पुटपुटत त्यांनीं बाबूरावाची डोळे व जीभ पाहिली, आणि बरोबर आणलेल्या पडशीतून कसलीशी पूड काढून ती त्याला हुंगावयास दिली. बाबूराव कण्हत उठून बसला आणि त्यानें ती पूड नाकाशीं नेली मात्र, तोंच काय चमत्कार सांगावा? त्याला पटापट दहावीस शिंका येऊन त्याचें मस्तक एकदम

हलकें झालें, आणि त्याला हुशारी वाटूं लागली. त्याबरोबर म्हातारा जय-मुद्रेनें मोरोबाकडे पहात म्हणाला, ' मोरू, पाहिलीस ना कान्होबांचा चमत्कार ! अरे बाबा, कसे झाले तरी गंगा विष्णूचे शिष्य आहेत ते ! '

कान्होबांना आपली प्रशंसा ऐकून फार आनंद झाला. ते म्हणाले, ' दादा, असल्या क्षुद्र विकारांना बरे करण्यांत विद्या कसली ! आतां आपला पोटशूळ बरा झाला, तो माझ्या कसबानें झाला म्हटलेंत तर एक वेळ कबूल करीन. पण तेव्हां देखील आपणास दिलेलें औषध गुरुजींच्या पाठांतलें नव्हतेंच हो ! '

' काय म्हणतां ? ' बाबुराव विस्मयानें आ वासून म्हणाला, ' तर मग तें औषध तुम्ही आपल्या कल्पनेनेंच तयार केलें होतें कीं, काय ? मोरू, ऐकलेंस ना ? कान्होबांची विद्या पाहून ठेव म्हटलें ! आमचा नाना तरी काय खुळा आहे, श्रीमतांना केव्हांच कान्होबांचें औषध सुरू करावयाचें सोडून त्यांना भलतीं भलतीं औषधें देत बसला आहे तो ! '

' देऊंद्यात, देऊंद्यात ', कान्होबा म्हणाले, ' अखेर श्रीमंतांना बरें करण्याचा मान मजकडेच येणार आहे. '

बाबूराव यावर कांहीं तरी बोलणार होता, इतक्यांत वाड्यांतून एक पालखी कान्होबांना बोलावण्यासाठीं आली आहे अशी एका खिजमतगारानें येऊन वर्दी दिली. त्याबरोबर कान्होबा दुणादिशीं उडी मारून उभे राहिले. आपण ज्या क्षणाची आतुरतेनें वाट पाहत आहों, तो अखेर आला असें त्यांना वाटलें आणि त्यांनीं आतुरतेनें त्या हुजऱ्यास विचारलें ' कायरे, कोणास पहावयास जावयाचें आहे, कांहीं कळलें का ? '

" दादासाबांच्या तैनातींतलऽ तिर मंगलाचारी म्हनून कोनी हैत त्येंना बगाया जायचं हाय मनत्यात. " हुजऱ्यानें उत्तर केलें.

कान्होबांचा अमळ विरस झाला. तथापि तो बाहेर दिसूं न देतां ते बाबूरावा-कडे वळून म्हणाले, " बरें दादा, मी वाड्याकडे जाऊन त्रिमंगलाचार्यांना पाहून येतों. आपणांस आतां बरें वाटलेंच आहे. पुन्हा जडपणा वाटला; तर आणखी एकदा हेंच औषध दुंगा म्हणजे झालें. " असें म्हणून कान्होबांनीं औषधाची एक पुडी करून मोरोबाचे हातीं दिली आणि ते पायऱ्या उतरून पालखींत जाऊन बसले.

कान्होबांना जाऊन एक घटका झाली असेल नसेल, इतक्यांत बाबूरावाच्या नाकाला आंतून खाज सुटली, आणि त्यानें नाकपुडीच्या मध्यावरच्या हाडावर

सहज अमळ खाजविलें. झालें, तेवढेंच निमित्त पुरेसें होऊन घटकाभराच्या आंत तेथें एक तांबडी लाल पुळी उठली. क्षणभरांत ती टपोरी दिसूं लागून त्यांच्या साऱ्या मस्तकांत एकदम वेदना सुरू झाल्या, आणि मस्तकाला सूज चढूं लागली. कान्होबांच्या घराकडे तातडीनें बोलावणें पाठविण्यांत आलें, पण ते अजून वाड्यांतून घरीं परत आले नाहींत असें कळलें. बाबूराव तर अगदीं घाबरा झाला. तेव्हां कान्होबांच्या येण्याची वाट न पाहतां मोरोबानें लागवणकरांस बोलावून आणलें. लागवणकरांनीं येतांच बाबूरावाची पुळी तपासली, आणि नाकात कसला तरी विषारी जिन्नस गेला असून नखानें खाजविल्यामुळे तो त्वचेंत भिनला आहे असें निदान केलें, आणि दूषित रक्त काढविण्याचा सल्ला दिला. त्याप्रमाणें संध्याकाळच्या सुमारास रक्त काढविण्यांत आलें, तरी उतार पडेना. तिनीसांजच्या सुमारास बाबुरावाचें सारेंच मस्तक सुजेनें व्यापलें आणि ती सूज डोळयापर्यंत चढून त्याला दिसेनासें झालें. लगेच थेऊरास निरोप पाठवून नाना फडणिसांस बोलावून आणाविण्यांत आलें. त्याच्या बरोबर हरिपंत फडकेही आले. रात्रीच्या वेळीं कान्होबा बाबूरावाला पहावयास आले, तेव्हां लागवणकरांस आणल्याची आणि रक्त काढवल्याची हकीगत त्याना कळली. त्याबरोबर ते रागाने बेफाम झाले आणि लागवणकरांस अद्वातद्वा शिव्या देऊं लागले. इतक्यांत लागवणकरही आले, आणि मग त्या दोघांची जी एकच लाथाळी सुरू झाली, ती नाना व हरिपंत यांनाही सोडावितां येईना! लागवणकरांचे ह्मणणें असें पडलें कीं कान्होबांनीं बाबूरावाला जें औषध हुंगावयास दिलें, त्याचें विष बाधूनच हा वाखा झाला असला पाहिजे! उलट पक्षीं कान्होबा ह्मणूं लागले कीं, शिंका येऊन मस्तक हलकें झाल्याच्या स्थितींत रक्त काढविण्याचा मूर्खपणाचा सल्ला देऊन लागवणकरांनींच बाबूरावाची प्रकृति इतकी विकोपाला नेली आहे!! होतां होतां दोघेही अगदीं हातघाईवर आले असें पाहून नाना मध्यें पडले आणि त्यानीं त्या दोघांचीही समजूत काढून त्यास गप केलें. कान्होबा फणफणत घराकडे निघून गेले. बाबूरावाची अवस्था मात्र क्षणाक्षणाला अधिकाधिक बिकट होत चालली. तो थोड्याच वेळात बेशुद्ध झाला. आप्तेष्टांनाही तो थोड्या वेळाचाच सोबती आहे हे समजून आलें. मोरोबा पटवर्धन वगैरे त्याचे स्नेही येऊन त्याला भेटून गेले. उत्तर रात्रीं त्याचा वाखा अगदींच विकोपास गेला. लागवणकरांनीं रात्रभर जागून आपल्याकडून उपायांची शिकस्त केली, पण तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. कान्होबांनाही पहाटेच्या वेळीं

बोलावणें पाठविण्यांत आलें, पण त्यांनीं येण्याचें साफ नाकारलें! षष्ठीच्या दिवशीं सकाळींच बाबूरावाचें प्राणोत्क्रमण झालें. त्याची बायको सती गेली.

कान्होबांना ही हकीत समजली, तेव्हां बाबूरावाच्या मरणाचें दुःख त्यांना कितपत वाटलें हें आपणास समजावयास मार्ग नाहीं, पण लागवणकरांच्या मत्सरी स्वभावामुळें आपण नाना फडणिसांच्या नजरेंत तर कदाचित् उतरलों नाहींना, अशी शंका त्यांच्या मनांत येऊन त्यांना मनस्वी चुटपुट लागून राहिली, आणि लागवणकर वैद्यावरचा त्यांचा रोष शतपट वाढला! त्या तावांतच त्यांनीं आपल्या नोंदवहीवर पुढील नोंद केलीः—

| रोग्याचें नांव व ठिकाण | रोगी आल्याची मिति | बरा हो. गे. मि | दगा. मि. | शेरा. |
|---|---|---|---|---|
| बाबुराव फडणीस पुणें. | श्रावण शु. ५ शके १६९४ | | श्रावण शु. ६ शके १६९४ | बरा असतां असतां असतां मूर्ख वैद्याच्या नादीं लागून भलतेंच उपचार केल्यानें मेला |

---

## प्रकरण ४४ वें.

खरे ले. १२१९ इ. } **वैद्यराज नमस्तुभ्यम्!** { मंगळवार, आश्विन शु० १० शके १६९४

मागील प्रकरणांत सांगितलेली हकीगत घडून दोन महिने होऊन गेले असून आज आश्विन शुद्ध दशमी होती. आज वाचकांस आह्मी थेऊर येथील श्रीमंतांच्या मुक्कामास घेऊन जात आहोंत. आपण प्रस्तुतच्या दुखण्यांतून वांचत नाहीं, अशी खात्री होतांच श्रीमंतांनीं आपल्या अखेरच्या निवासाकरितां थेऊर हेंच स्थान जें पसंत केलें त्याला अनेक कारणें होतीं. एक तर थेऊर येथील गणपतीची मूर्ति स्वयंभु असून फार जागृत आहे असा त्यांचा पुरता विश्वास होता. अर्थात् ‘ शरीरे जर्जरीभूते व्याधिग्रस्ते कलेवरे । औषधं जान्हवीतोयं वैद्यो नारायणो हरिः ॥ १ ॥’ या सर्वप्रसिद्ध न्यायाचा अवलंब करून अनुष्ठानें, जप, तप, इत्यादि साधनांनीं श्रीगजाननाची आराधना करून त्याच्यापाशींच आरोग्याची याचना करावी असें श्रीमंतांस वाटणें स्वाभाविक होतें. दुसरें कारण असें कीं, थेऊर हें त्याकाळीं मुळा-

मुळेच्या काठचें अत्यंत रमणीय खेडें असल्यामुळें श्रीमंतांना प्रस्तुत पाहिजे असलेल्या एकांत विश्रांतीचें सुख त्यांना तेथें लाभणार होतें. तिसरें कारण असें कीं थेऊर हें पुण्याच्या पूर्वेस अवघ्या पांचच कोसांवर असल्यामुळें कारभारी आणि सरदार सरंजामदारमंडळी जरी श्रीमंतांच्या बरोबर तेथें येऊन राहिली, तरी कारभाराच्या बंदोबस्तास कसलीही अडचण पडणारी नव्हती. अशा अनेक गोष्टी मनांत आणूनच श्रीमंतांनीं आपल्या अखेरच्या निवासस्थानासाठीं थेऊरची निवड केली होती.

आणि थेऊरचें स्थान श्रीमंतांच्या पसंतीस उतरण्याजोगें खरोखरीच रमणीय व पावन होतेंही. आमच्या वाचकांपैकीं ज्यांनीं आजचें थेऊर पाहिलें असेल त्यांना हिरव्याचार घाणीनें आच्छादिलेलें नदीचें पात्र, त्याच्या वरच्या बाजूस ओसाड व खडकाळ असा तटप्रदेश, आणि त्याला लागून असणारें पडक्या भिंताडांनीं, धुळीच्या ढिगांनीं, आणि निवडुंगाच्या फडांनीं गजबजलेलें एक गलिच्छ खेडें एवढाच देखावा दिसला असेल. फार काय, पण पेशवे सरकारांचा राहता वाडा आणि गजाननाचें देवालय हींही त्याला मोडक्या तोडक्या स्थितींत अश्रु गाळतांना दिसलीं असतील! महाराष्ट्र देशाला कंठमण्याप्रमाणें शोभणारें पुणें शहर आज स्वराज्यप्राप्तीच्या चळवळींत उत्साहानें पुढाकार घेत असतां श्रीमंत पेशवे सरकाराचा थेऊर येथील वाडा धूळ खात पडला आहे, आणि पुण्याचा शनिवारवाडा तर प्रत्यक्षच धुळीस मिळाला आहे; पण या गोष्टीची पुणें शहराला दाद देखील नाहीं! थेऊरचा आणि पुण्याचा नगारखाना आपआपलीं हत्यारें काळाच्या गवसणींत घालून चूप झाले आहेत, पण पुण्याचें इतिहाससंशोधनाचें तुणतुणें चालूंच आहे! थेऊर येथें पतीमागून सती गेलेल्या श्रीमंत रमाबाईसाहेबांच्या वृंदावनावर कसलेही आच्छादन किंवा कसलाही सौभाग्यालंकार नाहीं, पण पुण्याच्या गंध्याच्या दुकानात रोज हजारो वेण्याचा आणि गजऱ्याचा खप चालूंच आहे! स्वराज्यकालीन वैभवाचे हे अवशेष पुण्यप्रताप माधवराव पेशवे, नाना फडणीस, गोपाळराव पटवर्धन, हरिपंत फडके, महादजी शिंदे, मल्हारबा होळकर, इत्यादि अनेक राष्ट्रपुरुषांचे मूक पोवाडे गात आहेत, आणि आपली कदर करणारे भक्त कोणी राहिले नाहींत हे मनांत आणूनच कीं काय, धूलिकणरूपी अश्रु ढाळताहेत, तर त्याच राष्ट्रवीरांचे आजचे वंशज नाटकें सिनेमाच्या सजावटीत आणि कृत्रिम व बेगडी मानमरातबाच्या संपादनांत चूर आहेत! ही स्थिति पुण्याला आणि एकंदर महाराष्ट्राला कितपत भूषणभूत आहे, हें आम्ही सांगावयास पाहिजे असें नाहीं!

तथापि हें विषयांतर सोडून आमच्या कथानकाच्या कालीं थेऊरचे खेडें कसें दिसत होतें हें वाचकांस निवेदन करणें जरूर आहे. त्या काळचें थेउर म्हणजे सौंदर्य, पावित्र्य आणि आनंद यांचें माहेरघर होतें. गांवाच्या मध्यभागीं असलेलें तें स्वयंभु गणपतीचें रम्य मंदिर, गजाननाची ती दोन हात उंचीची सुंदर मूर्ति, त्याच्या पुढचा तो प्रशस्त सभामंडप, हा साराच देखावा मोठा मनोहर होता. हें देऊळ पूर्वाभिमुख असून त्याच्या सभोंवती मजबूत तट होता, तटाच्या उत्तर, पूर्व, आणि दक्षिण अशा तिन्ही बाजूंना ओवऱ्या काढल्या असून उत्तरेला प्रवेशद्वार होतें. पूर्वेकडील बाजूला नऊ ओवऱ्या असून त्यांच्यावर नगारखान्याची माडी होती. दक्षिणेकडील तटाच्या उत्तरांगाकडे चार ओवऱ्या असून त्यांवरील माडीवर सरकारी कचेरी होती. मुख्य देवळाच्या पिछाडीला एक लहानसें विष्णूचें देवालय असून उत्तरेकडील बाजूला एक पिंपळाचा पार होता. पाराच्या समोर दोन खांबांवर एक आडवा गज टाकून त्याला फादर फ्रेल नांवाच्या पाद्यानें श्रीमंतांना नजर केलेली प्रचंड घंटा टांगली होती. या देवळाला लागूनच उत्तरेच्या बाजूला पेशवे सरकाराचा प्रचंड वाडा असून त्याला उत्तरेकडे दोन आणि दक्षिणेकडे दोन असे चार दरवाजे होते. हा वाडा उत्कृष्ट शृंगारलेला असून आमच्या कथानकाच्या काळीं आपल्या ऐन वैभवांत चमकत होता. देवळाच्या पिच्छाडीस थोड्या अंतरावर मुळामुठा नदीचे पात्र वाहात असून, त्या पात्राच्या तीरावरून रम्य वनश्री पसरली होती. गांवापासून पात्रापर्यंत एक छोटी पायवाट बांधून काढली होती. साराश, गजाननाचा शेजार, स्वराज्याची प्रेमळ छाया, आणि निसर्ग-शोभेची अनुकूलता असा त्रिवेणीसंगम जुळून आला असल्यामुळे, थेऊरचें खेडें विद्वान ब्रह्मवृंदाच्या आणि भाविक यात्रेकरूंच्या गर्दीने नेहमी गजबजलेलें दिसत असे.

श्रीमंताची स्वारी आषाढ वद्य त्रयोदशीस थेऊरास रहावयास आली हे वाचकास ठाऊकच आहे. चतुर्दशीच्या दिवशीं कारकून, प्यादे वगैरे श्रीमंतांचा इतर परिवार आला, त्यास श्रीमंतानी मारहाण केली हेही वाचकांस कळलेच आहे. थेउरास आल्यावर तूर्त तेथेच कायम वास्तव्य करण्याचा आपला मनोदय श्रीमंतांनी व्यक्त केला. प्रस्तुत त्याना औषध मुळींच चालू नव्हतें म्हटले तरी चालेल. कनिगॅहम काकाचें औषध तर केव्हाच बंद झाले होते. नंतर कांहीं दिवस स्वतः दादासाहेबांनीं श्रीमंतांना औषध देऊन व मंत्रतंत्राचे प्रयोग करून पाहिले, पण त्यानें कांहीं गुण येत नाहींसें पाहून त्यांनीं आपले प्रयोग हळूच

बंद केले, आणि ते तुळापुराकडे निघून गेले! आपण या दुखण्यांतून वांचत नाहीं हें श्रीमंतांनीं केव्हांच ओळखलें होतें, म्हणून ते औषधाविषयीं उदासीन झाले होते, आणि राज्याची व्यवस्थित निरवानिरव करून गजाननाच्या पायाजवळ देह ठेवावा, असा त्यांनीं विचार केला होता. अर्थात् आतां औषधपाण्यानें आणि कडक पथ्यानें देहाला शीण देणें नको वाटण्याजोगी त्यांची मनस्थिति झाली होती यांत नवल नाहीं. ते आतां मन मानेल तसें आणि तेव्हां खात पीत होते. एका शब्दांत सांगावयाचें ह्मणजे श्रीमंत आतां मृत्यूच्या दारीं पडले असून आपल्या आयुष्याचे उरलेले क्षण मोजीत होते.

श्रीमंतांची मनस्थिति जवळच्या मंडळींना कळतांच त्यांच्यामध्यें मोठाच हाहाःकार उडाला! श्रीमंतांच्या अखेरच्या सहवासाकरितां पुण्याहून श्रीमंतांचे सेवक, आप्तेष्ट व हितचिंतक भराभर थेउरास जमूं लागले. सखाराम बापू नाना फडणीस, हरिपंत फडके, नारायणराव पेशवे, आनंदराव रास्ते, आनंदराव खासगीवाले, कृष्णराव काळे, अप्पाजीराव पाटणकर, खंडेराव दरेकर इत्यादि आप्त, मानकरी व मुत्सद्दी आणि इच्छारामपंत ढेरे, गंगाधरपंत ओक, इत्यादि कारकून मंडळी थेऊरास जमली. श्रीमंतांना एखाद्या चांगल्या वैद्याचें औषध सुरू करावें, असा मंडळीमध्यें खल सुरू झाला. त्यावेळीं चांगले ह्मणण्याजोगे दोन तीन वैद्य दक्षिणेंत प्रसिद्ध होते. एक नाशिकचे गंगा विष्णु महीधर, दुसरे तेरदळचे रणछोड नाईक, आणि तिसरे सातारचे रूपेश्वरबुवा. या तिघांतही गंगा विष्णूची औषधयोजनेबद्दल फारच प्रसिद्धि होती. शिवाय तो नुकताच पुण्यास आला होता, आणि श्रीमतांना त्याचें औषध सुरू करण्याचें घाटतही होतें, इतक्यांत गंगापुरास गोपिकाबाईची प्रकृति बिघडल्याचें कळतांच श्रीमंतांनीं त्यास तिकडे पाठवून दिलें होतें. त्याच्या औषधानें गोपिकाबाईस ताबडतोब गुणही आला होता. हा सर्व विचार मनांत आणून श्रीमंतांच्या कारभारी मंडळींनीं श्रीमंतांना गंगा विष्णूचेंच औषध द्यावयाचें ठरविलें, आणि श्रीमंतांपाशीं त्याबद्दल गोष्ट काढली. श्रीमंत आतां औषधाला व पथ्याला अगदींच कंटाळले असल्यामुळें त्यांनीं गंगा विष्णूचें औषध घेण्याच्या कामीं पुष्कळ आढेवेढे घेतले. पण नानांच्या, हरिपंत फडक्यांच्या आणि मुख्यतः रमाबाईच्या आग्रहापुढें त्यांचा नाइलाज होऊन त्यांनीं अखेर त्या वैद्याचें औषध घेण्यास कबुली दिली. लगेच गंगा विष्णूस पालख्यांची डांक ठेऊन आणविण्यांत आलें. तो आश्विन शुद्ध नवमीस पुण्यास येऊन कान्होबा शतघ्ने यांचे घरीं उतरला. आज ह्मणजे दस-

त्याच्या मुहूर्तावर त्याला प्रकृती दाखवून त्याचें औषध सुरू करण्याचें ठरलें होतें. पण इतक्यांत श्रीमंतांच्या मनांत कांहीं कल्पना येऊन त्यांनीं डॉक्टर कनिंगहॅम यास पुण्यास निरोप पाठवून अणाविलें. कनिंगहॅमकाका सकाळीं लवकरच येऊन थेऊरास दाखल झाला. त्यानें येतांच आपल्या रिवाजाप्रमाणें श्रीमंतांची प्रकृति एकवार काळजीपूर्वक तपासून पाहिली, आणि त्यांच्या चालू औषधपाण्यासंबंधानें बारकाईनें चौकशी केली. श्रीमंतांनीं कणीघाम काकाचे औषध बंद केल्यास आज दोन महिने होऊन गेले होते. एवढ्या अवधींत त्यांच्या प्रकृतींत जमीन अस्मानाची तफावत पडलेली कनिंगहॅमला दिसून आली. त्यांचीं गालफडें बसलीं होतीं, डोळे खोल गेले होते, हातापायांच्या काड्या झाल्या होत्या, आणि त्यांची अस्थिपंजरमात्र देहयष्टि निःसत्व आणि शक्तिहीन झाली होती. अलीकडे अलीकडे तर त्यांना कफ झाला असून त्यातून थोडथोडें रक्तही पडूं लागलें होतें. त्यांच्या पायावर मृत्यूची संदेशसूचक सूजही दिसूं लागली होती. त्यांना वाड्यांतील दिवाणखान्यात निजविण्यांत आलें असून त्यांच्या आसपास सुवासिक उदबत्त्या व अगरबत्याही पेटविण्यांत आल्या होत्या. त्याच्या उशाशी सुवासिक फुलें आणि अत्तराचे फायेही ठेवण्यांत आले होते. कणीघाम काका श्रीमंतांची प्रकृति पाहत असताच आपण तेथे प्रवेश करीत आहोंत.

डाक्तर बराच वेळ श्रीमंतांची प्रकृति पाहात होता. त्यानें त्यांची छाती, नाडी, डोळे, जीभ, फुपुसे, पाठ वगैरे मर्में काळजीपूर्वक तपासून पाहिलीं. तीं पाहून होत असता त्याच्या चर्येवर आपोआपच एक उद्विग्नतेची चोरटी छटा पसरली, आणि त्याच्या तोंडांतून एक दीर्घ निश्वास निघून गेला! आपल्या वृत्तीचा श्रीमंताच्या मनावर अनिष्ट परिणाम होईल हें ओळखूनच कीं काय, त्याने लगेच आपल्या चेहऱ्यावर स्मित आणले व तो म्हणाला, 'शिरमंट, आपल्या टबेटीट काइ अडिक सुडारना जालेली डिसट नाई. सद्ध्या डवा कोनाचा चालू आए? कोना टरी चांगल्या वैड्याचा असला मनजे मग काई हरकट नाई.'

'डाक्तर,' श्रीमंत क्षीण आवाजात ह्मणाले, 'त्या बाबतींतच तुमचा सल्ला घेण्यासाठी मी आज तुम्हांला बोलाविलें आहे. माझा तुम्हास आगोदरच असा प्रश्न आहे कीं, माझा व्याधि बरा होण्याजोगा आहे कां?'

'शिरमंटाच्या प्रश्नाचें उट्टर डेने कठिन आए,' कणीघामकाका ह्मणतो, 'मनजे मला या प्रस्नाचें उट्टर डेटा एनार नाई असे नाई; पन आजारी

मानसाला असल्या प्रस्नाचे उट्टर डेऊ नए अशी आमा डाक्टर लोकांची सिस्ट आए.'

'तुमची शिस्त माझ्या लक्ष्यांत आली, आणि तिचा हेतुही मला समजला,' श्रीमंत ह्मणाले, 'पण माझी गोष्ट इतर माणसांसारखी नाहीं. माझ्या बऱ्यावाईटावर साऱ्या मराठी राज्याचें भवितव्य अवलंबून आहे. आणि ह्मणूनच मी मरणार असें जर निश्चित ठरलें तर मला राज्याची निरवानिरव केली पाहिजे, आणि या करितांच मला तुमचें स्पष्ट उत्तर पाहिजे आहे. मी घाबरून जाईन म्हणून जर तुम्ही उत्तर देण्याचें टाळीत असाल तर ती तुमची भीती अनाठायीं आहे. तोफांच्या गोळ्यापुढें छातीचा कोट करून उभा राहणारा मी--'

'टे मी जानटो,' कणीधाम काका श्रीमंतांस मध्येंच अडवीत ह्मणाला, 'आनि मनूनच मला शिरमंटांच्या टब्बेटीसाटीं रिग्रेट्--आय मीन् खेड वाटटो. आटा शिरमंटांच्या प्रश्नाचे उट्टर जरी मला डेटा एट नाई, टरी मी शिरमंटांस इटकें सुचविटो कीं, ट्यांनीं आपल्या राज्याचा बंडोबस्ट मनाप्रमाने करावा. निडान ट्याट वाईट टरी काई होनार नाई!'

'समजलों, समजलों,' श्रीमंत म्हणाले, 'माझ्या मरणाची कल्पना तुमच्यानें बोलून दाखवत नाहीं हेंच खरें! माझा व्याधि पहिल्यापासूनच दुर्धर होता, आणि तो तुम्ही आपल्या औषधोपायांच्या जोरावर इतके दिवस थोपवून धरला होता, यांत शंका नाहीं. अजूनही मला तुमचेंच औषध चालूं असतें, तर माझें मरण आणखी बरेच दिवस लांबलें असतें असें मला वाटतें.'

'शिरमंटांची या बाबटीत गैरसमज जालेली डिसटे,' कणीधाम उद्गारला, 'शिरमंटाना जी बिमारी जाली आए टिजवर कोनापासीच डवा नाई. निडान आमा डाक्टर लोकापासी खराच नाई. अटाट शिरमंटांची टब्बेट आज पाच साट वर्से जी टिकून राइली टी माज्या डव्याने नाई, टर, बिमाराची पुरी वाड जाली नवटी मनून राइली. माज्या डव्याने फार टर टी मुडट ठोडी लांबवली असेल, इटकीच गोस्ट आए.'

'तर मग आतां कारभारी मंडळींनीं मला गंगा विष्णूचें औषध घेण्याचा जो आग्रह चालविला आहे, त्याचा तरी काय उपयोग आहे?' श्रीमंतांनीं प्रश्न केला' त्यानें मला पथ्याचा मात्र उगाच शीण होणार आहे, नव्हे कां?'

'टसेच केवल मनटा एनार नाई,' कणीधामकाकानें उत्तर केले, 'ट्यांच्या पासी चांगला डवा असला, तर ट्याचा उपयोग होनारच नाई असे कसे मनटा

एईल ? आनि टसे असलें टर शिरमंटानी टयांच्या मनन्याप्रमाने पटथ केले पाहिजे."

"बरें" श्रीमंत ह्मणाले, "तुमचेंही तसेंच मत असलें, तर मी त्यांचें औषध एक सप्तक घेऊन पाहतों. पण तुह्मी मात्र वरचेवर येऊन मला भेटून जात चला, एवढी माझी तुह्मांला विनंती आहे."

कर्णीघाम काकाला हुंदका आवरेना. श्रीमंतांच्या गेल्या पांच सहा वर्षांच्या सहवासाची त्याला आठवण झाली, आणि त्याच्या पोटांत भडभडून आलें! तो सद्‌गदित होऊन ह्मणाला, "शिरमंटांचा मी नेअमीच आड्न्याडारक नोकर आए, जरूर एट जाईन."

"डाक्तर," श्रीमंतही कंठ दाटून येऊन ह्मणाले, "तुमच्या औषधाला यश आलें नाहीं, गजाननाची मर्जी! पण तुमचा निष्कपट आणि प्रेमळ स्वभाव आणि तुह्मी केलेली माझी हलाल चाकरी हीं मात्र मी कधी विसरणार नाहीं. तुमच्या श्रमाचें पर्यवसान याहून वेगळ्या तऱ्हेनें व्हावयास पाहिजे होतें, पण आता तें बोलून काही उपयोग नाहीं. काळानेंच आपली ताटातूट करण्याचें योजिलें आहे-"

"श्रीमंटांनीं असा असा ढीर सोड्डू नये" कर्णीघाम काका अश्रु ढाळीत ह्मणाला, "प्रॉव्हिडन्स् - आय् मीन गजानन डया करील, टर गंगा बिस्नूच्या डव्याला यश एईल. नाई कोनी मनावे ? बरें, मला आटा जान्यास परवानगी असावी. टे वैड्य एनार आएट, ट्यांना मी एटे असलेला कडाचित् आवडनार नाई."

श्रीमंतांनीं स्मित करून कर्णीघाम काकास निरोप दिला. फिरंगी डाक्तर व हिंदु वैद्य यांच्या वागणुकींतला विरोध मनात येऊन त्यांना मोठी मौज वाटली. कर्णीघाम काका नको नको म्हणत असतां श्रीमतांनीं त्याच्या बरोबर पांच हजार रुपयाचे तोडे देऊन त्याची रवानगी केली. थोड्याच वेळांत नाना फडणिसांच्या पुरःसरत्वा-खालीं गंगा विष्णू महीधर जिन्याच्या पाहिऱ्या चढून वर आले. पण त्यांच्या मागोमाग हें कोण आहे? अरे हे तर आपले दोस्त कान्होबा शतघ्ने? होय वाचकहो, हे कान्होबा शतघ्नेच होते, आणि गगा विष्णु महीधरांच्या शिष्यत्व-प्रसंगानें त्यांना आज श्रीमंतांच्या सांनिध्यांत प्रवेश मिळाला होता! फारा दिवसांचा मनोरथ कोणत्या तरी रीतीनें कां होईना, सिद्धीस गेल्यामुळें वाटणारें समाधान त्यांच्या मुद्रेवर चमकत होतें. गंगा विष्णूनें एक भलें मोठें पागोटें घातलें होतें आणि अंगावर एक बाजीराव कांठीं धोतर दुहेरी करून घेतलें होतें. त्याचें नेसलेलें धोतरही

मोठ्या कांठांचें असून चांगल्या निगेमुळें त्याच्यावर गुलाबी रंग चढला होता. गंगा विष्णूचा रंग काळा कुळकुळीत, नाक मोठें व ठसठसीत, आणि डोळे मोठे व पाणीदार दिसत होते. त्याचा बांधा मध्यम उंच व किंचित् स्थूळ असून त्याच्या चर्येवर विद्वत्तेचें तेज चमकत होतें. तो जितका गुणवान् तितकाच निस्पृह व फटकळ म्हणून प्रसिद्ध होता. त्यानें मोठमोठे दुर्धर रोगी हजारांनीं बरे केले आहेत, असा त्याचा लौकिक होता, पण त्याच्या लहरी स्वभावामुळें त्याची मर्जी संभाळणें हें एखाद्या सुलतानाची मर्जी संभाळण्याइतकेंच दुर्घट होऊन बसलें होतें. त्याला आपल्या वैद्यकाचा मोठा अभिमान वाटत असून तद्व्यतिरिक्त वैद्यकांचें नांवही उच्चारलेलें त्याला खपत नसे. दिवाणखान्यांत आल्याबरोबर त्यानें एकवार श्रीमंतांकडे नजर टाकली व त्यांना नमस्कार केला. श्रीमंतांनींही अर्धवट उठून त्याचा नमस्कार घेतला, आणि त्यास आपल्या शेजारीं बसण्यास सांगितलें. नाना फडणीस व कान्होबाही श्रीमंतास नमस्कार करून खालीं बसले. नानानी गंगा विष्णूची श्रीमंताना ओळख करून दिली आणि त्याच्या औषधानें गोपिकाबाईस चागला गुण आल्याचीही आठवण करून दिली. तें ऐकून श्रीमंतानी वैद्यराजांची औपचारिक स्तुति केली व आपला हात त्यांना दाखविण्यासाठीं पुढें केला. गंगा विष्णूनें श्रीमंताची नाडी पाहिली, आणि तो नानाकडे पाहून ह्मणाला, " नाना, श्रीमंताच्या प्रकृतीची मला पहिल्यापासून एकदा सविस्तर हकीगत सागा पाहू. "

" हो, " दर्शन-स्पर्शन-प्रश्नैः परीक्षेताथ रोगिणम् " असा न्यायच आहे," कान्होबा गुरुजीच्या सूचनेला आधार देत ह्मणाले.

नानांच्या शिरावर ही मोठीच जबाबदारी येऊन पडली. कारण गंगा विष्णूच्या तऱ्हेवाईक स्वभावाची त्याना पूर्ण माहिती असल्यामुळे श्रीमंताच्या प्रकृतीची हकीगत सांगतांना, त्यांना पाचसहा वर्षे फिरंगी वैद्याचे औषध चालू होतें ही गोष्ट वैद्यराजापासून छपावेणें अत्यवश्य आहे या गोष्टीची त्यांना एकीकडून जाणीव होती; तर दुसरीकडून त्याचें नांव छपविल्यावर सांगण्याजोगें कांहींच शिल्लक रहात नाहीं, हेंही त्यांना कळत होतें. बरें तो सारा मजकूर थोडक्यांत सागावा ह्मटले तर तसेंही करणें शक्य नव्हतें. कारण श्रीमंतांच्या प्रकृतीची हकीगत म्हणजे चागला पाच सहा वर्षांचा इतिहास असून, तोही पुन्हा जगजाहीर होता, अर्थात् त्यांत काही दाबादाबी करण्याची सोय नव्हती. असा नानांना हा मोठाच पेंच येऊन पडला होता. पण फिरंगी वैद्यकाला, आणि वैद्याना नावें ठेऊन, राजेश्वरासारख्या वैद्याना भुरटे ह्मणून, आणि जागजागीं गंगा विष्णूची स्तुति करून नानांनीं आपलें काम मोठ्या

शिताफीनें पार पाडलें. नाना श्रीमंतांच्या प्रकृतीची हकीगत सांगत असतांना गंगा-विष्णू आपण होऊनही त्यांना मधून मधून कांहीं प्रश्न विचारीत होता, आणि नाना त्यांचीं समयोचित उत्तरें देत होते. शेवटीं एकदाची प्रकृति पाहून झाली. गंगा विष्णूनें व्याधीचें निदान करून कान्होबांकडे पाहिलें, त्याबरोबर कान्होबांनीं घडाघड राजयक्ष्म्याच्या निदानाचे श्लोक ह्मणून, त्याच्या असाध्यावस्थेचेही श्लोक ह्मणून दाखविले! नानांनीं त्यांस बोटानें खूण केली ह्मणून बरें, नाहीं तर कान्होबा त्या श्लोकाचा सुबोध मराठींत अर्थही सांगून मोकळे झाले असते!

निदान झाल्यावर चिकित्सेस प्रारंभ झाला. कान्होबानीं गुरुजीस कांही पाठ सुचविले, पण ते सशक्त मनुष्यालाही सोसण्याजोगे नव्हते! शेवटीं गंगा विष्णूनें काढ्याचे दोन पाठ आपल्याच मतानें कायम करून ते नानास लिहून घेण्यास सांगितले, आणि त्या काढ्यातून देण्याकरिता आपल्या बटवींतून एक मात्राही काढून दिली. औषधाचे अनुपान सांगून झाल्यावर त्यानें पथ्य सांगितलें. श्रीमंत एवढा वेळ सारा मजकूर स्तब्धपणे ऐकून घेत होते, पण गंगा विष्णूच्या तोडचें कडक पथ्य ऐकताच त्याच्या छातींत धडकी भरली व ते ह्मणाले, 'कायहो वैद्यराज, यापेक्षा सौम्य पथ्य नाही का?'

'या पेक्षा सौम्य विकार असता, ह्मणजे सौम्य पथ्य सांगितलें असते!' गंगा विष्णूनें ताडकन् उत्तर दिले.

श्रीमताच्या तापट स्वभावाला असले उद्धट उत्तर खपणार नाही हें नानांस ठाऊक होते. त्यानी श्रीमंताकडे एकवार नजर टाकली, तो त्यांच्या कपाळावर हजार आठ्या उमटलेल्या त्याना दिसल्या. आता लढित होणार हें ओळखून नाना मध्ये पडले व हंसत हंसत ह्मणाले, "तेही खरेंच वैद्यराज, यथा यक्षस्तथा बलिः. बाकी पुढच्या परिणामाची खात्री असली ह्मणजे पथ्याचे कष्ट सोसावया बद्दल आह्मी सर्व जण श्रीमंताना गळ घालूं."

"ती खात्री मी देतो," गंगा विष्णू ह्मणतो, "सात दिवस जर श्रीमंताना औषध सोसलें तर त्याना पूर्ण बरे करण्याची जोखीम मजकडे लागली!"

नानाच्या कौशल्यानें वेळ निभावून गेली. त्याच म्हणजे विजयादशमीच्या दिवसापासून श्रीमंतांना गगा विष्णूचें औषध सुरू झालें. थेऊरासच मुक्काम करण्याविषयीं नानांनीं गंगा विष्णूस फार आग्रह केला, कान्होबांनींही त्याना दुजोरा दिला. पण त्या तुसड्या वैद्याला तें न पटून तो कान्होबांना घेऊन पुण्यास परत गेला!

---

## प्रकरण ४५ वें

खरे, ले. १२०८-१२०९ } **दादासाहेबांच्या गणांची कारवाई.** { आश्विन शु.१० ता. ६-१०-१७७२

त्याच ह्मणजे विजयादमीच्या रात्रीं कान्होबा शतघ्न्यांच्या सोप्यावर तीन गृहस्थ गप्पागोष्टी करीत बसले होते. ते ह्मणजे कान्होबा शतघ्ने, त्यांचे गुरुजी गंगा विष्णु महीधर आणि सदाशिव दीक्षित दाते हे होत. मृत्युंजयाच्या अनुष्ठानासाठीं सदाशिव दीक्षित दाते वाड्यांत गुंतलेले असत व त्यांना झोंपही वाड्यांतच घ्यावी लागे हें वाचकांस ठाऊकच आहे. पण त्यांचे जुने दोस्त गंगा विष्णु आज फार दिवसांनीं पुण्यास आले असल्यामुळे, त्यांना भेटून घटकाभर त्यांच्याशी बोलून येण्याची परवानगी सदाशिव दीक्षितांना महादाजीपंत गुरुजींकडून मिळाली होती. त्याबरोबरच वाचकांना हेंही कळविले पाहिजे कीं, नाना फडणीस आणि सखारामबापू प्रस्तुत थेउरास जाऊन श्रीमंतांजवळ राहिले असल्यामुळें वाड्यांतील कारभारावरची देखरेख तात्पुरती महादाजीपंत गुरुजींकडे आली होती. सदाशिव दीक्षित वागणुकीचे खंबीर असल्यामुळें त्यांच्या शीलास मान देऊन, आणि अनुष्ठानही आतां संपत आलें आहे हें मनांत आणून महादाजीपंतांनीं त्याना गंगा विष्णूस भेटावयाला जाण्याची परवानगी दिली होती. दोघे जीवश्च कंठश्च सोबती पुष्कळ दिवसांनीं भेटल्यावर त्यांच्या ज्या प्रकारच्या गप्पागोष्टी होतात, तशाच आज गंगा विष्णु आणि सदाशिव दीक्षित यांच्या चालल्या होत्या. काशीस आपलें अध्ययन पुरें झाल्यावर आपण अनेक ठिकाणीं हिंडतां हिंडतां अखेर नाशिकास कसे स्थायिक झालों, आपणास कसकसे अनुभव आले, आपण कोणकोणते दुर्धर रोगी बरे केले इत्यादि हकीगत गंगा विष्णु दीक्षितांना सागत होता. अर्थात् त्यांत इतर वैद्यांचा व वैद्यकांचा भरपूर उपहास प्रकट होत होता, हें वाचकांस सांगावयास नकोच. उलट पक्षीं सदाशिव दीक्षितांनींही आपल्या बाळमित्रास आपल्या भटक्या भिक्षुकीची, नंतर झालेल्या लग्नाची, नंतर घेतलेल्या अग्निहोत्राची आणि अखेर पुण्यास मिळालेल्या आश्रयाची हकीगत तपशिलानें कळविली. कान्होबा या संभाषणांत फारसा भाग घेत नव्हते. ते नात्यानें व वयानें त्या दोघांनाही मुलाप्रमाणें असल्यामुळें त्यांना त्यांची मर्यादा संभाळणें भाग होतें. ते स्वस्थपणें आपल्या दोघा गुरुजनांचें संभाषण ऐकत होते, आणि मधून मधून एखादा शब्द बोलत होते. होतां होतां संभाषणाचा ओघ

श्रीमंतांच्या प्रकृतीकडे वळला. गंगा विष्णु आज सकाळींच थेउरास जाऊन श्रीमंतांना पाहून व त्यांना औषध सुरू करून आला असल्यामुळें, त्याच्या तोंडून श्रीमंतांचें प्रकृतिमान ऐकावें असें सदाशिव दीक्षितांना वाटणें स्वाभाविक होतें. त्यांनीं गंगा विष्णूस मोठ्या उत्सुकतेनें प्रश्न केला, "कायरे गंगाधर, श्रीमंतांची प्रकृति पाहून तुला एकंदरींत कांहीं आशा वाटली कां?"

"आशा आहे," गंगा विष्णू ह्मणतो, "पण श्रीमंतांच्या हातून पथ्य झालें पाहिजे ही एक गोष्ट, आणि त्यांना औषध सोसलें पाहिजे ही दुसरी गोष्ट."

"पथ्य होईल ह्मणा," सदाशिव दीक्षित ह्मणतात, "आमचे श्रीमंत तसे करारी आहेत."

"भ्रम आहे तुला सदाशिव," गंगा विष्णू मान हलवीत ह्मणाला, "अरे हे राजे लोक ह्मणजे पहिल्या प्रतीचे तब्बेतखोर, त्याच्याजवळ नेहमी हांजी हांजी करणारांचें वास्तव्य; अशा स्थितींत त्याच्या वागणुकीला धरबंध घालणार कोण? त्यातून तुमचे श्रीमंत तर फारच लहरी आहेत ह्मणून ऐकतो. ते आजपर्यंत एका फिरंग्याचेच औषध घेत होते ह्मणे! मग त्याना पथ्याची संवय कोठून असणार, तूंच सांग बरें?"

"ते काही असलें तरी तुझ्या औषधाचें पथ्य ते कांटेकोर संभाळतील अशी माझी खात्री आहे," सदाशिव दीक्षित आग्रहपुरःसर उद्गारला.

"तसे झाले तर बरेंच," गंगा विष्णू ह्मणतो, "पण पुन्हा औषध सोसलें पाहिजे ही अडचण आहेच. कायरे कान्होबा, श्रीमंतांना हल्लींच्या स्थितींत त्रैलोक्य चिंतामणि--सोसेल कारे?"

"मला नाही वाटत सोसेलसा," कान्होबा ह्मणाले, "बाकी त्यांच्या प्रकृतीचा मला तितकासा अदाज नाही हेंही खरें. मी त्याना अद्याप कधी औषध दिलेंच नाही. दादासाहेबाची आणि त्यांच्या परिवाराची प्रकृति मी पुष्कळदा पाहिली आहे, त्यापैकीं एकाला पहावयास जाण्यासाठी हल्लीं रोज मला पालखी येते—"

'काय गुलाम सांगतो आहे, पालखी येते!' सदाशिव दीक्षित तुच्छतेनें ह्मणतात, 'एवढे लागवणकर राजवैद्य पडले आहेत त्याना पालखी नाहीं, आणि ह्मणे याला पालखी येते!' सदाशिव दीक्षितांच्या तर्फे वाचकांस आह्मी एवढें सुचवितों कीं त्यांचें बोलणें फटकळ असले तरी प्रामाणिकपणाचें होतें. कारण दादासाहेबानीं आपलें वजन खर्च करून कान्होबांना पालखीची सोय करून दिलेली त्यांना खरोखरीच ठाऊक नव्हती.

कान्होबांच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. बाबूराव फडणीसाच्या मृत्यूमुळें आपणावर नाना फडणिसांचा बेभरंवसा झाला होता, आणि त्यांतच आपल्या गुरुजींच्या आगमनामुळें आपणास एक प्रकारचा गौणपणा आला होता, अशा समजुतीनें ते अगोदरच नाराज होते, आणि त्यांतच सदाशिव दीक्षितांनीं केलेल्या उपहासाची भर पडली. मग काय विचारावें ? दीक्षिताना आपण पूर्वी घडविलेल्या अद्दलीचें विस्मरण झालें असावें असें मनांत आणून कान्होबा त्यांना काहीं तरी झणझणीत उत्तर देण्याच्या विचारांत होते. त्यांची जीभ वळवळूं लागली, पण त्यांचे गुरुजी जवळच असल्यामुळें त्यांना कांहीं बोलता येईना. इतक्यांत त्यांच्या सुदैवानें एक पालखी खरोखरीच येऊन त्याच्या घरासमोर थाबली आणि एक सरकारी प्यादा ' कानुबा वैदराज हैती कां ? तिरमंगलाचारीला बगाया जायाचं हाय, ' असे म्हणत आत आला.

क्षणार्धांत कान्होबांच्या चर्येवर स्मित चमकूं लागलें. सदाशिव दीक्षितांना परभारेंच चांगली थप्पड मिळाली असे मनात येऊन वाटणारे समाधान त्याच्या मुद्रेवर झळकूं लागलें. " आलो हं, " असें त्या खिजमतगारास सागून कान्होबा आपल्या गुरुजींकडे वळून ह्मणाले, " गुरुजी, मी अमळ सरकार वाड्याकडे जाऊन त्रिमंगलाचार्यांना पाहून येतों. मी लवकरच परत येईन, पण न जाणो, मला अमळ वेळ लागला तरी मजकरितां थाबावयास नको. आपले अंथरूण ह्या समोरच्या खोलींत घालून ठेवलें आहे." असे ह्मणत कान्होबानी अगरखा पागोटें चढविलें, आणि सदाशिव दीक्षिताकडे जयमुद्रेनें पहात ते पालखींत जाऊन बसले.

पण चला वाचकहो, आपण कान्होबाना व त्याच्या दोघा गुरुजनाना येथेच सोडून शनिवार वाड्याच्या पिछाडीस असलेल्या पीलखान्यातील एका मजबूत कोठडींत जाऊं. ते पहा खोलीच्या मध्यभागी एका बिछान्यावर त्रिमंगलाचार्य पडले असून खंडो दीक्षित, भैरवभट, कुटुंबशास्त्री, देव्या आचारी, सदू नावाचा एक वाढपी आणि गोविंदा नांवाचा एक खटपट्या इतके असामी त्याच्याभोवती कोंडाळें करून बसले आहेत. वाचकास आठवतच असेल की, सिद्धटेकच्या मुक्कामीं श्रीमंतानीं दादासाहेबास बंदींतून मोकळें केलें, त्यावेळीं त्याच्या आश्रितांपैकीं सात असामींस दादासाहेबापासून वेगळे काढून बंदींत ठेवण्याचें त्यांनीं ठरविलें होतें. ते सात इसम वर निर्दिष्ट केलेलेच होत. श्रीमंतांच्या हुकमाप्रमाणें या मंडळींना मोती चौकातून काढून पलिखान्यातील एका कोठडींत ठेवण्यांत आलें, आणि त्याच्यावर सक्त पहारा बसाविण्यांत आला. पुढें दादासाहेब

मोकळे झाल्यावर जरी मोतीचौकांतच रहात असत, व वाड्यांत थोडी बहुत मुखत्यारीही गाजवीत, तरी या आपल्या सात गणांची भेट घेण्याची इच्छा ते कधींच दाखवीत नसत. उलट त्यांच्यावर त्यांचा राग असल्याचेंच दिसून येई. पुढें कान्होबा बाबूराव फडणिसांच्या घरीं त्यांना पहावयास गेले असतां, त्रिमंगलाचार्यांची प्रकृति-पाहण्यासाठीं त्यांना वाड्यांतून एकाएकीं बोलावणें आलें हेंही वाचकांस आठवत असेलच. त्रिमंगलाचार्य तेव्हांपासून जे आजारी होते, ते अजून आजारीच होते. गेल्या आठवड्यापासून तर त्यांची प्रकृति विशेषच बिघडल्याचा बोभाटा झाला होता. त्यांतून दादासाहेब थेऊराहून तुळापुरास जाण्यास आणि इकडे त्रिमंगलाचार्य हैराण होऊन पडण्यास एकच गांठ पडली. त्रिमंगलाचार्यांना वाटेल तेव्हां येऊन पाहण्यास महादजीपंत गुरुजींच्या दस्तुरचा परवाना कान्होबांस मिळाला होता, आणि दादासाहेबांच्या शिफारशीवरून त्यांना पालखीही मिळण्याची सोय झाली होती. कान्होबांनीं त्रिमंगलाचार्यांना बरे करण्याकरितां आपल्या संग्रहांतील ' तडागमृत्तिकेश्वर, पुलिनवालुकेश्वर, भग्नेष्टिकेश्वर, ' इत्यादि अनेक रामबाण औषधाचा उपयोग करून पाहिला, पण त्यांचा कांहींच गुण न येता त्रिमंगलाचार्यांचा वाखा एकसारखा वाढतच चालला. होतां होता आश्विन-शुद्ध अष्टमी आणि नवमी या दोन दिवशीं त्रिमंगलाचार्य फारच हैराण होऊन, आतां ते जगतात कीं मरतात अशी त्यांची अवस्था झाली. त्या दोन दिवसांत त्यांना पाहण्यासाठीं वाड्यात कान्होबांच्या पन्नास तरी खेपा झाल्या असतील! त्यातच नवमीच्या दिवशीं कान्होबांचे गुरु गंगा विष्णु महीधर श्रीमंताना पाहण्यासाठीं पुण्यांत आले, ते कान्होबांच्या घरी उतरले, त्यामुळें तर कान्होबाची फारच त्रेधा झाली. आज विजयादशमीच्या दिवशी सकाळीं मात्र त्रिमंगलाचार्यांना किंचित् उतार पडला, त्यामुळे कान्होबांना आपल्या गुरुजींबरोबर थेउरास जाऊन येण्यास सधी सापडली. दुपारीं त्रिमगलाचार्यांस पाहून कान्होबा जेव्हां घरीं परत गेले, तेव्हां ' एक दुर्धर रोगी काळाच्या जबड्यांतून ओढून काढला ' अशी त्यांनी आपल्या गुरुजींपाशीं प्रौढी मिरविली आणि त्यांचे धन्यवाद घेतले. नंतर रात्रीपर्यंत वाड्यांतलें बोलावणें आलें नाही, यावरून त्रिमंगलाचार्यांची प्रकृति ठीक असली पाहिजे असा कान्होबांनी तर्क केला. पण तो खोटा ठरून दहा घटका रात्रीच्या सुमारास त्यांना बोलावण्यास वाड्यांतून पालखी आली, हें वर वाचकांस कळलेंच आहे.

त्रिमंगलाचार्यादि दादासाहेबांच्या आश्रिताना ज्या कोठडींत ठेवण्यांत आलें होतें, ती चांगली मजबूत असून तिच्याबाहेर एका गारद्याचा स्वतंत्र पाहरा ठेव-

ण्यांत आला होता. कान्होबा वाड्यांत वरचेवर येत असल्यामुळें सर्वच गारद्यांच्या व शिपाई प्यादयांच्या चांगले ओळखीचे झाले होते. त्यांची पालखी जांभळी दरवाज्यानें आंत आली ह्मणजे त्यांना प्रथम आपला परवाना त्या दरवाज्यावरील गारद्यांस दाखवावा लागे. नंतर त्यांची पालखी दक्षिणेकडे वळून, मोतीचौकाच्या पिछाडीस पीलखान्यापाशीं येऊन थांबे, व नंतर कान्होबा खालीं उतरून आपला परवाना पुन्हा एकदा तेथील पहारेवाल्यास दाखवीत, आणि नंतर कोठडींत जाऊन त्रिमंगलाचार्यांची प्रकृति पहात, असा क्रम असे. त्रिमंगलाचार्यांस द्यावयाचें औषध ते सरकारी खिजमतगाराबरोबर पाठवीत, किंवा स्वतः देत. अलीकडे कान्होबांचा गारद्यांशीं विशेष परिचय झाल्यामुळें असो, किंवा श्रीमंतांच्या प्रकृतीसंबंधी उत्पन्न झालेल्या चिंतेंत वाड्यांतील गारदीही अंशतः वाटेकरी झाल्यामुळे असो, कान्होबांच्या परवान्याची तपासणी बरीच शिथिल, किंबहुना बंदच झाली होती. इतकी प्रस्तावना केल्यावर आतां कथासूत्राचा धागा पुढें चालविण्यास हरकत नाही.

वर म्हटल्याप्रमाणें त्रिमंगलाचार्य अंथरुणावर विवळत पडले असून त्यांची बाकीची दोस्त मंडळी त्यांच्या भोंवती बसली होती. पण काय असेल ते असो, त्रिमंगलाचार्यांची प्रकृति इतकी विकोपास गेली असतां त्यांच्या मुद्रेवर काळजीची छटा कसली ती दिसत नव्हती. ते आपले खुशाल हसत खिदळत होते. ते पहा, भैरवभट दांत विचकत त्रिमंगलाचार्यांस ह्मणत आहेत, “आचार्य बोवा, आतां तुह्मांला अमळ बरें वाटत असेल नाहीं बरें ? कान्होबांचा पुलिनवालुकेश्वर तुमच्या पोटांत गेला आहे, तो आपला गुण केल्याशिवाय सोडावयाचा नाहीं !”

“आचार्यांचें पोट ह्मणजे अगस्त्य ऋषींचें पोट आहे,” कुटुंबशास्त्री ह्मणाले, “त्यांत तुमचा पुलिनवालुकेश्वर जावो, मालपाषाणेश्वर जावो किंवा लोहचूर्णेश्वर जावो, सर्वांची एकच गत व्हावयाची ! आजच स्वारींनीं सहा पोळ्या पचविल्या आहेत !”

“पण या खोट्या आजारीपणाचा कंटाळा आला बुवा आपणाला !” त्रिमंगलाचार्य अंगाला आळोखे पिळोखे देत ह्मणाले, ‘आतां तुमच्या पैकीं कोणी तरी माझ्या वांटणीचे आजारी पडा !”

“झालें,” खंडो दीक्षित ह्मणतात, “आणखी एक घटकाभर कळ मारा, ह्मणजे सर्वांचीच सुटका होते आहे!”

“पण कायहो दीक्षित,” त्रिमंगलाचार्यांनीं प्रश्न केला, “कान्होबांच्या बदलीं दर वेळेस एक इसम याप्रमाणें आपणां सात असामींना सात इसम मिळाले पाहिजेत, त्याची तुह्मी काय व्यवस्था केली आहे ?”

" ती सर्व व्यवस्था दादासाहेबांनीं परभारें केली आहे, " खंडो दीक्षितांनीं हलक्या आवाजांत खुलासा केला, " हल्लीं वाड्यांत नित्य पांच हजार ब्राह्मण भोजन घालावयास प्रारंभ झाला आहे, त्यांत चोरून येऊन आगंतुक जेवून जातात हें तुह्मांस ठाऊकच असेल. तसले सहा आगंतुक आज दादासाहेबांनीं कान्होबांच्या घराशेजारच्या एका घरांत तयार ठेवण्याची तजवीज केली आहे. "

" आणि सातवे आगंतुक खुद्द कान्होबाच ह्मणतां ? " कुटुंबशास्त्र्यांनीं हंसत प्रश्न केला, " ही तर दादासाहेबांनीं खाशी योजना केली आहे बुवा ! "

त्रिमंगलाचार्य यावर कांहीं तरी शंका विचारणार होते असें दिसलें. पण इतक्यांत कोठडीचें कुलूप बाहेरून उघडलें, आणि कान्होबांची स्वारी मंद मंद पावलें टाकीत आंत प्रविष्ट झाली. त्यांना पाहतांच मंडळींची चर्या एकदम पालटली. सर्वजण गंभीर व चिंतातुर मुद्रा करून त्यांच्याकडे पाहूं लागले. त्रिमंगलाचार्यांनीं कण्हावयास सुरवात केली. कान्होबा पुढें झाले, आणि त्रिमंगलाचार्यांच्या उशाशीं बसून त्यानीं त्यांची नाडी पाहिली. नाडी पाहतां पाहतां त्यानीं भोंवतालच्या मंडळींना उद्देशून प्रश्न केला, " का ? आज आचार्यांना विशेष काय झाले आहे बरें ? "

'विशेष कांहीं नाहीं,' खंडो दीक्षितांनीं उत्तर केलें, 'त्यांचा शूळ कमीच आहे, पण त्याच्या पोटात आज एकाएकीं इतकी आग पडली कीं, त्यानीं संध्याकाळच्या वेळीं सहा भाकरी खाल्ल्या ! '

' काय, सहा भाकरी खाल्ल्या ? ' कान्होबा जागच्या जागीं टुणदिशीं उडी मारून ह्मणाले, 'काय ? काय सांगतां? सहा भाकरी खाल्ल्या ? अहो, यांना तर कांही खावयाचे नाही हेंच मुख्य पथ्य ह्मणून मी सागितलें होते. आणि तुह्मी सांगतां यानी सहा भाकरी खाल्ल्या म्हणून ? ' बोलता बोलता कान्होबा आश्चर्यमूढ होत्साते आ वासून मंडळीच्या तोडाकडे पाहत राहिले !

कान्होबाच्या मनात त्रिमंगलाचार्यांचा व त्यांच्या सोबत्याचा याँ आचरटपणाबद्दल कडक शब्दात निषेध करावयाचा होता, पण तसें करण्यास त्याना फुरसतच मिळाली नाही. एका क्षणांत त्याच्या अंगावर दोनी बाजूंनी सात आठ हात पडून त्याच्या तोडात एक घट्ट बोळा देण्यात आला. हा प्रकार इतका आकस्मिक झाला कीं, आपणावर होणाऱ्या अत्याचाराचे स्वरूप कान्होबांच्या चागलेंसें लक्ष्यात येण्यापूर्वीच त्यांचे तोड बद करण्यात आलें, हातपाय जखडण्यात आले, आणि कपडे हिसकावून घेण्यांत आले.

* * * * *

सुमारें [illegible] रात्र झाली असून वाड्यांत बहुतेक सामसूम झाली होती. दाट आभाळ आलें असून पावसाची थोडथोडी बुरबूर चालू होती. थंड आणि झोंबरी जांभळे पडली होती. अशा वेळीं देवीसिंग परदेशी आणि मणिराम गारदी नित्याप्रमाणें जांभळी दरजावर पहारा करीत होते. ते दोघेही थंडीनें गारठले असून मध्यरात्र केव्हां होते, आणि आपला पहारा केव्हां संपतो याची वाट पाहत असावे असें दिसलें. इतक्यांत त्यांच्या समोरून कान्होबांची पालखी बाहेर जावयास निघाली. पालखींत कान्होबा होते हें त्यांनीं ओळखलें, दिवटीच्या उजेडांत त्यांना कान्होबांची पगडी, कांठाचें धोतर, बटवी वगैरे चिन्हें स्पष्टच दिसलीं. कान्होबांचा चेहरा त्यांना स्पष्ट दिसला नाहीं, पण आज थंडीची झड असल्यामुळें वैद्यबोवांची स्वारी गारठून जाऊन त्यांनी तोंडापर्यंत धोतर ओढून घेतले असावे असा त्या गारद्यांनी तर्क केला. कान्होबा नुकतेच त्रिमंगलाचार्यास पहावयास आले होते, हे त्याना ठाऊक असल्यामुळे त्यानी परवाना न विचारता कान्होबाची पालखी बाहेर जाऊं दिली.

आणखी अर्धी घटका गेली असेल, इतक्यांत कान्होबाची पालखी पुन्हा वाड्यात येते आहे, आणि तिजमध्ये कान्होबा आहेत, हें पाहून गारद्यास आश्चर्य वाटलें. पण गेल्या दोन दिवसात त्रिमंगलाचार्यांची प्रकृती फारच बेमार असून कान्होबा त्याना पहावयास वरचेवर वाड्यांत येत होते, हे त्यांना ठाऊक असल्यामुळे त्यानीं आताही कान्होबाच्या येण्याकडे विशेष लक्ष्य दिले नाहीं. कान्होबाची पालखी आत गेली, आणि सुमारे पाव घटकेत परत येऊन गारद्याच्या समोरून बाहेर निघाली. कान्होबा अर्थात् पालखींत होतेच. पालखी बाहेर जाताच देवीसिंग परदेशी दिवटीवर हात धरून तिचा उबारा घेत मणिरामास म्हणाला, ‘ आज तिरमंगलाचारी लइ बिमार हैत जनु. कानुबा पुना येऊन ग्येऽऽ म्हनून म्हनतो. ’

‘ हं, तसऽ दिसतया खरंच, ’ मणिराम म्हणाला, आणि त्याने दुसऱ्या दिवटीचा आश्रय केला.

आणखी अर्धी घटका गेली असेल. पावसाची बुरबुर चालू होतीच. इतक्यांत कान्होबाना पोचवावयास गेलेली पालखी परत आली. अरे पण हा काय चमत्कार ? आतांही पुन्हा पालखींत कान्होबा आहेतच ! मणिराम चकित होऊन ‘ परवाना ’ म्हणून ओरडला. कान्होबांनीं हात लांब काढून परवाना पुढें धरला. तो गारद्याच्या पुरा ओळखीचा असल्यामुळें त्यांनीं हातांत न घेतांच ‘ जाऊं द्या ’ म्हटलें. पालखी

आंत गेली आणि सुमारें पाव घटकेनें परत येऊन कान्होबांना घेऊन वाड्यांतून बाहेरही गेली. थंडींतून वारंवार हेलपाटे पडल्यामुळें काकडून जाऊन कान्होबांनीं येतां जातां आपलें सर्वांग धोतरानें लपेटून घेतलें आहे हे पाहून गारद्यांना मोठी मौज वाटली, आणि ती स्मिताच्या रूपानें त्यांच्या चेहऱ्यावर प्रकटली !

आणखीही अर्धी घटका जाऊन मध्यरात्रीचा सुमार झाला होता. कान्होबांना सोडावयास गेलेली पालखी परत आली. देवीसिंगानें सहज पालखीकडे नजर टाकली, तों आतांही तिजमध्यें कान्होबा आहेतच हें पाहून तो इतका चमकला कीं त्याच्या बोटांना दिवटीची झळ लागून त्याला चांगलाच चटका बसला ! मणिरामाचीही जवळ जवळ तशीच अवस्था होऊन ते दोघेही आपणासमोरून आत जाणाऱ्या पालखीकडे टकमक पहात राहिले ! पालखी आत निघून गेली.

पण पालखी डोळयासमोरून बाजूस होताच त्या गारद्याच्या पोटात कसला तरी अंधुक संशय उत्पन्न झाला आणि या खेपेस पालखीचो कसून झडती घेण्याचा त्यानी बेत केला. त्याच्या अटकळीप्रमाणे थोड्याच वेळात पालखी कान्होबाना घेऊन परत आली. ती आलली पाहताच ते दोघेही गारदी देवडीवरून चटकन् उड्या टाकून पालखीपुढें झाले. मणिरामाने "खडी राहूदे !" म्हणून पालखी रोखून धरली, व आत बसलेल्या कान्होबाना उद्देशून तो म्हणाला, "वैदराज, तुमी समद्या जगाला दवा देनारे, आन् तुमासनी येवडीबी थंड सोसनाशी झाली व्हय ?"

पण कान्होबा चूप राहिले. मणिरामाच्या प्रश्नाला त्यांनीं एका अक्षरानेंही उत्तर केलें नाहीं !

'का जी वैदराज,' देवीसिंग म्हणाला, 'अशी बोलानासा की ? आजच्या थंडीनं आमच्यावानी तुमीबी गारटलासा जनु !'

तरीही कान्होबा चूपच ! ते काहीं बोलेनात इतकेंच नव्हे, तर गारद्याकडे वर मान करून पाहीनात देखील ! नेहमीं आपण एक शब्द बोलताच घटकाभर पाल्हाळ लावून पुरेवाट करून सोडणाऱ्या कान्होबाची आजची ती चमत्कारिक वृत्ति पाहून गारद्यांस कसेंसेंच झाले. त्याना आलेला संशय बळावला. मणिराम एकदम स्वर चढवून म्हणाला, 'वैदराज तुमचा परवाना काढा !'

कान्होबा किंचित् चमकल्याचा भास झाला. पण तें त्यांचें चमकणे इतकें अस्पष्ट होतें की गारद्यांच्या तें लक्ष्यातही आलें नसेल. कान्होबानीं हात लांब करून परवाना गारद्यांच्यापुढें केला. मात्र धोतराखालीं अर्धवट लपलेलें त्याचे तोंड गारद्यांना अद्यापि अदृश्यच राहिलें होतें.

कान्होबा आपलें तोंड मुद्दाम लपवीताहेत असें पाहतांच देवीसिंगानें शेजारची एक दिवटी उचलून चटकन् कान्होबांच्या तोंडापुढें धरली तों वैद्यराज आपलें तोंड अधिकाधिकच लपवूं लागले. त्याबरोबरच मणिरामाचा संशय अधिक विकोपास जाऊन त्यानें कान्होबांच्या तोंडावरचें धोतर जोरानें बाजूस ओढलें. तों काय चमत्कार सांगावा ? पालखींत बसलेली व्यक्ति कान्होबा नसून कान्होबांचा वेष घेऊन बसलेले खंडो दीक्षित नरगुंदकर आहेत असें त्या गारद्यास दिसून आलें ! आश्चर्याच्या भरात त्याच्या तोंडून 'दगा' असा शब्द बाहेर पडला ! तो ऐकतांच देवीसिंग चटकन् आपली तरवार उचलून पालखीजवळ आला !

'दगा' हा शब्द ऐकतांच 'इचभन हीं काय बैदा झाली !' असें ह्मणत भोयांनीं पालखी खाली ठेविली. ती ठेवली ह्मणण्यापेक्षां आपटली ह्मणणेंच अधिक शोभेल ! गारद्यांनी आरडा ओरडा करीत खंडो दीक्षिताना बाहेर खेचलें, व त्यांची झडती घेतली. त्या धांदलींत दीक्षिताच्या कनवठीतून एक तपकिरीची डबी खाली पडून उघडली ! तिजमधलि तपकार खाली साडली आणि त्या तपकिरीतून एक बारीक घडया करून ठेवलेलें पत्र बाहेर पडलें ! तें मणिरामाने झाडून उचलून घेतलें. नंतर तेथे जो एकच कल्ला झाला तो सांगता पुरवत नाही. ताबडतोब महादाजीपंत गुरुजींना बोलावण्यात येऊन त्याच्या कानावर ती सारी हकीगत घालण्यांत आली. त्यानीं जनार्दन हरी कोतवालास बोलावणे पाठविले. तोंपर्यंत वाडयात या चाललेल्या प्रकाराचा बोभाटा होऊन, हशम, प्यादे, जासूद, कारकून, कामाठी वगैरे लोकांचा घोळका जाभळी दरवाजाच्या आसपास गोळा झाला. खंडो दीक्षितांना त्यांच्या कोठडकिडे परत नेण्यात येऊन कोठडीची तपासणी करण्यात आली. तिजमध्यें कान्होबा तोंडात बोळा देऊन व हातपाय बांधून पडले आहेत आणि त्रिमंगलाचार्य व देव्या आचारी हे दोघे नाहीसे झाले असून त्याच्या ऐवजी दोन तेलंगी आगंतुक आले आहेत असे दिसून आले ! इतक्यात जनार्दन हरी येऊन पोचले व त्याना ती सर्व हकगित कळाविण्यात आली. त्यानीं तो प्रकार ऐकतांच भोई लोकांबरोबर आपले शिपाई पाठवून कान्होबाच्या घराशेजारच्या एका घराची झडती घेतली, तेथें त्रिमंगलाचार्य, देव्या आणि चार आगंतुक तेलंगी भट सापडले, त्या सर्वांस गिरफदार करून वाड्यांत आणण्यात आलें. नंतर कान्होबास मोकळे करून त्यांची, तेलंग भटांची आणि भोयांची अशा जबान्या घेण्यात आल्या. त्यांवरून असें दिसून आले कीं दादासाहेबांच्या गणानीं हा वाड्यातून निसटून जाण्याकरितां एक कटच तयार केला होता. प्रथम कान्होबांच्या तोंडांत बोळा देऊन

त्यांना डांबून ठेवावयाचें, नंतर त्यांचे जागीं त्यांचाच वेष घेउन एकाने पालखींत बसून उद्दिष्ट स्थळीं जावयाचें, तेथें आपल्या जागीं एका आंगतुकास कान्होबांचा वेष देऊन पालखींत बसवून वाड्यांत पाठवावयाचें, पालखी परत जातांना आगंतुकास कोठडींत सोडून दादासाहेबांच्या दुसऱ्या आश्रितानें त्याची जागा घ्यावयाची, याप्रमाणें सातही असामी बाहेर पडेपर्यंत क्रम चालावयाचा, असें त्या कटाचें स्वरूप होते. पुण्यास त्यावेळीं श्रीमंतांच्या आरोग्याकरितां ब्राह्मणभोजनें चालू असल्यामुळे आगतुक मिळण्यास मुळीच अडचण पडली नाही. त्या आगंतुकाची अशी समजूत करून देण्यात आली होती कीं, वाड्यांतलि भोजनास विद्वान् ब्राह्मणांनाच तेवढे सोडण्यात येत असल्यामुळें, आगंतुक मंडळींनी एका वैद्याच्या वेषानें वाड्यात जाऊन चोरून जेऊन येण्याची सोय केली आहे आणि हा क्रम एकसारखा चालू आहे. त्या अक्षरशत्रु आगंतुक मंडळीना हें सर्व खरें वाटलें हें सागावयास नकोच. मात्र त्याना ही विद्या कोणी शिकविली हे अखेरपर्यंत बाहेर आले नाही ! बहुतेकाना दादासाहेबांचा संशय आला, पण पुराव्याच्या आभावी तो त्याना उघडपणे बोलून दाखविता येईना.

महादाजीपंत गुरुजींनी खडो दीक्षिताच्या कडोसरीतून पडलेलें पत्र वाचून पाहिले, तो ते नागपूरकर भोसल्यांना उद्देशून लिहिलेले असून त्याच्या खालीं कोणाचीच सही नव्हती ! अर्थात् त्यावर दादासाहेबाची मागाहून सही घ्यावयाचा त्याच्या आश्रितमडळींचा बेत होता हें उघडच झालें. ते पत्र आणि उघडकीस आलेल्या कारस्थानाची हकीकत रातोरात थेऊरास नाना फडणिसाकडे धाडून देण्यात आली. कान्होबा, भोई आणि आगंतुक भट मंडळी याचे या कारस्थानात अंग नाही असे निर्विवाद शाबीत झाल्यामुळे त्याना दोषमुक्त करून सोडून देण्यात आले. मात्र कान्होबाची पालखीची सवलत काढून घेण्यात आली. खडो दीक्षितादि मडळीना पुरंदरच्या किल्यावर सक्त बंदोबस्तांत पाठविण्यात आले. दादासाहेबाचे या कटात कितपत अंग होते ही गोष्ट अखेर अनिश्चितच राहिली. कान्होबानी आपल्या वैद्यकीय अनुभवात मिळालेला हा धडा चागलाच ध्यानांत ठेवला. जाता जाता वाचकांस हें कळविणें जरूर आहे की, मणिरामानें खंडो दीक्षिताच्या कडोसरीपासून घेतलेले पत्र जरी झाडून घेतले होतें तरी त्याच्या, आणि महादाजीपंतांनी ते आपल्या हातीं वाचण्याकरितां घेतलें होतें म्हणून त्यांच्या, हाताची पुढें कैक दिवस आग होत होती. मग तो खंडो दीक्षिताच्या डबींतून सांडलेल्या तपकिरीच्या स्पर्शाचा प्रभाव होता कीं काय नकळे !

———

## प्रकरण ४६ वें.

| खरे ले. १२१५, १२१८, १२२०, १२२१, १२२२ इ. रियासत ४ पान २४०-२४१ | **निरवानिरव.** | का. शु. ६ श. १६९४. |
|---|---|---|

मागील प्रकरणांत सांगितलेल्या हकीगतीस आज जवळ जवळ महिना झाला होता. एवढ्या अवधींत श्रीमंतांच्या प्रकृतींत लवमात्र सुधारणा झाली नसून उलट ती अधिकच बिघडली होती. गंगा विष्णूचें औषध श्रीमंतांनीं एक सप्तक घेऊन पाहिलें, पण तें त्यांना सोसेना व त्याला जरूर तें कडक पथ्यही त्याच्या हातून होईना, म्हणून ते त्यानीं सोडून दिलें. गंगा विष्णू नाशिकास निघून गेला. पुढें कांहीं दिवस श्रीमंत औषधावाचून होते. पण जवळच्या आप्तेष्ट मंडळींना ते बरे न वाटून त्यांनीं तेरदळचा रणछोड नाईक व वाईचा रूपेश्वरबोवा या दोघा सुप्रसिद्ध वैद्यास बोलावून आणलें. ते दोघे वैद्य नुकतेच आले असून त्यांनीं श्रीमंताची प्रकृति पाहिली होती, व दोघांनी मिळून निदान करून श्रीमंतांना कांही औषधयोजनाही केली होती. सर्व वैद्यांनी आपल्या रोगाचें निदान एकच 'राजयक्ष्मा' केलें होतें, हें श्रीमंतास कळलें होतें, आणि त्यावर कोणापाशींच खात्रीचें औषध नाहीं हेंही त्याना ठाऊक होते. यामुळे वैद्यकीय प्रयत्नांवरचा त्याचा विश्वास साफ उडाला होता, आणि आता केवळ परमेश्वरी कृपाच झाली तर आपण जगणार असें त्यांनी ठरविलें होतें. या समजुतीमुळेंच कीं काय, त्यांनी अनेक नवस केले होते. उदाहरणार्थ त्याचा एक नवस गिरीच्या व्यंकोबास उद्देशून होता 'देवानें आपणास घोड्यावर बसतें करावें ह्मणजे आपण देवाला दहा लक्ष रुपये वाहूं' असा श्रीमंताचा संकल्प होता. थेऊरच्या गणपतीस तर श्रीमंतांनीं प्रथम दर्शनाच दहा हजाराचा तुरा वाहिला होता. अनुष्ठानें आणि जप तर सारखे चालूच होते. साराश, श्रीमंतानीं आतां आपल्या प्रकृतीची सर्व आशा सोडली असून ते केवळ देवावर भार घालून दिवस कंठीत होते.

श्रीमंताना मृत्यूची जरी भीती वाटत नव्हती, तरी आपल्या मागें राज्याचें कसें काय होईल, ही चिंता त्यांना अहोरात्र लागून राहिली होती. त्यानीं दादा साहेबाना ज्या हेतूनें मुक्त केलें तो त्यांचा हेतु तर साधला नाहींच, पण उलट दादासाहेबानीं त्यांच्या परावलंबी अवस्थेचा फायदा घेऊन एक नवेंच

कारस्थान उभारलें. शिवरामभटाच्या सल्याप्रमाणें त्यांनीं चिंतो विठ्ठलामार्फत जागजागीं गारदी नोकर ठेऊन सैन्यभरतीस प्रारंभ केला होता, आणि त्याच करितां ते तुळापुरास गेले होते! पण ऐन वेळीं त्यांच्या पुण्यांतील गणांची कारवाई उघडकीस आल्यामुळें त्यांची मसलत सिद्धीस गेली नाहीं. श्रीमंतांनीं कृष्णराव काळ्यांस पाठवून दादासाहेबांना थेऊरास बोलावून आणलें, आणि त्यांच्या आश्रित जनांजवळ सांपडलेलें पत्र त्याच्यापुढें ठेवलें. दादासाहेबांनीं त्यावेळीं निरनिरपराधीपणाचें असें कांही सोंग केलें, इतक्या आणा शपथा वाहिल्या, आपल्या आश्रित मंडळींच्या वागणुकीविषयीं असा कांहीं तिटकारा दाखविला कीं, श्रीमंताचा नाइलाज होऊन त्यानीं दादासाहेबांना गुन्हा माफ केला. मात्र योगायोगाची गोष्ट अशी कीं, श्रीमतानीं दादासाहेबापुढें ठेवलेलें पत्र फाडण्यासाठीं म्हणून जेव्हा उचलले आणि त्याचे कपटे केले, तेव्हा त्यातला एक कपटा चुकून त्याना प्यावयासाठीं तयार केलेल्या काढ्यात पडला. तो लगेच काढून टाकण्यात आला हे खरे, पण कांहीं वेळानें श्रीमंतांनीं तो काढा प्राशन करिताच त्याच्या घशात जळजळल्यासारखे होऊन त्याच्या अंगाचा जो एकदा दाह सुरू झाला तो कशानेही थांबेना. वैद्यांनीं नाना प्रकारचे यत्न केले, पण श्रीमंताच्या अंगाचा तो दाह अखेरपर्यंत लवमात्रही कमी झाला नाहीं! खंडो दीक्षिताची इच्छा तशा नाहीं अशा प्रकारें अखेर सिद्धीस गेली!

थेऊरास या वेळीं श्रीमंताची सर्व आप्तेष्ट, हितचिंतक, कारभारी आणि आश्रित मंडळी जमली होती. दक्षिण कर्नाटकातील मोहीम आटोपून त्रिंबकरावमामा पेठे, वामनराव पटवर्धन, परशुरामभाऊ पटवर्धन, कोन्हेरराव पटवर्धन, लक्ष्मणराव रास्ते वगैरे सरदार मंडळी येऊन दाखल झाली होती. वडिलांचे उत्तरकार्य करून मोरोबा फडणीस आले होते. मोरोबा पटवर्धन पुण्यास होते, ते येऊन जाऊन थेऊरास असतच. दादासाहेब आणि त्याचे व्याही बाबुजीनाईक बारामतीकर यांचाही तळ थेऊरासच होता. आनंदराव रास्ते, गोविंदराव खासगीवाले, नाना फडणीस, हरिपंत फडके, सखारामबापू आणि इच्छारामपंत ढेरे हे तर श्रीमंताच्या दिमतीस अहोरात्र होते. या खेरीज मलबा पानशे, कृष्णराव काळे, अप्पाजीराव पाटणकर, खंडेराव दरेकर इत्यादि अनेक सरदार मानकरीही श्रीमंताच्या सहवासाकरिता थेऊरास येऊन राहिले होते. त्यातच हुजुरातीच्या पाच सहा हजार फौजेचा तळ थेऊरास पडला असल्यामुळें थेऊरचे खेडें गजबजून निघाले होतें. श्रीमंत सौ. रमाबाई आणि पार्वतीबाई यांनाही आता पुण्यास धीर निघेनासा होऊन त्या थेऊरास येऊन राहिल्या

होत्या. रमाबाई तर गेले कांहीं दिवसांपासून नुसत्या गोमूत्रावर राहिल्या होत्या. त्यांनीं यावेळीं पातिनिष्ठेची आणि भिवा पोवारानें स्वामिनिष्ठेची शिकस्त करून दाखविली. दोघांनींही अन्नपाणी आणि निद्रा जवळ जवळ सोडल्यासारखींच केली होती. पार्वतीबाई पुतण्याच्या आरोग्याकरितां लक्षावधि नवस बोलल्या होत्या आणि रोज बोलत होत्या. नारायणराव तर बिचारा अजून पोरच होता. आपल्या घराण्यावर येणाऱ्या संकटाची जाणीव त्याला होऊन तो पार्वतीकाकूंच्या गळयांत पडून रडूं लागे त्या वेळचा देखावा खरोखरींच हृदयद्रावक असे.

श्रीमंतांची प्रकृति तर दिवसेंदिवस अगदीं तोळा मासा होत चालली. त्यांच्या अंगाचा दाह इतका वाढला कीं त्यांना वाड्यांत राहणें अशक्य होऊन ओंवरींत आणून ठेवणें भाग पडलें. कार्तिक शुद्ध तृतीयेच्या दिवशीं तर त्यांच्या अंगाची इतकी भयंकर काहिली झाली कीं, त्यांना केळीच्या अगोतल्यावर निजवूनही ती थांबेना. शेवटीं तिच्या यातना असह्य होऊन श्रीमंतांनीं ‘अर्जुनवाद्य’ केलें! ते गुराप्रमाणें ओरडूं लागले, आणि ‘देवा मला आता या यमयातनांतून सोडीव’ म्हणून गणपतीची करुणा भाकूं लागले! देव आपली भीड ऐकत नाहीं, तर निदान मनुष्य तरी ऐकतो का पहावें, म्हणून त्यांनीं दादासाहेब, हरिपंत, इच्छारामपंत ढेरे इत्यादि मंडळीजवळ आत्महत्या करण्यासाठीं खंजीर मागून पाहिला. त्यांनीं अर्थातच तो दिला नाहीं. तेव्हां त्यांनीं मनस्वी आकांत केला. सुमारे एक प्रहरभर याप्रमाणें आरडा ओरड केल्यावर ते जे निपजीत पडले ते बराच वेळ मृतप्राय पडले होते! बऱ्याच लोकांची श्रीमंत वारले अशीच समजूत झाली. श्रीमंतांची कदर इतक्या आजारीपणातही जबर असल्यामुळे त्यांच्या खास परवागीशिवाय त्यांच्या जवळ उगाच वाटेल त्यास प्रवेश मिळत नसे. श्रीमंतांचें आज चिन्ह नीट नाहीं अशी चोरटी कुणकुण रमाबाईसाहेबांच्या कानावर जातांच त्यांनीं मुकाट्यानें एक सांडणीस्वार पुण्यास पाठविला आणि त्याच्याकडून सती जाण्यास जरूर तीं पातळें आणविलीं. सांडणीस्वाराने आपल्याकडून खूप खबरदारी घेतली, तरी श्रीमंतांच्या मृत्यूची अवाई पुण्यांत पसरल्या वांचून राहिली नाहीं! हां हां म्हणतां सारें पुणें हलाल्लन गेलें. वाड्यांतील नौबत आणि गावांतील दुकानें बंद झालीं. चोहोंकडे एकच ओरड होऊन हजारो लोकांच्या झुंडी थेऊरच्या वाटेनें निघाल्या. पुण्याचे लोक थेऊरास येईपर्यंत श्रीमंत चांगले सावध झाले होते. श्रीमंतांनीं आपल्या प्रेमळ प्रजेस दर्शन दिले. बोलतां बोलतां त्यांना आपल्या मरणाच्या खोट्या वार्तेनें पुण्यास कशी गडबड उडवून दिली होती हें कळून आलें.

गैरसमजानेंच झालेला प्रकार, पण तो मनांत येतांच श्रीमंतांच्या पोटांत लक्क झालें! आपल्या प्रच्छन्न शत्रूंपैकीं कोणीतरी ही अवाई उठवून दिली असावी असें त्यांच्या मनानें घेतलें. लगेच चौकशीस सुरवात झाली. दोन दिवस काहीं पत्ता लागला नाहीं. पण तिसऱ्या ह्मणजे षष्ठीच्या दिवशीं सांडणीस्वाराचें नांव श्रीमंतांस कळलें. त्यानें पुण्यास जाऊन सतीचीं पातळें खरेदी केलीं, त्यामुळें शहरांत एवढा प्रळय उडाला हें कळताच श्रीमंत रागानें बेहोष झाले आणि त्यांनीं त्या सांडणीस्वाराचा हात तोडण्याचा हुकुम केला! पण त्या हुकुमाची तामिली करण्याची कोणाची छाती होईना. जो तो एकमेकाच्या तोंडाकडे टकमक पहात राहिला. दादासाहेब, त्रिंबकराव मामा, आणि बाबूजी नाईक हे तिघे पारावर जाऊन बसले. पटवर्धन मंडळी तोंडें चुकवून दूर झाली. नाना आणि हरिपंत तात्या चुळबूळ करीत राहिले, व भिवा पोवार काळ्याचे जिन्नस आणावयाचें निमित्त करून पसार झाला. येऊन जाऊन श्रीमंताच्या दाढेस इच्छारामपंत ढेरे सापडला. श्रीमंत त्याच्यावर कडाडले, "इच्छाराम, आताच्या आतां त्या सुतरस्वाराचा हात तोडव आणि मला आणून दाखव." श्रीगजाननाच्या समोर असला अत्याचार करण्याची इच्छारामपंताची छाती होईना. तो गुळमुळूं लागला. एक क्षणभर वाट पाहून श्रीमंत त्याच्यावर उसळले, "इच्छाराम, अजून त्याचा हात उतरला नाहीं का? आणखी एक क्षणभर वाट पाहीन, तेवढ्यात त्याचा हात तुटला तर बरें, नाहींतर तुझा हात तोडला जाईल ध्यानात ठेव!" बिचारा सांडणी स्वार तर भीतीनें अर्धमेला होऊन कांपत उभा राहिला होता. इच्छारामपंताचीही जवळ जवळ तशीच अवस्था झाली. आणखी एक क्षण जाता तर श्रीमंताच्या हातून भलताच कांहीं तरी अविचार होणार होता. पण इतक्यात श्रीमंत रमाबाईसाहेबांची स्वारी झपाट्यानें देवळाच्या प्रवेशद्वाराच्या पायऱ्या उतरून ओवरीपाशीं आली. त्यांनी एकवार भोंवतालीं नजर टाकली. ओवरींतून श्रीमंत दरडावीत आहेत, आणि सांडणीस्वार व इच्छारामपंत अधोवदन करून बाहेर उभे आहेत असें दृश्य त्यांच्या दृष्टीस पडलें. त्यांनी एक क्षणभरच विचार केला. तत्काळ त्यांचा निश्चय ठरला, आणि धीटपणानें ओवरीच्या तोंडाशीं असलेला जाळीचा पडदा दूर करून त्या आत शिरल्या!

रमाबाईसाहेब आत आलेल्या पहाताच नाना व हरिपंत चटकन् उठून बाजूस झाले, आणि धनिणीची मर्यादा राखण्याकरिता त्यांनी ओवरींतून हळूच

पाय बाहेर काढला. श्रीमंतांनीं वर पाहिलें, तों उपासतापासांनीं कृश झालेली, व हरणकाळजीनें पोळून निघालेली पत्नीची करुण मूर्ति आपणापुढें उभी आहे, असें त्यांस दिसून आलें. रमाबाईनीं पतीकडे एकवार नजर टाकली, आणि त्याच्या पोटांत भडभडून आलें. त्या तशाच पुढें झाल्या, आणि सारी भीड-मर्यादा क्षणभर गुंडाळून पतीस म्हणाल्या, "त्या बिचाऱ्या सुतरस्वाराचा हात तोडावयाचा हुकूम काय म्हणून करावयाचा तो? तो काय मेला, आज्ञेचा चाकर, मी त्याला आज्ञा केली, तो जाऊन पातळें घेऊन आला. इतक्याही उपर दंडच लावावयाचा असेल, तर तो त्याला न लावतां मला लावावा. हा माझा हात पुढें केला आहे. खुशाल तोडावयाची आज्ञा व्हावी!"

आपल्या पत्नीची ती करुण मूर्ति, तिचा तो शीलसंपन्न धीटपणा, आणि तो सात्विक संताप, या सर्वांचा श्रीमंताच्या मनावर जादूसारखा परिणाम झाला! त्यांचा सारा राग एका क्षणात मावळला. त्याच्या वाळलेल्या मुखावर एकदम स्मित चमकलें, आणि ते म्हणाले, 'सरकार, आपला हात मी जो लग्नाचे वेळी हातात धरला, तो तोडण्याकरिता नाही, जोडण्याकरिता आहे.' असे म्हणत श्रीमंतानी आपले क्षीण झालेले बहु पसरले. क्षणार्धात पतिपत्नीच्या बाहुपाशाची परस्पराना मिठी पडली. रमाबाईच्या अश्रूंनी श्रीमताचे मस्तक न्हाऊन निघाले!

'आता आपल्या व माझ्या हाताची तोडातोड करावयाची गजाननाचीच इच्छा असली, तर मात्र नाइलाज आहे,' श्रीमंतानीं मनाचें वाक्य पूर्ण करून निश्वास टाकला!

'इश्श, असे अभद्र नको बोलायला गडे!' रमाबाई श्रीमंताच्या तोंडावर हात ठेवीत म्हणाल्या, 'त्या गजाननाला माझी काहीच का करुणा येत नसेल? आणि इतक्याही उपर तो निष्ठुर झालाच, तर इकडच्या हातातून माझा हात सोडविण्याची त्याची सुद्धा प्राज्ञा नाही!'

'काय म्हणालात सरकार?' श्रीमंत चकित होऊन उद्गारले, 'माझ्या मागून सती येण्याचे वेड तुमच्या मनानें पुरते घेतलेले दिसते! पातळ आणविण्यात आपला हाच हेतु मला दिसून आला, आणि तो मला सहन झाला नाही म्हणूनच तर मी त्या सुतरस्वाराला शिक्षा करणार होतो.'

"माझा हेतु जर सहन होण्यासारखा नसला," रमाबाईसाहेब हुदके देत म्हणतात, "तर त्या सुतरस्वाराचा हात तोडणे हा त्यावरचा उपाय नव्हे. आपण दोघेही त्या मंगलमूर्तीची करुणा भाकूं, आई जगदंबेची प्रार्थना करूं, खंडेराया जवळ माझ्या चुडेदानाची भीक मागूं–"

"हाय हाय लाडके!" श्रीमंत सद्गदित होऊन ह्मणाले, "साऱ्या देवांनीं तुझा अर्ज नामंजूर केला आहे. यमाच्या ढालाइतांनीं तुझ्या सौभाग्यावर हुकुमाची बजावणी केली आहे. अशा स्थितींत तूं माझ्या आरोग्याची आशा अगदीं सोडून दे आणि पुढचा विचार कर."

"तो तर मी केव्हाच केला आहे!" रमाबाईनीं निश्चयी स्वरानें उत्तर केलें.

"पण त्या संबंधी मी तुला कांहीं सांगणार आहे," श्रीमंत खोल आवाजात ह्मणाले, "रमा तू पतिव्रता आहेस, अर्थात् पतीची आज्ञा पाळणें हें तुझें कर्तव्य आहे. होय ना?"

"होय," रमाबाई ह्मणाल्या.

"तर मग माझी तुला अशी आज्ञा आहे," श्रीमंत क्षीण आवाजांत ह्मणाले, 'की तूं माझ्यामागून सहगमन करूं नयेस. तीर्थस्वरूप काकासाहेबाच्या आणि पार्वतीकाकूंच्या आज्ञेत रहावेस आणि चिरंजीव नारायणाच्या हिताला जपावेस.'

रमाबाईनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं. त्या फक्त अश्रु ढाळीत राहिल्या.

'का? कांहीं उत्तर दिले नाहींस?' श्रीमंतानी प्रश्न केला, 'मला तुझें निश्चित उत्तर पाहिजे.'

'उत्तर मी केव्हाच दिलें आहे,' रमाबाई ह्मणाल्या,' माझ्या फुटक्या नशीबानें माझें सौभाग्य ढळलेंच, तर माझें कर्तव्य निश्चित ठरलेलेंच आहे. पतिपत्नीच्या सर्वांगात अर्धा अंगाला वेगळे उरण्यास शास्त्रांनीच सवड ठेवलेली नाही. त्यातून ईश्वर सत्ता प्रमाण आहेच?'

श्रीमंत गार झाले! पत्नीकडून इतके सडेतोड उत्तर दिलें जाईल अशी त्यांची कल्पना नसावी. तथापि आपल्या प्राणाहून प्रिय अर्धांगीच्या सुकुमार देहाच्या दहनाची कल्पना त्यांना कांहीं केल्या सहन होईना. ते पत्नीला हळूच जवळ ओढून म्हणाले, 'सरकार, लाडके, माझ्या मागून सहगमन करण्यात पुण्य असेल, पण तें अमूर्त आहे, काल्पनिक आहे. तीच तं मागें राहून जर नारायणाच्या हिताला जपशील, तर हजारों नव्हे, लाखो जीवाचा प्रतिपाळ केल्याचे खरेखुरे श्रेय तुला लाभणार आहे, असे नाही का तुला वाटत?'

'मी मागे राहणें—नकोग बाई ती मेली कल्पना!—' रमाबाई स्फुंदत म्हणाल्या, 'म्हणजे स्वतःकरिता रौरव नरकाचे साधन करून घेणेंच आहे, स्वतःचे हित बुडाविणे आहे. आणि जिला स्वतःचे हित साधता येत नाहीं, ती दुसऱ्याचें कितीसे जपणार हें वरच दिसतें आहे! पण मी ह्मणते, या गोष्टी

आतां नको गडे बोलायला! इकडच्या प्रकृतीकरितां मी सोळा निर्जळे सोमवार, लक्ष प्रदक्षिणा असे कितीतरी नवस बोलले आहे, त्यांचा मेला कांहींच कां नाहीं गुण .यायचा तो ?'

श्रीमंत हंसले. पण त्यांच्या स्मितांत पत्नीच्या गुणांच्या कौतुकापेक्षां तिच्या प्रयत्नांस येणाऱ्या फळाविषयीं त्यांना वाटणारी निराशाच अधिक व्यक्त होत होती! आणखी एक घटकाभर त्या प्रेमळ दंपत्याचा संवाद चालला होता. घटकाभरानें रमाबाई ओवरींतून बाहेर पडल्या. सांडणीस्वाराचा गुन्हा माफ झाला.

यानंतरचा आठवडा श्रीमंतांनीं निरवानिरव करण्यांत घालविला. हरिपंत फडक्यानें त्याची हलाल शुश्रूषा केली होती, ह्मणून त्याला श्रीमंतांनी आपले श्रीवर्धनचें देशमुखीचें वतन इनाम करून दिलें. त्याचप्रमाणे कोकणचे सुभेदार रामाजी महादेव हे नुकतेच वारले होते, ह्मणून श्रीमंतांनीं कोकणची सुभेदारीही हरिपंताकडेसच सोपविली. आप्पाजीराव पाटणकर आणि खंडेराव दरेकर सरलष्कर या दोघांचे कर्ज आपण फेडूं, असे श्रीमंतांनी पूर्वी त्याना वचन दिलें होतें; त्याची श्रीमतांना आठवण होऊन, त्यानी त्या दोघास बोलावून आणलें व 'तुमचें कर्ज किती आहे?' असा त्यास प्रश्न केला. श्रीमताच्या प्रश्नाचा आशय लक्ष्यात येताच त्या सरदारास गहिंवर आला आणि 'श्रीमताच्या प्रकृतीला आराम पडल्यावर मग सांगू, आतांच काय गडबड आहे?' असे त्यानीं उत्तर केलें. कार्तिक शुद्ध द्वादशीच्या दिवशी श्रीमंतानी सर्वप्रायश्चित घेतले. त्या प्रसगी त्यांनी लाखो रुपये दानधर्म केला. पुण्यास पाच हजार ब्राह्मणाना नित्य क्षीरभोजन घालण्याचा हुकूम आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून अमलात आलाच होता. त्यावर देखरेख करण्यासाठीं श्रीमंतांनी त्रिंबकराव मामाची योजना केली. कर्ची कामाक्षीला पन्नास हजार मोहरा पाठविण्याचें उदक सोडलें आणि इतर पुष्कळ दानाचेही संकल्प केले. बाळोजी पलांडे, लक्ष्मणपंत आपटे, मोरोपंत भावे आणि इच्छारापंत ढेरे या चौघा खासगीकडील कारकुनाना प्रत्येकी हजार पाचशाचे गाव इनाम करून दिले. बहुतेक हुजरे खिजमतगारास माणस पाहून दोनशे, चारशे याप्रमाणें रुपये बक्षीस दिले. भिवा पोवाराला मात्र श्रीमंतानीं तो नको नको ह्मणत असता हजार रुपयाचा तोडा बक्षीस दिला. मोरोबा पटवर्धनांनें आपण कांहींही घेणार नाहीं असें निक्षून सांगितल्यावरून श्रीमंतानीं त्याचा मुलगा श्रीपतराव याच्या घोड्याला अबदागिरीचा मान करून दिला.

पण वाचकहो, नाना फडणिसास श्रीमंतानी काय दिलें हें जाणण्याची आपणांस उत्कंठा असेल नाहीं बरें? तर मग आपणास आम्ही एकदमच सांगून

टाकतों कीं श्रीमंतांनीं नानांस कांहीं एक दिलें नाहीं. रामावतार खलास करतेवेळीं भगवंतांनीं इतर सर्वांस पारितोषिकें दिलीं पण मारुतिरायांना मात्र कांहीं दिलें नाहीं. तोच प्रकार श्रीमंतांच्या बाबतींत झाला. वरील दृष्टांत पुढें चालवून आम्ही असेंही म्हणतों कीं, भगवंतानीं मारुतीला नश्वर उपायन न देता आपले सर्वस्व दिलें, आपले देवपण दिलें, त्याचप्रमाणें श्रीमंतांनीं नानांना पैसा अडका न देतां आपले अगाध बुद्धिचातुर्य, योजकशक्ति, दीर्घसूत्रीपणा, खोल दृष्टि वगैरे सर्व बिनमोल सद्गुण देऊन टाकले! नाना श्रीमंताचे पट्टशिष्य–प्रतिकल्याण निपजले आणि म्हणूनच त्यानीं आपल्या हयातीत मराठेशाहीच्या वैभवचंद्रिकेच्या वद्य पक्षातही तिच्या मागे लागलेल्या काळराहूंना दूर दूर झुलवीत ठेवलें!

द्वादशीच्या दिवशीं तिसरा प्रहरचे सुमारास श्रीमंताची स्वारी गजाननाचे सभामंडपात येऊन निजली. लगेच सर्व कारभारी मंडळीस आणि नारायणरावांस पाचारण करण्यात आलें. ते सर्वजण जवळ येऊन बसले. दादासाहेब पुण्यास उभा-उभी जाऊन येतो ह्मणून गेले होते. श्रीमतानी एक यादी काढून सर्वांपुढें ठेविली आणि नाना फडणिसास ती मोठ्याने वाचण्यास सांगितलें. नानानीं ती सर्वांस वाचून दाखविली. तिजमध्ये पुढील कलमें होतीः– (१) कोंकणात व देशात इजारे झाल्यामुळे रयतेस सुख नाही, त्यास बारकाईने मनात आणून वाजवीचे रीतीने जसें जाहले असेल ते नीट करून प्रजापालन करावे. (२) श्री काशी, प्रयाग ही दोन स्थळें सरकारात यावीं असा तीर्थरूपाचा हेतु होता. त्यास प्रस्तुत करण्याजोगे दिवस आहेत, दहावीस लक्षाची जहागीर मुबदला पडली तरी देऊन दोनी स्थळे हस्तगत करावीं. प्रयत्न करावा. (३) तीर्थरूप मातुश्रीबाईचा हेतू काशीस जावयाचा आहे. त्यास सुपथ पडल्यावर यात्रा घडवावी. (४) तीर्थस्वरूप भाऊसाहेबाची क्रिया माघमासीं करावी. काकूबाई (सती) जाऊत वा राहूत, उत्तम प्रकारें क्रिया करावी. (५) काशीचे ब्राह्मणास वर्षासने आहेत, ती सिद्धीजाद करून देऊन वर्षास पावती करीत जावी. (६) काशीस दोन लक्ष ब्राह्मणभोजन करावे. दक्षणा दोन पैसेप्रमाणे द्यावी. (७) तीर्थस्वरूप दादासाहेबास निवळ पाच लक्षाची जहागीर लावून द्यावी. याहून थोडेंबहुत अधिक [illegible] त्याचा संतोष राखून मर्जी राखावी. निदान सात लक्षाची जहागीर देऊन मर्जी राखावी. अधिक मागूं लागल्यास ऐकूं नये. (८) श्रावणमासाचा धर्मादाय पूर्वीपासून चालत आला आहे, तसा चालवावा. पाच लक्षाची दौलत राही तावत्कालपर्यंत चालवावा. यासी अनमान करूं नये. (९) दौलतीस कर्ज आहे तें वारावें.

नानांनीं यादी वाचून दाखविल्यावर श्रीमंतांनीं सर्व कारभारी मंडळीस गणपतीची शपथ वाहून तिजवर सह्या करण्यास सांगितलें. श्रीमंतांचें हें मृत्युपत्र सर्वांस सारखें पूज्य असल्यामुळें सर्वांनीं त्यावर ताबडतोब सह्या केल्या. पहिली सखारामबापूंची झाली. नंतर नाना फडणीस, त्यानंतर महादाजीपंत गुरुजी, त्यांच्यामागून कृष्णाजीपंत काळे, अशा क्रमानें कारभाऱ्यांच्या सह्या झाल्यावर सर्वांचे खाली नारायणरावांचें दस्तुर झाले आणि त्याच्या खाली श्रीमंतानीं रुजू घातलें. कारभारी मंडळींचे डोळे अश्रूंनी भरून आले. श्रीमंतांनीं समाधानाचा उसासा सोडला. पण वाचकहो, आठव्या कलमांतील 'पांच लक्षाची दौलत राही तावत्कालपर्यंत चालवावा' या शब्दाचा अर्थ काय असेल बरें ? होय वाचकहो, आपला तर्क बरोबर आहे. आपल्या पश्चात् मराठी साम्राज्याला उतरती कळा लागणार हे भविष्य मनुष्यस्वभाचें आणि देशकालवर्तमानाचे अचूक निदान करणाऱ्या या महाशय पेशव्याला नक्की कळले होतें, आणि ह्मणूनच त्याने त्या कलमात वरील शब्दयोजना केली होती !

---

## प्रकरण ४७ वें

खरे, ले. १२२१- १२२८ इ. } **पहिल्या कलचा ग्रास.** { कार्तिक व. ८ बुधवार शके १६९४. १८-११-१७७२.

श्रीमंताचे अखेरचे दिवस फार क्लेशात गेले. ते कोणाचेही एकतनासे झाले. 'मनस्वी खाणे, तसेंच बोलणें' करू लागले. दररोज अंगात ज्वर भरावा, तो उतरून गेल्यावर ग्लानि येऊन निश्चेष्ट पडावें, सावध झाल्यावर अंगाची भडकर आग व्हावी, असा प्रकार होऊं लागला. शरीराचा दाह होऊ लागला ह्मणजे श्रीमंताना तो सोसेनासा होऊन त्यांनी प्राणांतिक आक्रोश करावा, माशाप्रमाणे तडफडावें, आणि त्याच्या इमानी इष्टमित्राची त्यावर कांही मात्रा चालेनाशी होऊन त्यानी निमूटपणं श्रीमंताच्या यातना पहाव्या आणि त्याच्याकरिता अश्रु ढाळावें, अशी स्थिति झाली. पुढे पुढे अन्न मुळींच बंद झाले, तेव्हा मंडळी त्याना कण्हेर घालू लागली. कार्तिक वद्याच्या प्रारंभास त्याना ओरडण्याचीही शक्ति राहिली नाहीं. देह नुसता अस्थिपंजर मात्र उरला होता. श्रीमंताना आता जिणे नकोसे होऊन ते जीव देण्यासाठीं प्रत्येकापाशी खंजीर मागूं लागले. तो कोणी देईनात. अखेर इच्छारामपंत ढेऱ्याला आणाशपथा घातल्यावरून त्यानें देण्याचें कबूल

केलें, पण त्यानेंही शेवटीं तो दिला नाहींच. तेव्हां श्रीमंतांनीं त्याला मुसक्या बांधून मारविलें ! इच्छारामपंताने शंखवाद्य केलें ! दादासाहेब श्रीमंतांपाशीं जाण्याचें टाळूं लागले. आश्विन वद्यापसूनच ' श्रीमंतांना क्षीणता फार आली, शब्द राहिला. पर्जन्य दिवसास दोन प्रहर रात्रौ दोन प्रहर फारच पडला. चौकी दाट बसली आहे. बातमी कोणासही फुटों देत नाहींत. देवळांत कोणी बसों नये, दर्शन मात्र घेऊन जावें, ' असा प्रकार होता ' सूज सर्वांगास आली आहे. दुसऱ्याने भरवावे, धाकटे राव व हरिपंत भरवितात ' अशी स्थिति दशमीच्या दिवशी झाली. एकादशीच्या दिवशी देवळांत केळीच्या आगोतल्या अंथरून त्यावर श्रीमंत निजले होते. रात्रौ त्यांनी पटवर्धन, रास्ते आणि बाळपणाचे खेळगडी याच्या आठवणी काढल्या होत्या. त्रयोदशीपासून जमीन सारवून त्यावर श्रीमंताची शय्या तयार करण्यात आली. शूद्रस्पर्श बंद झाला. हालचाल थांबली. पण तशा स्थितींतही श्रीमंतांनी कारभारातला एक गुंता उरकून घेतलाच. तो एरडकिऱ्याच्या ठाण्यासंबधीं होय. चित्रदुर्गकर आणि रायदुर्गकर याच्या वकिलाचे समक्ष जो सरकारात अधिक पैसा देईल त्यास एरडकिरे द्यावे, अशी शक्कल त्रिंबकराव मामानें काढली होती, पण श्रीमंतांनीं ती मनावर न घेता चित्रदुर्गकराकडूनच वाजवी खंडणी घेऊन एरडकिरे गाव त्याना देण्याचा हुकूम केला.

चतुर्दशीपासून श्रीमंताचे चलनवलन अगदीच बंद झाले. शिंपीनें तोंडात तरवणी करून रात्रौ घातले. पौर्णिमेच्या दिवशी अमळ बोलता येऊ लागताच श्रीमंतानी नारायणरावास जवळ बोलावून पटवर्धन आणि रास्ते या दोन सरंजामदाराशी घासाघीस न करण्याविषयी उपदेश केला ! ' इतके दुखणेकरी, हालचाल तोडली, शब्द राहिला, तरी लोक अजून चळचळा कापतात, ' अशी श्रीमताची जरब होती. देवळाच्या गाभाऱ्यात अनुष्ठानाला ब्राह्मण लावले होते, त्यांचीं बारा निश्चक्र उपोषणं झालीं, पण कोणास कसलाही दृष्टांत झाला नाही ! पौर्णिमेपासून श्रीमत आपल्या अगास कोणासच हात लावू देईनातसे झाले. रणछोड व रूपेश्वर हे दोघेही वैद्य जवळ बसून होते, त्यानी काय पाहिजे ह्मणून विचारलें ह्मणजे " अंते समयी मला अतिसार होण्याचे औषध द्या, नाही तर गजाननाचे स्मरण व्हावयाचें नाही " अशी श्रीमंत त्या वैद्याना विनंती करीत. रमाबाई साहेबांनीं मात्र पतिभक्तीची शर्थ केली. वद्य प्रतिपदेपासून तो वद्य सप्तमी पर्यंत त्या श्रीमंताच्या पायाशी अन्नपाण्याविणे बसून होत्या. त्या विवेकाने रडें आवरीत होत्या व ईश्वराची कृपा भाकीत होत्या. वैद्यानीं व आप्तेष्टांनीं त्याना पुष्कळ प्रकारें सांगून पाहिलें, पण त्यांनीं आपला निग्रह सोडला नाहीं.

वद्य अष्टमीचा दिवस उजाडला. आज बुधवार होता. सकाळीं प्रहर दिवस आला होता. श्रीमंतांना एकाएकीं वाचा आली आणि त्यांनीं नाना फडणिसांना ‘ अनुष्ठानाच्या ब्राह्मणांस बोलवा ’ अशी आज्ञा केली. त्यांनीं सर्व ब्राह्मण गाभाऱ्यांतून बोलावून आणलें. ब्राह्मणास पाहतांच श्रीमंतांनीं ‘ आह्मी महायात्रेस जातों, आमच्या स्वारीची तयारी करा ’ असें ह्मणून त्यांना हात जोडले ! ब्राह्मण ढळढळा रडूं लागले. रमाबाईनीं हंबरडा फोडला. पार्वतीबाई धांवत येऊन आक्रोश करूं लागल्या. सर्व कारभारी, कारकून, प्यादे, भोंवती जमा झाले. दादासाहेब व नारायणराव लगबगीने येऊन श्रीमंताजवळ बसले. श्रीमंतांनीं नारायणरावाचा हात मोठ्या कष्टाने उचलून दादासाहेबाच्या हातीं दिला, आणि आपले निस्तेज डोळे त्याच्याकडे लाविले. दादासाहेबानी त्यांचा आशय ओळखून डोळयांत पाणी आणलें आणि ‘ मी नारायणाला जिवापलीकडे जपेन वर बाळ ! ’ असे उद्गार काढले. तत्काळ श्रीमंतांच्या चेहऱ्यावर समाधानाची छटा पसरली आणि ‘ गजानन, गजानन, ’ असा घोष करीत त्यानी नेत्रद्वारे प्राण सोडला ! नंतर तेथे जो आकांत झाला तो वर्णन करावयास आमची लेखणी असमर्थ आहे.

---

## उपसंहार.

—:0:—

मुळामुठेच्या काठी बिल्व-तुलसी चंदनादि काष्ठांची चिता रचून श्रीमंतांचे दहन करण्यात आलें. संकल्पाप्रमाणे श्रीमंत सकलसौभाग्यवती रमाबाई साहेब सती गेल्या. जाताना त्यांनी आपलें जवाहीर व अलंकार गोरगरिबास वाटून टाकले, आणि धर्मशिलेवर चढून त्यांनी नारायणरावाचा हात दादासाहेबाचे हातीं दिला व ‘सर्वांचे वडिलपणें यथास्थित चालवावें’ अशी त्यास विनंति केली. मोठमोठे सरदार, मुत्सद्दी, शिपाई, कारकून, प्यादे, वगैरे हजारो लोक त्याच्या पायावर डोकें ठेवून जात होते, त्या पैकीं कोणास आंगठी, कोणास मोहोर, कोणास पुतळी, कोणास रुपाया, याप्रमाणे त्यांनी सर्वांस खैरात केली. अखेर साऱ्या मंडळीना नमस्कार करून त्या शांत वृत्तीने चितारूढ झाल्या, आणि अग्नीच्या ज्वालांत पतीशी एकरूप झाल्या ! हल्लीं थेऊर येथील सुंदर घाटावर जें वृंदावन आहे, तें या सती-सावित्रीचें मुक्तिमंदिर होय !

श्रीमंतांच्या स्मरणाकरितां थेऊर येथें लवकरच घाट बांधण्यांत आला, तो 'सुंदर घाट' या नांवानें हल्लीं प्रसिद्ध आहे. नारायणरावांनीं श्रीमंतांचें उत्तरकार्य

## थेऊर येथील श्रीमंतांची अक्षय निवासभूमि.




यथासांग केलें. तें झाल्यावर सर्व मंडळी गांवोगांव निघून गेली. दहाव्या दिवशीं पिंडास कावळा शिवेना. त्यावेळीं नाना फडणीस वगैरे मंडळींनीं संकल्प

केला कीं, ‘ नारायणरावांस पुत्र झाला तर त्याचें नांव माधवराव ठेऊं. ’ त्यांनीं असा संकल्प करितांच पिंडास कावळा शिवला !

बन्सीधर महाराजांचें पुढें काय झालें तें कोणासच कळलें नाहीं. नाहीं म्हणावयास शिवरामभटाला नाशिकच्या मुक्कामीं एक ओळखीचा भिल्ल भेटला, त्यानें गरुडेश्वरावर एका बैराग्यानें जलसमाधि घेतल्याची हकीगत त्याला सांगितली. मग हा बैरागीच बन्सीधरबोवा असला तर न कळे.

खंडो दीक्षितादि दादासाहेबांचे आश्रित पुरंदरचे किल्ल्यावर डांबले गेल्याचें वाचकांना कळलेंच आहे. गोपाळभट लिमयाला तेथें आधींच ठेवण्यांत आले होतें. श्रीमंत मेल्यावर आपली सुटका होईल अशी या मंडळींना फार आशा होती, पण तूर्त तरी ती सफळ झाली नाहीं. मात्र श्रीमंतांच्या अंगाची मरतेवेळीं फार काहिली होत होती ही बातमी ऐकून खंडो दीक्षितांना त्यांतल्या त्यांत समाधान वाटलें आणि त्यांचा हात चटकन् आपल्या कडोसरीकडे गेला ! त्यांच्या कनवटीच्या तपकिरीच्या डबीचा श्रीमंतांच्या अंगाच्या दाहाशीं काय संबंध होता हें वाचकांना ठाऊकच आहे.

कान्होबा शतघ्ने मात्र आतां फार सावधगिरीनें वागूं लागले. विशेषतः रोग्याचें निदान करण्यांत ते अधिक खबरदारी घेऊं लागले. राजवैद्य होण्याची हांव त्यांनीं सोडली, आणि वैद्यराज म्हणवून घेण्यांतच ते तृप्त राहिले.

श्रीमंतांच्या मृत्यूची वार्ता ऐकून धुळप मंडळी फार हळहळली. म्हातारा जानराव तर सारा दिवसभर झिंज्या उपटून घेत होता ! त्याच रात्रीं हंसा बाळंतीण होऊन तिला मुलगा झाल्याची बातमी त्याला कळली, तरी त्याचें दुःख कमी झालें नाहीं. दुसऱ्या दिवशीं पणतोंडाचें प्रत्यक्ष दर्शन त्याला झाल्यावर त्याचा दुःखावेग किंचित् कमी झाला. पणतूचें नांव त्यानें ‘ हरबाजी ’ असें ठेवलें.

मुमताज आतां पूर्ण सुखी होती. तिच्या पवित्र सहवासात लालामियाच्या दुर्व्यसनाला बराच आळा बसला. त्याने यापुढें हिंदु स्त्रियांवर अत्याचार केल्याचा बोभाटा ऐकूं आला नाहीं. निदान मुमताजनें परशुरामभाऊंना नुकत्याच पाठवि लेल्या पत्रांत तशी खात्री दिली होती.

वॉरन हेस्टिंग्सची मद्रास येथील कामागिरी पूर्वीच पुरी झाली होती. दक्षिण कर्नाटकांतील कपाशीचा व्यापार कंपनीच्या पुरतेपणीं ताब्यांत आला होता. त्याची चोहोंकडे बोलबाला झाली होती. लवकरच बंगाल प्रांतांतून त्याला निमंत्रण येऊन त्यानें सन १७७२ च्या फेब्रुवारी महिन्याच्या प्रारंभीं कलकत्यास प्रयाण केलें.

त्याच्या बरोबर इमहॉफ दंपत्यही गेलें. काडीमोडीच्या दाव्याचा निकाल कलकत्यास व्हावयाचा असल्यामुळें बॅरन इमहॉफ तेथें जाण्यास कबूल झाला. चिकबाळाप्पाची अवस्था मात्र अत्यंत शोचनीय झाली. कर्नाटकी शेतकऱ्यांचा राबता एक दोन वर्षे कंपनीकडे पडतांच कंपनीचे लोक त्याला विचारीनातसे झाले. पुढें पुढें तर त्यांनीं त्याच्या दलालीचा दरही कमी केला. इकडे त्याचे व्यवसाय बंधु त्याला शिव्याशाप देत होतेच. अशा स्थितींत एके दिवशीं कंटाळून त्यानें अफू खाऊन जीव दिला!

आपलें बिंग श्रीमंतांच्या कानांवर जाईल कीं काय अशी जी त्रिंबकरावमामा पेठ्यांना एकसारखी धास्ती वाटत असे, ती आतां राहिली नाहीं. शेषम्माचा विरह त्यांना कितपत जाणवला हें कळण्यास मार्ग नाहीं, तथापि एवढी गोष्ट खरी कीं; यापुढें पुण्यांतील कोणत्याही कलावंतिणीचें गाणें किंवा नाच त्याना पसंत पडला नाहीं. कितीही कुशल कलावंतिणीचें गाणें चाललें असलें, तरी 'त्यांत कर्नाटकी ढंग नाहीं' असें ते ह्मणत.

परकीय असूनही श्रीमंतांच्या निधनाचें सर्वांत अधिक दुःख कोणास झालें असेल तर तें डाक्तर कनिंगहॅम यास होय. श्रीमंतांच्या पश्चात् पुण्यास राहण्यास त्याचें मन घेईना. थोड्याच दिवसांत आपलें बाड बिछाड घेऊन तो सुरतेस निघून गेला.

पेशवे मंडळी पुण्यास परत गेली. दादासाहेबांनीं 'वडिलपणें सर्वांचें चालविण्याचा' बेत केलेला दिसला. पार्वतीबाईचें दुःख मात्र बरेच दिवस कमी झालें नाहीं

वाचकहो, प्रस्तुत कथानक समाप्त झालें आहे. हैदरअल्लीला नामोहरम करून व त्याचें राज्य उलथें पालथें करून मराठी फौजा परत फिरल्या, एवढया वरून खरें ह्मटलें असता मराठेशाहीच्या पूर्णचंद्राचा प्रकाश अधिकच उठून दिसावयास पाहिजे होता, पण एका श्रीमंत रावसाहेबांच्या मृत्यूनें दुधाच्या हंड्यांत मिठाचा खडा पडल्याप्रमाणें झालें! चंद्राच्या एका कलेचा ग्रास झाला, आणि तो तितक्या प्रमाणात फिका दिसूं लागला. यापुढचें आमचे कर्तव्य उत्तरोत्तर शोकजनकच होत जाणार हें आमच्या इतिहासज्ञ वाचकास सांगावयास नकोच, तथापि 'पुढच्यास ठेच, मागचा शाहाणा' या न्यायानें आमच्या पूर्वजांनीं यापुढील राजकारणात ज्या चुका करून स्वराज्य घालविलें तशा चुका पुढील स्वराज्यप्राप्तीच्या काळांत आमच्या हातून होऊं नयेत, अशी आमची मनापासून इच्छा असल्यामुळें

आम्ही हा उद्वेगजनक इतिहास वाचकांपुढें ठेवणार आहोंत. तो कितीही उद्वेगकारक असला तरी त्याच्या चिंतनांतही एक प्रकारची बोधप्रद रंजकता उत्पन्न होणा आहे अशी आमची खात्री असल्यामुळें, यापुढील वध ' द्वितीयेच्या ' कथान काच्या श्रवणाकरितां वाचकांस प्रेमपुरःसर निमंत्रण देऊन आम्ही त्यांचा तू निरोप घेतों.

---

समाप्त.